ओंकार ट्रस्ट

# कल्याणी २०१०

## भगवान श्रीरामकृष्ण परमहंस विशेषांक





स्थापकाय च धर्मस्य सर्वधर्मस्वरूपिणे ।
अवतारवरिष्ठाय रामकृष्णाय ते नमः ।।




**उद्याच्या उज्वल भवितव्यासाठी**

## ओंकार ट्रस्ट

(स्थापना २६ जुलै १९९१)
'विसावा' अनिकेत सोसायटी नं. १
बिबवेवाडी, पुणे - ४११ ०३७
टेलिफोन क्र. ०२०-२४२१००४७
मुंबई सार्वजनिक विश्वस्त कायदा १९५० अन्वये
नोंदणीकृत संस्था नोंदणी क्रमांक
ई १५०५ दिनांक १० ऑक्टोबर १९९१
कलम ८० ग खाली आयकर सवलत





**संस्थापक कार्यवाह**
कै. सौ. वसुंधरा भा. सातवळेकर



**संस्कार वर्ग संचालक**

| | |
|---|---|
| **सौ. ज्योती शेटे** | **सौ. सुनिता देशपांडे** |
| **सौ. लता खरे** | **सौ. रेखा मिटकर** |
| **सौ. लतिका कुलकर्णी** | **श्रीमती मालती निमोणकर** |

ओंकार ट्रस्ट २०१० चा "**भगवान श्रीरामकृष्ण परमहंस**" विशेषांक, संपादक श्रीमती रजनी गोपाळ काळे, ट्रस्टी यांनी प्रतिमा ऑफसेट, पुणे - २९ येथे छापून श्री. भालचंद्र वा. सातवळेकर, ट्रस्टी यांनी 'विसावा' अनिकेत सोसायटी क्र. १, बिबवेवाडी, पुणे - ४११ ०३७ येथे प्रकाशित केला आहे.

टीप : १) सदरचा विशेषांक **फक्त खासगी वितरणासाठी** आहे.
२) या अंकात प्रसिद्ध झालेल्या लेखनाशी संपादक सहमत असतीलच असे नाही.

**मुखपृष्ठ संकल्पना**
श्री. अभय व सौ. अंजली पुरंदरे

**अक्षरजुळणी**
प्रतिमा ऑफसेट

**प्रोसेसिंग**
चित्रभारती प्रोसेसर, सदाशिव पेठ, पुणे.

**छपाई**
प्रतिमा ऑफसेट, पुणे - २९. फोन : २५४६०२१६

# अध्यक्षीय मनोगत

ऑकार न्यासाचा एक विश्वस्त म्हणून मी सन १९९८ पासून न्यासाच्या कार्याशी निगडीत आहे. त्याचे अगोदरही न्यासाच्या कार्यात माझा अत्यल्प सहभाग होता. नुकतीच या न्यासाच्या अध्यक्षपदाची जबाबदारी माझेवर विश्वस्त मंडळाने सोपविली आहे. त्यांच्या विश्वासास पात्र ठरण्याकरीता माझ्या दृष्टीने मी निश्चितच प्रयत्नशील असेल असे मी सर्वांना आश्वस्त करु इच्छितो.

''शिवभावे जीवसेवा'' या उक्तीवर न्यास व न्यासाचे सर्व विश्वस्त पहिल्यापासून कार्य करीत आहेत. न्यासाच्या कार्याचा सन २००९-१० चा अहवाल अंकात प्रकाशित करण्यात आला आहे. त्यासंबंधी मी न लिहीता आमचे न्यासाकडून आणखी कार्य व्हावे म्हणून मी आमच्या हितचिंतकाना, वाचकांना, देणगीदारांना विनंती करतो की त्यांनी कार्यासंबंधीच्या काही सूचना असल्यास आम्हांस जरुर कळवाव्यात. योग्य सूचनांचा आम्ही निश्चित स्वीकार करु.

कल्याणीचा १९ वा ''भगवान श्रीरामकृष्ण परमहंस'' हा विशेषांक प्रकाशित करताना मला फार आनंद व समाधान लाभत आहे. रामकृष्ण मठ, पुणे यांचे अध्यक्ष स्वामी भौमानंदजी महाराज व स्वामी सुविज्ञेयानंदजी महाराज यांनी या अंकासाठी बहुमोल मार्गदर्शन केले आहे. त्यांचे आम्ही ऋणी आहोत. भगवान श्रीरामकृष्ण परमहंस यांचेवरील श्रद्धा व भक्तिप्रेमाने लेखकांनी भरभरुन लेख दिले आहेत. आतापर्यंतच्या अंकांना आमच्या वाचक बंधु-भगिनींनी भरभरुन प्रतिसाद दिला असून हाही अंक आपणास आवडेल व असाच प्रतिसाद मिळेल याची खात्री आहे.

न्यासाचे सामाजिक प्रकल्प आणखी वाढविण्याचा आमचा मानस आहे. त्यासाठी आपल्या सर्वांकडून अपेक्षा अशी आहेत की - १) आमचे कार्यात सहभाग २) देगणीरुपाने सढळ मदत. देणगीदारांना ८० ग अन्वये प्राप्तीकरांत सूट मिळते.

आपण आमचेवर जो विश्वास दाखविला आहे त्याला आम्ही कोणत्याही प्रकारे तडा जाऊ देणार नाही याची खात्री बाळगा.

धन्यवाद !

**म. वा. सरदेशपांडे**
(अध्यक्ष, ऑकार ट्रस्ट)



PHONES PBX : (033)
2654-1144 2654-5700
2654-1180 2654-5701
2654-5391 2654-5702
2654-9581 2654-5703
2654-9681 2654-8494
FAX : 033-2654-4071
E-Mail : president@rkmpresident.org
office@rkmpresident.org




**RAMAKRISHNA MATH**
P.O. BELUR MATH, DIST. HOWRAH
WEST BENGAL : 711 202
INDIA

*Sri Ramakrishna Sharanam!*

# MESSAGE

*February 23, 2010*

I am pleased to know that the Omkar Trust has been carrying out various service activities since 1991, inspired by the ideal of '*Shiva Jnane Jiva Seva*'. I am also glad to know that you are involved in spreading the ideas and ideology of great saints and Incarnations by publishing a yearly issue, '*Kalyani*', containing articles from eminent writers.

I am very happy to know that you have chosen to focus on Sri Ramakrishna this year. The life and teachings of Sri Ramakrishna are a great source of inspiration for the present age. I sincerely hope that the issue is able to articulate the wonderful personality of Sri Ramakrishna to the society at large.

May this noble effort be successful by the grace of Bhagavan Sri Ramakrishna is my earnest prayer!

(Swami Atmasthananda)
*President*
Ramakrishna Math &
Ramakrishna Mission

Sri M. V. Sardeshpande
*Chairman*
Omkar Trust
'VISAVA', Aniket Society
No. 1, Bibwewadi Road, Pune – 411 037

# संपादकीय



**स्थापकाय च धर्मस्य सर्वधर्मस्वरुपिणे ।**
**अवतार वरिष्ठाय रामकृष्णाय ते नमः ।।**

योद्धा संन्यासी स्वामी विवेकानंद यांनी वरील श्लोकांत जे वर्णन केले आहे ते भगवान श्रीरामकृष्ण परमहंस यांचे जीवन चरित्र डोळ्यांपुढे उभे करते.

भगवान श्रीरामकृष्ण परमहंसांचे आई वडील नुसतेच धार्मिक होते असे नाही तर त्यांना ईश्वराने साक्षात्काराद्वारे त्यांचे पोटी येणारे बालक (भगवान श्रीरामकृष्ण) यांच्या अलौकिकत्वाची ग्वाही दिली होती.

१९ व्या शतकातील परिस्थितीला योग्य असा देवमानव जन्माला आला. गीतेत म्हटल्याप्रमाणे -
**यदायदाही धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ।**
**अभ्युत्थानम धर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ।।**
**परित्राणाय साधूनां विनाशायच दृष्कृताम् ।**
**धर्म संस्थापनार्थाय संभवामि युगे युगे** ।। ४/७-८

भगवान श्रीकृष्णांनी दिलेले वचन भगवान श्रीरामकृष्ण परमहंस यांच्या रुपाने या देशात अवतीर्ण झाले. लहानपणापासून देवाबद्दल परमप्रेम, निसर्ग आणि भक्ती गीत यामुळे ध्यानावस्था येत असे. यामुळे हा बालक जगावेगळा आहे असे माता पित्यानां वाटू लागले. 'पोटभरु विद्या मला नको' असे आपल्या वडील बंधूंना सांगणारे भगवान श्रीरामकृष्ण परमहंस यांनी आपल्या जीवनकाळात मंत्र, तंत्र, विद्या आत्मसात करुन ख्रिश्चन व इस्लाम धर्माचा तीन दिवसांत अभ्यास करुन त्यांना येशू व महंमद यांचे दर्शन झाले. ठाकुरांच्या अलौकिक भक्तीमुळे श्रीकृष्ण, श्रीराम व हनुमान यांनी त्यांना पावन केले.

त्यांनी कामिनी कांचनाचा त्याग करुन, आपल्या पत्नीला देवीप्रमाणे मानून तिची पूजा केली. प. पू. सारदा मातांना बरोबरीने वागवून त्यांचा योग्य तो सन्मान केला.

स्वामी विवेकानंदांसारखा शिष्य तयार करुन जगाला दाखवून दिले की सर्वधर्म एकच आहेत. 'जितकी मते तितके मार्ग' देवाकडे जाण्याचे आहेत. निर्गुण मानणाऱ्या सुशिक्षित स्वामी विवेकानंदांसारख्या योद्धा संन्यासाला काली मातेला मानावे लागले यातच त्यांची थोरवी दिसून येते.

सामान्यापासून विद्वानापर्यंत, ब्राह्मो समाज, आर्य समाज या सर्वांना त्यांनी आपले केले. जो ज्या मार्गाचा असेल त्याप्रमाणे ते वागत असत.

अशा भगवान श्रीरामकृष्ण परमहंसांवर अंक काढण्याचे ठरल्यावर प्रश्न पडला की विषय कोणते असावेत? कारण त्यांचे लिखाण काही नाही. त्यांचे थोर शिष्य 'श्री. म.' यांनी लिहिलेले 'श्रीरामकृष्णवचनामृत' हा मोठा आधार होता. परंतु रामकृष्ण मठ पुणे येथील प. पू. स्वामी भौमानंदजी महाराज व स्वामी सुविज्ञेयानंदजी महाराज या उभयतांनी आम्हांला बहुमोल सहाय्य व मार्गदर्शन केले. विषय, लेखक यांची मोठी सूची स्वामी सुविज्ञेयानंदजी महाराजांनी दिली. स्वामी सुविज्ञेयानंदजी महाराज यांनी सुचविल्याप्रमाणे अंकातील लेखांचे पुढील प्रमाणे वर्गीकरण करुन ठाकुरांचे जीवन दर्शन दाखविणाचा प्रयत्न केला आहे. १) चरित्रात्मक २) सर्वसाधारण ३) तुलनात्मक आलोचन ४) श्रीरामकृष्ण आणि भारतीय धर्मशास्त्र ५) साधना तत्त्व. स्वामी सुविज्ञेयानंदजी महाराजांनी वेळोवेळी योग्य मार्गदर्शन केले. त्यामुळे आमचा भार फारच हलका झाला. आम्ही त्या उभयतांचे ऋणी आहोत.

भगवान श्रीरामकृष्ण परमहंसांच्या अभ्यासकांनी व विचारवंतांनी आपले लेख देवून आम्हालां उपकृत केले आहे. त्यामुळेच आम्ही हा अंक सादर करीत आहोत याची आम्हांला जाणीव आहे. त्या सर्वांचे आम्ही मनःपूर्वक आभार मानतो. तसेच जाहिरातदार व हस्ते परहस्ते मदत करणारे हितचिंतक या सर्वांचे ऋणांत रहाणे योग्य ठरेल. गेली १९ वर्षे कल्याणी अंक अखंडपणे प्रकाशित होत आहे याचे सर्व श्रेय ज्या साधुसंतांवर आम्ही अंक प्रकाशित केले त्यांना, तसेच लेखक, कवी, जाहिरातदार व आपण सर्व सुजाण वाचक यांनाच आहे. म्हणूनच भगवान श्रीरामकृष्णांच्या मुखारविंदांतून पाझरलेल्या ज्ञानामृतसागरातील काही थेंब या 'कल्याणीच्या' कलशात गोळा करुन आम्ही वाचकांस सुपूर्त करीत आहोत, ज्यायोगे भगवान श्रीरामकृष्णांच्या वचनामृत सागरात आखंड डुंबण्याची प्रेरणा त्यांस मिळावी.

।। जय जय रघुवीर समर्थ ।।

**रजनी काळे**



# वाटचाल २००९-१०

सामर्थ्य आहे चळवळीचे । जे जो करिल तयाचे । परंतू तेथे भगवंताचे । अधिष्ठान पाहिजे ।। श्रीराम ।।श्री समर्थांच्या या शिकवणीतील मर्म अचूक ओळखून श्रीसमर्थशिष्या सौ. वसुंधरा सातवळेकर ऊर्फ दिदींनी गुरुपौर्णिमा १९९१ रोजी ओंकार ट्रस्टची स्थापना केली. 'शिव भावे जीव सेवा' हे संस्थेचे उद्दिष्ट. मनाच्या आरोग्यासाठी संस्कार वर्ग, ध्यानशिबीरे तर शरीर संपदेसाठी आय कँप, कॅन्सर चिकित्सा शिबीर, मधुमेह चिकित्सा शिबीर तसेच सर्वसाधारण आरोग्यासाठी तपासणी शिबीर इत्यादी कामे संस्थेमार्फत केली जातात. गरजू व हुशार विद्यार्थीनीला / विद्यार्थ्याला उच्च शिक्षणासाठी शिष्यवृत्ती, १० वी परीक्षेत संस्कृत व मराठी विषयात प्रथम येणाऱ्या विद्यार्थी / विद्यार्थीनीस विशेष पारितोषिक तर खेड्यांतील दोन मुलांना त्याच्या शिक्षणासाठी आर्थिक मदत अशी शिक्षण क्षेत्रातही लहान मोठी कामे ट्रस्ट मार्फत केली जातात. संस्थेच्या नैमित्तीक कार्याचा परिचय आपणा सर्वांना आहेच.

आता जरा नजर टाकूया २००९-१० या वर्षात झालेल्या काही ठळक घडामोडींकडे. २९ एप्रिल २००९ रोजी 'कल्याणी' आद्य शंकराचार्य विशेषांकाचे प्रकाशन फुलगावच्या स्वामी स्वरुपानंद सरस्वती यांचे हस्ते झाले. आद्य शंकराचार्यांचे वाङ्मय संस्कृत मधे, पण मराठीतून त्यांच्या अद्भुत वाङ्मयाची ओळख करुन देण्याची संधी आम्हांला या अंकामुळे लाभली. त्याच दिवशी ससुन मित्र मंडळ म्हणजेच सोफोश (श्रीवत्स)च्या संचालिका सौ. माधुरीताई अभ्यंकर यांना 'वसुंधरा कृतज्ञता' पुरस्काराने सन्मानित करण्यात आले. विशेष म्हणजे या कार्यक्रमाला रामकृष्ण मठ, पुणेचे अध्यक्ष स्वामी भौमानंद महाराज, श्री साखरे महाराज, आळंदी, फुलगावचे स्वामी स्वरुपानंद सरस्वती आणि सोफोशच्या संचालिका सौ. माधुरीताई अभ्यंकर हे सारे दिग्गज एकाच व्यासपीठावर उपस्थित होते. हा आमच्या ओंकार ट्रस्टचा सन्मान होता.



१२-९-२००९ रोजी अक्षरभारती या संस्थेने ट्रस्टला ५०० पुस्तके भेट देऊन गुजरवाडी, निंबाळकरवाडी येथील बाल-मित्रांसाठी वाचनालय सुरु केले. १४-९-२००९ रोजी श्री. सुनिलजी चिंचोलकर यांनी याच गावातील मुलांना एकत्रित करुन आपल्या सुरेल वक्तृत्त्वाने मंत्रमुग्ध केले. अर्थासह मारुती स्तोत्र, विद्यार्थ्यांचे रामदास अशा छोट्या छोट्या पुस्तिकांचे वाटप करुन त्यांना पाठांतराचीही गोडी लावली. ३-१०-२००९ रोजी स्वरुप वर्धिनिचे श्री. ज्ञानेश पुरंदरे यांचा वाडीतील छोट्यांसाठी कथा कथनाचा कार्यक्रम झाला. या तीनही कार्यक्रमांसाठी वाडीतील छोटी मंडळी एवढ्या मोठ्या संख्येत उपस्थित होती की आम्हांला शेवटी भिती वाटायला लागली की आम्ही त्यांच्यासाठी आणलेला खाऊ कमी पडतो की काय?

२२, २३ आणि २४ डिसेंबर २००९ रोजी आयोजित केलेली व्याख्यान माला प्रा. मिलिंद जोशी, श्री. ज्ञानेश पुरंदरे आणि श्री. अविनाश हळबे यांनी सुशोभित केली. ''साहित्यातील दोन शिवाजी'' या विषयातून श्री. मिलिंद जोशी यांनी कै. डॉ. शिवाजी सावंत व डॉ. शिवाजीराव भोसले यांच्या साहित्यातील कंगोरे श्रोत्यांसमोर उलगडले. श्री. ज्ञानेश पुरंदरे यांनी ''हाची करावा विवेक'' या विषयांतून जेष्ठांनी आपल्या प्रापंचिक कर्तव्यात विवेक बाळगून कुटुंबातील लहानांना कशी मदत करावी, त्यांना कसे सुसंस्कारक्षम बनवावे याचे सुरेख मार्गदर्शन केले. पाश्चिमात्य संस्कृती आणि पाश्चिमात्य जीवनपद्धती याकडे सध्या सर्वच भारतीय आकृष्ट होत आहेत. ''मेरा भारत महान'' या आपल्या व्याख्यानातून श्री. हळबे यांनी भारत देश हा ज्ञान, विज्ञान, जीवन पद्धती, संस्कृती, इतिहास आणि भौगोलिक स्थिती या सर्वच बाबतीत किती श्रेष्ठ आहे हे बारीक सारीक उदाहरणे देऊन स्पष्ट केले. कोणाही भारतीयाच्या मनात आपल्या देशाचे प्रेम कायम स्वरुपी वृद्धींगत होत राहील असे त्यांचे भाषण होते.



१३, १४ व १५ मार्च २०१० या दिवशी श्रीसमर्थ भक्त श्री. सुनिलजी चिंचोलकर यांची तीन दिवसांची व्याख्यान माला आयोजित करण्यात आली होती. प्रयोजन होते संस्थेच्या संस्थापिका कै. सौ. वसुंधरा सातवळेकर यांच्या स्मृती दिनाचे आणि विषय होता 'श्रीसमर्थांचा आत्माराम'. त्यांचे व्याख्यान नेहमीप्रमाणेच रंगतदार झाले हे सांगणे नलगे.

या कार्यक्रमाबरोबरच चालू वर्षात संस्थेने आणखी दोन मुली दत्तक घेतल्या आहेत. वाडीतील मुलांना आणि बायकांना विविध हस्तकला, भेटकार्ड, तसेच टाकाऊतून टिकावू बनविण्याचे प्रशिक्षण श्रीमती निमोणकर मावशींच्या देखरीखीखाली सौ. वैशाली रणावरे आणि श्रीमती वैशाली जगताप देत असतात. निसर्गाच्या सानिध्यात आणि आजीच्या संस्कारात ज्यांचे बालपण वाढीला लागले आहे अशा आमच्या मुलांबरोबर जरा वेगळी वाट करुन शहा कुटुंबीय तसेच रामकुमार कुटुंबीय यांनी आपल्या नातीचा आणि कुटुंबातील इतर नातेवाईकांचा वाढदिवस साजरा केला. श्री. किशोर वैद्य यांच्या सारखे काही वेगळे करण्याची आवड असणारी माणसे मुलांना 'गीता' शिकविण्यासाठी येत असतात तर सिंहगड इंस्टिट्यूट मधील काही विद्यार्थी विद्यार्थीनी आपला अभ्यास सांभाळून मुलांना गणित आणि सायन्स शिकवायला येतात.

कणाकणांनी संस्थेचे रोपटे वाढते आहे. दिदींच्या आशिर्वादाचे आणि कृपेचे खत पाणी त्याला मिळत आहे. तर आपल्यासारख्या हितचिंतकांची सावली त्याला लाभली आहे. असाच आपणा सर्वांचा कृपालोभ असावा. आपापल्या इच्छेनुसार, शक्तीनुसार रोपट्याच्या वाढीसाठी आपण सर्वांनी हातभार लावावा हीच प्रार्थना.

।। जय जय रघुवीर समर्थ ।।



'आद्य शंकराचार्य विशेषांकाचे प्रकाशन फुलगावचे स्वामी स्वरुपानंद सरस्वती यांचे हस्ते



सोफोश (श्रीवत्स)च्या संचालिका सौ. माधुरीताई अभ्यंकर 'वसुंधरा कृतज्ञता' पुरस्कार स्विकारताना.



'आद्य शंकराचार्य विशेषांकाचे प्रकाशन समारंभावेळी प्रमुख पाहुण्यांसमवेत ओंकार न्यासाचे विश्वस्त





ओंकार न्यासाने दत्तक घेतलेल्या मुलांसमवेत न्यासाचे विश्वस्त व स्पर्धेतील सहभागी मुले



न्यासाने आयोजित केलेल्या प्रशिक्षणातील एक उपक्रम




''ओंकार'' न्यासातर्फे दरवर्षी ''वसुंधरा-कृतज्ञता पुरस्कार प्रदान करण्यात येतो.
सन २००८-२००९ व्या वर्षासाठी 'सौ. माधुरीताई अभ्यंकर' यांना हा पुरस्कार प्रदान करण्यात आला होता.
त्यावेळी प्रदान करण्यात आलेले मानपत्र सर्वांच्या माहितीसाठी या अंकामध्ये प्रसिद्ध करत आहोत.

## वसुंधरा कृतज्ञता पुरस्कार २००८-२००९
## सौ. माधुरीताई अभ्यंकर

# गुणगौरव

व्यक्ती तितक्या प्रकृती अशी मराठीत म्हण आहे. श्री समर्थांनी ढोबळ मानाने याचे रजोगुणी, तमोगुणी व सत्त्वगुणी अशा तीन गुणांत वर्गीकरण केले आहे. परपीडेचे वाहे दुःख । परसंतोषाचे सुख । वैराग्य देखोन हरिख मानी तो सत्वगुण । अशा वृत्तीची माणसे हाताच्या बोटावर मोजण्या एवढीच.

माधुरीताई आपले वर्गीकरण तिसऱ्या वर्गात होणारे आहे. आपल्या सारखी माणसे विरळाच. दुसऱ्याचे दुःख आपले दुःख मानणे आणि दुसऱ्याच्या सुखात आपले सुख शोधणे हे येऱ्या-गबाळ्याचे काम नाही. जनसेवेचे बाळकडू आपल्याला आईकडूनच मिळाले होते. दुसऱ्याचे अश्रू पुसण्याची शिकवणही आपल्या माऊलीने आपल्याला लहानपणापासून दिली होती. पेरावे ते उगवते या श्रीसमर्थांच्या उक्तीप्रमाणे दुसऱ्यासाठी जगण्याचे संस्कार आपल्या बाळमनावर रूजवले गेले आहेत.

१६ जानेवारी १९६१ साली गिरगांव मुंबई येथे एका सधन, सुशिक्षित आणि सुधारणावादी रानडे कुटुंबात आपला जन्म झाला. ९व्या- १०व्या वर्षीच आपले पितृछत्र हिरावले गेले. आपल्या मातोश्रींनी आई- बाबा या दुहेरी भूमिकेतून आपल्याला वाढविले. आपल्यावर सुसंस्कार केले. मुंबई महानगरपालिकेच्या शाळेत शिक्षिकेची नोकरी करणाऱ्या आपल्या आईबरोबर आपणही त्यांच्या शाळेत जात होतात. आजुबाजूच्या वस्त्यातून अनवाणी, डब्याविना येणाऱ्या विद्यार्थ्यांना आपण जवळून पाहिले होते. त्यामुळे दुःख म्हणजे काय याचा अनुभव आपल्याला बालपणापासून येत होता. या दुःखावर फुंकर घालण्यासाठी आई करीत असलेले प्रयत्न आपण अगदी जवळून अनुभवत होतात. शालेय शिक्षणा बरोबरच दुसऱ्याचे दुःख हलके करण्याचे शिक्षणही गुरू समान मातेकडून आपल्याला मिळत होते. याचाच परिणाम म्हणून आपण बी.ए. झाल्यानंतर एम.एस्.डब्लू. म्हणजेच मास्टर इन् सोशल वर्क हा पदव्युत्तर अभ्यासक्रम पूर्ण केलात.

१९८४ साली श्री. प्रमोद अभ्यंकर यांचे बरोबर आपण विवाहबद्ध झालात. खऱ्या अर्थाने आपण एकमेकांचे जोडीदार बनलात. सौ. पद्मा अभ्यंकर आपल्या सासूबाई याही आपल्या मातेप्रमाणे सदैव आपल्या पाठीशी उभ्या राहिल्या. आपल्या वैशिष्ट्यपूर्ण शिक्षणाचा सासरच्या सर्वांनाच अभिमान आहे. १९८४ साली म्हणजे लग्नानंतर लगेचच आपण सोफोश म्हणजेच ससुन मित्र मंडळ या संस्थेत आपल्या कार्याला आरंभ केला. आज एक यशस्वी संचालक म्हणून आपण तेथे कार्यरत आहात. सोफोश मध्ये काम करणे म्हणजे आपल्या पुढे एक आव्हानच होते. प्रत्येक उगवता सूर्य आपल्या पुढे आव्हान आणि समस्या घेऊन येत होता. पण आपल्या सहकार्यांबरोबर आपण प्रत्येक आव्हान समर्थपणे झेलत होतात. समस्यांवर इलाज शोधत होतात. इथेच आपल्याला गुरू समान दिपिका महाराज सिंग भेटल्या. माधुरीताई आपण आपल्या मृदु, सुस्मित आणि प्रेमळ वाणीने येणाऱ्या प्रत्येकाला समस्या सुटणारच आहे असा आत्मविश्वास देत असता. समस्या कोणतीही असो त्यावर उपाय आपल्याकडे असतोच. मातृत्वासाठी पितृत्वासाठी आसुसलेल्यांना एखाद्या गोड बालकाचे पालकत्व देऊन आपण त्यांच्या जीवनात चैतन्य निर्माण करता. लहान मुलांच्या हक्कांना न्याय मिळावा म्हणून कार्यरत असता. गरीब, अशिक्षित रूग्णांना जीवरक्षक औषधे मिळावीत म्हणून मार्गदर्शन व मदत करीत असता. क्षयरोग, एच.आय.व्ही एडस् इत्यादी असाध्य रोगांवर इलाज करण्यासाठी सोफोश काम करीत असते. श्रीवत्समधील समस्या म्हणजे तर कुटील समस्यांचा डोंगरच. कुमारीमाता, त्यांचे पुनर्वसन, त्यांना योग्य न्याय मिळवून देणे याबरोबरच काही तासांच्या वयाच्या निष्पाप, निरागस व झिडकारलेल्या बालकांचे आरोग्य, सांभाळ, पालनपोषण आणि त्यांना योग्य पालक मिळवून देणे तसेच मिळवून दिलेले पालक योग्यप्रकारे पालकत्व निभावत आहेत ना? हे पाहणे. एक ना दोन अनेक गोष्टींकडे आपल्याला लक्ष द्यावे लागते. हे काम म्हणजे तारेवरची कसरतच!

सोफोश मधील कार्याबरोबरच आपण इतर कार्यांमध्येही सहभागी असता. वेगवेगळ्या राष्ट्रीय पातळीवरील सभांमध्ये, संस्था व सामाजिक कार्य यांचे शोध निबंध आपण सादर केलेले आहेत. सोफोशच्या सामाजिक कार्याची देशांत-परदेशात ओळख व्हावी म्हणून आपण प्रचार केला आहे. विशेषतः अमेरिका व स्वीडनमध्ये जाऊन आपण संस्थेच्या कार्याची ओळख करून दिली आहे. या व्यतिरिक्त वेगवेगळ्या सामाजिक संस्थांमध्ये आपले सभासदत्व आहे. उदा. कॅम्प एज्युकेशन सोसायटी, भारती विद्यापीठ, महर्षी कर्वेस्त्री शिक्षण संस्था इत्यादि. आकाशवाणी पुणे च्या सल्लागार समितीवर आपली नेमणूक झालेली आहे. तर पुणे येथील ॲडॉप्शन कोऑर्डीनेशन एजन्सीमध्ये आपण अध्यक्ष म्हणून कार्यभार सांभाळीत आहात. प्रसार माध्यमांमध्ये सामाजिक कार्याशी निगडीत व मुलांशी निगडीत उपक्रमांवर सतत आपल्या मुलाखती प्रसारित होत असतात.

आपल्या कार्याचा गौरव म्हणून या आधीही आपल्याला प्रमिला कामतेकर पुरस्कार, 'अनाथांची जननी' पुरस्कार, कर्तृत्ववान महिला गौरव पुरस्कार इत्यादी पुरस्कारांनी सन्मानित करण्यात आले आहे.

माधुरीताई आपले कार्य आपला स्वभाव यामुळे श्री. फ.मुं. शिंदे यांच्या कवितेची आठवण झाल्याशिवाय राहत नाही. आई असतो अेक धागा वातीला उजेड दाखवणारी समईतील जागा । आई खरच काय असते? लेकराची माय असते । वासराची गाय असते । दुधावरची साय असते । लंगड्याची पाय असते । या बरोबरच खास तुमच्यासाठी आणखी एका ओळीची भर घालाविशी वाटते- अनाथांना सावली मिळवून देणारी माऊली असते ।

माधुरीताई ! म्हटल असत तर तुम्ही सावलीखाली बसून ऐषोआराम करू शकला असतात. फक्त स्वतःसाठी जगू शकला असतात. पण तुमचा तो पिंड नाही. श्री. अनंत काणेकरांनी आपल्या दोन मेणबत्त्या या लघुनिबंधात म्हटल्याप्रमाणे दुसऱ्यासाठी जगलास तर खरा जगलास हा तुमचा बाणा. मग तुम्हीच सांगा तुमच्या या असामान्य कार्याने कोण प्रभावित होणार नाही? ओंकार न्यासाचे विश्वस्त मंडळही तुमच्या या असामान्य कर्तृत्वाने प्रभावित झाले आहे. 'वसुंधरा कृतज्ञता' पुरस्कार समारंभपूर्वक स्वामी स्वरूपानंद सरस्वती यांचे हस्ते आपणास प्रदान करताना न्यासास अत्यंत आनंद व समाधान होत आहे. आपणास, आपल्या सोफोश या संस्थेस आणि श्रीवत्समधील सर्व बाळांना सुयश लाभो. आपणास आरोग्य व संपदा लाभो. आपल्या हातून असेच भरघोस कार्य होत राहो हीच ईश्वर चरणी प्रार्थना.



**सु. भि. ढवळे - अध्यक्ष** आपले **म. वा. सरदेशपांडे - उपाध्यक्ष**

**दिनांक :- २९ एप्रिल २००९**

# वाचकांच्या प्रतिक्रिया

ओंकार ट्रस्टचा स्तुत्य उपक्रम

## चिंतनिय व संग्राह्य विशेषांक

पुण्यातील बिबवेवाडी भागातील ओंकार ट्रस्ट या १९९१ साली स्थापन झालेल्या संस्थेने अनेक उपक्रम सुरु केलेले आहेत. या ट्रस्टतर्फे दरवर्षी एका संताचा परिचय करुन देणारा दिवाळी अंकासारखा विशेषांक प्रकाशित करण्यात येत आहे. गतवर्षी भगवत् पूज्यपाद जगतगुरु आद्यशंकराचार्य यांच्या साहित्याचा समग्र-साद्यंत परिचय करुन देणारा संग्राह्य अंक काढण्यात आला होता. तो आजही अनेक वाचकांच्या आठवणीत - संग्रहात आहे.

१७२ पानांच्या, सुंदर मुखपृष्ठ व सुबक छपाई असलेल्या या विशेषांकात मान्यवरांचे, अभ्यासकांचे आद्य शंकराचार्यांचे जीवन व साहित्य यांचा विविध दृष्टिकोनातून दर्शन घडविणारे ४० लेख आहेत. स्वामी गोविंदगिरी, सुनील चिंचोळकर, डॉ. अजित कुलकर्णी, डॉ. नवलगुंदकर, डॉ. देगलूरकर या मान्यवरांचे लेख चिंतनिय आहेत. हा विषेशांक केवळ खासगी वितरणासाठी आहे. त्यामुळे इच्छुकांनी श्री. सातवळेकर 'विसावा' अनिकेत सोसायटी, बिबवेवाडी, पुणे येथे संपर्क साधावा.

**(अेकता मासिक, पुणे यात आलेले परीक्षण - साभार)**

## (भगवत् पूज्यपाद जगत्‌गुरु आद्यशंकराचार्य विशेषांक २००९)

ओंकार ट्रस्ट पुणे यांच्यावतीने यावर्षी कल्याणी या नियतकालिकाचा जगद्‌गुरु आद्य शंकराचार्य विशेषांक नुकताच प्रसिद्ध झाला आहे. ओंकार ट्रस्टच्या वतीने दरवर्षी एका संत / सत्पुरुषाच्या कार्याचा, त्यांच्या वाङमयाचा समग्रतेने परिचय घडविणारा कल्याणीचा विशेषांक प्रसिद्ध करण्याचा उपक्रम काही वर्षांपासून राबवला जात आहे. श्री. गुरुदेव रानडे, प्रज्ञाचक्षू गुलाबराव महाराज, श्री.प.प. वासुदेवानंद सरस्वती, श्रीसमर्थ रामदास यांच्यासारख्या सत्पुरुषांच्या कार्याचा परिचय घडवून देणारे विशेषांक प्रसिद्ध झाले आहेत. त्यांचे अभ्यासकांकडून मनःपूर्वक स्वागतही झाले आहे. अंक ही संग्राह्य ठरले आहेत. या वर्षीचा अंक आद्य शंकराचार्यांच्या कार्याचा, चरित्राचा, त्यांच्या बहुविध वाङ्मयाचा परिचय घडवून देणारे आहे.




**(भगवत् पूज्यपाद जगत्‌गुरु आद्यशंकराचार्य विशेषांक २००९)**

अलौकिक प्रतिभा, मूलभूत तत्त्वज्ञान, प्रचंड वाङमय निर्मिती आणि त्यांना लाभलेली असामान्य बुद्धिमत्ता, उत्तुंग असे व्यक्तिमत्त्व याद्वारे त्यांनी सनातन वैदिक धर्माची पुनः प्रतिष्ठा केली. उपजत लाभलेल्या योगसामर्थ्यांनी आणि सिद्धप्रज्ञेने केवळ ३२वर्षांच्या आयुष्यात त्यांनी हे कार्य केले आहे. स्वतःचे पाय हेच वाहन. त्याद्वारे भारताची दोनदा पदयात्रा आणि मुख हेच साधन त्याद्वारे विचारवंताचे हृदयपरिवर्तन घडवून अद्वैत तत्त्वज्ञानाची महती पटवून दिली. सोबतच विश्व कल्याणाच्या औपनिषदिक विचारांचा प्रचार आणि प्रसारही केला. 'दुष्टाचार विनाशाय प्रादुर्भूतो महीतले । स एव शंकराचार्यः साक्षात कैवल्यनायकः ।' असे त्यांच्या विषयी यथार्थतेने म्हटले आहे.

वैदिक संप्रदायातील मतभेदाला आपल्या बुद्धिमत्तेद्वारे आणि हृदय परिवर्तनाच्या प्रक्रियेद्वारा दूर सारुन त्यांच्यात समन्वय साधला. भारताच्या चारही दिशेला मठस्थापना करुन जणू धर्मदुर्ग उभारले. धर्म प्रसाराचे प्रमुख साधन बुद्धि आहे. ही धर्मतत्त्वे बुद्धिग्राह्य होतात, तेव्हा ती सहजतेने आचरणात आणली जातात. आचार्यांनी आपल्या अलौकिक बुद्धिने वैदिक विचारांची आणि अद्वैत सिद्धांताची महती पटवून दिली. आपल्या भाष्यग्रंथातून तर्काधिष्ठित विचारप्रणाली विश्वाला बहाल केली. त्यांचे विचारऋण कधीही न फिटणारे आहे.

प्रस्तुत अंकात आद्य शंकराचार्यांच्या या कार्याचा आणि विचारांचा अत्यंत समर्पक असा परिचय मान्यवर लेखकांच्या विविध विषयांवरील लेखातून घडविला आहे. अनेक महनीयांचे, विचारवंतांचे यातील सर्वच लेख अभ्यसनीय आहेत. स्वामी भौमानंद यांच्या 'भगवान आदि शंकराचार्य आणि त्यांचे कार्य' या अंकातील पहिल्याच लेखात सूत्ररुप असा आचार्यांच्या तत्त्वज्ञानाचा परिचय आलेला आहे. त्यांच्या धर्मसंस्थापनेच्या कार्याची योजनाही त्यात दिलेली आहे. आचार्यांचे तत्त्वज्ञान आजच्या काळातही कसे मौलिक मार्गदर्शन करणारे आहे, याचेही अप्रतिम प्रतिपादन यात आलेले आहे. आचार्य श्री. गोविंदगिरीजी महाराज यांनी 'महाराष्ट्रातील भक्तिपरंपरा' या लेखात आणि ज्ञानेश्वर, तुकाराम आदि संतमंडळी, समर्थ रामदास, श्री दत्त संप्रदाय हे सगळे आचार्यांच्या अद्वैत तत्त्वज्ञानाचे अनुसरण करणारे

आहे. याचे अभ्यापूर्ण दर्शन घडविले आहे. आचार्यांच्या कार्यासंबंधीही त्यांची मौलिक मार्गदर्शन आहे. याशिवाय आचार्यांचे अद्वैत तत्त्वज्ञान, वेदांत शास्त्राची वैशिष्ट्ये ब्रह्मसूत्रांतर्गत चतु:सूत्री, सर्व वेदानत सिद्धांत सारसंग्रह, ज्ञानाच्या सात भूमिका, आचार्यांचा कर्मयोग, त्यांच्या प्रकरण ग्रंथातील अद्वैत बोध इत्यादी आचार्यांच्या दार्शनिक विचारांचा विविध अंगांनी परिचय घडवून देण्याचे श्रेय विविध अधिकारी अशा अभ्यासाच्या विविध लेखांतून संपादन केले आहे. या श्रेय नामावलीतील स्वामी तेजोमयानंदजी, श्री. वि. मा. दंडगेशास्त्री, श्री. विघ्नहरि महाराज देव, सौ. कल्याणी नामजोशी, सौ. मनीषा अभ्यंकर, डॉ. के. वा. आपटे, डॉ. सौ. सरोजा भाटे, डॉ. सौ. जयश्री साठे, डॉ. कांचन मांडे, डॉ. त्रि. ना. धर्माधिकारी, डॉ. शंकर तळघट्टी, श्री. शाम रघुनाथ साखरे, डॉ. श्रीपाद भट, डॉ. इंदु देशपांडे, श्री. शंकर रामनाथन आणि स्वामी स्वरुपानंद सरस्वती ही काही अधिकारी अभ्यासकांची नावे आहेत. प्रत्येकच लेख प्रदीर्घ चिंतन आणि समृद्ध व्यासंग याची साक्ष देणारा आहे.

आचार्यांच्या काही स्तोत्रांचा आणि प्रकरण ग्रंथांचाही परिचय यातून घडविला गेला आहे. हस्तमालक स्तोत्र, आत्मषट्क, कालभैरवाष्टकम्, विवेक चूडामणि, चर्पट पंजरिका स्तोत्र, साधना पंचक, सौंदर्यलहरी, अन्नपूर्णा स्तोत्र इत्यादींचा यात समावेश आहे. श्री. किसनमहाराज साखरे, सौ. सुनंदा शाळीग्राम, डॉ. सौ. रजनी पत्की, श्री. अवधूत हर्डीकर, सौ. विजया प्रभुणे, श्री. सुनील चिंचोळकर, ज्योतिर्भास्कर हिंगे, डॉ. प्रमोद लाळे, डॉ. अजित कुळकर्णी, सौ. रेखा पटवर्धन इत्यादी मान्यवरांचे यावरील चिंतन घडविले आहे. विवेक चूडामणि आणि साधनापंचक यावरील चिंतन विशेष उल्लेखनीय ठरावे असे आहे.

डॉ. सौ. भाग्यलता पाटस्कर यांच्या विष्णु सहस्त्रनाम भाष्य या लेखातून या भाष्यग्रंथाकडे बघण्याची नवी दृष्टी दिलेली आहे. यातील लेखातून किंवा चिंतनातून ज्या भाष्यग्रंथाचा संदर्भ आला नाही ते आचार्यांचे आणखी एक महत्त्वाचे भाष्य 'सनत्सुजातीय भाष्य' या नावाने ओळखले जाते. महाभारताच्या उद्योग पर्वातील एका प्रकरणावर हे भाष्य आहे.

आचार्यांच्या कालखंडातील वेगवेगळे उल्लेख काही लेखातून आलेले आहेत. १) जन्म सन इ.स. ७८८ ते ८२० (पृ. क्र. २ व पृ. क्र. ७६) २) जन्मदिनांक ३१ मार्च ६७० वैशाख शुद्ध पंचमी (पृ. क्र. १०२) याच लेखात या तारखेप्रमाणे आचार्यांची जन्मकुंडलीही दिलेली आहे. त्यातील अलौकिक योगासंबंधीचे विवरणही दिलेले आहे. पृ. क्र. २१ यात श्री. श्रीगोविंदगिरी यांच्या लेखात आचार्यांचा कार्यकाल इसवी सन आठवे शतक नसून इ.स. पूर्व पाचवे शतक आहे असे दिलेले आहे.

या संदर्भात काच्चीकामकोटिपीठाने एक पुस्तिका प्रसिद्ध केलेली असून त्यात विविध प्रमाणांचे आधारे आचार्यांचा कालखंड इ.स. पूर्वी ५०९ ते ४७७ असा आलेला आहे. त्या संबंधीचे पूर्ण विवरण श्री गोविंदगिरिजी यांच्या लेखात आलेले आहे. ते मार्गदर्शकपर ठरावे असे आहे.

प्रस्तुत ग्रंथाला श्री शृंगेरीपीठाचे आचार्य, श्री शारदापीठ तसेच ज्योतिर्मठाचे आचार्य यांच्या शुभेच्छा लाभलेल्या आहेत. श्री करवीरपीठाचे आचार्य यांचा तर एक सूत्ररुप लेखच यात समाविष्ट करण्यात आलेला आहे. असा अधिकारी अभ्यासकांच्या लेखांनी समृद्ध असलेला हा विशेषांक आहे. आचार्यांच्या विचारांचे, वाङ्मयाचे यथातथ्य दर्शन घडविले जावे अशी संपादक मंडळाची दृष्टीही यातून व्यक्त झालेली आहे. एका संदर्भग्रंथ म्हणून विशेषांक उपयुक्त ठरेल यात संदेह नाही. संपादक मंडळाचे मन:पूर्वक आभार.

प्रकाशक : ओंकार ट्रस्ट, द्वारा भालचंद्र वा. सातवळेकर, विश्वस्त, विसावा, अनिकेत सोसायटी, क्र. १, बिबवेवाडी, पुणे – ४११०३७. पृष्ठ संख्या – १७२.

**वासुदेव गोविंद चोरघडे**, अभ्यंकरनगर, नागपूर

**प्रज्ञालोक नागपूर मधून साभार**

**म.अ.कुलकर्णी तथा स्वामी प्रज्ञानंद**

■ भाग्यश्री को.ऑ.हौसींग सोसायटी लि., डी.१, २६२, ताराबाई पार्क, कोल्हापूर –३, फोन : २६५२०२५
■ सर्व्हे नं.१०१ / अ, महाडकर रेसिडेंन्सी, बी–६, फ्लॅट नं.२०३, पौंड रस्ता, कोथरूड, पुणे–२९. फोन : २५२८३५४२

कोल्हापूर

श्री. भा. वा. सातवळेकर, दि. १७/५/०९

स. न. वि. वि.

'ओंकार' ट्रस्ट मार्फत प्रकाशित झालेला आद्य शंकराचार्य विशेषांक मिळाला. आपण आगत्यपूर्वक तो पाठविलात याबद्दल मी आपला अत्यंत आभारी आहे.

'कल्याणी' नियतकालिकाच्या आजवरच्या सर्व विशेषांकात उठून दिसावा असा आकर्षक अंक झाला आहे. आपल्या ट्रस्ट मार्फत जे समाजोपयोगी विविध उपक्रम आपण श्रद्धेने, निष्ठेने करीत आहात त्यातील हा, विशेषांक प्रकाशनाचा उपक्रम अत्यंत आगळा वेगळा व दर्जेदार - संपन्न असा आहे. व्यक्तिशः प्रतिवर्षी मी अंकाच्या प्रतिक्षेत असतो. अंकातील सारेच लेख दर्जेदार आहेत. आचार्यांच्या विचार-तत्वज्ञानाचा परिचय सर्वांना सुलभ करून दिल्याबद्दल मनःपूर्वक धन्यवाद कळावे. लोभ वृद्धिंगत व्हावा.

आपला – स्वामी प्रज्ञानंद

# अनुक्रमाणिका



# भावपूर्ण श्रद्धांजली

## डॉ. एम.एन.हर्डीकर



ओंकार न्यासाचे एक हितचिंतक व
सुरवातीचे काळात ज्यांनी भरघोस देणगी देऊन
दवाखाना व सूतिकागृह गुजरवाडी–निंबाळकरवाडी येथे सुरु करण्यास मदत केली
असे न्यासाचे आधारस्तंभ डॉ. एम.एन.हर्डीकर यांचे ४–१२–२००९ रोजी
वृद्धापकाळाने दुःखद निधन झाले.
न्यासाला त्यांनी वेळोवेळी सहकार्य केले होते.

आम्ही सर्वजण त्यांच्या पवित्र स्मृतीस अभिवादन करून
त्यांना ही भावपूर्ण श्रद्धांजली अर्पण करीत आहोत.



# परमहंस श्रीरामकृष्ण

**सौ. जयश्री नातू,** एम.ए.बी.एड.
प्रथमपासून घराच्या आजुबाजूला असलेल्या झोपडपट्टीतील मुलांच्या शिकवण्या घेत असत. १९८९ ते २००५ पर्यंत 'श्री सारदा मठ' संस्थेतर्फे चालविण्यात येणाऱ्या 'स्वामी विवेकानंद विद्या मंदिर'मध्ये सेवाभावी शिक्षिका. शाळा दुर्बल घटकांसाठीच आहे. रामकृष्ण मठाच्या 'बालक सेवा संघातील' १०वीच्या मुलांना व 'प्रज्ञावर्धीनी' उपक्रमांतर्गत इंग्रजी विषय व स्पोकन इंग्लीशचे वर्ग घेत. शालेय मुलांसाठी नाटुकले, प्रहसने, गीत लिखाण. 'जीवन विकास' नागपूर मासिकात संत साहित्यावर लेखमाला प्रसिद्ध होत आहेत.

विश्वाचे हे कालचक्र मोठे अजब आहे. या चक्राच्या गतीमुळे मानवी जीवनात सतत उलथापालथ होत असते. कधीकधी खूप पुण्यशील आणि मंगल गोष्टी वर येतात, तर कधीकधी अमंगल, पाशवीवृत्ती वर येऊन ठाण मांडून बसतात. या अमंगलातून समाजाच्या ऱ्हासाला सुरुवात होते. या उतरत्या काळात मानवी समाज आपली 'मानव' ही ओळख विसरतोय की काय, असे वाटायला लागते. अशा वेळी सूज्ञ आणि विचारवंत लोक परिवर्तनाचा प्रयत्न करतात. पण समाजाचे विशाल स्वरुप पाहता हा प्रयत्न फारच थिटा पडतो. मग या तिढ्यातून निसर्गच वाट काढतो. या अधोगतीकडे जाणाऱ्या समाजाच्या क्षितिजरेषेवर एखादे अलौकिक आणि तेजस्वी नेतृत्व उदयाला येते. त्याच्या प्रेरणेने परिवर्तनाची प्रक्रिया विलक्षण गतिमान होते आणि समाजाला प्रगतीची दिशा अचूक सापडते. एकोणिसाव्या शतकात स्वतःच्या अस्मितेची ओळख विझत चाललेल्या भारतीय समाजाला श्रीरामकृष्ण परमहंसांच्या रुपात असेच सामर्थ्यशाली आणि दैवी नेतृत्व लाभले आणि समाजमनाच्या परिवर्तनाला जणू काही पवनगती लाभली.

पाश्चिमात्य तत्वज्ञानामुळे भोगवाद, जडवाद आणि त्याला आधार असे भौतिक विज्ञान या सर्वांच्या हल्ल्यामुळे त्याकाळी भारतीय स्त्री-पुरुष, श्रद्धा आणि विश्वास यापासून दूर भरकटू लागले. त्यागाचे अधिष्ठान डळमळू लागले. भारतीय धर्म आणि तत्त्वज्ञानाचा विकृत अर्थ करण्यात येऊन त्याचे खरे स्वरूप दडपले जाऊ लागले. या भरकटलेल्या समाजाला आणि हरवलेल्या मूल्यांना पुन्हा प्रस्थापित करण्याची निकड निर्माण झाली; आणि या पार्श्वभूमीवर १७ फेब्रुवारी १८३६ या शुभदिनी श्रीरामकृष्णांचा जन्म झाला.

कलकत्त्यापासून काही कि.मी. वर असलेले कामारपुकूर हे अगदी छोटेसे खेडेगाव! या गावात राहाणाऱ्या चंद्रामणीदेवी आणि क्षुदिराम चट्टोपाध्याय या सत्वशील, परंतु गरीब मातापित्यांच्या पोटी जन्माला आलेला हा मुलगा म्हणजे गदाधर किंवा गदाई. शाळेशी ओळख जेमतेमच. निसर्गाशी एकतान होणारा हा मुलगा 'बिनभिंतीची शाळा आमुची लाखो इथले गुरु झाडे, वेली, पशू, पाखरे याशी गोष्टी करु ।।'' या कवी उक्तीप्रमाणे निळ्याभोर आकाशाखाली रमत असे. विधात्याच्या विराट सृष्टीकडे भावतल्लीन होऊन पाहत असे. 'व्यवहारी जगातली पोटभरु विद्या मला नको' असे म्हणणारा हा अजब मुलगा वेगळ्याच विश्वात वावरत असे. या दृश्य जगापलिकडे काहीतरी चिरंतन आहे, 'ते' जे 'चिन्मय' आहे, त्याचा ध्यास या नवयुवकाला लागलेला होता.

**साधक रामकृष्ण**

अमर्याद आभाळात स्वच्छंद उडणारे ते मनोहर पक्षी, हिरवीगार कुरणे, पाण्याच्या उठणाऱ्या निळ्याशार लाटा ! हे सारे दृश्य आपल्याला दाखवणारे डोळे, त्यातून आनंद देणारे मन! या कड्या एकमेकात जोडून गगनापासून धरेपर्यंत ही साखळी तयार करणारे कोण बरे? कसा असेल तो? कसा? हे प्रश्न गदाईला सतावत. तो मनाशीच विचार करी, सृष्टीमधल्या मुंगीपासून, सूर्यमालेपर्यंत सर्वांना आपल्या अंगाखांद्यावर वाढवणारी, जोपासणारी ही शक्ती ही आपल्या साऱ्यांची आईच असेल ! तिच्याखेरीज एवढ्या वत्सलतेने साऱ्या पसाऱ्याचा प्रतिपाळ कोण बरे करेल? त्या दशांमुळे उरलेल्या परब्रह्माची छाया असलेली, त्याच्या इथल्या प्रत्येक रुपाला मायेने जोजवणारी ही जगत्‌जननी ! आई, कशी असशील तू? केव्हा मला दर्शन देशील? कधी या लेकराची हाक ऐकशील? कधी कधी??

गदाईने फोडलेला हा टाहो त्या विश्वजननीला अस्वस्थ करुन गेला. आपल्यासाठी आकांत मांडलेल्या या लेकराला आईने दर्शन दिले. त्याला जवळ घेऊन शांत केले.

कालीमातेच्या या दर्शनाने गदाई शांत झाला. तो सजगपणे जगाकडे पाहू लागला. भक्तीच्या मार्गाने भेटलेली ही चित्‌शक्ती अन्य मार्गानेही निश्चितच भेटू शकेल, हा विचार मनात येऊन त्याने भैरवी ब्राह्मणीकडून तंत्रमार्ग चोखाळून पुन्हा तोच साक्षात्कार मिळवला. तोतापुरी या गुरुकडून अद्वैत साधना केली आणि त्याच सत्याचा त्यांनी अनुभव घेतला. विविध साधनांनी संपृक्त व्यक्तित्व झालेल्या या प्रगल्भ पुरुषाला लोक आदराने 'रामकृष्ण' म्हणू लागले.

मौलवी साधुला गुरु करुन रामकृष्णांनी इस्लामी धर्माची उपासना

केली आणि ईश्वरी अस्तित्वाची अनुभूती घेतली. ख्रिस्ती धर्माप्रमाणे साधना करुन येशू ख्रिस्ताचे पवित्र दर्शन घेतले. स्त्रीभावात राहून मधुरा भक्तीचा अनुभव घेतला. हनुमान भावात राहून दास्यभक्ती पणाला लावली. असे अनेक धर्म, पंथ, संप्रदाय उपासना यांची प्रत्यक्ष साधना करुन, त्या त्या भावात राहून एकाच ईश्वरी सत्याची प्रत्यक्ष अनुभूती रामकृष्णांनी घेतली आणि त्या अनुभूतीच्या भक्कम पायावर उभे राहून त्यांनी संदेश दिला, ''ईश्वर एक आहे, त्याच्यापर्यंत जाण्याचे मार्ग विविध आहेत. तो धर्म, पंथ, ग्रंथ, मंदिर, मूर्ती यात नसून तो अनुभूतीमध्ये आहे.''

**गृहस्थ रामकृष्ण**

साधकावस्थेत भ्रमिष्टपणे पिसाटलेल्या आपल्या तरुण मुलाला पाहून गदाईच्या मातेला दुःख होई. तिने त्याला वठणीवर आणण्यासाठी त्याचा विवाह करण्याचा मातृसुलभ विचार केला. पण तिला काही केल्या यश येईना. कावून गेलेल्या आपल्या आईला रामकृष्ण म्हणाले, ''काय इकडेतिकडे हिंडून नवरी शोधताय? ईश्वराने माझ्यासाठी नेमलेली वधू जयरामवाटीला रामचंद्र मुखर्जींच्या घरी थोरल्या कन्येच्या रुपात आहे !''

खरोखरीच सांगितलेल्या ठिकाणी वधू सापडली आणि वरपक्षानेच हुंडा मोजून तिला मिळविली. कोणतीही कुरकूर न करता मुलाने विवाह खुशीने केला म्हणून माता आनंदून गेली. त्या भाबड्या जीवाला या विवाहाचे दैवी हेतू कोठून माहित असणार?

विवाहानंतर छोटी सारदा जेव्हा सासरी येई तेव्हा तेव्हा तिचा पती तिला अनेक गोष्टी शिकवण्याचे काम करी. म्हणजे विडा कसा लावावा, भाजी कशी करावी, इथपासून ते 'चंद्र जसा साऱ्यांचा मामा, तसाच ईश्वरही आपलाच ! आपल्या साऱ्यांचा !' हेही रामकृष्ण आपल्या पत्नीच्या मनी बिंबवू लागले.

कलकत्त्यामधील दक्षिणेश्वर येथील कालीमातेचे पुजारीपद वडिलबंधूंच्यानंतर रामकृष्णांकडे आलेले होते. चकोराला चंद्रमंदिरी जागा मिळावी, तसाच हा प्रकार होता. मृण्मय आईच्या चिन्मय सहवासात रामकृष्ण रममाण झाले होते. जाणती झालेली सारदा पतिगृही आपण होऊन उपस्थित झाली होती. जनरितीप्रमाणे पित्याने जावयाहाती कन्या सोपवली आणि निश्चिंत मनाने तो स्वगृही परतला.

पतीची उन्मनी अवस्था जाणून सारदेने त्याचाच वसा उचलला. आणि तळहातावर निखारे झेलणाऱ्या सतीचे वाण घेतले. देहाच्या सामान्य स्तरावरुन गगनभरारी घेतलेला एक असमान्य संसार सुरु झाला, जो दोन जीवांपुरताच मर्यादित नव्हता, तर सारे विश्व त्यात सामावणार होते.

या काळात रामकृष्णांनी आपल्या पत्नीला विविध साधना, दीक्षेचे निरनिराळे मंत्र, समाधीचे बहुविध प्रकार, समाधी उतरवण्यासाठी म्हणावयाचे मंत्र अशा अनेक गोष्टी शिकवल्या. शिवाय अप्रत्यक्षपणे ज्ञान, भक्ती, वैराग्य, व्यवहार या विषयांचा भक्तांशी चालणारा उहापोह अष्टौप्रहर तिच्याही कानी पडत होता. स्वतः रामकृष्णही याबाबत जागरुक होते. पत्नीच्या अनेक क्षमता ते वारंवार तपासत होते, वृद्धिंगत करत होते. कळत नकळत हे व्यक्तिमत्व विकसित होत होते. नियती एका दिव्य यज्ञाची तयारी या दांपत्याकडून करवून घेत होती. प्रत्यक्ष कालीमाता या तयारीमागे उभी होती.

पत्नीचे अंगभूत सामर्थ्य, तिच्या वाटयाला आलेले दैवी कार्य आणि त्यासाठी चाललेली अमोघ साधना शेवटच्या पर्वात येऊन ठेपली आणि रामकृष्णांनी पत्नीची देवीभावे षोडशी पूजा करण्याचे ठरविले. तिच्या भावी कार्याची जाणिव असलेल्या या विलक्षण महापुरुषाने आपली सर्व तपस्या 'तिच्या चरणी समर्पित करुन तिच्याठायी अविर्भूत होण्यासाठी देवी त्रिपुरासुंदरीची तळमळीने प्रार्थना केली. लोककल्याणार्थ रामकृष्णांनी पत्नीची प्रतिष्ठापना विश्वमातृत्वाच्या स्थानी करुन आपल्या साधना यज्ञाची पूर्णाहुती केली.

रामकृष्णांचे एक शिष्य श्री सारदानंद महाराज म्हणतात, ''आपल्या विराट कार्यात धर्मपत्नीला रामकृष्णांनी नुसतेच सहभागी करुन घेतले नाही तर त्यासाठी लागणारे प्रशिक्षणही दिले. त्यादृष्टीने तिला समर्थ बनविले. षोडशी पूजेचे पहिले प्रयोजन यात आहे.''

''रामकृष्ण स्वतः त्यांच्या पत्नीशी सन्मानाने वागले आणि इतरांनीही तिला तोच सन्मान द्यावा, हा आदर्श त्यांनी प्रस्थापित केला. षोडशी पूजेचे हे दुसरे प्रयोजन. '' ''ईश्वराचे संपूर्ण मातृरुप श्री सारदादेवींच्या द्वारे प्रकट करणे हे षोडशी पूजेचे आणखी एक महान प्रयोजन !''

गृहस्थ रामकृष्णांनी धर्मपत्नीला साऱ्या वसुधेचे कुटुंब प्रदान करुन तिला जगत्‌जननीचा मान देऊन आपल्या जगावेगळ्या प्रपंचाची आपल्या सर्वांना ओळख दिली. या पतीने पत्नीसंदर्भातील आपली कोणतीही जबाबदारी टाळली नाही. स्त्री म्हणून तिला सन्मान दिला. त्यांच्याकडे असणारे सर्व ज्ञान हातचे काहीही राखून न ठेवता, निरहंकारी वृत्तीने तिला दिले. तिच्यासाठी आपल्या मागेही तिची देवस्थानतर्फे वेतन व्यवस्था करुन व्यावहारिक कर्तव्यही चोख बजावले. याशिवाय रत्नासारखे अमूल्य पुत्र तिच्या ओटीत घातले. रामकृष्णांचा हा गृहस्थाश्रम आपल्याला थक्क करणारा आहे.

**गुरु रामकृष्ण**

अंतिम सत्याच्या साक्षात्काराने भरलेला अंतरात्म्याचा कुंभ रामकृष्णांना समर्थ व्यक्तींच्या हाती सोपवायचा होता. पत्नीला त्यांनी ज्ञानाचा वसा देऊन कार्याचा पाया भक्कम केला असला तरी त्यांना या कार्यप्रसादाचे शक्तिशाली स्तंभ उभे करायचे होते. अनुभूतींच्या या राशी ओतण्यासाठी त्यांना एखाद्या ऋषीतुल्याची अमोघ झोळी पाहिजे होती. या सत्याचे दान स्वीकारणारे सामर्थ्यशाली बाहू आपल्यापुढे कोण पसरेल याची ते तळमळीने वाट पाहू लागले. विराट शक्तीचा एक प्रकाश पुतळा तेजाचे दान करायला उभा राहिला. शिष्यांसाठी गुरुची तडफड सुरु झाली.

''या रे यारे ! तुम्ही कुठे लपलेले आहात? मी तुमची किती वाट पहात आहे !'' रामकृष्णांच्या या आर्त हाकेला अखेर प्रतिसाद मिळाला. कमळातील मधुपानासाठी भ्रमरांचा गुंजारव सुरु झाला. एकामागून एक

असे देवकोटी, ईश्वरकोटी, दैवदत्त त्यागी तरुण रामकृष्णांपुढे येऊन उभे राहिले. त्यातच एकेदिवशी तेजाने भारलेले एक लखलखीत झाड त्यांनी पाहिले आणि हाच आपला वारसदार होऊ शकतो, हे त्यांच्या प्रज्ञेने ताडले. अद्वैताशी बांधलेल्या त्यांच्या धारदार बुद्धीला त्यांनी आपली तपस्या आणि अनुभूती यांच्या बळावर मोकळे केले. प्रेमाच्या वर्षावाने त्याला आकर्षून घेतले. ईश्वरी भक्तीच्या अनंत रुपाचे विशाल आकाश त्याला दाखवले. नरेंद्रनाथ दत्त नावाचा हा तेजस्वी तरुण पाहता पाहता साधक बनला आणि साधकाचा अनुभूती संपन्न अधिकारी यती झाला.

नरेंद्राशिवाय रामकृष्णांकडे आणखी पंधरा सामर्थ्यशाली आणि त्यागी युवक आले. त्यांनी रामकृष्ण चरणांचा आश्रय घेतला. प्रत्येकाने त्यांच्याकडून त्याग, वैराग्य, ज्ञान, तपस्या यासाऱ्या गोष्टींची आपापल्या क्षमतेप्रमाणे प्राप्ती करुन घेतली. स्वामी विवेकानंदांनी आपल्या गुरुदेवांचा महान संदेश साऱ्या जगाला ऐकवला.

पू. ब्रह्मानंद महाराज उर्फ राखाल या त्यांच्या मानसपुत्राने रामकृष्ण मठ मिशनची धुरा अत्यंत समर्थपणे सलग पंचवीस वर्षेसंभाळली. संस्थेच्या विकास चक्राला पहिली चालना दिली.

पू. अखंडानंद उर्फ गंगाधर यांनी संन्यस्त धर्माला सामाजिक कार्याचे वळण लावण्याच्या विवेकानंदांच्या धोरणाचा श्रीगणेशा केला. त्यांनी सारगाछी येथे अनाथाश्रम सुरु केला.

पू. अभेदानंद उर्फ कालीप्रसादने सतत सत्तावीस वर्षेअमेरिकेत राहून वेदान्त प्रचाराचे कार्य केले. तेथे नविन केंद्रांची स्थापना केली.

पू. सारदानंदांनी ग्रंथ लेखन, प्रकाशन, प्रचार असे झंझावाती कार्य केले, तर तुरीयानंद, त्रिगुणातीतानंद यांनीही विदेशात जाऊन वेदान्ताचा प्रचार आणि प्रसार केला. आज विदेशात असलेली विविध केंद्रे हे त्यांच्याच कार्याचे फळ आहे.

स्वा. विज्ञानानंदांपर्यंत या प्रत्येकाने रामकृष्णांची भावधारा अखंड वाहती ठेवण्यासाठी अनमोल कार्य केलेले आहे.

शिष्यांचे यश हे गुरुप्रसादाने असते. हे एकएक शिष्य हे अस्मानाला भिडणाऱ्या दीपस्तंभासारखे उच्च आणि तेजस्वी होते. पण त्यांना हे सामर्थ्य देणारा त्यांचा गुरु म्हणजे स्वयंभू, दिप्तीमान असा सूर्यच होता. या संन्याशी शिष्यांशिवाय रामकृष्णांचे अगणित गृहस्थ शिष्यही होते. बलराम बोस, मास्टर महाशय, गिरीष घोष, रामचंद्र दत्त, नागमहाशय, गौरी माँ, गोलाप माँ यांनीही आपल्या गुरुदेवांच्या भावधारेला अनेक मार्गेवाट करुन दिली. त्यांचे कार्यही मोलाचे आहे. तसेच प्रचार कार्याचे श्रेयही बरेचसे या गृहस्थ शिष्यांकडे जाते. रामकृष्णांच्या संन्याशी शिष्यांना निरंतर मदत करत राहिल्याने आजही आपल्या रामकृष्ण भक्त संन्याशी आणि गृहस्थ हे परस्पर पूरक राहून ही भावधारा प्रवाहित ठेवत असल्याचे दृश्य दिसते.

याशिवाय रामकृष्णांना गुरुस्थानी मानून त्यांची श्रद्धेने सेवा करीत. राहणारे अनेक भक्त त्यावेळेही होते आणि आजही आहेत. दक्षिणेश्वरचे मंदिर उभारणारी धनाढ्य आणि भक्तीमती राणी रासमणी ही रामकृष्णांची भक्त होती. तिने या लोक विलक्षण पुजाऱ्याचे सामर्थ्य पूर्णपणे ओळखले होते. तिचे जावई व कारभारी मथुर बाबू विश्वास हे तर रामकृष्ण चरणी पूर्णपणे समर्पित होते. अवतारांनाच काय पण दैवी व्यक्तींना त्यांच्या हयातीत ओळखणारे फारच थोडे महाभाग असतात. या दोघांप्रमाणेच केशवचंद्र सेन, ईश्वरचंद्र विद्यासागर या थोर पुरुषांनीही रामकृष्णांना जाणले होते. चिनू शांखारीसारखा ग्रामस्थ आणि गोपालेर माँ सारख्या अशिक्षित भक्तांनीही रामकृष्णांची योग्यता ओळखली होती. असंख्य लोकांनी श्रद्धेने आणि उत्स्फुर्तपणे रामकृष्णांना गुरुस्थानी विराजमान केले होते. हीच त्यांची विलक्षण थोरवी !

**परमहंस रामकृष्ण**

परमहंस हा संन्यासाचा एक प्रकार आहे. हंस याचा एक अर्थ ब्रह्मतत्व असा होतो. परम त्याचा अर्थ अगदी उच्चतम सीमा. परमहंस याचा अर्थ – ज्याने ब्रह्मतत्व पूर्णपणे जाणले आहे, आता त्याला जाणण्यासारखे काहीच राहिले नाही असा जो, तो परमहंस ! या प्रकारातला संन्याशी, शास्त्रातील व्याख्येप्रमाणे कुठेही राहू शकतो. तो द्वंद्वातीत असतो. तो समदर्शी व सर्वात्मा असतो.

वरील सर्व शास्त्रार्थ एकत्र करता जो जीवात्मा सदेह अवस्थेतच परमात्म्याशी लीन झालेला असतो, तो 'परमहंस' म्हणून जाणायला हरकत नाही. रामकृष्णांना त्यांचे गुरु तोतापुरी आणि भैरवी या उभयतांनी 'परमहंस' म्हणून संबोधले आहे. खरोखरी त्यांच्या दृष्टीने भेद कुठेच नव्हता. बालपणी धनी लोहारणीकडून त्यांनी बटू भिक्षा घेऊन समदर्शित्वाची पहिली ओळख दिली. तरुणपणी दलितांच्या वस्तीत जाऊन त्यांचे शौचकूप साफ केले. आपले पहिले शिष्यत्व एका स्त्रीला – स्वतःच्या पत्नीलाच दिले. त्यांची पहिली गुरुही स्त्री होती. म्हणजे लिंगभेद मानला नाही. सर्व धर्म, पंथ, संप्रदायांची उपासना केली. आणि 'हे सर्व रस्ते ईश्वराकडेच जातात' असे दृढ प्रतिपादन केले. धर्मभेद नसतोच, हे त्यांनी स्वतःच अनुभवून सिद्ध केले.

'खोली वेगवेगळ्या असल्यातरी आतली जिन्नस एकच असते.' असे वारंवार सांगणारा हा साधा, अशिक्षित, सामान्य पुजारी, समदर्शी तर होताच पण या समदर्शी तत्त्वज्ञानाचा अभिनव संदेश जगाला देणारा मानवी धर्माचा एक फार मोठा भाष्यकार होता. बदलत्या युगाला उच्च मानवी मूल्यांवर आधारित असा धर्माचा अर्थ सांगणारा एक महामानव होता. आपला हा चिरंतन कल्याणकारी भाव समर्थ हातांच्या ओंजळीत ओतून त्याने भविष्यातील जगाच्या अभ्युदयाची दिशाही दाखवून दिली आहे.

विश्वाच्या कल्याणाची सोय करणारे महापुरुष हे ईश्वरी अवतारच म्हटले पाहिजे. याशिवाय का त्यांचे सर्वांवर सारखे प्रेम असणार ? हे त्यांचे प्रेम म्हणजेच त्यांना उमजलेले ब्रह्मतत्त्व ! म्हणूनच रामकृष्ण हे परमहंस! त्यांच्या चरणी कोटीकोटी प्रणाम !

**सौ. जयश्री नातू**
ए/१२, अनुबंध सोसायटी,
रामकृष्णमठाजवळ, पुणे – ४११०३०.



# भगवान श्रीरामकृष्णांचे दिव्यत्व

**स्वामी विपाप्मानंद**
१९९४ साली रामकृष्ण संघाच्या नागपूर येथील शाखा केंद्रात प्रवेश केला. नागपूर येथील प्रकाशन विभागात गेली २५ वर्षेसातत्याने सेवा सुरु आहे. संघाच्या जीवन-विकास ह्या मराठी मासिक पत्रिकेचे संपादक आहेत.

**जन्म कर्म च मे दिव्यमेव यो वेत्ति तत्त्वतः ।**
**त्यक्त्वा देहं पुनर्जन्म नैति मामेति सोऽर्जुन ।। गीता ४.९**

हे अर्जुना जो माझा अशा प्रकारचा दिव्य जन्म व कर्म तत्त्वतः म्हणजे यथार्थ रीतीने जाणतो, तो देह सोडल्यानंतर पुनर्जन्माला प्राप्त होत नाही तर मलाच प्राप्त होतो.

''दिव्यभावाचा पूर्ण अविष्कार फक्त अवतारांच्याच ठायी दिसून येत असतो. जगाचा आध्यात्मिक इतिहास ह्याला साक्ष आहे. म्हणूनच अवतारांचे चरित्र आपल्यापक्षी कायमचे गूढ ठरत असते. खरोखर आपण कल्पनेच्या मदतीने मायारहित ब्रह्मज्ञानावस्थेचे काहीसे चित्र मनामध्ये रेखाटू शकू, परंतु त्या अवस्थेत जे सहज व स्वाभाविकपणे सर्वदा वसत असतात ते कशाप्रकारे, कोणत्या उद्देशाने-कधी आमच्यासारखे आणि कधी असीमशक्तीसंपन्न देवतेसारखे-कार्य करीत असतात हे आपण समजू, आकलू शकत नाही. आमची मन-बुद्धी दूर राहो. आमची कल्पनासुद्धा याबाबतीत पुढे सरसावून सर्वथा पराजीत होते. म्हणून श्रीरामकृष्ण जीवनातील या काळामधील कार्यांचे यथार्थ आलोचन संभवनीय नाही हे निराळे सांगावयास नको. करिता, त्यांची ह्या काळातील कार्येनुसती नमूद करुन, त्यांची फळे बघून ज्या उद्देशाने जे केले गेले असे आम्हाला वाटते तेच फक्त वाचकांना सांगू. कार्याचे मोठेपण पाहूनच आम्ही नेहमी कारणाचे महत्त्व जोखीत असतो. ठाकुरांच्या ह्या काळातील कार्यांचे अलौकिकत्व विचारात घेतल्यास, त्यांच्या आत दिव्यभावाचा केवढा अदृष्टपूर्व आविष्कार झाला होता हे कळण्यास उशीर लागणार नाही.'' (श्रीरामकृष्णलीलाप्रसंग ८२१-२२)

सूर्याचा प्रकाश जेव्हा एखाद्या लोलकातून बाहेर पडतो तेव्हा त्यातून विविध सप्त-रंग प्रकट होतात, परंतु त्या विविध रंगांच्या मागे एक सर्वसमन्वयात्मक असा पांढरा रंग विद्यमान असतो. अगदी त्याच प्रकारे त्या निर्गुण-निराकार परब्रह्माची लीला अवतारी पुरुषांच्या देह-मनाद्वारे अभिव्यक्त होते तेव्हा त्यातून विविध भावांचा आविष्कार झाल्याचे आपल्याला आढळून येते, परंतु त्या साऱ्या लीलांमधून व भावांमधून त्या अवतारांचे दिव्यत्व सदोदित अभिव्यक्त होत असते. परंतु हे दिव्यत्व सर्वसामान्यांना सहजासहजी आकलन होत नाही. कारण ते समजण्याची दृष्टी - पात्रता आपल्यासारख्या सर्वसामान्य लोकांत नसते. म्हणूनच अशा अवतारांच्या जीवनातील काही घटना पाहूनच ही गोष्ट समजावून घ्यावी लागेल. भगवान श्रीरामकृष्णांचे दिव्यत्व समजावून घ्यायचे झाल्यास त्यांच्या जीवनातील अशा काही घटना आपल्याला पाहाव्या लागतील. खरे तर त्यांचे संपूर्ण जीवनच अशा घटनांनी परिपूर्ण आहे. स्थलाभावास्तव काही घटनाच आपण येथे पाहू शकू.

भगवान श्रीरामकृष्णांच्या वडिलांचे नाव होते क्षुदिराम चट्टोपाध्याय. इसवी सन १८३५ सालच्या हिवाळ्यात ते एकदा वाराणसी व गया येथे दर्शनासाठी गेले होते. गयेला एक दिवस त्यांना स्वप्न पडले. स्वप्नात त्यांना प्रत्यक्ष गदाधराचे - विष्णूंचे दर्शन झाले. वीणेच्या झंकारांसारख्या मधुर स्वराने ते त्यांना म्हणाले, ''क्षुदिराम, तुझ्या भक्तीने मी अतिशय प्रसन्न झालो आहे. तुझ्या पुत्राच्या रुपाने तुझ्या घरी अवतीर्ण होऊन मी तुझी सेवा ग्रहण करीन.'' स्वप्नाच्याही पलीकडचे हे बोलणे ऐकून क्षुदिरामांच्या आनंदाला जणू सीमा राहिली नाही; परंतु दुसऱ्याच क्षणी, सदाचे गरीब आपण त्यांना काय खायला देणार, कुठे ठेवणार वगैरे विचार येऊन अतोनाद विषादाने घेरले जाऊन रुदन करीत करीत ते त्या पुरुषोत्तमाला म्हणाले, ''नको, नको प्रभो, मला असल्या भाग्याची गरज नाही. कृपा करुन तुम्ही जे मला दर्शन देऊन कृतार्थ केलेत आणि असली वांच्छा प्रकट केलीत तेच माझ्या पक्षी अगदी पुरेसे आहे. तुम्ही खरोखरच माझा पुत्र झाल्यास दरिद्री मी तुमची काय सेवा करु शकेन?'' यावर अत्यंत प्रसन्न होऊन भगवान विष्णू म्हणाले, ''भिण्याचे कारण नाही. क्षुदिराम, तू मला जे देशील तेच मी संतोषाने स्वीकारीन. माझा अभिलाष पुरविण्याबाबात काही हरकत घेऊ नकोस.''

प्रस्तुत घटनेवरुन आपल्याला समजून येईल की प्रत्यक्ष श्रीविष्णूंनीच दर्शन देऊन आपल्या जन्मग्रहणाची - अवतार घेण्याची गोष्ट क्षुदिरामांना सांगितली आहे. त्या निर्गुण-निराकार परब्रह्माचंच एक सगुण-साकार रुप म्हणजे भगवान विष्णू होत. म्हणून इथे निःसंदेहपूर्वक आपण म्हणू शकतो की त्या परब्रह्मानेच - परमात्म्यानेच भगवान श्रीरामकृष्णांच्या रुपात जन्म ग्रहण केला होता.

श्रीरामकृष्णांचे जन्मस्थान बंगालमधील एक लहानसे खेडेगाव

कामारपुकुर हे होय. श्रीरामकृष्णांच्या मातेचे नाव चंद्रामणी देवी. क्षुदिराम जेव्हा गयेला होते तेव्हा इकडे कामारपुकुरला देखील एक घटना घडली. त्यांच्या घराजवळच एक शिवमंदिर आहे त्याला युगींचे शिवमंदिर म्हणतात. एके दिवशी या शिवमंदिरासमोर उभी राहून चंद्रामणीदेवी धनी नावाच्या एका महिलेबरोबर बोलत होत्या. अशा वेळी चंद्रामणीदेवींना दिसू लागलं की, महादेवाच्या अंगापासून एक दिव्य ज्योत निघून तिनं मंदिर भरुन टाकलं आहे आणि वायुसारख्या तरंगांच्या रुपाने ती त्यांच्याकडे झपाट्याने येत आहे! एकाएकी जवळ येऊन त्या ज्योतीनं चंद्रामणीदेवींना जणू झाकून टाकलं आणि ती त्यांच्या आत प्रबळ वेगानं शिरु लागली. भयानं आणि विस्मयानं स्तंभित होऊन त्या एकदम मूर्च्छित होऊन पडून गेल्या. आणि तेव्हापासून त्यांना वाटू लागलं की ते तेज त्यांच्या उदरात शिरलेलं आहे आणि त्यांच्या ठिकाणी गर्भाचा संचार झालेला आहे. यानंतर प्रत्यक्ष श्रीरामकृष्णांचा जन्म होईपर्यंत चंद्रामणी देवींना कितीतरी दर्शने होत होती. क्षुदिरामांनीही त्यावर त्यांना, गयेला पाहिलेल्या स्वतःच्या स्वप्नाचा वृत्तांत सांगून समजावले की, अपार भाग्यामुळेच तिने ह्या खेपेस पुरुषोत्तमाला गर्भी धारण केले आहे. आणि त्याच्या पावन स्पर्शानेच तिला ही असली दिव्य दर्शने होत आहेत.

अशा रीतीने दिवसांमागून दिवस जाऊ लागले आणि क्षुदिराम व त्यांची ती पवित्रस्वभावाची सहधर्मचारिणी श्रीरघुवीराला पूर्णपणे शरणापन्न होऊन, ज्याच्या शुभसंस्पर्शाने त्यांचे जीवन ईश्वरी भक्तीने भरुन गेले होते त्या पुरुषोत्तमाला पुत्ररुपाने बघण्याच्या लालसेने काळ घालवू लागले.

इतर अवतारी पुरुषांच्या जीवन-चरित्राचं अनुशिलन केल्यास आपल्याला समजून येतं की त्यांच्याही जीवनात जन्मापूर्वी आशा प्रकारचे दैवी संकेत मिळालेले होते. आणि त्याचबरोबर त्यांच्या जन्माच्या वेळी व जन्मानंतर लगेचच कितीतरी अलौकिक अशा घटना घडल्या की ज्याद्वारे त्यांनी आपल्या दैवी अवतारतत्त्वाचे संकेत प्रकट केले.

अवतार-महापुरुषांची सर्वच कार्येदिव्यत्त्वाने परिपूर्ण असतात. अगदी जन्म होण्याच्या पूर्वीपासूनच ते विविध प्रसंगांमधून हे आपले दिव्यत्व प्रकट करीत असतात. भगवान श्रीरामकृष्णांचे जीवन देखील याला अपवाद नाही. त्यांच्या माता-पित्यांना श्रीरामकृष्णांच्या जन्मापूर्वी कशी दर्शने झाली व कसे संकेत मिळाले या संबंधातील काही घटना आपण पाहिल्या. प्रत्यक्ष परमात्मा-परमेश्वरच अशाप्रकारे जन्मग्रहण करुन आल्याची खात्री अशा घटनांवरुन आपल्याला पटते.

भगवान श्रीरामकृष्णांच्या जन्माची घटनाही अशीच अद्भुत आहे. हे छोटे बालक जन्मतःच सहा महिन्यांच्या मुलाएवढे होते. तसेच लगेचच ते सरकत सरकत बाजूला असलेल्या चुलीत शिरुन त्याने अंगाला राख अर्थात विभूती माखून घेतली होती. ह्या गोष्टी अविश्वसनीय जरी वाटत असल्या तरी आश्चर्यकारक नव्हे काय? जणू काही पुढे त्यांच्यामधून प्रकट होणाऱ्या विराट व्यक्तिमत्वाची व त्याग-वैराग्याच्या आदर्शाची ही सुरुवात होती.

बालकाच्या जन्मानंतर क्षुदिरामांना गयेला पडलेल्या स्वप्नाची आठवण झाली व त्यांनी आपल्या या दैवी पुत्राचे नाव ठेवले 'गदाधर'. गदाधर दिसामासांनी मोठा होऊ लागला. त्याच्या अद्भूत अशा बाललीलांचे वर्णन त्याच्या चरित्रग्रंथात व श्रीरामकृष्ण पोथीमध्ये सापडते. ते सर्व येथे करणे शक्य नाही परंतु त्या घटनांमधून त्याचे दिव्यत्व मात्र निश्चितच प्रकट होते.

लहानसे तान्हे मूल अशा प्रकारे वजनदार होणे वा अचानक असे मोठ्या पुरुषाच्या आकारात दिसणे या खरोखर अलौकिकच घटना होत. कदाचित आपण प्रत्यक्षात कोण आहोत याची काहीशी झलक दाखविण्यासाठीच की काय, कोण जाणे परमेश्वर अशी लीला करीत असावेत. परंतु क्षणभरातच पुन्हा मायेचा पडदा ते आपल्या माता-पित्यांच्या नजरेसमोर टाकीत असावेत, अन्यथा त्यांची ही दिव्यलीला कशी काय चालू रहाणार?

आणि त्याचमुळे प्रत्यक्ष भगवंत पुत्ररुपात जरी जन्माला आले तरी मातेला तिथे ऐश्वर्यबोध जाणवत नाही. मायेमुळे आपला पुत्रच कर्ता करविता आहे याची जाणिव नसल्याने ती माता आपल्या या देवपुत्राची फुकाची काळजी करते. कदाचित भगवंताला अशाप्रकारे आपल्या मातेच्या वात्सल्याची गोडी चाखण्याची इच्छा असावी.

बालवयातील भगवान श्रीरामकृष्णांनी - या छोट्याश्या गदाधराने अगदी लहानपणीच कितीतरी लीला आपल्या आई-वडिलांना दाखविल्या होत्या. त्यातून त्याचे दिव्यत्व प्रकट होत होते. आपल्या पुत्राचे हे अलौकिक ऐश्वर्य पाहून त्याची माता गोंधळून जात असे.

बालक गदाधराने आता किशोर वयात पदार्पण केले. गावामध्ये यात्रेला जाणाऱ्या-येणाऱ्यांसाठी विश्रांतीची व्यवस्था म्हणून गावचे जमीनदार लाहाबाबूंनी एक धर्मशाळा बांधली होती. त्या धर्मशाळेत कित्येक साधुबैरागी येऊन राहात. गदाधरने ऐकले होते की 'साधुबैरागी लोक अनित्य संसाराचा त्याग करुन भगवंताचे दर्शन लाभावे ह्या तळमळीने जगत असतात आणि खऱ्या साधूंच्या संगाने माणसाला परमशांती लाभून तो कृतार्थ होत असतो.' सहाजिकच अशा साधूंशी संबंध येण्याच्या आशेने बालक गदाधर त्या धर्मशाळेत मधूनमधून जाणे-येणे करु लागला. प्रातःकाली आणि संध्यासमयी धुनीमधील पवित्र अग्नी अधिक प्रज्वलीत करुन ते लोक भगवंताच्या ध्यानात कसे मग्न होऊन जातात, भिक्षेत मिळालेल्या मामुली खाद्याचा स्वतःच्या इष्टदेवतेला नैवेद्य दाखवून ते संतुष्ट चित्ताने तो प्रसाद कसा सेवन करतात, प्रबळ रोगाच्या तावडीत सापडल्यास भगवंतावर भरीभार घालून ते दुःख अविचलितपणे सहन करण्याचा ते कसा प्रयत्न करतात, आपली विशेष गरज भागवण्यासाठी देखील ते कुणालाही त्रास देण्यास कसे कचरतात, आणि परत त्यांच्याच सारखा वेश धारण करणारी ढोंगी माणसे सगळे सदाचार पायदळी तुडवून आपला स्वार्थ नि सुख साधण्यासाठीच कसे जगत असतात इत्यादी साऱ्या गोष्टी गदाधर आता संधी लाभताच लक्षपूर्वक अवलोकू लागला. हळूहळू तो खरेखरे साधु दिसल्यास रांधण्यासाठी लाकडे गोळा करणे, पिण्याचे पाणी आणणे

वगैरे लहानसहान कामात मदत करुन त्यांच्याशी खूप सलगीने मिसळू लागला. ह्या लोभसवाण्या मुलाच्या गोड वागण्याने संतुष्ट होऊन त्यांनाही त्याला भगवंताची भजने शिकवण्यात, नाना प्रकारे सदुपदेश देण्यात आणि भिक्षेच्या प्रसादातील थोडे त्याला देऊन त्याच्याबरोबर एकत्र खाण्यात आनंद वाटू लागला.

ह्या वर्णनावरुनच आपल्या लक्षात येईल की गदाधराच्या वयाची इतर सामान्य मुले आणि स्वयं गदाधर यांत किती फरक होता. बरेचदा तर असे दिसून येते की या वयातील बालकांच्या मनामध्ये साधु-बैराग्यांविषयी भीतीच अधिक असते. मग त्यांच्याविषयी आपुलकी वाटणे वा त्यांच्याबरोबर मिसळून त्यांची सेवा वगैरे करणे ही तर फार दूरची गोष्ट. त्याचबरोबर गदाधराची या साधूंकडे व त्यांच्या विरोधात जगाकडे पाहण्याची दृष्टी आणि यासंबंधात येणारे त्यांच्या मनातील विचार व त्यातून मनात उद्धवलेला विवेक या गोष्टी पाहिल्या की सहजच समजते की हा बालगदाधर काही सामान्य नव्हता, तर काही विशेष दिव्यत्व त्याच्यात होते. अखंडब्रह्मांडनायक अर्थात परमात्मा परमेश्वरच बालक गदाधराचे रुप धारण करुन आले होते. पुढे जो त्याग-वैराग्याचा अत्युच्च आदर्श जगापुढे प्रस्तुत करावयाचा होता, त्याची एक चुणुक जणू काही त्यांनी आपल्या लीलेद्वारे दाखविली होती.

साधुसंगामुळे गदाधर आता एकान्तप्रिय झाला होता. त्याच्यात नित्यानित्यवस्तुविवेक जागृत होऊन ईश्वरप्राप्ती हा जीवनाचा उद्देश आहे हेही त्याला उमगले होते. साहजिकच तो अधूनमधून कुठेतरी एकान्तात जाऊन राहत असे. श्रीरामकृष्ण - पोथीमध्ये वर्णन येते - ''श्रीप्रभुदेव अर्थात बालक गदाधर कोणालाही न सांगता दोन-चार दिवसांसाठी कुठेतरी गेला होता. जेव्हा तो परत आला तेव्हा तो पूर्णपणे बदलून गेला होता. जो सर्वांशी हास्यविनोद करीत असे तोच आता त्या सर्वांपासून अलिप्त राहू लागला. यासंबंधीत काही विचारल्यास त्याने आधी काहीच उत्तर दिले नाही, परंतु अतिशय आग्रह केल्यावर त्याने जे उत्तर दिले ते खरोखरच त्याच्या बदललेल्या, अंतर्मुख झालेल्या स्वभावावर प्रकाश टाकणारे आहे. गदाधर उत्तर देतो -

**वृथा कार्यात अर्थहीन । गेले इतुके सारे दिन ।**
**सुंदर हरीचे दर्शन । झाले नाही ।।**
**बुद्धी विषयमलाने युक्त । आहे तुम्हां सर्वांत ।**
**चुकूनही नाही करीत । हरिकथा मधुर ।।**
**हरीचे हे नाम गायन । करी सकल-संताप-हरण ।**
**नाना साधन-भजन । स्मरण-मनन आणि ।।**
**रुची नाही तुम्हां त्यात । आहे परी हास्य-विनोदात ।**
**ऐशा परी समय जात । अंती काय व्हावे ।।**
**अनित्य संसार ओळखून । पाहा जरा विचार करुन ।**
**गती नाही हरी विण । मानवासी ।।**

अशा प्रकारे लहानपणापासूनच ईश्वरप्राप्तीविषयीची आत्यंतिक ओढ असणे; इतकेच नव्हे तर इतरांनाही त्याविषयी उपदेश करणे ही काही सामान्य गोष्ट नव्हे. भक्त प्रल्हादाची गोष्ट अशीच आहे. तोदेखील आपल्या सवंगड्यांना घेऊन हरिनामाचा उपदेश देत असे हे सर्वश्रुत आहेच. त्याचप्रमाणे हा बालक गदाधर आपल्या सवंगड्यांना एकत्र करुन त्यांना असे उपदेश देत असे व त्याबरोबर स्वतः त्यांना हरिकथा सांगत असे.

भगवान श्रीरामकृष्ण अर्थात गदाधराने आता किशोरावस्था ओलांडली होती. जीवनात घडणाऱ्या विविध घटनांच्या परिणामी त्याला कसे विचारशील - चिंतनशील बनवले होते हे आपण पाहिले आहेच. जीवनामध्ये श्रेय काय आणि प्रेय काय याचा विवेक-विचार तो आतापासूनच करु लागला होता. कठोपनिषदामध्ये यमराजांना अपेक्षित असलेला साधक हा असाचा असामान्य, विवेक-विचारशील आहे. नचिकेत्यामध्ये असलेले सारे गुण आपल्याला या बाल गदाधरामध्ये पूर्णपणे असल्याचे दिसते. नचिकेत्याला उपदेश करताना यमराज हे श्रेय व प्रेय काय आहे, कसे आहे आणि त्यातले काय ग्रहण करायचे याचे सुंदर वर्णन करतात.

यमराज सांगतात - श्रेय अर्थात श्रेयस्कर हे मनुष्य जीवनाचे कल्याणकारी साधन आहे. याउलट प्रेय अर्थात प्रिय वाटणारे हे एक भोग प्रदान करणारे साधन आहे. दोन्हीही स्वतंत्र असून वेगवेगळी फळे प्रदान करणारी आहेत. दोन्हीही मानवाला आपल्याकडे आकर्षित करीत असतात. परंतु असे जरी असले तरी त्यातील जे श्रेय-कल्याण प्रदान करणारे जे साधन आहे, त्याचे ग्रहण करणाऱ्याचे कल्याण होत असते आणि जो प्रेय - सांसारिक भोग प्रदान करणाऱ्या भोग-साधनांचा स्वीकार करतो तो मात्र खऱ्या लाभापासून दूर जातो. त्याला यथार्थ फलप्राप्ती होत नाही. (कठ १.२.१) म्हणून मग पुढे यमराज म्हणतात -

**श्रेयश्च प्रेयश्च मनुष्यमेतस्तौ सम्परीत्य विविनक्ति धीरः ।**
**श्रेयो हि धीरोऽभि प्रेयसो वृणीते प्रयो मन्दो योगक्षेमाद् वृणीते ।।**

कठ १.२.२

ही श्रेय व प्रेय दोन्हीही मनुष्यासमोर येत असतात. परंतु बुद्धिमान पुरुष त्या दोहोंच्या स्वरुपावर योग्यप्रकारे विचार करुन त्यांना वेगवेगळे समजून घेतो. आणि मग तो श्रेष्ठ बुद्धीचा पुरुष प्रिय अर्थात भोग प्राप्तीच्या साधनाऐवजी श्रेय अर्थात परम-कल्याणकारी साधनाचं ग्रहण करतो. परंतु मंद बुद्धी असलेला मनुष्य लौकिक योगक्षेमाची इच्छा ठेवून भोगांचे साधनस्वरुप असलेल्या प्रेयाचे ग्रहण करतो.

बाल गदाधराने केलेल्या अशाप्रकारच्या विवेक-विचाराचे श्रीरामकृष्णलीलाप्रसंगात अत्यंत हृद्य असे वर्णन स्वामी सारदानंदांनी केले आहे, ते मुळातून पाहिल्यास आपल्याला त्याच्या वयाच्या इतर मुलांपासून तो कसा वेगळा - असामान्य होता ते समजून येईल.

स्वामी सारदानंद लिहितात -

''अशा रीतीने धर्मप्रवृत्ती विकसित होऊनही गदाधराचा विद्याभ्यासविषयीचा अनुराग मात्र एव्हानाही विशेष वृद्धी पावला नाही. पंडित, भट्टाचार्य इत्यादी बिरुदे मिरविणाऱ्या व्यक्तींची ऐहिक

भोगसुखाची नि धनाची लालसा बघून तो उलट त्यांच्यासारखा विद्यार्जनाविषयी दिवसेंदिवस उदासीन होऊ लागला. कारण, बालकाची सूक्ष्मदृष्टी त्याला आता आधी सगळ्यांच्या कार्यामागील हेतू जोखावयास प्रेरित करी, आणि त्याच्या पित्याचे वैराग्य, ईश्वरभक्ती, सत्यनिष्ठा, सदाचरण व धर्मपरायणता इत्यादी गुण आदर्श म्हणून समोर धरुन त्याला त्या लोकांच्या वागणुकीचे मूल्यमापन करावयास प्रवृत्त करी. अशा प्रकारे पारख करु जाऊन जवळजवळ सगळ्याचजणांची अगदी निराळी उद्दिष्टे लक्षात घेऊन बालक विस्मित होऊन गेला. परत, अनित्य संसाराला नित्य समजून कवटाळून ते सदा दुःखाने रंजीस येत असतात हे बघून त्याला त्याहीपेक्षा अधिक विषादही वाटला. हे सारे पाहूनसवरुन आपले स्वतःचे जीवन वेगळ्याच रीतीने घालविण्याचा संकल्प त्याच्या मनात उदय पावावा ह्यात नवल नाही. वाचक कदाचित हे सारे ऐकून म्हणतील की, अकरा की बारा वर्षांच्या मुलाच्या ठायी सूक्ष्मदृष्टीचा व विवेकशक्तीचा येथवर विकास होणे संभाव्य आहे काय? उत्तरी म्हणता येईल की, सामान्य मुलांच्या बाबतीत असे घडत नाही हे खरे, परंतु गदाधर ह्या वर्गातला नव्हता. असामान्य प्रतिभा, मेधा व मानसिक संस्कार घेऊन तो जन्माला आला होता. आणि म्हणून, कमी वय असले तरी त्याच्या बाबतीत हे असे घडणे विचित्र नाही.''

भगवान श्रीरामकृष्णांचे दिव्यत्व प्रकट करणाऱ्या अशाप्रकारच्या कितीतरी गोष्टी आपल्याला त्यांच्या बालवयातच दिसून येतात.

गदाधरानं आता तारुण्यात पदार्पण केलं. त्याचे थोरले बंधू रामकुमार यांनी कामारपुकुर सोडलं व ते कलकत्ता (कोलकाता) आले होते आणि तेथे त्यांनी एक संस्कृत पाठशाळा सुरु केली. काही दिवसानंतर ते गदाधरलाही कलकत्त्याला घेऊन आले. त्यांचा विचार असा की गदाधर इथे काही शिक्षण प्राप्त करेल व पौरोहित्य वगैरे करुन त्यांना अर्थार्जनामध्ये मदत करेल. परंतु असे घडावयाचे नव्हते. दैवी संकेत वेगळाच होता. गदाधर कलकत्त्याला आपल्या भावाच्या पाठशाळेत असताना एके दिवशी विद्यार्जनाकडे मन देण्याबाबत थोरले बंधू रामकुमार यांनी केलेल्या कानउघाडणीच्या नि तक्रारीच्या उत्तरी स्पष्ट शब्दांत गदाधर म्हणाला होता – **''केळा–तांदळाची गाठोडी बांधण्याची विद्या मी शिकू इच्छित नाही; मी अशी विद्या शिकू इच्छितो की जिच्याने ज्ञानाचा उदय होऊन माणूस खरोखर कृतार्थ होतो.''** अर्थात पौरोहित्य करणाऱ्या भिक्षुकांना दक्षिणेत मिळणाऱ्या या साऱ्या वस्तू होत त्या मिळविण्याची विद्या मला नको आहे. म्हणजेच 'मी भाजीभाकरी मिळविण्याची, वा केवळ उदरभरणाची विद्या शिकू इच्छित नाही.' गदाधर त्यावेळी फक्त सतरा वर्षांचा होता ही गोष्ट इथे स्मरणात ठेवली पाहिजे. या वयातील सर्वसामान्य युवक असा विचार करु शकतो काय वा असे उत्तर देऊ शकतो काय? यातच श्रीरामकृष्णांचे दिव्यत्व अनुस्यूत आहे.

नंतर ईश्वरी संकेतानुसार दक्षिणेश्वर येथे जगन्मातेचे – कालीमातेचे एक भव्य मंदिर बांधण्यात आले व तिथे प्रथम रामकुमारांची व नंतर भगवान श्रीरामकृष्णांची – गदाधराची पुजारी म्हणून नियुक्ती झाली. जगन्मातेची पूजा करता करता गदाधराच्या मनात येऊ लागले की या प्रस्तरमय मूर्तीच्या मागे काम खरोखरच चिन्मयी जगन्माता विराजीत आहे काय? आणि असेल तर तिचे दर्शन होऊ शकते काय? आणि मग मातेच्या दर्शनासाठी त्याचे मन व्याकुळ होऊ लागले. हळूहळू ही व्याकुळता पराकाष्ठेला जाऊन पोचली. परिणामी गदाधर – श्रीरामकृष्ण आंतरिकतेने जगन्मातेला आळवू लागले.

श्रीरामकृष्णांनी आपल्या भक्तांना एकदा सांगितले होते की, ह्या काळात एक दिवस ते जगदंबेला गाणे ऐकवीत होते आणि तिच्या दर्शनलाभासाठी अतोनात व्याकुळ होऊन प्रार्थना करीत होते नि रडत होते. म्हणत होते, ''आई, इतकं हे आळवतो आहे त्यातलं काहीच का तू ऐकत नाहीस? रामप्रसादला दिसलीस, मला का दिसणार नाहीस?''

**तुझी कृपा कैसी होई। रामप्रसादावरी ग आई।**
**मी नसे का कोणीच काही। तोचि एक पुत्र।।**
**आकुल होती पाहा प्राण। तयांचे हो।।**
**नेत्रांतील अश्रुधारांनी। वक्षस्थल जाई भिजूनी।**
**करती किती श्यामा–चरणी। प्रार्थना–विनती।।**
**विरहयातना त्या अति। कैसी करावी त्यांची इति।**
**अवशेषे मग ते होती। बाह्यज्ञानशून्य।।**

श्रीरामकृष्ण स्वतः सांगत –

''आईचं दर्शन झालं नाही म्हणून तेव्हा हृदयात असह्य दुःख होतं, कोरडा करण्यासाठी लोक ज्याप्रमाणे जोरानं पंचा पिळत असतात, वाटू लागलं की माझं हृदय धरुन कोणी जणू तसं करतो आहे! आईचं दर्शन बहुधा कधीच लाभायचं नाही असं वाटून दुःखानं तळमळू लागलो. कमालीचा बेचैन होऊन विचार केला की तर मग ह्या जीवनाची आणखी आवश्यकता नाही. आईच्या मंदिरात जी तलवार होती तिच्यावर एकाएकी दृष्टी पडली. ह्याच क्षणी जीवनाचा शेवट करीन अशा विचाराने वेड्यासारखा धावून ती धरतो आहे एवढ्यात अकस्मात आईचं अद्भूत दर्शन लाभलं अन् भान लोपून पडून गेलो! त्यानंतर बाहेर काय होत आहे, कुणीकडे तो नि त्यानंतरचा दिवस गेला त्यातलं काहीही कळू शकलं नाही! आतमधे मात्र पूर्वी कधीही न अनुभवलेल्या एका सांद्र आनंदाचा स्त्रोत वाहत होता आणि आईच्या चिन्मय अस्तित्वाचा प्रत्यक्ष प्रत्यय येत होता.'' (श्रीरामकृष्णलीलाप्रसंग)

हे अशाप्रकारे मातेचे दर्शन झाल्यावर श्रीजगदंबेच्या चिन्मय मूर्तीच्या अबाधित, अखंडित दर्शनलाभासाठी श्रीरामकृष्णांच्या हृदयात एका निरंतर, विव्हल, सोत्कंठ क्रंदनाचे कढ उठू लागले! नंतर त्यांना जगन्मातेचे अस्तित्व सदोदित आपल्याबरोबर असल्याची अनुभूती येऊ लागली. त्याचबरोबर तीच आपला हात धरुन सर्वकाही करुन घेत आहे हेही त्यांना जाणवू लागले.

नंतर याच जगन्मातेचे विविध रुपांत दर्शन घेण्याची इच्छा श्रीरामकृष्णांच्या मनात उत्पन्न झाली. अर्थात विविध संप्रदायाचे – धर्माचे लोक त्या परमात्म्याचा लाभ कसा करुन घेतात हे अनुभवण्याची

इच्छा त्यांना झाली. आणि त्यानुसार विविध संप्रदायांचे आणि धर्मांचे गुरु त्यांच्यापाशी आले व त्यांच्या मार्गदर्शनानुसार श्रीरामकृष्णांनी त्या त्या संप्रदायाची - धर्मांची शास्त्रोक्त साधना केली. परिणामी त्यांना त्या संप्रदायोक्त अंतिम सत्याची उपलब्धी अवघ्या तीन-तीन दिवसांतच झाली. त्याचबरोबर त्यांना ज्या ज्या देवतांचे दर्शन झालं त्यातील बहुतेक साऱ्याच देवता त्यांच्या शरीरात विलीन झाल्या होत्या. ह्या साऱ्या अद्भूत व दिव्य इतिहासाचे विस्तृत वर्णन भगवान श्रीरामकृष्णांचे अंतरंगीचे संन्यासी पार्षद स्वामी सारदानंद यांनी 'श्रीरामकृष्णलीला - प्रसंग' नामक भगवान श्रीरामकृष्णांच्या बृहत् चरित्रग्रंथात केले आहे ते वाचकांनी जरुर वाचावे.

खरोखर अशाप्रकारे एकाच जीवनामध्ये विविध धर्मांच्या व संप्रदायांच्या साधना करणं व त्यात सिद्धी प्राप्त करुन घेणं हे सामान्य मुनष्याचं काम नाही. यावरुनच आपल्या लक्षात येईल की श्रीरामकृष्ण हे कोणी सामान्य व्यक्ती नव्हते तर जगताचं कल्याण करण्यासाठी अवतार धारण केलेले परमेश्वरच होते.

परिणामी नंतरच्या काळात आपल्या भक्तांना त्यांनी त्यांच्या त्यांच्या भावानुसार त्यांच्या इष्टप्राप्तीच्या मार्गात साहाय्य तर केलं होतचं परंतु स्वतःच बरेचदा त्यांना त्यांच्या इष्टरुपामध्ये दर्शन दिलं होतं. यासंबंधीची एखादी घटना इथे पाहिल्यास त्यांचं दिव्यत्व समजण्यास ती निश्चितच उपयोगी पडेल.

श्रीरामकृष्णांचे लीलास्थान दक्षिणेश्वर हे राणी रासमणी नामक एका भक्तिमान महिलेने निर्माण केले होते. श्री. मथुरबाबू हे तिचे जावई. श्रीरामकृष्णांवर त्यांची अत्यंत भक्ती होती. अशाप्रकारचा दृढ विश्वास व भक्ती पाहून एकदा भगवान श्रीरामकृष्णांनी आपले स्वरुप-आपले दिव्यत्व त्यांच्या समोर कसे प्रकट केले ती घटना खरोखरच अत्यंत रोचक, भक्तिवर्धक व श्रीरामकृष्णांचे अवतारत्व प्रकट करणारी आहे.

सर्वदाच आपल्या भावात तन्मय असणारे श्रीरामकृष्ण एक दिवस त्यांच्या खोलीच्या ईशान्येस जी पूर्व-पश्चिम विस्तारलेली ओसरी आहे तीत आपल्यातच मग्न होऊन तारेत असल्याप्रमाणे येरझारा घालीत होते. देवस्थान आणि पंचवटी यांच्या मधे जो एक अलग वाडा आहे, त्याच्याच एका खोलीत मथुरबाबू त्यावेळी एकटे आपल्याच तंद्रीत बसलेले होते. मथुरबाबू जिथे बसले होते तिथून श्रीरामकृष्ण जिथे फिरत होते ती जागा दृष्टीस पडत होती. आणि अचानक एक अतर्क्य आणि अचिंत्य अशी घटना घडली - मथुरबाबूच एकाएकी गडबडीने धावत श्रीरामकृष्णांजवळ आले आणि प्रणत होऊन त्यांचे दोन्ही पाय कवटाळून धरुन रडू लागले.

मथुरबाबूंना एक अद्भुत दर्शन झाले होते ! ते श्रीरामकृष्णांना म्हणाले, ''बाबा, तुम्ही फिरत होता आणि मला स्पष्ट दिसले की जेव्हा इकडे येत आहात तेव्हा बघतोय् की तुम्ही नाही, तर माझी ती मंदिरातली आई (काली)! अन् पाठ वळवून तिकडे जाऊ लागताच दिसले की प्रत्यक्ष महादेव! पहिल्यानं वाटलं की दृष्टिभ्रम झाला आहे. म्हणून डोळे चांगले पुसून पुन्हा बघितले - फिरुन तेच ! जितक्यांदा असे केले तितक्यांदा तसेच दिसले.''

खरं तर भगवान श्रीरामकृष्णांनी कृपा करुन मथुरबाबूंना असं दर्शन घडवलं होतं. परंतु श्रीरामकृष्ण स्वतःचा दिव्य भाव लपवून ठेवीत व सर्वकाही जगन्माताच करीत आहे असं भासवीत व सांगत. मथुरांच्या पत्रिकेत लिहिलेलं होतं की, त्यांच्या इष्टदेवतेची त्यांच्यावर इतकी कृपादृष्टी राहिल की शरीर धारण करुन ती त्यांच्याबरोबर फिरेल, त्यांचे रक्षण करील. प्रस्तुत घटनेवरुन आपण निश्चितपणे म्हणू शकतो की मथुरबाबूंची इष्टदेवता जगदंबा त्यांच्यावर कृपा करण्यासाठीच श्रीरामकृष्णांच्या शरीरात प्रत्यक्ष विद्यमान झाली होती. ह्या घटनेमुळे मथुरबाबूंचीही खात्री पटली की, मंदिरातील पाषाणमूर्तीत जी कालीमाता आहे तीच बहुधा शरीर धारण करुन त्यांच्या जन्मपत्रिकेत सांगितल्याप्रमाणे त्यांच्याबरोबर फिरत आहे !

भगवंत जेव्हा शरीर धारण करुन जन्म ग्रहण करतात तेव्हा मानवाप्रमाणेच लीला करण्याचा 'प्रयत्न' करतात. परंतु त्यातूनच कधी कधी त्यांचे ते ईश्वरत्व कसे प्रकट होते हे आपण पाहिलेच आहे. त्याचबरोबर त्यांना त्यांच्या अवतारत्वाची - दिव्यत्वाची जाणीव असते. तसेच त्यांचे शरीर धारण करण्याचे प्रयोजन काय आहे हेही त्यांना पूर्णपणे माहीत असते. आणि ते प्रयोजन पूर्ण झाल्यावर ते लगेचच लीलासंवरण करण्याची तयारीही करतात.

श्रीरामकृष्णांच्या जीवनातही आपल्याला हे आढळून येते. आपले अवतारकार्य पूर्ण झाल्याचे लक्षात येताच आपली भावधारा प्रसारित करण्यासाठी साधनरुप असलेली त्यांची भक्तमंडळीही येऊन उपस्थित झाली. विशेषेकरुन त्यांचे सर्व युवक भक्तही एव्हाना येऊन पोचले होते. साहजिकच त्या सर्वांना एका प्रेमरज्जूने बांधून योग्य त्या दिशेने परिचालित करुन मग शरीरत्याग करायचा असे जणू श्रीरामकृष्णांनी ठरविले असावे.

या सर्व कार्यासाठी व आपल्या लीलासंवरणासाठी काही कारण हवे म्हणूनच की काय त्यांनी स्वतःहूनच कंठरोग 'धारण' केला. साहजिकच भक्तांच्या लक्षात आले की श्रीरामकृष्ण लवकरच लीलासंवरण करणार आहेत. त्याचबरोबर त्यांची योग्यप्रकारे सेवा होणे आवश्यक आहे. हे जाणून त्यांनी श्रीरामकृष्णांना दक्षिणेश्वरहून प्रथम कलकत्त्याच्या श्यामपुकुर व नंतर काशीपुर येथे आणून त्यांच्या चिकित्सेची व सेवाशुश्रुषेची व्यवस्था केली.

यापूर्वीच दक्षिणेश्वरी राहत असताना श्रीरामकृष्णांनी स्वतःसंबंधीच्या भविष्यकाळातील कित्येक गोष्टी भक्तांना पुष्कळ वेळा सांगितल्या होत्या - ''जाण्याच्या आधी (इहलोकाचा त्याग करण्याच्या आधी) बाजारात हंडी फोडून टाकीन (अर्थात स्वतःचे देवमानवत्व सर्वांसमोर प्रकट करीन)''; ''जेव्हा पुष्कळ लोक (माझ्या दिव्य महिम्याची गोष्ट) जाणतील, त्यासंबंधी कुजबुज करतील तेव्हा (आपले शरीर दाखवून) ही खोळ मग राहणार नाही, आईच्या (जगन्मातेच्या) इच्छेने ती नष्ट होऊन जाईल'' आणि या साऱ्या गोष्टी आता प्रत्यक्षात परिणत होत होत्या.

भगवान श्रीरामकृष्णांना कित्येक लोक अवतार मानू लागले होते. त्यांच्या दिव्यत्वाचा प्रसार-प्रचार ब्राह्मसमाजाचे नेते श्री. केशवचंद्र सेन वृत्तपत्रांतून करु लागले होते. आणि अखेर तो श्रीरामकृष्णांच्या जीवनातील अत्यंत महत्त्वपूर्ण दिवस उगवला.

श्रीरामकृष्णलीलाप्रसंगात वर्णन येतं-

"हळूहळू अर्धा पौष महिना निघून जाऊन १८८६ सालची १ जानेवारी ही तारीख आली. त्या दिवशी ठाकुरांना (भगवान श्रीरामकृष्णांचा उल्लेख त्यांचे भक्तलोक 'ठाकुर' अर्थात देव म्हणून करीत असत.) विशेष बरे वाटत होते, म्हणून उद्यानात थोडा वेळ फिरण्याची इच्छा त्यांनी प्रकट केली. सुटीचा दिवस असल्यामुळे त्या दिवशी भक्तगण मध्यान्हानंतर थोड्या वेळातच एकामागून एक किंवा समूहासमूहाने उद्यानात येऊ लागले. दुपारी तीन वाजता ठाकुर जेव्हा उद्यानात फिरण्यासाठी वरुन खाली उतरले तेव्हा तीसहूनही अधिक लोक घरात किंवा उद्यानातील झाडांखाली बसून आपसात बोलत होते. ठाकुरांना बघताच सर्वांनी आदराने उठून त्यांना प्रणाम केला. खालच्या हॉलमधून पश्चिमेकडील दाराने उद्यानातील रस्त्यावर उतरुन ठाकुर दक्षिणेकडील फाटकाच्या दिशेने हळूहळू पुढे जाऊ लागले. थोडे अंतर ठेवून भक्तगण त्यांच्या मागे मागे जाऊ लागले. याप्रमाणे घर व फाटक यांच्या मध्यभागी आल्यावर ठाकुरांनी गिरीश, राम, अतुल इत्यादी काही भक्तांना पश्चिमेकडील झाडाखाली बघितले. या भक्तांनी देखील ठाकुरांना पाहून तिथूनच प्रणाम केला आणि आनंदाने ठाकुरांच्याजवळ येऊन पोहोचले. कोणी काही म्हणण्यापूर्वीच गिरीशचंद्रांना संबोधून ठाकुर अकस्मात म्हणाले, "गिरीश, तुम्ही सगळ्यांना इतक्या गोष्टी (माझ्या अवतारत्वासंबंधीच्या) सांगत फिरता, तुम्ही (माझ्याविषयी) असे काय पाहिले व तुम्हाला असे काय समजले?" हे शब्द ऐकून किंचित देखील विचलित न होता ठाकुरांच्या चरणांजवळ जमिनीवर गुडघे टेकून बसून व तोंड वर करुन हात जोडून गद्‌गद स्वरात गिरीश म्हणाले, "व्यास-वाल्मिकी ज्यांचा महिमा वर्णू शकले नाहीत त्यांच्यासंबंधी मी आणखी अधिक काय बोलू शकतो?" गिरीशांच्या हृदयातील सरल विश्वास प्रत्येक शब्दांतून व्यक्त झालेला बघून ठाकुर मुग्ध होऊन गेले आणि त्यांना उपलक्षून तेथे गोळा झालेल्या भक्तांना ते म्हणाले, "तुम्हाला आणखी काय सांगू! आशीर्वाद देतो की तुम्हाला चैतन्य प्राप्त होवो." भक्तांविषयीच्या प्रेमाने व करुणेने स्वतःला विसरुन जाऊन, हे शब्द उच्चारताच ठाकुर भावाविष्ट होऊन गेले. त्यांची ती स्वार्थगंधहीन गंभीर आशीर्वाणी प्रत्येकाच्या थेट हृदयाला जाऊन भिडली व तिने आनंदलहरींनी सर्वांची हृदये उद्वेलिखत करुन टाकली. त्या सर्वांना देशकालाचे विस्मरण झाले आणि ते प्रत्यक्ष अनुभवू लागले की जणू त्यांच्या दुःखाने व्यथित होऊन कोणी एक अपूर्व देव, हृदयात अनंत यातना व करुणा घेऊन, स्वतःचे किंचित देखील प्रयोजन नसताही मातेसमान त्यांना स्नेहांचलात आश्रय देण्यासाठी देवलोकातून अवतीर्ण होऊन त्यांना प्रेमाने बोलावीत आहे! ठाकुरांना प्रणाम करण्यासाठी व त्यांची पदधूली घेण्यासाठी भक्तगण तेव्हा व्याकुळ होऊन गेले आणि जयजयकाराने चारही दिशा भरुन टाकून एकेकाने त्यांना प्रणाम करण्यास सुरुवात केली. अशाप्रकारे प्रणाम करण्याच्यावेळी आज ठाकुरांच्या करुणासागराने आपली सीमा उल्लंघून एक अदृष्टपूर्व घटना घडविली. कुणाकुणा भक्ताविषयीच्या करुणेने व प्रसन्नतेने स्वतःला विसरुन जाऊन आपल्या दिव्य शक्तिपूत स्पर्शाने त्याला कृतार्थ करताना आम्ही पूर्वी दक्षिणेश्वरी त्यांना प्रायः रोजच बघितले होते, परंतु आज अर्धबाह्यदशेत ते तेथे जमलेल्या भक्तांपैकी प्रत्येकाला अशा प्रकारे स्पर्श करु लागले. त्यांच्या अशा आचरणामुळे भक्तांच्या आनंदाला सीमा उरली नाही हे सांगावयास नको. ते जाणून चुकले की आजपासून ठाकुर आपल्या देवत्त्वाची गोष्ट केवळ त्यांच्यापासूनच नव्हे, तर जगातील कुणाहीपासून लपवून ठेवणार नाहीत; आणि स्वतःमधील त्रुटी, अभाव व असमर्थता यांची जाणीव असल्यामुळे त्यांच्या मनात किंचित देखील संशय उरला नाही की यापुढे पापी, तापी सर्वजणांना त्यांच्या अभयपदी समान रीतीने आश्रय प्राप्त होईल. म्हणून या अपूर्व घटनेमुळे कोणी कोणी, काहीही बोलण्यास असमर्थ झाल्यामुळे मंत्रमुग्धवत त्यांच्याकडे नुसते पाहू लागले; कोणी कोणी घरातील सर्व लोकांना ठाकुरांच्या कृपालाभाने धन्य होण्यासाठी ओरडून ओरडून बोलावू लागले आणि कोणी कोणी फुले गोळा करुन मंत्रोच्चारण करीत करीत ठाकुरांच्या शरीरावर ती उधळून त्यांची पूजा करु लागले. काही वेळ असे घडल्यानंतर ठाकुरांचा भाव शांत झालेला बघून भक्तगणदेखील पूर्वीप्रमाणे भानावर आले आणि त्या दिवशीचे उद्यानभ्रमण याप्रमाणे समाप्त करुन ठाकुर घरातील आपल्या खोलीत जाऊन बसले." (श्रीरामकृष्णलीलाप्रसंग)

खरोखरच श्रीरामकृष्णांनी आपले देवत्व - अवतारत्व सर्वांसमोर प्रकट केले. आपल्या आध्यात्मिक संपदा त्यांनी मुक्तपणे सर्वांना वाटली. अशाप्रकारे श्रीरामकृष्णांनी या दिवशी आपले 'दिव्य स्वरुप' आपले 'दिव्यत्व' सर्वांसमोर प्रकट केले.

भगवान श्रीरामकृष्णांच्या जीवनातील अशा कितीही अलौकिक घटना आपण पाहिल्या तरी त्यांकडे 'सश्रद्ध' मनाने पाहणं आवश्यक आहे. कारण तसं पाहिलं तर श्रीरामकृष्णांच्या बाह्य रुपावरुन वा बाह्य आचरणावरुन सहजासहजी त्यांचं दिव्यत्व समजणं अतिशय कठीणच होय. त्यासाठी 'विश्वासी मन' असणं अत्यंत आवश्यक असतं, यासंबंधीत अक्षयकुमार सेन आपल्या श्रीरामकृष्ण-महिमा या पुस्तकात वर्णन करतात -

"एक गोष्ट सांगतो ऐका - अवतार विशेषांमध्ये रुपविशेष असतो, जसं राम-अवतारात राम-रुप, कृष्ण-अवतारात कृष्ण-रुप यावेळी रामकृष्ण अवतारात रामकृष्ण-रुप झालं आहे. सर्व अवतारांत एकसारखा वेश नसतो नि एकसारखं कार्यदेखील नसतं. अवतार दोन प्रकारचे असतात. एक अवतार असतात - धरणीचा भार हलका करण्यासाठी, साधूंचे रक्षण करण्यासाठी आणि दुष्टांचा विनाश करण्यासाठी, नि दुसरे जे अवतार असतात त्यांना आदर्शावतार म्हणतात. या अवतारांचं कार्य आहे - धर्मस्थापना करणं, जीवांना शिक्षण देणं, तसंच पतितोद्धार करणं. आदर्शावतारांमध्ये ऐश्वर्य असलं

तरी ते व्यक्त असत नाही. वेशभूषेचं अवडंबर असून देखील नसल्यात जमा असतं. असतं फक्त माधुर्य. आदर्शावतार असतात – ऐश्वर्याविना ऐश्वर्यवान नि रुपाविना रुपवान.'' आणि याच कारणास्तव भगवान श्रीरामकृष्णांना अवतार म्हणून ओळखणं अत्यंत कठीण. परंतु विश्वासपूर्ण अंतःकरणानं श्रीरामकृष्णांच्या जीवन–चरित्राकडं पाहिलं, त्यांच्या अंतरंगात डोकावून पाहिलं, प्रत्यके घटनेतील भगवान श्रीरामकृष्णांचा मानसिक भाव कोणता होता हे पाहिलं की मगच त्यांचे दिव्यत्व काही प्रमाणात आपल्या लक्षात येईल.''

शिवाय आणखी एक गोष्ट म्हणजे भगवंताचे हे स्वरुप त्याची स्वतःची कृपा झाल्याशिवाय कोणालाही दिसू – समजू शकत नाही. प्रयत्न जरुर केले पाहिजेत परंतु शेवटी सारंकाही त्याच्या कृपेवरच अवलंबून असते. यासंबंधात कठोपनिषदात एक सुंदर श्लोक येतो. श्रुतिमाता सांगते –

**नायमात्मा प्रवचनेन लभ्यो न मेधया न बुहना श्रुतेन।**
**यमेवैष वृणुते तेन लभ्य – स्तस्यैष आत्मा विवृणुते तनुं स्वाम ।।**

– कठ उपनिषद १.२.२३

हा आत्मा वेदांच्या अध्ययनाने लाभण्यासारखा नाही, बुद्धीने वा धारणाशक्तीनेही लाभण्यासारखा नाही तसेच खूपशा अध्ययनानेही तो प्राप्त होणार नाही. हा आत्मा ज्याला वरतो अर्थात ज्या साधकाची निवड करतो, त्याला स्वतःचे स्वरुप प्रकट करुन दाखवितो. (अथवा असाही अर्थ होऊ शकतो की जो साधक या आत्म्याचेच वर्णन करतो अर्थात त्याच्या प्राप्त्यर्थ व्याकुळतेने, एकाग्र होऊन प्रयास करतो त्याला हा आत्मा स्वतःचे स्वरुप प्रकट करुन दाखवितो.)

**स्वामी विपाप्मानंद**
रामकृष्ण मठ, धंतोली, नागपूर

## 'श्रीरामकृष्ण म्हणतात' पुस्तकातून साभार

**श्रीरामकृष्ण परमेश्वर साकार आहे आणि निराकारही. एकदा एक संन्यासी जगन्नाथाच्या दर्शनाला गेला. मंदिरात प्रवेश करुन दर्शन घेत घेत तो विचार करु लागला की देव साकार आहे की निराकार. देवाला स्पर्श होतो की नाही हे पाहण्याकरता त्याने आपल्या हातातील दंड डावीकडून उजवीकडे फिरवला. दंडाला कसलाच स्पर्श झाला नाही. तेव्हा त्याला कळून चुकले की त्याच्यासमोर कुठलीच मूर्ती नाही – देव निराकार आहे. परत त्याने उजवीकडून डावीकडे दंड फिरवला. पण या वेळी दंड मूर्तीला लागला. तेव्हा संन्याशाच्या लक्षात आले की देव साकारही पण आहे. अशा तऱ्हेने त्याला प्रत्यय आला की परमेश्वर साकार आहे आणि निराकारही.**



# श्रीरामकृष्ण आणि त्यांचे स्त्रीपार्षद

**डॉ. मालती आगटे**, जी.डी.आर्ट, एम.ए. पीएचडी, (आर्ट व पेंटिंग्ज्),
कमर्शिअल आर्टिस्ट म्हणून स्वतंत्र व्यवसाय १९९० पर्यंत एस.एन.डी.टी. कॉलेजमधून लेक्चरर म्हणून निवृत्त. लोकसत्ता, केसरी, सकाळ मध्ये आर्ट क्रिटिक या विषयावर लेख. बालचित्रकला स्पर्धा गेली २५ वर्षेपरीक्षक. 'सहज सोपं' या नावाची सेरीज सकाळमध्ये खूप गाजली. रामकृष्ण मठ व शारदा मठ, पुणे येथे कार्यरत. आदिशक्ती पुरस्कार, रामकृष्ण मठ - त्रिवेंद्रम, कलकत्ता, बेलूर मठ. शारदा मठ-पुणे, इंदौर, बलसाड, कलकत्ता निवेदिता स्कूल येथे पेंटिंग्ज् लावली आहेत.

**नाहं प्रकाशः सर्वस्य योगमायासमावृतः ।**
**मूढोऽयं नाभिजानाति लोको मामजमव्ययम् ।।**

जेव्हा ईश्वर मानवी देह धारण करुन या भूतलावर अवतीर्ण होतो तेव्हा तो स्वतःच योगमायेने झाकला गेलेला असतो. त्यामुळे सर्वसामान्य लोक त्याला जाणू शकत नाहीत. परंतु त्याला कोणीच जाणले नाही तर त्याचे अवतारकार्य पूर्ण कसे होणार? म्हणून तो स्वतःच काही उपाय करीत असतो. तो कोणते उपाय करतो हे जाणून घेण्यासाठी आतापर्यंत होऊन गेलेल्या अवतारांचे अवलोकन करावे लागेल. या अवलोकनात असे लक्षात येते की, ईश्वर अवतार घेताना आपले पार्षदही बरोबर घेऊन येत असतो. हे पार्षदही मानवी रुपातच आलेले असतात. ते ईश्वराचे लीलासहचर असल्याने मानवी रुपातील ईश्वराला ओळखतात. परंतु केवळ या पार्षदांच्या सहाय्याने अवतारकार्य पूर्ण होऊ शकत नाही. म्हणून पार्षदांव्यतिरीक्त दोन प्रकारच्या व्यक्तिंची ईश्वर निवड करीत असतो.

पहिल्या प्रकारात अशा प्रकारच्या व्यक्ति येतात की, जे ईश्वराचे स्वरुप जाणून घेण्यास समर्थ असतात, त्यांचीच तो निवड करतो आणि योग्य वेळी त्यांना आपले खरे स्वरुप दाखवतो. त्यामुळे त्या व्यक्ति ईश्वराच्या अवतारकार्यात सहजपणे सहभागी होतात.

दुसरा प्रकार म्हणजे ईश्वराला जाणून घेण्याचे उपजत सामर्थ्य काही व्यक्तींच्या अंगी जरी नसले तरी थोड्याफार प्रयत्नाने ते निर्माण होऊ शकते. अशा व्यक्तींना ईश्वर एखादे निमित्त साधून स्वतःकडे ओढून घेतो. त्यानंतर त्या व्यक्ति त्या अवताराच्या निस्सिम भक्तच बनून जातात.

अशी 'निस्सिम भक्ती आणि प्रेम शिकवण्यासाठीच ईश्वर अवतार घेत असतो.' असे भगवान श्रीरामकृष्ण परमहंस म्हणत असत. श्रीरामकृष्ण परमहंस हे अवतारी पुरुष होते. वर उल्लेख केलेल्या तीनही प्रकारातील व्यक्ति त्यांच्या अवतारकार्यात सहभागी होत्या. त्यात अनेक स्त्रियाही होत्या.

त्या स्त्रिया कोण होत्या, कोणत्या प्रकारातील होत्या, श्रीरामकृष्णांशी त्यांचे कोणते नाते होते, स्वतःच्या अवतार कार्यात त्यांना श्रीरामकृष्णांनी कसे ओढून घेतले आणि त्या स्त्रियांचा श्रीरामकृष्णांविषयी कोणता भाव होता. या साऱ्या प्रश्नांची उत्तरे जाणून घेणे एक साधक या दृष्टीने अतिशय उद्‌बोधक होईल.

त्या सर्व स्त्रियांमध्ये प्रथम क्रमांकावर अर्थातच त्यांच्या जन्मदात्री आई म्हणजेच चंद्रमणीदेवी असणार आहेत. कारण त्यांच्यामुळेच ईश्वर श्रीरामकृष्णांच्या रुपात अवतरु शकला ! 'साक्षात ईश्वराला स्वतःच्या गर्भात धारण करण्याची महानता त्या मातेच्या ठिकाणी होती' ! अशा आशयाचे उद्‌गार स्वतः भावावस्थेत असताना श्रीरामकृष्णांनी मास्टर महाशयांजवळ काढल्याचा उल्लेख सापडतो.

श्रीरामकृष्णांना स्वतःच्या मातेच्या महानतेची जाणीव होती. परंतु चंद्रमणीदेवी तसे मानीत असतील असे वाटत नाही. त्यांना एवढेच वाटत असेल की, 'माझ्यापोटी साक्षात ईश्वराने जन्म घेतला आहे. त्याचे संगोपन मला जास्तीत जास्त चांगल्या प्रकारे करावयचे आहे. त्या संगोपनात बाळाच्या शारीरिक जपणूकीबरोबरच मानसिक आरोग्य उत्तम ठेवण्याचा मला प्रयत्न करावायाचा आहे.'

असा प्रयत्न करीत असताना, प्रत्येकच अवतारी व्यक्तीच्या आईच्या बाबतीत असे घडते की आपले मूल हे ईश्वरी अवतार आहे या गोष्टीचा त्या मातेला विसर पडतो. त्यामुळे आपल्या मुलाचे वागणे सामान्य मुलासारखेच असणार असे ती माता गृहीत धरते. प्रत्यक्षात मुलाचे वागणे वेगळेच घडू लागले की आईच्या मनात काळजी घर करुन बसते. चंद्रमणीदेवींच्या बाबतीतही हेच घडले.

छोट्या छोट्या घटनांनी बाल गदाधराचे म्हणजेच भविष्यातील श्रीरामकृष्णांचे देहभान नाहिसे होणे, रात्री अपरात्री त्याचे स्मशानात जाऊन बसणे, शाळेत जाऊनही अभ्यासात लक्ष नसणे. अशा अनेक घटनांमुळे ज्या चंद्रमणीदेवी गदाधराच्या जन्मापूर्वी चुकूनसुद्धा देवाजवळ एकही संसारिक गोष्ट मागत नसत, त्याच आता आपल्या मुलाच्या कल्याणासाठी देवाजवळ रात्रंदिवस धरणं धरु लागल्या. हे फक्त गदाधर लहान असतानाच घडत होते असे नाही, तर पुढेही ते चालूच

राहिले. कारण 'गदाधर ते रामकृष्ण' हा जो प्रवास होता त्या प्रवासात अशा काही घटना घडल्या की त्या सामान्य माणसाच्या आकलन शक्तिच्या पलिकडच्या होत्या. त्यावेळी चंद्रमणीदेवींना आपल्या मुलाच्या अवतारीत्वाचा विसर पडला. त्यामुळे त्यांनी गावातल्या मुकुंदपुरच्या शिवाला नवसही केला. थोडक्यात म्हणजे श्रीरामकृष्ण जगाच्या दृष्टीने अवतारी पुरुष असले तरी चंद्रमणीदेवींच्या दृष्टीने ते आपले स्वतःचे अपत्यच होते.

गदाधराला स्वतःच्या मुलासमान मानणारी एक स्त्री कामारपुकुरमध्ये होती. तिचे नाव होते धनी लोहारीण ! या धनीने गदाधराचे वेळी चंद्रमणीदेवींचे बाळंतपण केले होते. तिने गदाधराकडून एक वचन घेतले होते. 'त्याच्या मुंजीच्यावेळी त्याने पहिली भिक्षा धनीकडून घ्यावी' असे ते वचन होते. सत्यास धरुन राहणाऱ्या गदाधराने ते वचन पाळले होते.

बालकृष्णाने स्वतःच्या बाललीलांनी जशी साऱ्या गोकुळ-वासियांची मने जिंकली होती, तद्वतच बाल गदाधर आसपासच्या लोकांचा, विशेषतः स्त्रियांचा प्राणसखा झाला होता. त्या सर्व स्त्रियांमधील प्रसन्नमयी नावाची स्त्री अतिशय शुद्ध मनाची होती. ती गदाधराला म्हणत असे, ''गदाई, तू प्रत्यक्ष देव आहेस असे मधून मधून का वाटते बरे ? तू काही म्हण, पण तू काही माणूस नव्हेस खास !''

शुद्ध अंतःकरणात ईश्वराचे प्रतिबिंब चटकन पडते. प्रसन्नमयी शुद्ध अंतःकरणाची असल्यानेच तिला गदाधराच्या दिव्यत्त्वाची जाणीव होती.

गदाधराच्या अंगचे दिव्यत्त्व अधिकाधिक प्रगट होण्यास खरी कारणीभूत ठरली ती स्त्री म्हणजे राणी रासमणी ! या राणीने दक्षिणेश्वरी कालीमातेचे विशाल मंदिर बांधले नसते तर आज जगाला 'न भूतो न भविष्यती' असा पुजारी पाहायला मिळाला नसता. ज्याने स्वतःच्या तप सामर्थ्याने मृण्मयी कालीमातेला चिन्मयी स्वरुपात साकार करुन घेतले. ज्याने उच्चतम आध्यात्मिक साधनांच्या सहाय्याने निर्विकल्प समाधीची अनुभूती प्राप्त करुन घेतली. असा तो पुजारी म्हणजे गदाधरच होय! या गदाधराचे, 'भगवान श्रीरामकृष्ण परमहंस' मध्ये रुपांतर झाले ते दक्षिणेश्वरच्याच कालीवाडीत!

कुमार गदाधर कालीवाडीत राहायला आला तेव्हा तो 'एक अवतारी पुरुष' आहे याची कल्पना राणीला असल्याचे काही कारण नव्हते. परंतु गदाधराच्या अंगचे अनेक गुण राणीच्या गुणग्राही नजरेतून सुटले नाहीत. राणीसुद्धा सर्वसामान्य पातळीवरील स्त्री नव्हती. श्रीरामकृष्णांची ती लीलासहचर होती. कारण स्वतः श्रीरामकृष्ण तिच्याबाबत म्हणत असत की, ''राणी ही देवीच्या अष्टनायिकांपैकी एक आहे.'' राणी स्वतःच्या नावाआधी 'कालीपदाभिलाषी' असा शब्द वापरीत असे. या राणीने स्वतः बांधलेल्या कालीमंदिरात गदाधराला कालीमातेचा पुजारी म्हणून नेमले. हीच राणी पुढे त्या पुजाऱ्याच्या पायाशी त्याची भक्त म्हणून बसली. यानंतरही अनेक स्त्रिया भक्त होऊन श्रीरामकृष्णांच्या पायाशी बसल्या. परंतु एका स्त्रीचे स्थान मात्र श्रीरामकृष्णांच्या पायाशी नव्हते, तर त्यांच्या हृदयात होते. श्रीरामकृष्ण शिव होते तर ती त्यांची शक्ति होती. ते पुरुष होते तर ती प्रकृती होती.

श्रीरामकृष्णांचे अवतारकार्य तिने खऱ्याअर्थी पूर्ण केले आणि जी 'जगज्जननी' या पदाला पोहोचली, ती स्त्री म्हणजे त्यांची लीलासहचरणी जगज्जननी श्रीसारदामाता होय ! अर्थात तिला या पदावर आरुढ करण्याचं कार्यही श्रीरामकृष्णांनीच केलं. स्वतःच्या धर्मपत्नीची देवी म्हणून पूजा करणारा आणि स्वतःच्या तपःसामर्थ्याने साक्षात त्रिपुरासुंदरी देवीला पत्नीच्या हृदयात प्रतिष्ठापित करणारा हा अवतारी पुरुष एकमेव आहे. आपण स्वतः ईश्वरी अवतार आहोत याचा उल्लेख ते स्वतःच एका वाक्याने करतात. ते म्हणतात, ''जो राम आणि जो कृष्ण तोच आता रामकृष्ण म्हणून या देही अवतारला आहे.'' असा उल्लेख ते जसा उघडपणे भक्तांजवळ बोलून दाखवतात, तसेच 'सारदा माझी निजशक्ती आहे.' हेही ते आश्वासनपूर्वक साऱ्यांना सांगतात. गंगा जशी कशानेही अपवित्र होऊ शकत नाही. तशीच सारदासुद्धा पावित्र्याची मूर्ती आहे. असे 'योगिन मा' नावाच्या भक्त महिलेला समजावून देतात. पावित्र्याची मूर्ती असलेली ही सारदा श्रीरामकृष्णांच्या पश्चात अगणित भक्तांची अपवित्रता स्वतः पचवून त्यांच्या मनाचे उन्नयन करते. गंमत म्हणजे या गोष्टीचे सारे श्रेय ती श्रीरामकृष्णांच्याच चरणी अर्पण करते.

श्रीरामकृष्णांच्या ठायी असलेल्या शिष्यत्त्वाचा शोध घेत आलेली स्त्री म्हणजे भैरवी ब्राह्मणी! श्रीरामकृष्णांकडून तांत्रिक साधना करुन घेण्यासाठी गुरुपद घेऊन ती आली होती. 'गुरुने शिष्याचा शोध घ्यावा आणि तो गुरु स्त्रीरुपात यावा' ही गोष्ट एकमेवाद्वितीयच आहे.

तिच्याविषयी श्रीरामकृष्ण म्हणत असत, ''तिचे मोकळे सोडलेले केस आणि वात्सल्यभावाने विव्हल झालेली अवस्था पाहून, लोकांना 'ही गोपालविरहाने व्याकूळ झालेली नंदाराणी यशोदाच' आहे की काय असे वाटे'' प्रत्यक्षात घडलेही तसेच! श्रीरामकृष्ण व भैरवी ब्राह्मणीचे नाते यशोदा आणि बालकृष्ण असेच होऊन गेले. श्रीरामकृष्णांकडून तांत्रिक साधना करुन घेताना, अनेक छोट्या मोठ्या अनुभवातून तिला असे जाणवू लागले की गदाधर हा सामान्य साधक नाही. तो प्रत्यक्ष ईश्वरी अवतार आहे. या गोष्टीची खात्री करुन घेण्यासाठी तिने अनेक प्रयोग केले. त्यात यश आल्यानंतर तिने उघडपणे सांगितले. ती म्हणाली, ''यावेळी नित्यानंद आणि चैतन्य यांचा एकाच देहात अवतार झाला आहे.'' ही गोष्ट इतरांना पटावी म्हणून, श्रीरामकृष्णांच्याच सांगण्यावरुन मथूरबाबुंनी महापंडीतांची एक सभा बोलावली. वैष्णवचरण हे या सभेचे प्रमुख होते. ते जसे महापंडीत होते तसेच ते भक्त आणि साधकही होते. त्याकाळात त्यांच्या मताला खूप मान होता.

या सभेत शास्त्रग्रंथाच्या आधारे, भैरवी ब्राह्मणीने आपले म्हणणे सिद्ध करण्यास ज्यावेळी सुरुवात केली त्यावेळी ती अशा आवेशाने बोलत होती, की जणू आपल्या मुलाचा कैवार घेऊन एक माताच दुसऱ्याशी भांडत आहे. स्वतःचे म्हणणे खोडून काढण्याचे आव्हानही वैष्णवचरणांना तिने दिले होते. परंतु तसे करण्याची वेळ आली नाही.

कारण वैष्णवचरणांना तिचे म्हणणे पूर्णपणे पटले होते आणि ते त्यांनी भरसभेत स्पष्टपणे सांगितलेही. गंमत म्हणजे यावेळी श्रीरामकृष्णांचा भाव मात्र बालकाप्रमाणे होता. लोक म्हणतात त्याप्रमाणे 'पागल-पणाचा' रोग आपल्याला झाला नाही हे सिद्ध झाल्याचा आनंद त्यांना जरुर झाला.

अवतारी व्यक्तिंच्या आनंदाची जातकुळीच वेगळी असते. ती समजून घेण्याची पात्रता सर्वांच्या ठिकाणी नसते. परंतु काही जीव असे असतात की त्यांच्या मनावर असलेला मायेचा पातळसा पडदा दूर झाला की ती पात्रता त्यांना प्राप्त होते. तो मायेचा पडदा दूर करण्याचे काम अवतारी व्यक्तिच करीत असते.

श्रीरामकृष्णांना आता अनेकांच्या मनावरचे मायेचे पडदे दूर करण्याचेच काम करायचे होते. या अनेकात काही स्त्रिया होत्या. त्या सर्वजणी श्रीरामकृष्णांच्या लीलासहचर होत्या असे म्हणावयास हरकत नाही.

भैरवी ब्राह्मणीपेक्षाही तीव्रतेची वात्सल्यभावना घेऊन आलेली स्त्री म्हणजे अघोरमणी ! भैरवी ब्राह्मणीने स्वतःच्या पांडीत्याच्या आधारे, भरसभेत श्रीरामकृष्ण हे ईश्वरी अवतार आहेत असे सिद्ध करुन दाखविले, तर अघोरमणींनी स्वतःच्या भक्तिच्या सामर्थ्यावर श्रीरामकृष्ण आणि गोपालकृष्ण एकच आहेत अशी स्वतः प्रत्यक्ष अनुभूती घेतली. ही अनुभूती अर्थात श्रीरामकृष्णांच्या कृपेमुळेच त्यांना प्राप्त झाली. अघोरमणींनी स्वतःवर अतिशय कडक निर्बंध घालून घेतले होते. सोवळ्या ओवळ्याविषयी त्यांच्या अतिरेकी कल्पना होत्या. श्रीरामकृष्णांच्या कृपेने त्या साऱ्या गोष्टी गळून पडल्या आणि त्यांचा ब्रह्मबोध इतका वाढत गेला की, भविष्य काळात स्वामी विवेकानंदांबरोबर भारतात आलेल्या पाश्चात्य स्त्रियांनी केलेली सारी सेवा त्यांनी स्विकारली.

श्रीरामकृष्णांच्या व श्रीसारदा मातांच्या सेवेत सतत सावलीप्रमाणे राहून स्वतःचे जीवन सार्थ करणाऱ्या दोन स्त्रिया म्हणजे योगिनमा आणि गोलापमा! श्रीसारदामाता त्यांना स्वतःच्या 'जयविजया' म्हणत. माताजींच्या सहवासात त्या दोघींची जीवने आध्यात्मिकतेच्या उच्चतम पातळीपर्यंत पोहोचली. ही उच्चतम पातळी त्यांना भक्तिमार्गाने प्राप्त झाली होती. कर्मयोगाच्या मार्गाने साधना करुन उच्चतम पातळी प्राप्त करणारी श्रीरामकृष्णांची भक्त महिला म्हणजे गौरी मां !

गौरी मां अत्यंत बुद्धिमान, धाडसी आणि कल्पक होत्या. सामाजिक सुधारणेच्या कार्यासाठी श्रीरामकृष्णांनी त्यांची निवड केली होती. १८९४ मध्ये गौरी मां नी स्त्रियांसाठी एक आश्रम सुरु केला. त्याचे नाव 'श्री श्री सारदेश्वरी आश्रम' असे ठेवले. स्त्रीयांना शिक्षित आणि धाडसी बनवण्याचे काम त्यांनी अनेक प्रकारांनी केले.

गौरी मां नी तत्कालीन भारतीय स्त्रीयांसाठी जसे अनेक प्रकारे कार्य केले तसे कार्य करणाऱ्या अजून एक महिला म्हणजे भगिनी निवेदिता! स्वामी विवेकानंदांच्या त्या पट्टशिष्य असल्या तरी त्या स्वतःला 'श्रीरामकृष्णांची कन्या' म्हणवून घेत असत. स्वतःचा देश, धर्म, घर आप्त या साऱ्यांना सोडून त्या ज्यावेळी, विवेकानंदांच्या कार्यात उडी घेण्यासाठी भारतात आल्या, त्यावेळी श्रीरामकृष्ण सदेह या भूतलावर नव्हते. तरीही त्यांच्याविषयी भगिनी निवेदितांच्या मनात कोणता भाव होता हे खालील छोट्याशा प्रसंगावरुन ध्यानी येते.

भगिनी निवेदितांनी 'श्रीरामकृष्ण सारदा मिशन भगिनी निवेदिता बालिका विद्यालय' नावाची शाळा सुरु केली होती. आजही ती शाळा कोलकत्ता येथे उत्तम प्रकारे चालू आहे. त्या शाळेतील विद्यार्थिनींनी एकदा जगाचा नकाशा तयार केला होता. तो छान सजावटीसह शाळेत मांडला होता आणि त्या नकाशाच्या खालील बाजूस श्रीरामकृष्णांचे छायाचित्र ठेवले होते. भगिनी निवेदितानी ती सजावट पाहिली आणि त्यात एक छोटासा परंतु अतिशय महत्वपूर्ण बदल केला. त्यांनी श्रीरामकृष्णांचे छायाचित्र नकाशाच्या वरील बाजूस ठेवले आणि त्या मुलींना म्हणाल्या, ''मुलींनो, श्रीरामकृष्णांचे स्थान येथे नाही, श्रीरामकृष्णांनी जगाच्या पायाशी नाही बसायचे, तर सारे जग श्रीरामकृष्णांच्या पायाशी बसेल.''

एक विदेशी स्त्रीने काढलेले हे उद्गार अतिशय सार्थ आहेत. कारण श्रीरामकृष्ण एक अवतारी पुरुष होते. ज्या काळात त्यांचा अवतार झाला त्या काळात माणूस स्वतःमधील चैतन्य हरवून बसला होता. खरा धर्म आणि ईश्वरी शक्ति याविषयी त्याच्या भ्रामक आणि खुळचट कल्पना होत्या. समाजात स्त्रियांना अत्यंत हीन दर्जा होता. त्यांच्याकडे निंदनीय दृष्टीने पाहिले जात असे. स्त्री ही अध्यात्म मार्गातील एक धोंड असते' असे उघडपणे बोलले जात असे. या साऱ्या गोष्टींमध्ये श्रीरामकृष्णांनी अमुलाग्र बदल घडवून आणला. त्यासाठी त्यांनी कोणतेही शस्त्र हाती घेतले नाही. तर स्वतःच्या आचरणातून सारे आदर्श निर्माण केले. त्यांच्या पायाशी आलेल्या सर्वच स्त्रीयांमधील चैतन्य जागृत करुन त्यांना उच्चपातळीवर नेऊन बसविले. पार धनी लोहारीणीपासून राणी रासमणी, अघोरमणी, योगिनमा, गोलापमा, गौरी मां अशा अनेकजणींची जीवन चरित्रे पाहिली म्हणजे असे लक्षात येते की, वर्तमानकाळात खऱ्या अर्थी आणि पहिल्याप्रथम जर कोणी स्त्री शक्तीचे जागरण केले असेल तर भगवान श्रीरामकृष्णांनीच! म्हणूनच ते आपल्याबरोबर पुरुष पार्षदांबरोबर, तितक्याच उच्च कोटीच्या स्त्रीपार्षदांनाही घेऊन या जगात अवतरले होते.

**डॉ. मालती आगटे**

६८, शैलेश सोसायटी, कर्वेनगर, पुणे - ४११०५२

**'श्रीरामकृष्ण म्हणतात' पुस्तकातून साभार**

**रात्री आकाशात कितीतरी तारे दिसतात, परंतु सूर्य उगवल्यावर ते दिसत नाहीत. पण म्हणून तुम्ही असे म्हणू शकता काय की दिवसा आकाशात तारे नसतातच मुळी? लोकहो, अज्ञान-अवस्थेत परमेश्वराचे दर्शन होत नाही म्हणून असे म्हणून नका की परमेश्वर नाहीच.**



# श्रीरामकृष्ण परमहंस आणि जगप्रसिद्ध विचारवंत

**डॉ. नरेंद्र ब. पाटील**
एम.ए.एल.एल.बी. (जनरल) पीएचडी.
निवृत्तभाषा संचालक, विद्यार्थी दशेपासून रामकृष्ण मठ नागपूर व नंतर रामकृष्ण मठ मुंबई येथे 'स्वयंसेवक', श्रीरामकृष्ण विवेकानंद वाङ्मयाचा मराठी अनुवाद, नागपूर मठाद्वारे प्रकाशित. सध्या अनंताचार्य इंडॉलॉजिकल रीसर्च इन्स्टिट्यूट, कुलाबा, मुंबई व एशियाटिक सोसायटी, मुंबई या संस्थात पदव्युत्तर अभ्यासक्रमाचे मार्गदर्शक.

श्रीरामकृष्ण यांचे या धराधामी आगमन ही एक युवप्रवर्तक घटना होती. सारे जग जणू त्यांच्या आगमनाची वाटच पाहत होते.

एकोणिसाव्या शतकाच्या सुरुवातीस साऱ्या जगाचा बराच मोठा भाग ब्रिटिशांच्या साम्राज्याने व्यापला होता. ब्रिटिश साम्राज्यात सूर्य कधीच अस्त पावत नाही असे सर्वत्र बोलले जायचे. साम्राज्याच्या कोणत्या ना कोणत्या भागावर तो तळपत असतो अशी धारणा सर्वसाधारण जनमानसात रुढ झाली होती. त्याअगोदर चारशे वर्षांपूर्वी कोलंबसाने अमेरिकेचा शोध लावला. त्यानंतर इंग्लंडमधून व युरोपातून बरेच लोक अमेरिकेत वस्तीला गेले आणि तेथेच स्थायिक झाले. तेथील आदिवासींचा विध्वंस करुन त्यांनी सारा खंड आपल्या ताब्यात घेतला. पुढे तेथील इंग्रजांनी इंग्लंडचे राजकीय जोखड फेकून दिले आणि उत्तर अमेरिका जगातील एक स्वतंत्र देश म्हणून नावारुपास आली.

दरम्यान युरोपातील पोपची धर्मसत्ता इंग्लंडने झुगारुन दिली. लोकांना विचार स्वातंत्र्याचा लाभ झाला आणि विज्ञानाला चालना मिळाली. विज्ञान हळूहळू जीवनाचा अधिकाधिक भाग व्यापू लागले. यातून व्यावहारीक विज्ञानाची निर्मिती झाली. परिणामी इंग्लंडमध्ये आणि युरोपात औद्योगिक क्रांती झाली. उत्पादनाच्या साधनात प्रचंड बदल होत गेले. औद्योगिक क्रांतीनंतर युरोप अमेरिकेचा चेहरा मोहरा पार बदलला. यंत्राद्वारे होणारे उत्पादन प्रचंड प्रमाणात वाढले व त्यासाठी बाजारपेठा उपलब्ध करुन देण्याची गरज युरोपातील देशांना भासू लागली. प्रथम व्यापारी म्हणून आलेले युरोपातील पोर्तुगीज, फ्रेंच व इंग्रज यांनी बाजारपेठ मिळवण्याचा प्रयत्न करता करता येथील (भारतातील) भूभाग आपल्या सत्तेखाली आणण्याचा आटोकाट प्रयत्न केला. त्यात इंग्रजांची सरशी झाली. १७५७ मध्ये प्लासीची लढाई झाली. इंग्रजांच्या भाडोत्री पण शिस्तबद्ध हजार सैनिकांनी नबाबाच्या १५ हजार सैन्याचा पाडाव केला आणि बंगाल, बिहारमध्ये इंग्रजांनी आपली राजकीय सत्ता प्रस्थापित केली. १८१८ मध्ये पेशवाईबरोबर मराठ्यांचे राज्य संपुष्टात आले. हिंदी स्वराज्याचे छत्रपती शिवाजी महाराजांचे व त्यांच्या मराठे सरदारांचे स्वप्न लयाला गेले.

वेदांची व अन्य वैदिक वाङ्मयाची उत्पत्ती कोणत्या कालखंडात झाली याबद्दल निश्चितपणे उपलब्ध ऐतिहासिक सामग्रीवरुन सांगता येत नाही. परंतु वेदमूल अशा तत्त्वज्ञानाची उपासना भारतात अखंडपणे सुरु आहे; आणि तेच भारतीय संस्कृतीचे बलस्थान आहे. म्हणून कितीही परकीय आक्रमणे झाली तरी भारतीय तत्त्वज्ञान आणि भारतीय संस्कृती टिकून आहे. परंतु ब्रिटिश कालखंडात भारताच्या अस्मितेला आणि संस्कृतीला फार मोठा धोका निर्माण झाला होता.

१९व्या शतकात भारत भौगोलिकदृष्ट्या इंग्रजांच्या ताब्यात गेला आणि सुधारणेच्या नावाखाली त्याकाळी इंग्लडात प्रचलित असलेली शिक्षणपद्धती इंग्रजांनी भारतात अंमलात आणली. १८५७ मध्ये मुंबई, मद्रास व कलकत्ता येथे विद्यापीठांची स्थापना झाली आणि पाश्चात्य धर्तीची शिक्षण प्रक्रिया भारतात सुरु झाली. राजकीय गुलामगिरीच्या मागोमाग ही शैक्षणिक व बौद्धिक गुलामगिरी आल्यामुळे साऱ्या भारतभर एक विलक्षण मरगळ आली आणि लोक जीवनाचा अर्थच हरवून बसले.

अशी मरगळ आलेल्या भारतात १८३६ मध्ये श्रीरामकृष्णांचे या धराधामी आगमन झाले. उण्यापुऱ्या ५० वर्षांच्या कालखंडानंतर त्यांनी आपला तपस्यापूत देह सोडला. १८६० ते १८७० या कालावधीत त्यांनी अत्यंत कठोर साधना करुन विविध उपासनापद्धतींद्वारा ईश्वरीलाभ प्राप्त करुन घेतला. आपल्या अनन्य भक्तीद्वारा त्यांनी दक्षिणेश्वराच्या कालीमातेला साक्षात दर्शन देण्यास भाग पाडले. या कालखंडात भैरवी ब्राह्मणी, तोतापुरी या सारख्या संतांनी व सिद्धांनी त्यांना दिव्यानुभूती दिली. त्यानंतरच्या ८-१० वर्षांच्या काळात त्यांची वाक्सुधा अखंडपणे स्रवत होती. ऐहिक व दिव्य अशा दोन्ही विश्वांमध्ये त्यांचा अनिर्बंध संचार सुरु होता. त्यावेळी प्रचलित असलेल्या ब्राह्मोसमाज, नवब्राह्मोसमाज या संघटनांतील धुरीण श्रीरामकृष्णांच्या ईश्वरी भावामुळे त्यांच्याकडे आकृष्ट झाले. इंग्रजी शिक्षणाबरोबर नवविचारांचे वारे भारतात वाहू लागले. त्या विचारांनी प्रभावित होऊन, मुंबई प्रांतात प्रार्थना समाजाची स्थापना नवशिक्षितांनी केली. बंगालमध्ये तशाच

प्रकारची चळवळ ब्राह्मो समाजाद्वारे सुरु करण्यात आली. आपल्या उपासनापद्धतीवर पाश्चात्य उपासनापद्धतीचे देखणे आवरण नवशिक्षितांना घालावेसे वाटले. बंगालमधील बहुतांश शिक्षित समाज केशवचंद्र सेन यांच्या नेतृत्वाखाली ब्राह्मो समाजाचा उपासक बनला. पुढे केशवचंद्रसेन श्रीरामकृष्णांच्या संपर्कात आले आणि त्यांचे निष्ठावंत भक्त बनले. श्रीरामकृष्णांच्या ईश्वरीभावाचा प्रभाव सर्व विचारवंतांवर पडू लागला. जीवनाच्या दैनंदिन व्यवहारातील दृष्टांतानी श्रीरामकृष्ण आपले अनुभव सांगत आणि त्यांच्या जीवनात क्रांती घडवून आणत. त्यावेळचे ब्राह्मो समाजाचे नेते श्री. केशवचंद्र सेन हे श्रीरामकृष्णांच्या संपर्कात आले. त्यांनी श्रीरामकृष्णांवर इंग्रजीत लेख लिहून पाश्चात्य विद्वानांना श्रीरामकृष्णांच्या अध्यात्म-जीवनाबद्दल माहिती उपलब्ध करुन दिली. नरेंद्र (पुढे स्वामी विवेकानंद) यांना श्रीरामकृष्णांबद्दल प्रथम कळले ते त्यांच्या इंग्रजीच्या प्राध्यपकांकडून- प्रिन्सिपॉल हेस्टी यांच्याकडून, विल्यम वर्डस्वर्थची एक निसर्ग कविता वर्गात समजावून सांगताना, कविमहाशय निसर्गाशी कसे एकरुप होऊन भान विसरीत, हे प्रिन्सिपॉल हेस्टी वर्गात सांगत होते. 'ही तल्लीनता म्हणजे एक प्रकारची गूढ आनंदाची अवस्था असते.' पुढे हेस्टी म्हणाले, ''दक्षिणेश्वरच्या काली मंदिरात श्रीरामकृष्ण नावाचे सत्पुरुष राहतात. त्यांना अशी अवस्था वारंवार प्राप्त होते. तुम्ही अवश्य त्यांना पहायला जा.''

पुढे नरेंद्र श्रीरामकृष्णांच्या संपर्कात आले आणि गुरुशिष्यांनी धार्मिक जगतात एक प्रचंड क्रांती घडवून आणली. १८९३च्या सप्टेंबर महिन्यात शिकागो येथे झालेल्या धर्मसभेत स्वामी विवेकानंदांनी वेदान्त धर्माची पताका फडकवली. त्यानंतरच्या काळात नंतर अमेरिकेत व इंग्लंडमध्ये वेदान्तधर्मावर अनेक व्याख्याने दिली. *स्वामी विवेकानंद* आपल्या गुरुंबद्दल-श्रीरामकृष्णांबद्दल जाहीर व्याख्यानात क्वचितच बोलत. अमेरिकेत असताना एकदाच त्यांनी श्रीरामकृष्णांबद्दल आपल्या काही श्रोत्यांना सांगितले. त्यानंतर श्रीरामकृष्णांबद्दल प्रचंड कुतूहल जगभर निर्माण झाले. त्यानंतरच्या काळात वेदवाङ्मयाचे चिकित्सक अभ्यासक व भाषांतरकार मॅक्समुल्लर यांनी १८९८ मध्ये श्रीरामकृष्णांवर चरित्रग्रंथ लिहिला.

*संत वा अवतारी पुरुषांच्या जीवनाबद्दल लिहिण्याचा* एक ठराविक साचा साहित्यिक लिखाणात आढळून येतो. परंतु श्रीरामकृष्णांचे एक संन्यासी शिष्य व स्वामी विवेकानंदांचे गुरुबंधू स्वामी सारदानंद यांनी श्रीरामकृष्णांचे 'लीलाप्रसंग' नामक चरित्र अत्यंत चिकित्सकपणे लिहिले आहे. त्याचप्रमाणे मास्टर महाशय यांनी आपल्या दैनंदिनीच्या आधारे 'श्रीरामकृष्ण कथामृत' नामक ग्रंथ प्रसिद्ध केला आणि तोच पुढे इंग्रजीत 'गॉस्पेल ऑफ श्रीरामकृष्ण' या शीर्षकाखाली अमेरिकेत प्रसिद्ध झाला.

मॅक्समुल्लर आपल्या 'रामकृष्ण, हिज लाईफ अँड सेयिंग्ज' ह्या आपल्या ग्रंथात म्हणतात, ''वेदांतील तत्त्वज्ञान श्रीरामकृष्णांनी आपल्या जीवनात मुरवले. त्यांच्या साध्या साध्या वचनांमध्ये वेदान्त ओतप्रोत आहे. प्लेटो किंवा कांट यांच्या तत्त्वज्ञानाहून अधिक महत्त्वाची अशी विचारधारा श्रीरामकृष्णांच्या वचनांमध्ये आढळून येते. श्रीरामकृष्णांचे वेळोवेळी समाधी अवस्थेत जाणे आणि त्या अवस्थेतून परतल्यावर आपल्या सम्यक ज्ञानाचा लोकांवर वर्षाव करुन त्यांना नवजीवन देणे हे श्रीरामकृष्णांचे कार्य अलौकिक आहे.'' स्वतः मॅक्समुल्लर यांच्यावरही श्रीरामकृष्णांच्या विचारांचा बराच प्रभाव होता. इंग्लंडमध्ये असताना स्वामी विवेकानंद मॅक्स म्युलर यांना भेटायला गेले होते. मॅक्स म्युलर यांच्या वेदाभ्यासाचे आणि वेदांचे इंग्रजी भाषांतराचे काम पाहून स्वामी विवेकानंदांना आनंद झाला. निरोपाचे वेळी मॅक्स म्युलर स्वतः रेल्वे स्टेशनपर्यंत त्यांना पोहोचवण्यास आले. त्यावेळी ते म्हणाले, ''श्रीरामकृष्णांच्या शिष्याला प्रत्यक्ष पाहण्याचा व त्यांच्या मुखातून श्रीरामकृष्णांबद्दल ऐकण्याचा अपूर्व योग आज आला. मी धन्य झालो.''

दुसरे एक पाश्चात्य विचारवंत आणि संगीतज्ञ रोमाँ रोलाँ म्हणतात, ''भारतीय स्वरांची सुरावट म्हणजे श्रीरामकृष्णांचे जीवन. आमच्या अभिजात गायकीच्या सुरावटीप्रमाणेच ही सुरावटही अतीतातील असंख्य सुरस्वरांनी बनलेली आहे. कालसमुद्रातील ह्या सुरस्वरांचे जनक अनेक असतात. परंतु अखेरीस एकाच अभिजात गायकाच्या नावाने ती ओळखली जाते. कारण हाच गायक त्या असंख्य सुरावटीतून आपल्या मनःसामर्थ्याने एक अद्वितीय संगीत निर्माण करीत असतो. या गायकाला मिळालेले यश म्हणजे एका नवीन युगाचा शुभारंभ असतो. श्रीरामकृष्णांचे जीवन म्हणजे तीस कोटी लोकांच्या दोन हजार वर्षांच्या आध्यात्मिक जीवनाचा परिपाक होता... श्रीरामकृष्णांचे जीवन हे साऱ्या मानवतेला व दिव्यत्वाला स्पर्श करणारे होते''.

निकोलस द रोरिस हे एक. युरोपातील आणखी एक विचारवंत *त्यांनी आपल्या आठवणी लिहून ठेवल्या. त्यासंबंधीचा एक लेख,* श्रीरामकृष्ण मठाच्या प्रबुद्ध भारत या नियतकालिकात १९३६ फेब्रुवारीच्या अंकात प्रसिद्ध झाला होता. ते लिहितात - ''एकदा *मंगोलियात* प्रवास करीत असताना तेथील एका वालुकामय प्रदेशात त्यांना एक 'एल्म' वृक्ष दिसला. त्यावरुन त्यांना भारतातील विशाल वटवृक्षाची आठवण झाली. भारताबद्दलच्या विचारांचे त्यांच्या मनात उधाण आले. त्या विचारांनी धाव घेतली भारताच्या त्या प्रचंड *महासूर्याकडे-श्रीरामकृष्णांकडे. या नावाभोवती* त्यांची ओळख सांगणारी सन्मानदर्शक संबोधने - श्री, भगवान, परमहंस. आदरभाव दर्शवणारी ही प्रभावळ. मनात आले, देशातील माणसे आणि देशाचे सामाजिक मन योग्य व्यक्तिसाठी योग्य विशेषणांची निवड करीत असते. श्रीरामकृष्ण हे व्यक्तिनाम या अगोदरच एका सर्वराष्ट्रीय वैश्विक कल्पनेत परिणत झाले आहे. जगातील निरनिराळ्या देशांत श्रीरामकृष्णांचा संजीवक उपदेश मुरत आहे. श्रीरामकृष्णांचे सृजनशील सत्यविषयक आवाहन हा एक मानवतेला मिळालेला वारसा आहे. आपल्या छोटया-छोट्या कथांमध्ये आणि आपल्या जीवनातही त्यांनी कोणाचाही उपमर्द केला नाही. इतर कोणी केलेला त्यांनी सहनही केला नाही. त्यांनी सर्वच धर्मांचा आदर केला. ते एक महान समन्वयाचार्य होते.''

अर्नाल्ड टॉयनबी हे एक जगप्रसिद्ध इतिहासकार होऊन गेले.

त्यांचा अनेक खंडातील मानवतेचा इतिहास प्रसिद्ध आहे. ते म्हणतात, "सर्वच धर्म मानवतेचे पोषण करतात. कारण प्रत्येक धर्म हा एकाच सत्याचे विविध अंगांनी दर्शन घडवत असतो... श्रीरामकृष्णांचा ह्या घरातला आविर्भाव आणि उपदेशामृताचा वर्षाव योग्य स्थळी आणि योग्य काळी झाला... जी व्यक्ती हिंदु परंपरेत जन्मापासून वाढली नाही, अशी व्यक्ती असा जीवनसंदेश देऊच शकली नसती... आजच्या युगात सारेच जग हे तंत्रज्ञानामुळे भौतिक पातळीवर एकवटले आहे. त्याने लोकांच्या हाती अचाट क्षमता असलेली हत्यारे दिली आहेत. कोणत्याही क्षणी दोन गट परस्परांचा विनाश करु शकतात. ह्या कसोटीच्या क्षणी मानवतेला वाचवावयाचे असेल तर एकच मार्ग आहे. भारतीय मार्ग - सम्राट अशोकाचे व महात्मा गांधीचे अहिंसेचे तत्व आणि श्रीरामकृष्णांचा सर्वधर्मसमन्वय. आजच्या अणुयुगात सर्वनाशापासून वाचण्याचा हाच एक पर्याय आहे."

रशियन साहित्यिक आणि लेखक लिओ टॉलस्टॉय यांनाही श्रीरामकृष्णांचे विचार त्यांच्या ईश्वरविषयक संकल्पनांशी मिळते जुळते वाटत असल्याची नोंद त्यांनी आपल्या दैनंदिनीत करुन ठेवल्याचे आपल्याला आढळते.

गुरुदेव रविंद्रनाथ टागोर श्रीरामकृष्णांचे यशोगान गाताना म्हणतात, "असंख्य साधकांचे असंख्य साधनाप्रवाह तुमच्या ध्यानसमाधीत एकरुप झालेत. असीमाची आनंदलीला तुमच्या जीवनात साकारली. ते जीवन बनले एक तीर्थक्षेत्र."

जगातील विचारवंतांनी श्रीरामकृष्ण - विवेकानंदांबद्दल जे लिहिले ते संकलित करु गेल्यास बृहदाकार ग्रंथ निर्माण होईल. 'एकं सत् विप्रा बहुधा वदन्ति' या नायाने श्रीरामकृष्णांचे दिव्य चरित्र पाश्चात्य आणि पौर्वात्य विचारवंतांनी विविध अंगांनी वर्णिले आहे. श्रीरामकृष्णांच्या वाणीने केवळ भारताच्याच नव्हे तर साऱ्या जगातील धर्मविचारांत प्राण फुंकले. स्वामी विवेकानंदांनी आपल्या उण्यापुऱ्या ३९ वर्षांच्या आयुष्यात ही विचारधारा जगभर प्रसृत केली. हे विचार ही आधुनिक जगासाठी संजीवनी आहे.

**डॉ. नरेंद्र ब. पाटील**
अ ३७, कमलपुष्प, वांद्रे रिक्लमेशन, मुंबई - ४०००५०
फोन : ०२२-२६४२९३०९

**'श्रीरामकृष्ण म्हणतात' पुस्तकातून साभार**

**परमेश्वर एक पण त्याची नामे आणि त्याचे भाव अनंत. त्यातील कुठल्याही नामाच्या नि भावाच्या साहाय्याने त्याच्याप्रत पोहोचता येते. तुम्ही ज्या कोणत्या नामाने नि भावाने त्याला आळवाल, त्यानेच तुम्हाला त्याचे दर्शन लाभेल.**



# श्रीरामकृष्ण व माता सारदादेवी दांपत्य जीवनाचा आदर्श

**डॉ. सौ. सुरुचि सतीश पांडे,** बी.ए., एम.ए., परीक्षांत तत्वज्ञान व संस्कृत या विषयांत पुणे विद्यापीठात प्रथम - पीएच.डी. १) तत्त्वज्ञान २) संस्कृत - संशोधन व लेखन - फाऊंडेशन फॉर रिसर्च इन कम्युनिटी हेल्थ, पुणे. दीड वर्षे संस्कृत विभाग - ज्ञानप्रबोधिनी - दहा वर्षे. रामकृष्ण मठ व सारदा मठ, पुणे येथील उपक्रमामध्ये व कामामध्ये सहभाग. मासिके, वर्तमानपत्रे, राष्ट्रीय, आंतरराष्ट्रीय जर्नलमध्ये लेखन, आकाशवाणीकरीता लेखन, संशोधन परिषदांमध्ये शोध निबंध सादर, विविध पुरस्कार प्राप्त. २१ पुस्तके प्रकाशित, ४ पुस्तके प्रकाशनाच्या वाटेवर, ३ ग्रंथांचे लेखन चालू.

**संन्यासिनं पतिमवेक्ष्य च नोद्विजाने**
**सेवार्पितत्रिकरणे परिशुद्धचित्ते ।**
**तत्साधनाचरमसीम्नि समर्पिताङ्घ्रे**
**श्रीरामकृष्णपरमेश्वरी सुप्रभातम् ।।**

स्वामी अचलानंदसरस्वती यांनी रचलेल्या 'श्रीसारदादेवी सुप्रभातम्' या स्तोत्रातील ह्या ओळी आहेत. श्रीरामकृष्णांसारखा संन्यासी प्रवृत्तीचा पण तरीही दक्ष, प्रेमळ असा पती आणि सेवारुपा होऊन समरसून गेलेल्या श्रीसारदादेवी हे दांपत्यच अलौकिक आहे. रामकृष्णांच्या सर्व अंतरंग शिष्यांनी रामकृष्ण आणि सारदादेवी यांच्यातील अभेद सर्वस्वी मानलेला दिसतो. स्वामी सारदानंद लिहितात ठाकुर आणि माताजी कसे ? तर 'यथाग्नेर्दाहिका शक्तिः रामकृष्णे स्थिता हि या ।' स्वामी ब्रह्मानंद म्हणतात, ''माताजींना पाहिलं म्हणजे ठाकुरांना पाहिल्यासारखंच.' स्वामी अभेदानंदांचं मत आहे. 'शिव-शक्ती अभेद तसंच ठाकुर-माताजी.' स्वामी विवेकानंदठायीचा माताजींबद्दलचा अतीव आदर असा व्यक्त झालेला दिसतो.'' स्वामीजी नावेतून हरी महाराजांच्याबरोबर माताजींच्या दर्शनासाठी जात होते. स्वामीजी वारंवार गंगाजल प्राशन करीत आहेत हे पाहून हरी महाराज म्हणाले, 'आपण हे गढूळ पाणी वारंवार पीत आहात, यामुळे आपल्याला सर्दी होईल !' स्वामीजी म्हणाले, 'नाही बंधो, भीती वाटते की, हे आमचं मन माताजींजवळ जात आहे, भीती वाटते !''

श्रीरामकृष्ण आणि श्रीसारदादेवी यांचा विवाह झाला १८५८ सालामध्ये. तेव्हा माताजींचं वय होतं सहा वर्षाचं आणि ठाकुरांच वय होतं चोवीस वर्षांचं. माताजी वय लहान असताना काही दिवस जयरामवाटी या आपल्या माहेरघरी तर कधी कधी कामारपुकुरला सासरी राहिल्याचा उल्लेख आहे. मात्र त्यांचं वय अठरा वर्षांचं असताना अतिशय आंतरिक ओढीनं त्या ठाकुरांकडे दक्षिणेश्वरला आल्या. त्यावेळी ठाकुर विज्ञान्याच्या अवस्थेत किंवा सहजावस्थेत होते. एकेकदा ते समाधीमध्ये इतके लीन होऊन जात की बराच वेळ बाह्य संज्ञा येत नसे. असं असलं तरी ठाकुरांनी पूर्णपणे प्रेमळ पतीच्या स्नेहानं माताजींचा स्वीकार केला.

त्यांच्यातलं विवाहबंधन हे नावापुरतचं 'बंधन' होतं कारण मूलतः दोघेही इतक्या शुद्ध भावाचे होते की त्यांच्यातील पती-पत्नी प्रेमास कामगंधाचा स्पर्शही नव्हता. ठाकुरांनी सारदादेवींकडे जगन्मातेचं एक रुप म्हणून पाहिलं. सुरुवातीच्या काळात ठाकुरांनी त्यांना प्रश्न विचारला होता, ''तुम्ही काय मला संसारात ओढायला आला आहात ?'' त्यावर माताजींनी स्पष्ट उत्तर दिले होते, ''नाही, मी कशाला तुम्हाला संसारात ओढू ? मी तर तुमच्या इष्टप्राप्तीत तुम्हाला मदत करायला आले आहे.''

दांपत्य जीवनातील मोठा आदर्श काय असावा, हे जणू या संवादातून सूचित होतं. मनापासून एकमेकांना शिवसंकल्पांच्या पूर्तीसाठी स्वीकारणं महत्त्वाचं आहे. दक्षिणेश्वरला असतानाचे माताजींचे सारे दिवस आनंदानं शिगोशिग भरलेले होते. त्या स्वतःही मोठ्या ताकदीच्या साधिका होत्या म्हणून त्यांनी आपल्या जगावेगळया पतीला आध्यात्मिक मार्गावरुन खालच्या पातळीवर खेचलं नाही. ठाकुरांनी स्वतःही म्हटलं आहे की सारदादेवींच्या पवित्र, शुद्ध व्यक्तिमत्वामुळे त्यांची साधना भंगली नाही. आपल्या पतीच्या आदर्शांवरुन माताजींनी वाटचाल केली. पण ही करताना स्वतःची प्रज्ञा कधी लोपू दिली नाही. दोघांचीही आयुष्यं म्हणजे जणू एका स्वरांत बांधलेले दोन प्राण होते.

या अलौकिक दांपत्याच्या जीवनात अबोलपणानंसुद्धा किती संवाद साधलेला दिसतो. माताजी नौबतखान्यात अखंड काम करत असल्या तरी त्या सांगतात की त्यांचं मन सर्वदा ठाकुरांजवळ पडलेलं राही. कधी कधी असंही घडत असे की ठाकुर काही सांगावयास येत तर त्या दृष्टीनं कामाची सुरुवात माताजींनी आधीच केलेली असे ! आपल्या पत्नीला व्यावहारिक, लौकीक जगातील गोष्टींचं शिक्षण ठाकुरांनी दिलं. तसंच आपल्या ज्ञान व आनंद संपदेची त्यांना अधिकारिणीही केलं. ठाकुरांनी त्यांना आपल्या इष्टपथावरची सहाय्यिका म्हणून पुरेपूर ताकदीनं तयार केलं. आपल्या देहत्यागाची चाहूल लागलेले ठाकुर भावतंद्रीत माताजींना म्हणाले, ''मी काय म्हणतो ते ऐका, सगळीकडे कसा अंधार पसरला आहे. सगळी माणसे हया घाणेरड्या डबक्यात

किड्यांसारखी वळवळत आहेत. तुम्ही त्यांच्याकडे लक्ष द्या.'' ठाकुरांच्या छायेत तयार झालेल्या माताजींनी आपल्या आध्यात्मिक साधनेचा गवगवा कुठेही केलेला दिसत नाही. पण रामकृष्ण संघाची आई म्हणून त्यांच्यातल्या मातृभावानं किती विशाल रुप धारण केलं होतं, हे मात्र पुढच्या काळात प्रत्ययास आलं.

श्रीरामकृष्णांबद्दलच्या पतिनिष्ठेत माताजींना मिळालं होतं स्वातंत्र्य! त्यांनी आपल्या या देवतुल्य पतीचं अनुसरण केलं पण स्वाधीनतेचं विसर्जन नाही केलं. आपलं मतामंत स्पष्टपणे व्यक्त केली पण मर्यादाही निःसंशयपणे सांभाळली. विवाहित आयुष्यात हे कधी साध्य होत असतं? तर जेव्हा परस्परांच्या व्यक्तिमत्त्वाबद्दल मनाच्या खोल तळापासून आदर असतो तेव्हा. 'आत्मनस्तु कामाय सर्व प्रियं भवति ।' या विधानातील विश्वात्मकता अंगिकारली गेली असेल तर दांपत्य जीवनात ऐश्वर्य, माधुर्य, सभ्यता आहे. हेच माधुर्य श्रीरामकृष्ण श्रीसारदादेवींच्या दांपत्य जीवनाचं मर्म होत. अनुरक्त असणं आणि त्याचवेळी विरक्त असणं, कसं असतं, हे शिकायचं असेल तर ठाकुर-माताजींच्या जीवनाचा सहजसुंदर, चिंतनशील तरीही हळुवार असा जिवंत आदर्श आपणा सर्वांपुढे आहे.

**डॉ. सौ. सुरुचि सतीश पांडे**
सी-९, भोसले पार्क, सहकारनगर क्र. २, पुणे - ४११००९



# श्रीरामकृष्ण - विवेकानंद आदर्श गुरु-शिष्य

**श्री. सुनिलजी चिंचोलकर,** बी.कॉम.
१२ वर्षेसज्जनगड येथे व्यवस्थापन, ३२ पुस्तके प्रकाशित, शिवचरित्र, ज्ञानेश्वरी, दासबोध, गीता वगैरेंवर प्रवचन. समर्थ व्यासपीठ समर्थ पुरस्कार व समर्थ संस्थानचा पुरस्कार प्राप्त.

भारताच्या आध्यात्मिक इतिहासात गुरु-शिष्य संबंधाला अद्वितीय महत्त्व आहे. जीवनात माणूस अनेक नातेसंबंध प्रस्थापित करतो. आई आणि मुलगा, पती-पत्नी, बहिण-भाऊ, मित्र, शेजारी अशा अनेक नात्याने माणसे जोडली जातात. यातील सर्वात घट्ट नाते कुठले असेल तर ते गुरु आणि शिष्याचे आहे. या नात्याला जे मागंल्य आहे ते आई आणि लहान मुल यांच्या स्नेहबंधाला देखील नाही. खुद्द स्वामी विवेकानंदांनी भगवान रामकृष्णदेवांच्या आज्ञेचे पालन करीत असताना आपली विधवा माता आणि बहिण भावांचा एका क्षणात त्याग केला. आई-वडिलांपेक्षाही गुरुचे स्थान महत्त्वाचे आहे. कारण आई-वडिलांचे मुलावर कितीही प्रेम असले तरी त्या जीवाला मुक्त करण्याची क्षमता फक्त सद्‌गुरुंमध्ये आहे. प्रभू रामचंद्रांना विश्वमित्राच्या यज्ञरक्षणासाठी पाठवायला महाराज दशरथ तयार नव्हते. पण वसिष्ठ मुनींनी आज्ञा केल्यावर रामचंद्रांना विश्वमित्रांबरोबर जावे लागले. साधकाच्या दृष्टीने गुरुची आज्ञा पित्याच्या आज्ञेपेक्षा जास्त महत्त्वाची आहे. म्हणून निवृत्तीनाथ आणि ज्ञानदेव, राम आणि हनुमान, कृष्ण आणि अर्जुन, समर्थ आणि कल्याण, रामकृष्ण आणि विवेकानंद, अरविंद आणि माताजी या गुरु-शिष्यांच्या जोड्या जगाच्या इतिहासात अजरामर ठरल्या. यापैकी रामकृष्ण आणि विवेकानंद या आदर्श गुरु-शिष्याचे संबंध कसे विलक्षण होते हे प्रस्तुत लेखात आपण पहाणार आहोत.

रामकृष्ण-विवेकानंद या गुरु-शिष्यांच्या नात्याचे वैशिष्ट्य म्हणजे या दोघांची बाह्यलक्षणे परस्पर विरोधी होती. स्वामी विवेकानंद एका संपन्न घराण्यात वाढलेले तर भगवान रामकृष्ण अत्यंत गरीब कुटुंबातील. रामकृष्णदेव साकाराचे उपासक तर नरेंद्रनाथ निराकाराचे आग्रही पुरस्कर्ते. रामकृष्णांनी आयुष्यात जे काही मिळविले ते मूर्तीपूजेतूनच. याउलट नरेंद्रनाथ ज्या ब्राह्मो समाजाचे सदस्य होते त्या ब्राह्मो समाजाला मूर्तीपूजेचे वावडे होते. स्वामी विवेकानंद म्हणजे कलकत्ता विद्यापीठाचा बुद्धीमान पदवीधर तर रामकृष्ण परमहंस एक निरक्षर पुजारी. स्वामी विवेकानंद म्हणजे मूर्तीमंत तर्क आणि संशय तर भगवान रामकृष्ण म्हणजे घनीभूत श्रद्धा आणि प्रेम. स्वामी विवेकानंदांनी जगातील बहुसंख्य तत्ववेत्त्यांचे ग्रंथ वाचले होते. तर रामकृष्णदेव रामायण-महाभारताच्या संस्कारात वाढलेले. यांच्यात गुरु-शिष्य नाते प्रस्थापित होणे हा भारतातील आध्यात्मिक लोकशाहीचा परमोच्चर अविष्कार म्हणावा लागेल. रामकृष्ण दिवसातून १० वेळा कालीमातेच्या मंदिरात जात असत तर वरचेवर त्यांना भेटण्यासाठी जाणारे विवेकानंद पहिले तीन वर्ष तरी कालीमातेच्या मंदिरात गेले नव्हते. रामकृष्णांच्या मनाचा मोठेपणा असा की त्यांनी देखील नरेंद्रनाथाला मंदिरात येण्याचा आग्रह केला नाही.

रामकृष्णांचे मंदिरात जाणे आणि कालीमातेशी संभाषण करणे या सर्व गोष्टी स्वामीजींच्या मते ठाकुरांच्या मनाचा खेळ होता. ते तसे बोलूनही दाखवत. अशा वेळी रामकृष्णांच्या इतर शिष्यांना नरेंद्रनाथांचा राग येई. पण रामकृष्णांना मात्र त्याचा कधी राग आला नाही. उलट नरेंद्र जर ३-४ दिवस भेटायला आला नाही तर त्यांचे प्राण व्याकुळ होत असत. ते नरेंद्रनाथांना दक्षिणेश्वरला येण्यासंबंधी निरोप पाठवित असत.

आपल्याकडे गुरु-शिष्य संबंध म्हटले म्हणजे शिष्याची गुरुने परीक्षा घ्यावयाची आणि त्यात शिष्य उत्तीर्ण झाला तरच त्याचा स्वीकार करायचा हे ठरलेले असते. पण याबाबतीतही रामकृष्ण-विवेकानंदांचे नाते विपरित म्हणावे लागेल. इथे विवेकानंदच रामकृष्णांची परीक्षा घेताना दिसतात. आणि विशेष म्हणजे त्याचा रामकृष्णांना अपमान वाटत नाही. उलट ते नरेंद्रनाथाला म्हणतात, 'गुरु दिवसाही तपासावा आणि रात्रीही तपासावा.' एकदा रामकृष्णांचे भक्त रामकृष्णांच्या वैराग्यासंबंधी चर्चा करीत होते. तेव्हा रामकृष्णांना पैशाचा स्पर्श देखील सहन होत नाही असे ही मंडळी म्हणत होती. पण नरेंद्रनाथांचा यावर विश्वास बसेना. त्यांनी ठाकुरांची परीक्षा घ्यावयाचे ठरविले. एकदा रामकृष्ण मंदिरात गेले असताना त्यांच्या खोलीतील सतरंजीखाली नरेंद्रनाथाने मुद्दाम काही नाणी लपवून ठेवली आणि तो रामकृष्णांची प्रतिक्षा करीत राहिला. रामकृष्ण खोलीच्या दिशेने येऊ लागले तेव्हा नरेंद्र कपाटामागे लपला. रामकृष्ण त्यांच्या नेहमीच्या सवयीप्रमाणे सतरंजीवर आडवे झाले मात्र आणि दुसऱ्याचक्षणी किंचाळून उठले. त्यांना पैशाचा स्पर्श सहन होत नाही याची नरेंद्रनाथाने खात्री करुन घेतली.

आश्चर्याची गोष्ट म्हणजे रामकृष्णांच्या अनेक आध्यात्मिक मतांशी नरेंद्र सहमत नव्हते. मूर्तीपूजेखेरीज अनेक मुद्यांवरुन त्यांचा रामकृष्णांशी वाद होई. या जगात सगळीकडे ब्रह्म नटलेले आहे याची रामकृष्णांनी अनुभूती घेतलेली होती. पण नरेंद्र त्यांच्या या मताची टिंगल उडवित होता. एवढेच नव्हे तर कालीमातेवर अती प्रेम केल्यामुळे ठाकुरांना कोणतातरी मानसिक आजार झाला असावा असे नरेंद्र बोलून दाखवित असे. मात्र हे सर्व जरी खरे असले तरी रामकृष्णांना भेटल्याशिवाय नरेंद्रला चैन पडत नव्हती हे देखील तितकेच खरे होते. जसे ठाकुरांचे प्राण नरेंद्रला पहाण्यासाठी व्याकुळ होत असत तसा नरेंद्रदेखील ठाकूरांना बघण्यासाठी तळमळत असे. एकदा ठाकूरांनी नरेंद्रची परीक्षा देखील घेतली होती. २-३ वेळा ते नरेंद्रशी एकशब्द बोलले नाहीत. नरेंद्र इतक्या दुरुन चालत-चालत त्यांना भेटण्यासाठी येत होता. पण दोन्ही-तिन्ही वेळेला ठाकुरांनी एकाशब्दाने देखील त्याची चौकशी केली नाही. इतर सगळ्या लोकांशी बोलले पण नरेंद्रशी अजिबात बोलले नाहीत. तरी नरेंद्र येत राहिला. शेवटी एक दिवस नरेंद्रचा हात हातात घेऊन त्यांनी विचारले - 'मला वाटले मी बोलत नाही म्हणून तू रागवशील आणि यायचा बंद होशील'. त्यावेळी नरेंद्रने प्रमाणिकपणे कबूल केले की तुम्हाला पाहिल्याशिवाय मला चैन पडत नाही. प्रश्न असा आहे की साधनपद्धतीत एवढी भिन्नता असून हे दोन महापुरुष एकमेकांशी इतके का जोडले गेले? दोघांमध्ये असे काय साम्य होते?

पहिला साम्याचा मुद्दा म्हणजे भगवंताबद्दलचे विलक्षण प्रेम. ज्याप्रमाणे ठाकुरांच्या मनात कालीमातेबद्दल विलक्षण प्रेम होते त्याप्रमाणे नरेंद्रच्या मनाला भगवद् दर्शनाची विलक्षण ओढ होती. दुसरा साम्याचा मुद्दा म्हणजे विलक्षण वैराग्य. रामकृष्ण जरी गृहस्थाश्रमी असले तरी त्यांना सांसारिक जीवनाचा स्पर्श नव्हता. कामिनी कांचनाचा त्याग त्यांना सर्वार्थाने साधला होता. याबाबतीत नरेंद्रनाथही त्यांच्यापेक्षा तसूभरही कमी नव्हते. संन्यासी जीवन जगण्याचा निर्धार त्यांनी महाविद्यालयीन जीवनातच केला होता. पैशाचे त्याला अजिबात आकर्षण नव्हते. वडिलांच्या मृत्यूनंतर नरेंद्रच्या वाट्याला जेव्हा दारिद्र्य आले तेव्हा हे दारिद्र्य दूर करण्यासाठी कलकत्त्यातील एका श्रीमंत नटीने नरेंद्रशी विवाह करण्याची इच्छा व्यक्त केली होती. तिच्याशी विवाह करताच तिच्या सर्व मालमत्तेचा तो धनी होणार होता. अमेरिकेत त्यांना उदंड पैसा मिळाला असता. तिथे त्यांची व्याख्याने ठेवणाऱ्या अनेक स्त्रिया तरुण होत्या. पण या कशानेही स्वामीजी विचलित झाले नाहीत. त्यांचा संन्यस्त जीवनाचा निर्धार पक्का होता. विवेक आणि वैराग्य या दोन साम्याच्या मुद्यामुळे ते दोघे एकमेकांशी जोडले गेले. शिवाय रामकृष्णांनी त्यांना भगवंताचे दर्शन घडवून देण्याचे आश्वासनही दिले होते. पुढे कालीमातेचे दर्शन घडल्यावर नरेंद्रनाथ मूर्तीपूजा मानू लागला होता. दृश्य जगताबद्दल नरेंद्रनाथांना काडीमात्र आकर्षण नव्हते. भगवंताच्या प्राप्तीसाठी रामकृष्णांप्रमाणेच सर्वसंग परित्याग करण्यास तो कटिबद्ध होता. प्रारंभी त्याच्या दृष्टीने रामकृष्णांचे वागणे कितीही विचित्र असले तरी रामकृष्णांच्या मनात त्याच्याबद्दल असलेले विलक्षण प्रेम नरेंद्र नाकारु शकत नव्हता. रामकृष्णांना त्यांच्या सिद्धांताच्या प्रचारासाठी नरेंद्रनाथ हवे होते. रामकृष्णांपासून दूर गेला असता तर नरेंद्रनाथाने ब्राह्मो समाज आर्य समाज यासारखा एखादा पंथ काढला असता, त्याला शे-दोनशे अनुयायी मिळाले असते. काही काळ तो पंथ टिकलाही असता पण त्यामुळे नरेंद्र अद्वैतबोधाला वंचित राहिला असता. रामकृष्णांनाही त्याच्यासारखा प्रखर वैराग्यशाली शोधणे कठीण गेले असते. अशा वैचारिक मतभेदाच्या अवस्थेत फार काळ जाऊ देणे हिताचे नव्हते. म्हणून रामकृष्णांनी एक मार्ग निवडला. तो मार्ग म्हणजे स्पर्शाद्वारे नरेंद्रनाथांचे रुपांतरण करण्याचा. रामकृष्ण आणि विवेकानंद यांच्यातील गुरु-शिष्य नात्याचा हा भाग अत्यंत गूढ पण सर्वात महत्त्वाचा आहे.

स्वामीजी ठकुरांबद्दल संदेह बाळगून असले तरी त्यांच्या मनात ठाकुरांबद्दल आदराची भावना होती. ठाकूरांची योग्यता ते जाणून होते. ठाकूर त्यांच्या तर्काच्या चौकटीत बसत नसले तरी त्यामुळे स्वामीजी आपले ईश्वरप्राप्तीचे ध्येय सोडून देणारे नव्हते. ठाकूर सुद्धा पक्के होते. नरेंद्रशी वाद घालण्यात काही अर्थ नाही हे ते जाणून होते. साधनापद्धती बद्दलची नरेंद्रनाथांची आग्रही मते बाजूला सोडल्यास त्यांचे वैराग्य आणि ईश्वरदर्शनाची व्याकुळता ठाकूर जाणून होते. नरेंद्रनाथ हे प्रकरण काळजीपूर्वक हाताळल्यास तो धर्मसंस्थापनेचे साधन ठरु शकतो याबद्दल ठाकूरांना खात्री होती. म्हणून त्यांनी नरेंद्रनाथांना २-३ वेळा आध्यात्मिक स्पर्शाने अक्षरशः हलवून सोडले. एक दिवस ठाकूर पलंगावर भावदशेत बसले असता नरेंद्रनाथांनी त्यांच्या खोलीत प्रवेश केला. ठाकूरांनी त्याला पलंगावरच बसायला सांगितले. पलंगाच्या टोकाजवळ नरेंद्र शांतपणे बसला. ठाकूर त्याच्या जवळ गेले आणि त्यांनी आपला उजवा पाय नरेंद्रच्या डाव्या खांद्यावर ठेवला. त्या स्पर्शाने नरेंद्रला असे जाणवले की खोलीतील प्रत्येक वस्तू गोलाकार गतीने फिरते आहे. एक क्षण तर असा आला की त्याला वाटले आपले अस्तित्व अनंतात विलीन होणार. तो घाबरुन ओरडला - 'तुम्ही हे काय करीत आहात? मला आई वडील आहेत.' ठाकूर हसले. त्यांनी आपल्या हाताने नरेंद्रची छाती चोळली आणि गूढपणे म्हणाले - 'जाऊ दे, सगळ्या गोष्टी आजच नकोत.' ठाकूरांच्या या स्पर्शाने स्वामीजींचे रुपांतरण व्हायला सुरुवात झाली. नरेंद्रनाथांच्या एक लक्षात आले की लोकांना वाटतात तसे ठाकूर दक्षिणेश्वरचे पागल पुजारी नाहीत. त्यांच्यामध्ये जबरदस्त आध्यात्मिक शक्ती आहे. त्यांनी साधनेद्वारा निश्चित अद्भूत काहीतरी मिळविले आहे. केवळ स्पर्शाने हा माणूस दुसऱ्याच्या जीवनात वाटेल तशी उलथापालथ करु शकतो. स्वामीजींच्या मनाचा अशाप्रकारे ताबा पूर्वी कोणी घेऊ शकले नव्हते. सर्वत्र ते ब्रह्म नटलेले आहे अशी नरेंद्रनाथांनी श्रद्धा ठेवावी असे रामकृष्णांना वाटत होते. पण तो सिद्धांत नरेंद्रच्या तर्काच्या चौकटीत

बसणारा नव्हता. अखेर एक दिवस ठाकूरांनी नरेंद्रनाथांच्या मस्तकावर हात ठेवला. त्या स्पर्शाने नरेंद्रनाथांचे पुन्हा रुपांतरण झाले. सगळीकडे ते ब्रह्म नटलेले आहे या गोष्टींची नरेंद्रनाथांनी प्रत्यक्ष अनुभूती घेतली. एका बंगाली कवितेत नरेंद्रनाथ म्हणतात, 'दक्षिणेश्वरचा तो दैवी पुरुष कोणतीही लीला करु शकतो. मी झोपलो असताना ते माझ्या शरीरातून माझे मन काढून घेतात आणि घासून-पुसून त्याचप्रमाणे त्याच्यावर योग्य संस्कार करुन ते माझ्या शरीरात पुन्हा ठेवून देतात.' स्वतः नरेंद्रनाथांनी केलेली ही कविता अत्यंत गूढ असली तरी भगवान रामकृष्ण देव कशा पद्धतीने त्यांचे रुपांतरण घडवित होते याची कल्पना येते. हे लक्षात यायला साधकही उच्चकोटीचा हवा.

हलुहळू नरेंद्रनाथ रामकृष्णांमध्ये विलीन होऊ लागले. आता एकच कळीचा मुद्दा शिल्लक राहिला होता. नरेंद्रनाथ ब्राह्मो समाजाचे सदस्य असल्यामुळे मूर्तीपूजा मानत नव्हते. आधी त्यांना ब्राह्मो समाजातून बाहेर काढणे ठाकूरांच्या दृष्टीने महत्त्वाचे होते. ब्राह्मो समाजाचे लोक ठाकूरांचा खूप द्वेष करीत. ठाकूरांच्या संगतीत अनेकांनी ब्राह्मो समाजाला रामराम ठोकला होता. नरेंद्रनाथ ठाकूरांकडे जातो हे ब्राह्मो समाजाच्या आचार्यांना ठाऊक होते. ते सारेजण नरेंद्रनाथाकडे लक्ष ठेवून होते. नरेंद्र दर रविवारी ब्राम्हो समाजातील प्रवचनाला सायंकाळी जात असे. एका सायंकाळी नरेंद्रला भेटण्याकरीता ठाकूर ब्राह्मो समाजात आले. आचार्य व्यासपीठावरुन ब्रह्माचे वर्णन करीत होते. ब्रह्माचे वर्णन ऐकताच ठाकूरांची भावसमाधी लागली. ठाकूरांना पाहण्यासाठी ब्राह्मी भक्तांनी गर्दी केली. ठाकूरांना पाहून रागावलेल्या आचार्यांनी आपले भाषण तर बंद केलेच पण दिवे मालवून ते सभागृहातून निघून गेले. ठाकूर आपल्याला भेटायला आले असताना ब्राह्मो समाजात त्यांचा एवढा घोर अपमान झाला ही गोष्ट नरेंद्रनाथांच्या मनाला लागली. त्याने ब्राह्मो समाजाला कायमचा रामराम ठोकला. नरेंद्रने मूर्तीपूजा मानावी यातील एक अडथळा दूर झाला. हे योगायोगाने घडले का ठाकूरांनी घडविले याचा निर्णय सूज्ञ साधकांवर सोपविलेला बरा.



याच काळात नरेंद्रचे वडील मरण पावले. या कुटुंबावर उपासमारीची पाळी आली. एकेकाळी ज्या कुटुंबाचा मासिक खर्च शेकडो रुपये होता त्या कुटुंबाला १५-२० रुपयात घर खर्च भागवावा लागत होता. नरेंद्र इ.अ. झाले होते. पण त्यांना नोकरी मिळत नव्हती. आपल्या विधवा मातेचे आणि बहिण-भावंडांचे दुःख त्यांना बघवत नव्हते. त्याचे बंडखोर मन विचार करु लागले - 'ठाकूरांच्या कालीमातेला आपल्या कुटूंबियांचे दुःख दिसत नाही का? जो परमेश्वर माणसाला जिवंत असताना चार घास खायला देत नाही तो मृत्यूनंतर माणसाला स्वर्गातील सुख कसे देईल? त्याने आपल्या मनातील वादळ ठाकूरांजवळ बोलून दाखविले ठाकूर मोठे हुशार. ते मंदिरात गेले आणि थोड्यावेळाने परत आले आणि नरेंद्रला म्हणाले, 'आई म्हणाली, तो जर मला मानत नाही तर मी त्याचे काम का करु?' या वाक्याने नरेंद्र ओशाळला. ठाकूर पक्के होते. ते पुढे म्हणाले, 'तू स्वतः आईला प्रार्थना केलीस तर कदाचित उपयोग होईल'. नरेंद्रनाथांना कौटुंबिक समस्या देवीला सांगण्यात रस नव्हता पण या निमित्ताने कालीमाता नेमकी काय चीज आहे हे पहाता येईल. म्हणून तो मंदिरात गेला. मंदिरात पोहोचताच त्याला कालीमातेचे प्रत्यक्ष दर्शन झाले. नकळत त्याचे हात जोडले गेले. मुखातून प्रार्थना बाहेर पडली - 'आई, भक्ती दे, ज्ञान दे, विवेक दे, वैराग्य दे. तुझे अखंड अनुसंधान राहिल असे काहीतरी दे.' नरेंद्र संसारातील काही मागू शकला नाही. ठाकूरांच्या सांगण्यावरुन तो तीन वेळा मंदिरात गेला. तीन वेळा त्याला देवीचे दर्शन झाले पण तिन्ही वेळेला त्याने वरील प्रार्थना केली. अशा प्रकारे नरेंद्र मूर्तीपूजा मानू लागला. पुढे एकदा स्वामीजी म्हणाले, 'या जगात मूर्तीपूजेचा मी जेवढा द्वेष केला तेवढा अन्य कुणीही केला नसेल. या पापाचे प्रायश्चित म्हणून की काय मला अशा माणसाच्या चरणाजवळ बसून अध्यात्माचे धडे घ्यावे लागले की ज्याने सारे काही केवळ मूर्तीपूजेतून मिळविले होते.'

यावरुन ठाकूरांनी नरेंद्रनाथाचे कसे रुपांतरण घडविले ते ध्यानी येते. याबद्दलची कृतज्ञता स्वामीजींच्या मनात शेवटपर्यंत होती. ठाकूरही देह ठेवताना त्याला म्हणाले होते - 'तुला सारे काही अर्पण करुन आज मी फकीर झालो.' स्वामीजींनी देखील अमेरिकीतील अभूतपूर्व यशानंतर आपल्या आध्यात्मिक संघटनेला 'रामकृष्ण आश्रम' हे ठाकूरांचे नाव दिले. स्वतःचे नाव दिले नाही. त्यांचे जीवन पूर्ण ठाकूरमय होऊन गेले. मुळात नरेंद्रनाथ अंतर्मुख होते. मठस्थापना, व्याख्याने, प्रचार, धर्मसंस्थापना, त्यासाठी लोकसंग्रह हा त्यांचा पिंड नव्हता. या सर्व गोष्टी रामकृष्णांच्या आदेशावरुन त्यांनी केल्या. वैयक्तिक मोक्ष आणि निर्विकल्प समाधी यावर स्वामीजींचा सगळा भर होता. पण रामकृष्णांनी त्यांना 'शिवभावे जीवसेवा-दरिद्री नारायणाची पूजा' हा व्यापक दृष्टीकोन दिला. वनातील वेदांत ठाकूरांनी जनात आणला. त्यांनी स्वामीजींना निर्विकल्प समाधीचा लाभ करुन दिला पण त्याची किल्ली स्वतःच्या हातात ठेवली. अन्यथा स्वामीजी वारंवार निर्विकल्प समाधीत गेले असते आणि त्यातच त्यांनी देह ठेवला असता. ठाकूरांना अपेक्षित असलेले कार्य स्वामीजींनी पार पाडले तेव्हा ठाकूरांनी त्यांना त्यांची असलेले कार्य स्वामीजींनी पार पाडले तेव्हा ठाकूरांनी त्यांना त्यांची निर्विकल्प समाधीची किल्ली परत दिली. त्यानंतर लगेचच स्वामीजींनी देह ठेवला. (१९०२)

हे दोघे गुरुशिष्य एकमेकांशी किती एकरुप होते याचे बोलके

उदाहरण म्हणजे माताजींनी काढलेले उद्गार होय. माताजी म्हणत, 'सध्या ठाकूर नरेंद्रच्या ह्रदयात वास करीत असून त्याच्याद्वारे धर्मसंस्थापनेचे कार्य करुन घेत आहेत.' देह ठेवताना स्वामीजींच्या मनाला एक समाधन होते की आपण ठाकूरांच्या आज्ञेचे पालन केले. देहत्यागापूर्वीच्या एका पत्रात ते लिहितात – 'आता रामकृष्ण मठ ही स्वयंचलित यंत्रणा तयार झाली आहे. हे यंत्र कुणीही बंद करु शकणार नाही. माझ्या पश्चात नवनवीन संन्यासी निर्माण होत रहातील आणि कार्य पुढे चालू राहिल. ''संन्यास धर्माला मानवसेवेचे नवीन परिमाण स्वामीजींनी प्राप्त करुन दिले. अर्थात ही ठाकूरांचीच प्रेरणा होती. ठाकूरांची सगळी स्वप्न, त्यांच्या सर्व संकल्पना स्वामीजींनी सत्यसृष्टीत साकार केल्या. म्हणून गुरु-शिष्यांची ही आदर्श जोडी भारताच्या इतिहासाच्या पानावर आपला ठसा नोंदवून गेली. रवींद्रनाथ टागोर, योगी अरविंद, महात्मा गांधी, सुभाषचंद्र बोस अशा अनेक देशभक्तांना स्वामीजींनी प्रेरणा दिली. ठाकूर आणि स्वामीजी म्हणजे भारताच्या इतिहासातील एक नूतन गौरवशाली पर्व होय. या आदर्श गुरु-शिष्यांना श्रद्धापूर्वक कोटीकोटी प्रणाम...

**श्री. सुनिलजी चिंचोलकर**
अजिंक्यनगर, हिंगणे खुर्द, पुणे – ४११०५१
फोन : २४३४८०७०



# श्रीरामकृष्ण आणि आध्यात्मिक आदर्शाची उत्क्रांती

**डॉ. स्वर्णलता भिशीकर,** एम.ए. (मानसशास्त्र), पीएच.डी. (वाचन कौशल्यांचा विकास) महाविद्यालयात असल्यापासून ज्ञानप्रबोधिनीत काम-पुणे, सोलापूर ज्ञानप्रबोधिनीत विश्वस्त. हराळी केंद्र - उपप्रमुख-रामकृष्ण मठ स्वामी रंगनाथन् महाराज यांच्या Message of upwish मराठी भाषांतर. प.पू. विमलाजी ठकार इंग्रजी पुस्तकाचे मराठी भाषांतर. आलोल्लास कविता संग्रह-देवचाफे, मोकळीकीच्या ऋचा व मा. श्री. अप्पाजी पेंडसे चरीत्र प्रकाशित. नातू फाऊंडेशन पुणे, सावित्रीबाई फुले, नाशिक व वसुंधरा कृतज्ञता पुरस्कार प्राप्त.

**स्थापकायच धर्मस्य सर्व धर्मस्वरुपिणे**
**अवतारवरिष्ठाय रामकृष्णाय ते नमः**

ज्या काळात आपला देश ब्रिटिशांच्या गुलामीमध्ये पिचत होता, त्याच काळात एकोणीसाव्या शतकात परमार्थाच्या इतिहासातली एक अपूर्व घटना या देशात घडली. जीवाची शिवस्वरुपता म्हणजे सर्व दृष्टीने परिपूर्ण अशी मुक्तीची अवस्था कशी असते हे त्यांच्या समकालीन लोकांना पहायला मिळाले. श्रीरामकृष्णांना काळाच्या पटावर पहाणे कठीण आहे. परंतु श्री. अरविंदांनी म्हटलेले आहे, की सहस्त्रोवर्षांच्या मानवी इतिहासातील अध्यात्मज्ञानाचे सत्वसार श्रीरामकृष्णांच्या जीवनात उतरलेले आपल्याला दिसते. स्वामी विवेकानंदांनीही स्वामी रामकृष्णनंदांना याच अर्थाच्या पुढील ओळी लिहिल्या आहेत.

""He was the embodiment of all past religious thoughts of India. His life alone made me understand what the shashtras really meant, and the whole plan and scope of the Shashtras."

श्रीरामकृष्ण हे भारताच्या सर्व प्राचीन आध्यात्मिक आदर्शांचे साकार स्वरुप होते. प्राचीन शास्त्रांचा खरा अर्थ काय? त्यांची रचना कोणत्या योजनेनुसार आणि कोणत्या उद्देशाने झाली? याच सर्व गोष्टी श्रीरामकृष्णांच्या जीवनातूनच मला कळल्या.

अध्यात्मशास्त्राचा इतिहास लिहिणारे लोक आपल्याला सांगतात की, निसर्गातल्या विविध शक्तींविषयी प्राचीन मानवाला भय आणि आदर प्रेम दोन्ही वाटत असे. या शक्तींची त्याने नंतर प्रतिमास्वरुपात पूजा सुरु केली. उत्क्रांतीच्या एका टप्प्यावर त्याला कळले की

**एकं सत् विप्राः बहुधा वदन्ति अग्निं यमं मातरिष्वारमाहुः**

सत्य एकच आहे. त्याला अग्नि, यम, मातरिष्वा अशा विविध नावांनी हाक मारतात. देव एक आहे या जाणिवेतून जगातील अंतिम सत्य म्हणजेच ईश्वर या बोधापर्यंत मनुष्याचा प्रवास झाला. 'जो सर्वांतर्यामी आहे, तोच माझ्यातही आहे' अशा बोधाकडे अंतरंग साधनेद्वारा त्याचा प्रवास झाला. ईश्वराचा शोध बहिर्मुखतेकडून अंतर्मुखतेकडे कसा होत जातो, यासंबंधीचा एक श्लोक आपल्या परंपरेत आहे.

**उत्तमा सहजावस्था, मध्यमा ध्यानधारणा ।**
**अधमा मूर्तिपूजाच, तीर्थयात्राऽ धमाधमा ।।**

या श्लोकाचा अर्थ असा की नित्य ईश्वराशी एकरुपतेने रहाणे, ही सर्वात उत्तम गोष्ट. प्रयत्नपूर्वक ध्यानधारणा करुन समाधीचा काही काळ अनुभव घेणं ही मध्यम प्रतीची गोष्ट. एखाद्या मूर्तीच्या स्वरुपात परमसत्याची उपासना करणे, ही कनिष्ठ प्रतीची गोष्ट होय आणि तीर्थयात्रा करत फिरत वेगवेगळ्या क्षेत्री त्याचा शोध घेत भटकणे ही सर्वात कनिष्ठ गोष्ट होय. मराठी भाषेमध्ये अधम हा शब्द दुष्ट, नीच या अर्थाने वापरतात. पण या श्लोकामध्ये कनिष्ठता सूचित करण्यासाठी 'अधम' असा शब्द वापरला आहे. भगवान श्रीरामकृष्णांचे वैशिष्ट्य हे की उपासनेच्या कोणत्याही मार्गाला त्यांनी श्रेष्ठ किंवा गौण अस लेखलेलं नाही. अगदी शाक्तांच्या मद्यमांसयुक्त पूजेलाही परमेश्वराकडे जाण्याचा मागचा दरवाजा म्हणून त्यांनी उल्लेखले आहे.

शिकागोच्या सर्वधर्म परिषदेत स्वामी विवेकानंदांनी शिवमहिम्नातील जो श्लोक उद्धृत केला, तो त्यांच्या गुरुदेवांचंच जीवन साररुपाने सांगणारा होता.

**रुचीनां वैचित्र्यात् ऋजुकुटिल नानापथजुषाम् ।**
**नृणामेकोगम्यत्स्वमसि पयसामर्णव इव ।।**

पाणी जसं सरळ किंवा वक्र मार्गाने अखेर सागराला जाऊन मिळतं, तसे उपासनेचे नानाविध मार्ग सरळ किंवा वक्र वळणांनी अखेर श्रीशिवांपाशी येऊन मिळतात. आपल्याला आश्चर्य वाटते की श्रीरामकृष्णांना लौकिक आयुष्य पुरे पन्नास वर्षांचेही लाभले नाही. परंतु इतक्या थोड्या कालात त्यांनी विविध आध्यात्मिक आदर्श स्वतःच्या जीवनात जगून त्यांची सत्यता जगाला दाखवून दिली.

त्यांच्या बालपणातील प्रसंग आपण पहात आहोत. त्यांना स्वतःच्या आई इतकीच लोहाराची धनीमाता प्रिय असलेली आपल्याला दिसते. जसे पुरुषांविषयी त्यांना आदर, ममत्व वाटत होते, तसेच स्त्रियांविषयी मातृभाव ते अनुभवत असत. सगुण पूजा त्यांना मनापासून आवडे आणि त्याचबरोबर भाताच्या हिरव्यागार शेतातून फिरताना

निळभोर आकाश आणि त्यातील बलाकमाला पहातांना विराटाच्या साक्षात्कारात ते समाधिमग्न होऊन जात. लहानपणापासूनच सगुण आणि निर्गुण यांचा लपाछपीचा खेळ त्यांच्या आयुष्यात चाललेला दिसतो. पुढे यौवनावस्थेत विविध प्रकारच्या साधना करतांना ते दिसतात. 'कोणतेही साधन करायला मला तीन दिवसांपेक्षा अधिक वेळ लागणार नाही' असे त्यांनीच एकाठिकाणी सांगितले आहे. ख्रिस्ती धर्माची आणि मुस्लिम धर्माची साधना करुन त्याही मार्गांनी सत्यापर्यंत पोहोचता येते असा प्रत्यक्ष अनुभव त्यांनी घेतला.

श्रीरामकृष्णांच्या जीवनात दोन घटना आध्यात्मिक आदर्शांच्या दृष्टीने महत्त्वाच्या आहेत. एक स्वतःच्या पत्नीची जगदंबा भावाने पूजा आणि दुसरी – तोतापुरींबरोबर साधना करीत असतांना ज्ञानखड्गाने परमप्रिय कालीमातेच्या मूर्तीचे भंजन आणि निर्विकल्प समाधीत घेतलेली डूब. या दोन घटनांविषयी आपण थोडे तपशीलात विचार करु. आध्यात्मिक साधनेसाठी वैराग्य अत्यावश्यक मानले आहे. आद्यशंकराचार्य आणि त्यांच्या परंपरेतील थोर संन्याशांनी कामिनीकांचनाकडे पाठ फिरवून गृहस्थाश्रमाच्या बंधनात न पडता साधना केलेली आहे. वज्रांगशरीर हनुमंतांच्या रुपाने वैराग्याचा आदर्श आपल्याला दिसतो. पण गृहस्थाश्रमात राहून परिपूर्ण वैराग्य कसं असू शकतं हे आपल्याला रामकृष्ण आणि सारदामाता यांच्या जीवनातून ध्यानी येतं. वैराग्य म्हणजे रुक्ष, कोरडेपणा नव्हे तर कुठल्याही नामरुपाशी जिने स्वतःला बांधून घेतलेलं नाही अशी वस्तुमात्राविषयीची अथांग प्रीती आणि भगवत्‌भाव. असं वैराग्याचं एक वेगळं स्वरुप श्रीरामकृष्णांनी दाखवून दिलं. गृहस्थाश्रम आणि संन्यास हे अध्यात्म जीवनात एकत्र नांदू शकतात, ही महान आश्चर्याची गोष्ट त्यांच्या ठिकाणी आपल्याला पहायला मिळते. ठाकुरांच्या पूर्वीच्या ज्या विभूती होऊन गेल्या, त्यांच्यापैकी क्वचितच कोणाच्या जीवनात ही अलौकिकता आपल्याला दिसते. ज्या काळात स्त्री ही पुरुषाच्या चरणाची दासी असा सामाजिक भाव होता, त्या काळात अगदी निःसंदिग्धपणे स्त्री ही पुरुषाची अध्यात्ममार्गावरील सहचारिणी म्हणून नित्यवंदनीय, आदरणीय आहे असं श्रीरामकृष्णांनी वेळोवेळी आचरणातून प्रकट केलेलं आहे आणि म्हटलेलंही आहे.

एकेश्वरवादी जग म्हणजे मुस्लिम आणि ख्रिश्चनांचे जग भारताची तेहतीस कोटी देवांची पूजा करणारा देश म्हणून कित्येकदा हेटाळणी करत असतात. कुठल्या ना कुठल्या स्वरुपात मूर्तिपूजा सर्वच धर्मांमध्ये आपल्याला दिसते. अलिकडच्या काळात स्वामी विवेकानंदांपासून भारतीय अद्वैत सिद्धांताची ओळख जगाला करुन देणाऱ्या अनेक आचार्य भारतभूमीतून सर्व जगतात गेले. श्रीरामकृष्ण हे मूलतः सगुणाचे उपासक होते. प्रत्यक्ष आईशी जसं वागणं, बोलणं तसं कालीमातेशी त्यांचं वागणं बोलणं असे. मात्र तोतापुरींच्या सहवासात निर्गुण ब्रह्माचा अनुभव घेण्यासाठी साधना करत असताना निराकाराच्या प्रदेशात प्रवेश करण्याच्या आड ते परमप्रिय रुपच येऊ लागलं. तोतापुरींनी एका अणुकुचिदार तुकड्याने श्रीरामकृष्णांच्या भ्रूमध्यावर टोचल आणि जो आकार मनापुढे उभा रहात होता, त्याचा ज्ञानखड्गाने निरास करायला सांगितला. तसं करताच श्रीरामकृष्णांनी निर्विकल्प समाधीत डूब घेतली. समर्थांनी दासबोधात म्हटलं आहे की, 'सगुणाचे नि आधारे । निर्गुण पाविजे निधारे ।' यात एक रहस्य लपलेलं आहे ते म्हणजे एका क्षणी सगुणाचं बोट सोडून दिल्याशिवाय निर्गुणाचा अनुभव येत नाही. प्रसंगी सगुणाचा निरास करण्याची सिद्धता ठेवावी लागते. नामदेव महाराजांना विठ्ठलाचं सगुण रुप आपल्याशी बोलतं, खेळतं याचा अभिमान होता. पण विठ्ठलानेच त्यांना विसोबा खेचरांकडे जायला सांगितले आणि एका प्रतीक कथेतून जळी-स्थळी-काष्ठी-पाषाणी असलेल्या ईश्वरतत्त्वाची अनुभूती त्यांना दिली. संत चरित्रातून दिसणारा हा साकाराकडून निराकाराकडचा प्रवास अनेक संप्रदाय, अनेक पंथ यात आपल्याला दिसतो. साकाराची उपासनाही जगातील विविध पंथांनी विविध रुपाने केलेली आहे. श्रीरामकृष्णांच्या जीवनात साकार आणि निराकार या दोन्ही उपासनांच्या अनंत छटा आपल्याला दिसतात. प्रसिद्ध लेखक रोमाँरोला यांनी म्हटले आहे, 'श्रीरामकृष्णांच्या जीवनसंगीतातून जगातील हजारो धर्मपंथ आणि उपपंथ यांच्या भिन्नभिन्न आणि विसदृश स्वरांच्या मीलनाचा मंजुळ ध्वनी निघतो.'

श्रीरामकृष्ण यांचा प्रधान जीवनस्वर म्हणजे समन्वय. मानवी मनाला ईश्वराभिमुख करणाऱ्या सर्व साधनांचा स्वीकार. प्रत्यक्षात पहाता उपासनेच्या विविध पद्धतींमध्ये अनेक दर्शनी विसंगती आपल्याला दिसू शकतात. परंतु त्यामागचं सत्य पहाण्याची दृष्टी एका श्रीरामकृष्णांकडेच होती. श्री. 'म' यांनी लिहिलेल्या श्रीरामकृष्ण वचनामृतात त्यांच्याकडे वेगवेगळ्या विचारांचे साधक आलेले दिसतात. त्यांच्याबरोबर श्रीरामकृष्णांचं बोलणं होतं. आणि ते साधक समाधान पावून परत जातांना दिसतात. त्यांच्याकडे येणाऱ्यांमध्ये निरीश्वरवादी आहेत. पुष्टीमार्गी वैष्णव आहेत, शाक्त आहेत, कुंडलिनी जागृती करुन सहस्त्रारामध्ये शिवानुभव घेणारे आहेत. त्यांच्याकडे येणारे जे भक्त गायक आहेत, ते जगदंबेची स्तुती गाणारी पदं, कृष्णलीला, रामलीला, कुलकुंडलिनीची आवाहनं अशी भिन्नभिन्न प्रकारची पदं गाताना दिसतात. त्या सर्वांनीच श्रीरामकृष्णांचं भावउद्दिपन होताना दिसतं. त्यावरुन ध्यानी येतं की श्रीरामकृष्णांचा समन्वयभाव हा मनबुद्धी पलीकडच्या अद्‌वैत अनुभवातून आलेला होता.

अतिशय सोप्या समर्पक दृष्टांतामधून हा अनुभव ठाकुर आपल्याला सांगतात. ते म्हणतात, ''लोणी असेल, तर ताकही असलेच पाहिजे. ताक नसेल तर लोणी होणार नाही. असेच, नित्य मानल्यास लीलाही मानलीच पाहिजे. अनुलोम आणि विलोम ईश्वराचा साकार आणि निराकार या दोन्ही रुपात साक्षात्कार झाल्यानंतर ही अवस्था येते. साकार म्हणजे चैतन्याचे घनीभूत रुप ! चिन्मयरुप ! आणि निराकार म्हणजे अखंड सच्चिदानंद ! तोच सारे काही झाला आहे. म्हणून विज्ञान्याला हे जग आनंदाचे धाम वाटत असते आणि ज्ञान्याला हे जग मयसभा किंवा फसवणुकीचे ठिकाण वाटत असते. नारदादी आचार्य हे विज्ञानी होते. विज्ञान्याला ईश्वराचे चिंतन करीत अखंड सच्चिदानंदात मन विलीन झाले तरी आनंद आणि तसे अखंडात विलीन न होता लीलेत मन राहिले तरीही आनंद ! म्हणून मी नित्य आणि लीला दोन्ही मानतो आणि दोन्ही घेतो.''

यावरुन ध्यानी येते की श्रीरामकृष्ण सहजावस्थेत विज्ञानी स्थितीत होते. कुठल्याही एका मार्गाचा आग्रह धरणारे लोक त्यांना आवडत नसत. सनईवादक नुसता पोंपों करत असतो. त्याप्रमाणे ज्ञानी नुसता सोऽहं सोऽहं करीत असतो. पण विज्ञानी मात्र बासरीवादकासारखा असतो. त्याच्या बासरीतून ज्ञान, भक्ती, योग, तंत्र असे विविध स्वर येऊ शकतात. या विविध स्वरांचा तो आनंद घेतो.

जसे श्रीरामकृष्णांच्या काळात विविध संप्रदाय आणि त्या संप्रदायांचा अभिनिवेश असलेल्या व्यक्ती होत्या, त्याप्रमाणे आजही आहेत. स्वामी विवेकानंदांनी सर्व संप्रदायांच्या सत्यतेचा जो उद्घोष केला, त्याची आजसुद्धा आवश्यकता आहे. समर्थ रामदास स्वामी म्हणाले होते, 'धर्मस्थापनेचे नर । झाले आहेत पुढे होणार । देणे ईश्वराचे।' स्वतः श्रीरामकृष्णांनीही आपण पुनश्च अवतार घेणार असल्याचं सांगितलं आहे. ते एका ठिकाणी म्हणतात, "संसारी जीवाचे ज्ञान, भक्ताचे ज्ञान आणि अवताराचे ज्ञान ही सारखी नसतात. संसारी जीवाचे ज्ञान म्हणजे जणू दिव्याचा उजेड ! त्याने फक्त खोलीच्या आतलेच दिसते. त्या ज्ञानाच्या सहाय्याने खाणेपिणे, घरकाम करणे, शरीराची जोपासना करणे, मुलाबाळांचे पालनपोषण करणे, इत्यादी सारे होऊ शकते. भक्ताचे 'ज्ञान' म्हणजे जणू चंद्राची प्रभा ! त्याने आतले आणि बाहेरचे दोन्ही दिसते. परंतु खूप दूरची गोष्ट किंवा खूप लहानशी गोष्ट दिसत नाही. अवतारांचे ज्ञान म्हणजे सूर्याचा प्रकाश ! आतले, बाहेरचे, लहान, मोठे सर्वकाही ते पाहू शकतात."

आपल्याकडे दशावतारांची कल्पना आहे. ती आधुनिक उत्क्रांती कल्पनेशी जवळची आहे. मनुष्यत्व हा उत्क्रांतीचा एक महत्त्वाचा टप्पा आहे. आणि देवमानवत्व हा त्यापुढचा टप्पा आहे. श्रीरामकृष्णांसारखे अवतार हे मानवातून देवमानव निर्माण होण्याच्या प्रक्रियेला गती देत असतात. त्यांची अवतारलीला दृश्य स्वरुपात आपल्याला जी दिसते, तेवढीच नसते. अव्यक्तात किंवा मानवी दृष्टीला न दिसणाऱ्या जगतात ते काय करत असतात हे समजून घेण्यासारखे आहे. कंस किंवा रावण ही मानवी चेतनेतीत नकारात्मक प्रेरणांची दृश्य रुपे होती. त्यांच्या संहाराबरोबर अव्यक्त जगतातील अशुभ शक्तींचं बळ कमी होत असतं आणि सकारात्मक, विधायक शुभशक्ती बळ घेत असतात. 'परित्राणाय साधूनां विनाशायच दुष्कृताम्' हे अवतारांचे जीवितकार्य होय. श्रीरामकृष्णांच्या निव्वळ कटाक्षाने, स्पर्शाने व्यक्तींमध्ये झालेली परिवर्तनं आपण वाचतो. त्यामागे अव्यक्तात त्यांनी घडवलेली परिवर्तनं उभी आहेत. याची जाणीव आपल्याला असतेच असं नाही. म्हणून अवतार असतात पृष्ठभागावर एक अष्टमांश आणि पृष्ठभागाच्या आत सात अष्टमांश. अवतारांचं अवतारकार्य समजून घेण्यासाठीसुद्धा साधना आणि तपश्चर्या यांची आवश्यकता असते. मुंडकोपनिषदात दोन पक्ष्यांची कथा आहे. एक वृक्षाच्या शिखरावर संपूर्ण तेजोमय दैदिप्यमान स्वरुपाचा आहे. दुसरा वृक्षाच्या खालच्या बाजूला आहे. सुखदुःखाची फळे चाखून हसत रडत आहे. हळूहळू वृक्षाच्या वरच्या फांद्यांवर चढतचढत तो पक्षी शिखरावरच्या पक्ष्याच्या निकट जाऊन पोहोचतो. आणि त्याला कळतं, की हा दैदिप्यमान पक्षी म्हणजे आपणच होय. युक्ताहार विहार, शमदमादि साधनसंपत्ती, सत्कर्म, नामस्मरण, ध्यान या साधनमार्गांनी प्रवास करत मनुष्य आत्मस्वरुप जाणण्याच्या योग्यतेला पोहोचतो. त्यानंतर तो अवतारांचं खरं स्वरुप समजू शकतो. म्हणून भगवान श्रीरामकृष्ण यांचं अवतारित्व समजून घेण्यासाठी ते आपल्या हृदयात प्रतिबिंबित व्हावेत म्हणून आपण शुद्धी साधना करायला हवी.

विविध अवतार आपापले काही ना काही वैशिष्ट्य घेऊन या जगात अवतरलेले आपल्याला दिसतात. परंतु त्या वैशिष्ट्यांचाच अभिनिवेश त्या अवताराच्या पूजकांना झालेला दिसतो. आजपर्यंतच्या सर्व अवतारी पुरुषांच्या अवतारकार्यांचा समन्वय आपल्याला भगवान श्रीरामकृष्णांच्या जीवनात दिसतो. या अर्थाने ते आजवरच्या आध्यात्मिक आदर्शांचे उत्क्रांत स्वरुप आहेत. आणि त्यामुळेच सर्व आध्यात्मिक संप्रदाय आपापला अभिनिवेश सोडून या विराट आदर्शाच्या प्रकाशात आपल्याला गवसलेली सत्य अधिक चांगल्या रितीने न्याहाळून पाहू शकतील. तसं झाल्यावर त्यांच्या मनातील विभक्ततेची, अलगतेची भावनाही विरुन जाईल. आपल्या जाणिवा अशा विशाल होणं हे आपल्या व्यक्तिगत आणि सामुहिक साधनेसाठी आणि विश्वाच्या कल्याणासाठी आणि भारताच्या कल्याणासाठी फार मोलाची गोष्ट आहे. तसं होवो अशी श्रीरामकृष्णांच्या चरणी प्रार्थना करुन या लेखाचा समारोप करीत आहे.

**डॉ. स्वर्णलता भिशीकर**
९९७/८ गणेश वाडी, डेक्कन जिमखाना, फर्ग्युसन कॉलेज रोड, पुणे-४



# श्रीरामकृष्णांच्या बोधकथा

**सौ. अंजली धोपावकर**
एम.ए. (इंग्लीश)
१०-१५ वर्षे रामकृष्ण मठ व मिशन संबंधित.

खरं पाहता श्रीरामकृष्णांच्या बोधकथा हा एक विशेष अभ्यासाचा विषय आहे. कारण ह्या बोधकथा संख्येने, आशयाने, विषयांच्या विविधतेने, गुणात्मकतेने आणि त्यातील मर्माच्या दृष्टीने अपरिमित आहेत. आपल्याला ह्या कथांची ओळख 'श्रीरामकृष्ण वचनामृत' (मूळ बंगाली – श्रीरामकृष्ण कथामृत) ह्या ग्रंथात होते. एखाद्या निष्णात वैद्याने एखादे कडू औषध साखरेत किंवा मधात घोळून द्यावे त्याप्रमाणेच या बोधकथांचे स्वरूप आहे. श्रीरामकृष्ण अतिशय सुलभ, गोड अशा कथा सांगून सर्वसाधारण साधकाचा भवरोग दूर करत आहेत. वरवर पाहता अतिशय व्यावहारिक पातळीवर वाटणाऱ्या ह्या कथा परमार्थाच्या मार्गावरील अंतिम सत्यच आपल्याला शिकवत आहेत. त्यातील काही कथांचे स्वरूप आणि त्यामागचा बोध यांचा अभ्यास करण्याचा हा एक प्रयत्न आहे.

श्री. महेंद्रनाथ गुप्त उर्फ मास्टर महाशय यांनी श्रीरामकृष्णांनी वेळोवेळी केलेल्या उपेदशांच्या नोंदी 'श्रीरामकृष्ण वचनामृत' या ग्रंथात केल्या आहेत. हा ग्रंथ वाचत असताना जणू काही श्रीरामकृष्णच आपल्याशी बोलत आहेत, आपल्याला उपदेश करत आहेत असे वाटते. ह्या ग्रंथाबद्दल श्री. महेंद्रनाथ गुप्त यांना लिहिताना श्रीरामकृष्णांच्या लीलासहधर्मिणी श्रीसारदादेवी म्हणतात, ''त्यांच्या (श्रीरामकृष्णांच्या) जवळून तुम्ही जे ऐकले ते बोलणेच सत्य होय. एकेवेळी त्यांनीच तुमच्याजवळ ह्या साऱ्या गोष्टी ठेवल्या. आता आवश्यकतेनुसार तेच त्या प्रगट करवीत आहेत. ह्या साऱ्या गोष्टी व्यक्त न केल्यास लोकांचे चैतन्य जागणार नाही हे जाणून असा''. अतिशय आशयगर्भित अशा या ओळी आहेत. प्रत्यक्ष श्रीरामकृष्णांच्या मुखातून प्रगट झालेले हे उपदेश आपल्याला अध्यात्ममार्गावर प्रकाशदर्शी ठरणार आहेत आणि आपल्यातील चैतन्य जागृत करणार आहेत.

**'संसाराचे आकर्षण'**

एकदा एक कोळीण एका माळिणीच्या घरी पाहुणी म्हणून गेली होती. रात्री एका फुलांच्या खोलीत तिची झोपायची सोय केली होती. पण त्या कोळणीला त्या खोलीत काही झोप येईना. ती सारखी चुळबूळ करु लागली. ते बघून माळीण तिला म्हणाली, ''का गं, झोप येत नाही का तुला?'' त्यावर ती कोळीण म्हणते कशी, ''कोण जाणे बाई, या फुलांच्या वासानं झोपच येत नाही बघ. तू जरा माझी ती मासळ्यांची टोपली आणून देशील का?'' मग त्या कोळणीनं त्या मासळ्यांच्या टोपलीवर पाणी शिंपडलं आणि तो वास घेत घेत ती छान ढाराढूर झोपी गेली.

तसं पाहिलं तर ही कोळणीची गोष्ट आपल्याला माहित असलेलीच आहे. परंतु ज्या आशयाचा संकेत करण्यासाठी श्रीरामकृष्णांनी ही कथा सांगितली ते ध्यानात घेतल्यास ह्या गोष्टीला एक वेगळाच अर्थ प्राप्त होतो. ब्राह्मो समाजाचे नेते श्री. केशवचंद्र सेन हे श्रीरामकृष्णांच्या भेटीसाठी, त्यांच्याकडून उपदेश ग्रहण करण्यासाठी दक्षिणेश्वर येथे येत असत. एकदा असेच ते दक्षिणेश्वरला आले असताना श्रीरामकृष्ण त्यांना, ''रात्री येथेच रहा'' असे सांगत आहेत. त्यावर, ''काही काम आहे. जावे लागेल.'' असे श्री. केशवचंद्र म्हणतात. हे ऐकून श्रीरामकृष्ण त्यांना म्हणतात, ''कां हो, मासळ्यांच्या टोपलीचा वास नसल्यास काय तुमची झोप व्हायची नाही?'' असे म्हणून श्रीरामकृष्ण कोळणीची गोष्ट सांगतात.

संसारात रममाण झालेल्या माणसांची अवस्था श्रीरामकृष्ण या कथेतून सांगतात. ईश्वरप्राप्तीचा मार्ग अवलंबिणे अशा माणसांना रुचत नाही. संसाररुपी सुखदुःखाची माशांची टोपलीच त्यांना प्रिय वाटते. परमेश्वरी चिंतनाचा सुगंध त्यांना नकोसा वाटतो.

श्रीरामकृष्ण म्हणतात, ''ईश्वरप्राप्ती हे मनुष्यजीवनाचे ध्येय आहे. संसारात रहा पण निर्लिप्तपणे रहा, जसा चिखल्या मासा. चिखलामध्ये राहूनही त्याच्या अंगाला चिखल लागत नाही, अगदी तसे. संसारामध्ये निर्लिप्तपणे राहण्यासाठी ईश्वरलाभ झाला पाहिजे.'' ईश्वरलाभानंतर संसारात छान राहता येते असे सांगून श्रीरामकृष्ण आपल्याला आश्वस्त करत आहेत. पण ईश्वरलाभ व्हायचा कसा? परमेश्वरप्राप्तीचे आकर्षण वाटायचे कसे? ह्यावरही कृपासिंधू श्रीरामकृष्ण उपाय सांगताहेत. तो उपाय आहे – 'चित्तशुद्धी' मन शुद्ध झाले तरच भगवान त्या पवित्र आसनावर येऊन विराजतील. श्रीरामकृष्णांनी पद्मलोचन नावाच्या मुलाची एक कथा सांगितली आहे. ती कथाही असा संकेत देते की

चित्तशुद्धी झाल्यावरच भगवान हृदयमंदिरात आसनस्थ होतात.

**'चित्तशुद्धीची आवश्यकता'**

एका खेड्यात पद्मलोचन नावाचा मुलगा होता. गावात एक जुनाट, पडकं देऊळ होतं. आत देवाची मूर्ती नाही. सगळीकडे झाडं झुडपं उगवलेली, गाभाऱ्यात वटवाघळांची विष्ठा पडलेली अशी त्या मंदिराची अवस्था असल्याने लोकांचे मंदिरात जाणं येणं अजिबात नव्हतं. एके दिवशी संध्याकाळी मंदिराच्या दिशेनं शंखाचा आवाज येऊ लागला. गावकऱ्यांना वाटलं कुणीतरी मंदिरात देवाची मूर्ती बसवली असेल. म्हणून सर्वजण देवदर्शनासाठी मंदिरासमोर आले पण मंदिराचे दार उघडून बघतात तो काय? देवमूर्तीचा पत्ता नाही, की देवळाची झाडझूड नाही, सगळीकडे वटवाघळांची विष्ठा पसरलेली आणि पद्मलोचन एकीकडे उभा राहून जोरजोरात शंख फुंकतोय. हे पाहून गांवकरी म्हणतात, ''अरे तुझ्या देवळात माधव कुठे आहे? इथे वटवाघळं घिरट्या घालताहेत आणि नुसताच शंख फुंकून काय उपयोग?''

चित्तशुद्धीची आवश्यकता येथे श्रीरामकृष्ण सांगत आहेत. ह्या कथेमुळे आपल्याला ईश्वरप्राप्तीच्या मार्गक्रमणाची दिशा मिळते. संसारात जी सारी कामे केली जातात ती निष्काम भावनेने केल्यास चित्तशुद्धी होईल आणि मनात ईश्वराविषयी प्रेम उपजेल. प्रेम उत्पन्न होताच हळूहळू त्याच्याच कृपेने त्याचं दर्शन घडेल.

एखाद्या लहान मुलाचे बोट धरुन त्याला रस्ता दाखववा त्याप्रमाणे श्रीरामकृष्ण अध्यात्ममार्गावर आपल्याला मार्गदर्शन करीत आहेत. हा मार्ग आक्रमित असताना आपला मार्ग योग्य दिशेनेच जातो आहे ना? आपण कुठे चुकलो तर नाही ना? एखादी छोटीशी प्राप्ती झाली तर ध्येय प्राप्त झाले का? असे प्रश्न आपल्याला वारंवार पडतात. परंतु श्रीरामकृष्ण *सतत पुढे जाण्याची शिकवण आपल्याला देतात. त्यांनी सांगितलेली एका लाकुडतोड्याची बोधकथा ही हाच संदेश देते.*

**'सतत पुढे जा'**

एक लाकुडतोड्या जंगलात लाकडं तोडायला गेला होता. तिथे त्याला एक ब्रह्मचारी भेटला. तो त्याला म्हणाला, ''पुढे जा''. लाकुडतोड्या पुढे जाऊन पाहतो तो त्याला दिसते चंदनाचे वन. आणखी काही दिवसांनी त्याच्या मनात विचार येतो की आपल्याला तर पुढे जायला सांगितले आहे. चंदनाच्या झाडाशी थांबायला सांगितले नाही. म्हणून तो पुढे जातो तर त्याला दिसते चांदीची खाण ! काही दिवसांनी आणखीन पुढे जातो तर सापडते सोन्याची खाण! आणि त्याच्याही पुढे काय मिळते तर हिऱ्यामाणकांची खाण !

परमार्थाच्या वाटचालीतही सतत पुढे जात राहिले पाहिजे, मार्गक्रमण करत राहिले पाहिजे. मग आपल्याला प्रश्न पडतो की मार्गक्रमण कुठवर करायचे? काय सतत पुढे जात रहायचे? मग थांबायचे कधी? आणखी काही या मार्गावरील पथदर्शक खुणा आहेत का? असल्यास कोणत्या आहेत? या प्रश्नांवरही श्रीरामकृष्ण कृपा करुन उपाय सांगत आहेत. त्यांनी सांगितलेली ही शेतकऱ्याची बोधकथा आपल्या प्रश्नाचे उत्तर आहे.

**'दृढनिश्चय हाच उपाय'**

एकदा खूप दुष्काळ पडला. शेतकरी कालवे खणून दूरदूरुन शेतात पाणी आणू लागले. एक शेतकरी खूप निश्चयी होता. त्याने ठरविले की जोपर्यंत शेतात पाणी खेळत नाही, जोवर पाटानं शेत आणि नदी जोडले जात नाही तोपर्यंत कालवा खणत राहीन. आंघोळीची वेळ झाली तरी शेतकरी कालवा खणतच राहिला. जेवणाची वेळ उलटून गेली. त्याची मुलगी, बायको बोलवायला येताच तो त्यांच्यावर रागाने धावून गेला. सबंध दिवस कष्ट करुन शेवटी त्या शेतकऱ्याने शेत आणि नदी जोडून दिली आणि काठावर बसून डोळे भरुन पाहू लागला. दुसरा एक शेतकरी मात्र घरुन बोलावणे येताच कुदळ, फावडे शेतातच टाकून घरी गेला. त्याचे कालवा खणणे मात्र राहून गेले.

पहिल्या शेतकऱ्यासारखा दृढ निश्चय करुन परमार्थ मार्गावर वाटचाल केल्यास त्या सच्चिदानंद स्वरुप परमात्म्याची प्राप्ती होईलच. तीव्र वैराग्य अंगी बाणल्यास ईश्वरलाभ दूर नाही. परमेश्वराची प्राप्ती हे ध्येय आपल्या समोर असताना मग जगात वावरायचे कसे? असा प्रश्न आपल्याला पडतो. या प्रश्नाचे उत्तर आपल्याला श्रीरामकृष्णांनी सांगितलेल्या 'माहूत नारायण' आणि 'साप आणि साधू' या कथांमधून सापडते.

**'शक्तीचा प्रकाश जाणा'**

एका जंगलात एक साधू आणि त्याचे शिष्य राहात असत. एक दिवस साधूने आपल्या शिष्यांना उपदेश केला की जगात सर्वांच्या रुपाने एक नारायण नटलेला आहे, अशा दृष्टीने आपण नेहमी पाहावे. एकेदिवशी त्यामधील एक शिष्य समिधा आणायला वनात गेला असताना समोरुन एक हत्ती येताना त्याला दिसला. ''बाजूला व्हा, *बाजूला व्हा'' असे त्या हत्तीचा माहूत येणाऱ्या-जाणाऱ्याला ओरडून सांगत होता. पण आपण नारायण तसा हत्तीही नारायण असा विचार* करुन तो शिष्य तसाच उभा राहिला. परिणामी त्या शिष्याला हत्तीने सोंडेत धरुन दूर भिरकावून दिले. शिष्य रक्तबंबाळ होऊन बेशुद्ध होऊन पडला. गुरु आणि इतर शिष्यांनी त्याला आश्रमात नेऊन औषधोपचार केले. शुद्धीवर आल्यावर त्या शिष्याला विचारले की हत्ती येत असताना तू पळून का नाही गेलास? यावर त्या शिष्याने उत्तर दिले, ''आपल्याला गुरुदेवांनीच नाही का सांगितले की सर्वांच्या रुपाने एक नारायणच नटलेला आहे.'' तेव्हा गुरुदेव म्हणाले, ''हत्ती नारायण हे खरं पण 'बाजूला व्हा' असं सांगणारा माहूतही नारायणच होता. त्यावेळी त्या नारायणाचं ऐकायला हवं होतं.''

ईश्वर विभूतीरुपाने सर्वांभूती आहे पण कुठे त्याच्या शक्तीचा प्रकाश जास्त तर कुठे कमी असतो. या बोधकथेद्वारे श्रीरामकृष्ण आपल्याला एक धडाच शिकवत आहेत. सर्वांच्या हृदयात नारायण आहे खरा पण तरीही असाधू, अभक्त अशांशी मिळून मिसळून वागणं योग्य होणार नाही. उलट दुष्ट लोकांपासून सावध राहण्याचा इशारा श्रीरामकृष्ण आपल्याला देतात. त्यांनी सांगितलेली सापाची कथाही हेच सूचित करते.

**'सावध रहा'**

एका साधूने एका सापाला उपदेश केला, ''कोणालाही आपल्याकडून त्रास होणार नाही अशा सात्विक वृत्तीने वागावं''. या उपदेशानुसार साप अतिशय सौम्य वृत्तीने राहू लागला. मुलांनी दगड मारले तरी त्यांच्यावर फणा न उगरता शांत राहू लागला. हे पाहून एक दिवस मुलांनी त्याला गरगर फिरवून, यथेच्छ आपटून भिरकावून दिले. बिचारा साप अर्धमेला होऊन गेला. झाडपाला, झाडावरुन गळून पडणारी फळे यावर गुजराण करु लागला. काही काळाने साधू परत आला आणि पाहतो तर काय, सापाची पार दुर्दशा झाली आहे. ''काय झालं ?'' म्हणून विचारल्यावर त्याला सारी हकीगत कळली. त्या साधूने सापाला म्हटले, ''तू कोणाला त्रास देऊ नको असं मी तुला सांगितलं होतं. ! पण तुला कोणी विनाकारण त्रास दिला तरी तू अगदी फुत्कारही करु नको असं नव्हतं सांगितलं. मी चावायला मना केलं होतं, फुत्कारायला नव्हे''. आपण जरी सात्विक वृत्तीने वागायचे ठरवले तरी तामस वृत्तीच्या लोकांकडून आपल्याला त्रास होऊ शकतो. त्यासाठी सावधगिरी बाळगणे आवश्यक आहे. हाच संदेश ही कथा आपल्याला देते.

जीवनात कसे रहावे, जीवनाचे ध्येय काय असावे, ध्येयाप्रत जाताना कोणत्या अडचणी येऊ शकतील, ह्या अडचणींवर मात कशी करावी अशा असंख्य प्रश्नांची उत्तरे आपल्याला श्रीरामकृष्णांनी सांगितलेल्या बोधकथांतून मिळतात. 'श्रीरामकृष्ण वचनामृत' या ग्रंथामधे अशा अनेक बोधकथा आपण पाहतो. ह्या बोधकथा हे श्रीरामकृष्णांच्या उपदेशाचे मर्म आहेत. अतिशय साधे, सोपे शब्द, व्यवहारात रोज घडणाऱ्या घटना, सर्वसामान्यांना समजेल अशी भाषा असेच या बोधकथांचे स्वरुप आहे. परंतु या कथा आपल्या मनाला अतिशय भावतात, हृदयाला स्पर्श करतात, एखादा गहन सिद्धांत अतिशय सोप्या पद्धतीने आपल्यासमोर साकार करतात. असे का ? तर यामागे श्रीरामकृष्णांची अनुभवसिद्धता आहे. मनाच्या शुद्धतेतून, मन आणि मुख एक ठेवून आलेल्या प्रत्यक्ष अनुभवातून आलेले हे शब्द आहेत. विद्वज्जडतेचा स्पर्शही ह्या शब्दांना नाही. जगन्मातेचे बालक अशा अतिशय निरागस रुपातून श्रीरामकृष्ण आपल्याला जीवनाची दिशा दाखवतात.

लहानपणी ऐकलेली एक गोष्ट येथे सांगाविशी वाटते. एका स्त्रीला एका समारंभाला जायचे असते. तिच्याकडे चांगली वस्त्रे असतात पण आभूषणे नसतात म्हणून ती तिच्या मैत्रिणीकडून एक मोत्याचा हार मागून घेते. तो हार घालून, उंची वस्त्रे नेसून ती समारंभाला जाते. घरी येत असताना तो हार कुठेतरी हरवतो. आता मैत्रिणीला काय सांगणार ? मैत्रिणीला न भेटता अनेक दिवस कष्ट करुन ती स्त्री द्रव्य जमा करते. आणि खऱ्या मोताचा हार विकत आणते. तो हार ती मैत्रिणीला देऊन खरी गोष्ट सांगते आणि हार उशिरा परत केल्याबद्दल माफी मागते, हे ऐकताच ती मैत्रिण हसू लागते आणि म्हणते, ''अगं, तो हार तर नकली मोत्यांचा होता.''

नकली हाराला अस्सल समजण्याची जी चूक त्या स्त्रीच्या हातून घडली ती आपल्याकडून न घडो. जगत्‌रुपी नकली हाराच्या मागे न लागता ईश्वरप्राप्तीचा अस्सल हार प्राप्त करण्याची दिशा श्रीरामकृष्णांच्या कृपेने सर्वांना लाभो हीच त्यांच्या चरणी प्रार्थना !

संदर्भ ग्रंथ – श्रीरामकृष्णवचनामृत भाग १ व २

**सौ. अंजली धोपावकर**

४ए-२-१०, न्यू अजंठा ॲव्हेन्यू, पौड रोड,
पुणे – ४११ ०२९, फोन : ०२०-२५४३२३९१

**'श्रीरामकृष्ण म्हणतात' पुस्तकातून साभार**

**ईश्वर आणि जीव यांचा संबंध जणू लोहचुंबक आणि लोखंड यांच्यासारखा आहे. पण मग ईश्वर जीवाला ओढून का घेत नाही? त्याचे कारण, ज्याप्रमाणे लोखंड जर चिखलाने अत्यंत माखलेले असेल तर लोहचुंबकाच्या आकर्षणानेही हलत नाही, त्याप्रमाणे जीव मायापंकात अत्याधिक लिप्त असल्यास त्यात ईश्वराचे आकर्षण जाणवत नाही. परंतु पाण्याने चिखल धुवून काढला म्हणजे मग ते लोखंड हलू लागते. तसेच निरंतर प्रार्थनेच्या प्रेमाश्रूने जेव्हा जीवाच्या ठिकाणचा भवबंधनकारक मायापंक धुतला जातो तेव्हा तो एकदम परमेश्वराकडे ओढला जातो.**

# धर्म आणि धर्मजीवन



**स्वामी ब्रह्मस्थानंदजी महाराज**
सध्या रामकृष्ण मठ, नागपूर शाखा केंद्रांचे अध्यक्ष आहेत.

**भगवान श्रीकृष्णांनी भगवद्गीतेत म्हटले आहे –**
**अहं सर्वस्य प्रभवो मत्तः सर्वं प्रवर्तते ।**
**इति मत्वा भजन्ते मां बुधा भावसमन्विताः ।।**
**तेषां सततयुक्तांना भजतां प्रीतिपूर्वकम् ।**
**ददामि बुद्धियोगं तं येन मामुपयान्ति ते।।**
– भगवद्गीता १०/८ व १०

अर्थात, मी सर्वांची उत्पत्ती आहे आणि माझ्यापासून सर्व जगत निर्माण होते असे समजून भक्तिभावाने युक्त असलेले ज्ञानी लोक माझे भजन करतात. माझ्यामध्ये सतत युक्त असणाऱ्या व प्रेमपूर्वक मला भजणाऱ्या माझ्या ज्ञानी भक्तांना मी तो बुद्धियोग देतो की ज्याच्याद्वारे ते मला प्राप्त करतात.

धर्म हा केवळ श्रद्धेचा विषय नसून आचरणाचा विषय आहे. विष्णुसहस्रनामात स्पष्टच म्हटले आहे – आचारः प्रथमोधर्मोधर्मस्य प्रभुरच्युतः । सर्व मानवासाठी शुद्ध आचार, सदाचार हाच प्रथम धर्म आहे आणि धर्माचा प्रभू आहे शाश्वत, अव्यय, अखंड सच्चिदानंद परमात्मा.

धर्मभूमी भारतात सर्व आस्तिकवादी धर्म ईश्वराचे, परमात्म्याचे अस्तित्व स्वीकारतात. असा हा सनातन वैदिक धर्म अतिप्राचीन काळापासून मानवमात्रांच्या ऐहिक व पारलौकिक, अभ्युदय व निःश्रेयस, नैतिक व आध्यात्मिक विकासाचे साधन म्हणून मान्यता पावला आहे. पण हा आध्यात्मिक विकास साधण्यासाठी सिद्ध गुरुच्या मार्गदर्शनाखाली साधना आणि तपस्या करण्याची नितांत गरज आहे. धर्माची साधना ही अंतर्जीवनाची साधना आहे. मुख्यतः ही साधना मनुष्याच्या नैतिक शुद्धीसाठी आणि बहिर्मुखी मनाला अंतर्मुख करण्यासाठी आहे. तरीही साधारण मानवांना मनःसंयम आणि इंद्रियदमनाचे कठोर नियम पाळणे शक्य नसते. म्हणून वेदोक्त सनातन धर्म हा दोन प्रकारचा आहे असे ऋषींनी, आचार्यांनी व संतांनी सांगितले आहे. एक आहे प्रवृत्तिरुप, अभ्युदय मार्गाचा धर्म व दुसरा आहे निवृत्तिरुप, निःश्रेयस मार्गाचा धर्म. ज्याला जो मार्ग पेलवेल, आवडेल त्या मार्गाचे अवलंबन करावे, असा ऋषीचा निर्देश आहे. वेदोक्त सनातन धर्माच्या ह्या दोन शाखा आहेत.

आपल्या धर्माचे चार चरण सांगितले आहेत. 'चतुष्पादहि धर्मस्य ज्ञानं ध्यानं शमो दमः।' अर्थात आत्मज्ञान, अध्यात्मचिंतन, मनोविजय आणि इंद्रियनिग्रह हे धर्माचे चार चरण आहेत. आत्मज्ञानाच्या लाभासाठी मनःसंयम व इंद्रियदमन असे तपाचरण करुन अध्यात्मचिंतन–मननाद्वारे आत्मज्ञान, ईश्वरसाक्षात्कार प्राप्त करणे धर्माचे प्रयोजन आहे. परंतु सर्वसाधारण माणसांसाठी आत्यंतिक तपाचरण आणि अध्यात्मतत्त्वांचे चिंतन–मनन करणे कठीण आहे. म्हणून स्मृति–पुराणांमध्ये संध्यावंदन पूजा, स्तोत्रपाठादि नित्य कर्म, सण–उत्सवादिकांचे आयोजन, तीर्थभ्रमण, अनुष्ठान, व्रत–वैकल्याचे विधान सांगितलेले आहे. या सर्व उपक्रमांचा उद्देश मानवाचे जीवन शुद्ध होऊन ईश्वरकेंद्रित व्हावे, असा आहे.

शास्त्रात म्हटले आहे, 'धर्मो विश्वस्य जगतः प्रतिष्ठा' (तैत्तिरीय आरण्यक १०/६३) आणि महाभारतात म्हटले आहे –
**धारणाद्धर्ममित्याहु धर्मेण विधृताः प्रजाः ।**
**यः स्याद्धारणसंयुक्तः स धर्म इति निश्चयः।।** – शांतिपर्व १०९/११

याचा अर्थ असा की धर्मच समस्त विश्वाची व जगाची प्रतिष्ठा आहे. धर्माचरणाने जगताला स्थिरता लाभते आणि धर्म प्रजेला, सर्व प्राण्यांना धारण करतो म्हणून त्याला धर्म म्हटले आहे. जो सर्व चराचराला धारण करण्याची योग्यता ठेवतो तो धर्म होय.

भारतात धर्म–परंपरा अक्षुण्णपणे टिकवून ठेवण्यासाठी इतिहासपूर्व काळापासून अवतार–महापुरुष, संत–महात्मे वारंवार अवतरले आहेत आणि हा सनातन धर्मयज्ञ सतत प्रज्वलित ठेवला आहे. भगवान श्रीरामकृष्णांविषयी स्वामी विवेकानंदांनी **'हिंदुधर्म आणि श्रीरामकृष्ण'** या लेखात लिहिले आहे, ''आर्य जातीचा खरा धर्म काय आहे हे प्रत्यक्ष दाखवून देण्यासाठी आणि आपसात सदा झगडणाऱ्या, वरवर पाहता एकमेकांपासून अजिबात वेगळ्या भासणाऱ्या व परस्पर विरोधी आचार पाळणाऱ्या अशा पंथोपपंथांनी भरलेल्या... युगानुयुगांच्या इतिहासाच्या ओघात साऱ्या देशभर इतस्ततः विखुरलेल्या हिंदुधर्माच्या ह्या नाना तुकड्यांमधे व शाखाप्रशाखांमधे खरोखर एकता कुठे आहे हे प्रत्यक्ष दाखवून देण्यासाठी अवतीर्ण झाले होते – भगवान

श्रीरामकृष्ण. काळाच्या ओघात नष्ट झालेले ह्या चिरंतन धर्माचे सर्वकालीन व सार्वजनीन स्वरुप स्वतःच्या जीवनात प्रकट करुन, त्या चिरंतन धर्माचे जिवंत उदाहरण म्हणून स्वतःचे जीवन जगत्-कल्याणार्थ लोकांपुढे ठेवणे हेच ह्या अवताराचे प्रधान प्रयोजन होय.'' म्हणूनच श्रीरामकृष्णांच्या उपदेशांना असामान्य महत्त्व प्राप्त झाले आहे. त्यांना 'वचनामृत' वा 'वचनवेद' म्हटले आहे.

श्रीरामकृष्णदेव म्हणतात : ''ऋषींचा धर्म हा सनातन आहे, अनंतकालापासून आहे आणि अनंतकाल राहील. या सनातन धर्मात निराकार, साकार, सर्व प्रकारच्या पूजा आहेत; ज्ञानमार्ग, भक्तिमार्ग वगैरे सर्वच मार्ग आहेत. बाकीचे आजकाल उत्पन्न झालेले पंथ, संप्रदाय काही दिवस राहतील आणि मग नाहीसे होतील.''[१] पुनः ते एका ठिकाणी म्हणतात – ''हिंदुधर्मच सनातन धर्म. सांप्रत जे सारे पंथोपपंथ बघता आहात, ते सारे ईश्वराच्याच इच्छेने झालेत नि ईश्वराच्याच इच्छेने लोपतील. ते कायम टिकणार नाहीत. म्हणूनच मी म्हणत असतो – आजकालचे जे सारे भक्त आहेत, त्यांच्याही चरणी नमस्कार असो. हिंदुधर्म नेहमीचा आहे आणि नेहमी राहील.''[२] सध्या जगातील सर्वच देशातील लोकांमध्ये अतींद्रिय सत्याविषयी जिज्ञासा वाढत आहे; विचारवंतांमध्ये आनुष्ठानिक धर्म अव्हेरले जात असल्याचे दिसत असले तरी ते धार्मिक आदर्शांचा वैचारिक स्तरावर समन्वय घडविण्याची धडपड करताना दिसतात. परंतु आध्यात्मिक आधाराखेरीज केवळ वैचारिक स्तरावर धर्म समन्वय होऊ शकत नाही.

म्हणूनच आधुनिक काळात भगवान श्रीरामकृष्ण परमहंसांनी विभिन्न धर्मांच्या व संप्रदायांच्या साधना करुन समाधिलब्ध अनुभवांमधून जी गंभीर तत्त्वे सांगितली आहेत ती मननीय व अनुकरणीय अशीच आहेत. ते म्हणतात – ''वेदादी अनेक शास्त्रे आहेत, परंतु साधना केल्याखेरीज, तपस्या केल्याखेरीज ईश्वर मिळू शकत नाही. 'षट्दर्शने, वेद, तंत्र यांमध्ये ईश्वर सापडू शकत नाही.''

''मात्र शास्त्रात जे आहे ते सारे जाणून घेऊन त्यानुसार कृती करावी लागेल. एकाला एक पत्र आले होते, ते तो हरवून बसला. कुठे ठेवले ते काही आठवेना. मग दिवा घेऊन त्याने ते शोधायला सुरवात केली. दोघातिघांनी याप्रमाणे शोधाशोधी केल्यानंतर ते पत्र एकदाचे सापडले. त्यात लिहिले होते की पाच शेर संदेश (मिठाई) आणि एक धोतर पाठवा. तेवढे वाचून त्या इसमाने ते पत्र मग फेकून दिले. त्या पत्राची मग आणखी काय जरुर होती? मग पाच शेर संदेश (मिठाई) आणि एक धोतर विकत आणून ते पाठवून देणे एवढेच त्याने करावयाचे होते.''

यापुढे ते म्हणतात : ''वाचण्यापेक्षा ऐकणे चांगले, आणि ऐकण्यापेक्षा पाहणे चांगले, गुरुच्या किंवा साधूच्या मुखाने ऐकल्यास शास्त्र अधिक चांगले कळते, धारणा अधिक होते. तसे केल्याने शास्त्राच्या अनावश्यक भागाचा विचार करावा लागत नाही.''[३]

**धर्म-जीवन**

धार्मिक तत्त्वांचे श्रवण, मनन व गुरुचे मार्गदर्शन धर्मजीवन आचरण्यासाठी आवश्यक आहे. प्रथमतः आपला बोध कसा व कुठे आहे हे जाणून घेतले पाहिजे. तेव्हाच तेथून पुढे जाता येईल. कुमारसंभव नाटकात महाकवी कालिदासांनी 'शरीरमाद्यं खलु धर्मसाधनम्' असे महत्त्वाचे विधान केले आहे. शरीर सुदृढ, निरोगी व स्वच्छ असेल तरच मानव त्याच्या साहाय्याने उच्चतर श्रेयस्कर जीवनासाठी प्रयत्न करु शकतो. पण शरीर, मन व बुद्धी यांना मर्यादा आहेत. स्वामी विवेकानंद म्हणतात – आपले शरीर स्वाधीन नाही, कारण ते बाह्य परिस्थितींवर अवलंबून असते. आपले मनही स्वाधीन नाही, कारण ज्या विचारांनी मन घडविले आहे ते विचार 'कार्य' असतात – त्यांचे दुसरे काही 'कारण असते. आत्मा हाच स्वाधीन आहे.''[४]

भगवंताची त्रिगुणात्मिका मूलप्रकृती आहे आणि सत्त्व, रज व तम हे तीन गुण सर्वांच्याच मनात शिरलेले आहेत. या त्रिगुणात्मक मायेनेच जणू आत्मा झाकाळला आहे. या त्रिगुणांच्या दोऱ्यांनी जगन्माता आकाशात जीवरुपी पतंग उडवीत असते आणि एखादा पतंग जर कटला तर ती आनंदाने टाळ्या वाजवते, अशा अर्थाचे एक गाणे श्रीरामकृष्ण म्हणत असत. भगवान श्रीकृष्ण भगवद्गीतेत म्हणतात –

**सत्त्वं सुखे संजयति रजः कर्मणि भारत ।**
**ज्ञानमावृत्य तु तमः प्रमादे संजयत्युत ।।**[५]

हे अर्जुना, सत्त्वगुण हा सुखात आसक्त करतो, रजोगुण हा कर्मामध्ये आसक्त करतो. आणि तमोगुण तर ज्ञानाला आच्छादित करुन प्रमादात नियुक्त करतो. धर्माचा विचार करताना सर्व सृष्टी, समस्त विश्व त्रिगुणात्मिका प्रकृतीने व्यापलेले आहे आणि त्यापलीकडे ब्रह्म परमात्मा, आत्मा, चैतन्य आहे. असे चिंतन केवळ भारतातच उदयास आले आहे. याखेरीज धर्माच्या क्षेत्रात माणसाला दैनंदिन अनुभवास येणाऱ्या जागृत, स्वप्न व सुषुप्ती या अवस्थांचा सुद्धा आपल्या धर्माचार्यांनी विचार केला आहे. श्रीरामकृष्ण यांचे सुंदर स्पटीकरण करतात. ''जाग्रत, स्वप्न आणि सुषुप्ती – जीवाच्या ह्या तीन अवस्था आहेत. जे ज्ञानमार्गाने जातात ते ह्या तिन्ही अवस्था मानीत नाहीत. ते म्हणतात की, ब्रह्म हे जाग्रत-स्वप्न-सुषुप्ती ह्या तिन्ही अवस्थांच्या पलीकडे आहे, स्थूल-सूक्ष्म-कारण या तीन देहांच्या पलीकडे आहे, सत्त्व-रज-तम या तीन गुणांच्या पलीकडे आहे. हे समस्तच माया आहे, आरशातल्या प्रतिबिंबासारखे आहे. प्रतिबिंब ही काही वस्तू नव्हे. ब्रह्मच वस्तू होय, बाकी सारे अवस्तू होय.

''ब्रह्मज्ञानी आणखी असे म्हणतात की देहात्मबुद्धी असली की दोन (द्वैत) दिसणारच. त्या अवस्थेत प्रतिबिंबही खरे वाटत असते. हा देहात्मबोध निघून गेला की 'सोऽहं – मी ते ब्रह्म' ही अनुभूती लाभते.

''आणखी एक मार्ग आहे – तो म्हणजे भक्तिमार्ग. भक्त जर व्याकुळ होऊन ब्रह्मज्ञानासाठी रडेल तर त्याला तेही मिळेल. असे हे दोन मार्ग आहेत – एक ज्ञानयोग आणि दुसरा भक्तीयोग.

''दोन्ही मार्गांनी ब्रह्मज्ञान होऊ शकते. कोणी कोणी ब्रह्मज्ञानानंतरही भक्तीचा आसरा घेऊन राहतात – लोकांना उपदेश देण्यासाठी. उदाहरणार्थ अवतार वगैरे.

''मी'' तर सहजासहजी जात नाही, म्हणून भक्त हा जाग्रत, स्वप्न

प्रभृती अवस्था उडवून देत नाही. भक्त सर्वच अवस्था मानतो, सत्त्व-रज-तम हे तिन्ही गुण स्वीकारतो. भक्ताला दिसते की ईश्वरच चोवीस तत्त्वे झालेला आहे, जीव-जगत झालेला आहे. परत त्याला हेही दिसते की ईश्वर साकार चिन्मयरुपाने दर्शन देतो.

''भक्त विद्यामायेचा आश्रय घेऊन राहतो. तो साधुसंग, तीर्थयात्रा, ज्ञान, भक्ती, वैराग्य वगैरे साऱ्यांचा आश्रय घेऊन राहतो. तो म्हणतो की, जर 'मी' सहजासहजी जात नाही तर राहो साला 'दास मी' होऊन, 'भक्त मी' होऊन.''[६]

कर्तृत्व आणि भोक्तृत्वाचा अभिमानच माणसाला बंधनकारक असतो. धर्मांबद्दल हे सारे वाचून, ऐकून आणि जाणून आपल्या मनात प्रश्न येतो की, धर्माचरणाने संसारातील दुःख कमी करता येते काय किंवा संसारातील दुःख नाहीसे करता येते काय? आपल्या धर्मशास्त्रांमध्ये धर्माचे प्रयोजन आंत्यतिक दुःख निवृत्ती व परमसुख प्राप्ती असे सांगितले आहे.

श्रीरामकृष्ण म्हणतात, ''या 'मी' मुळेच तर जीवाच्या कपाळी साऱ्या दुनियेचं दुःख अन् यातना असतात. ...ईश्वरावर विश्वास नाही, म्हणून तर एवढा कर्मभोग...'[७] पण त्याची कृपा झाल्यास एका क्षणात पाश गळून पडतात, हे कशासारखं सांगू? जसं, हजार वर्षांची एक अंधारकोठडी आहे. तिथं दिवा घेऊन गेल्यास क्षणार्धात अंधार पळून जातो; अगदी एकदम, थोडा थोडा नव्हे.[८]

''पण भगवंताच्या दर्शनाची मनापासून स्पृहा असल्यास, नास्तिक भावानं झपाटलं तरी भक्त ईश्वरचिंतन सोडत नाही. ज्याचे बापजादे एकामागून एक पिढीजात शेती करत आले आहेत तो दुष्काळाच्या दिवसात पीक हाती लागलं नाही म्हणून काही नांगर सोडून पळत नसतो. त्याची शेती आपली चालूच असते.[९]

श्रीरामकृष्ण मायेचे दोन प्रकार सांगतात - एक आहे विद्यामाया आणि दुसरी अविद्या माया. अविद्यामाया माणसाला संसार बंधनात जखडते, याउलट विद्यामाया माणसाला संसारबंधनातून सोडविते. विद्यामायेने माणूस सत्त्वगुणप्रधान होतो. त्याच्यात विवेक जागतो. सार काय, असार काय, नित्य काय, अनित्य काय याची जाणीव त्याच्यामध्ये उपजते; आणि स्वतःच्या स्वरुपाची ओढ निर्माण होते. श्रीरामकृष्ण परमहंस विश्वनाथ उपाध्यायांना (कप्तानांना) म्हणाले, ''स्वतःवर चिदानंदाचा आरोप करा, तुम्हालाही तो आनंद प्राप्त होईल. चिदानंद तर मूळचाच आहे. केवळ आवरण आणि विक्षेप शक्तींनी झाकला गेला आहे. विषयासक्ती जसजशी कमी होत जाईल, ईश्वरावरची रुची तसतशी वाढत जाईल''[१०] भगवद्गीतेत हेच सांगितले आहे.

**सर्वद्वारेषु देहऽस्मिन्प्रकाश उपजायते ।**
**ज्ञानं यदा तदा विद्याद्विवृद्धं सत्त्वमित्युत ।।**

अर्थात, ''ज्यावेळी या देहात सर्व इंद्रियद्वारात ज्ञानरुप प्रकाश उत्पन्न होतो, त्यावेळी सत्त्वगुण वृद्धी पावला असे जाणावे.''[११]

तेव्हा जन्मोजन्मीच्या सुकृताने माणसात सत्त्वगुण वाढतो व रजोगुण व तमोगुण कमी होतात त्याला अतींद्रिय ईश्वरी शक्तीचा महिमा जाणवू लागतो. योगशिखोपनिषदात आहे - ''**जन्मान्तर - सहस्त्रेषु यदा क्षीणास्तु किल्बिषाः । तदा पश्यन्ति योगेन संसारोच्छेदनं महत् ।।** (यो. १/७८-७९) जेव्हा सहस्त्रावधी जन्मांच्या तपस्येने अंतःकरणातील पाप क्षीण होऊन जाते तेव्हाच साधकाला योगाच्याद्वारे संसाराचे उच्छेद करणारे ज्ञानरुप महान धर्मसाधन दिसू लागते.'' साधक धर्मात सांगितलेल्या साधना करुन ईश्वराचा लाभ करु घेऊ शकतो. पण त्यासाठी ईश्वरावर अनुराग व जगाविषयी विराग असावयास हवा. ह्यालाच श्रीरामकृष्णांनी 'कामिनी-कांचना'चा त्याग करणे म्हटले आहे. काम-कांचन म्हणजे वासना आणि लोभ माणसाला संसारात आबद्ध करतात. सर्वच शास्त्रात आणि सर्व सिद्ध महात्म्यांनी हेच सांगितले आहे. श्रीरामकृष्णांनी आपल्या जीवनात काम-कांचनाचा त्याग सर्वतोभावे करुन धर्म आचरुन दाखविला.

**कलियुगात भक्तियोग श्रेयस्कर**

काही लोक अती कर्मशील असतात तर काही लोक चिंतनशील असतात. जे कर्मशील असतात त्यांच्यासाठी कर्मयोगाचे विधान आहे; आणि जे चिंतनशील असतात, त्यांच्यासाठी ज्ञानयोग श्रेयस्कर आहे. आपल्यापैकी बहुतेक लोक भावनाप्रधान असतात, आणि ही भावना परस्पर प्रेमभावाने लोक व्यक्त करतात. आपल्या आप्त-स्वकीयांवर, आपल्या वंशपरंपरेवर, आपल्या कुल व जाती-वर्णावर, आपल्या संपत्ती-मालमत्तेवर माणूस प्रेम करतो. वास्तविक तो त्यावर आसक्त असतो. परंतु हे संबंध दीर्घकाळ टिकत नाहीत. म्हणून श्रीरामकृष्णांनी या युगासाठी नारदीय भक्ती उत्तम होय, असे सांगितले आहे. ते म्हणतात - ''कलियुगात उपाय भक्तियोग, भगवंताचं नामगुणगान नि प्रार्थना.'' भक्तीयोगच युगधर्म[१२].. कलियुगासाठी नारदीय भक्तीच श्रेयस्कर. शास्त्रात जी सारी कर्मेसांगितली आहेत, ती करायला लोकांना वेळ कुठे आहे? आजकाल तापावर काढे देऊन चालयचं नाही. त्या काढ्यांचा परिणाम होण्यापूर्वीच इकडे रोग्याचा ग्रंथ आटोपायचा. आजकाल ताबडतोब लागू पडणारं 'फिव्हर मिक्श्चरच हवं.[१३] कर्मयोग मोठा कठीण. निष्काम भावाने करु न शकल्यास तो बंधनास कारणीभूत होतो. त्यातच परत कलियुगात जीवाचा प्राण पूर्णपणे अन्नावर अवलंबून असतो. - कलियुगात कर्मयोग बरोबर नाही. भक्तियोगच ठीक.''[१४]

आपल्या भावनांना उत्तम दिशा भक्तियोगाने प्राप्त होते. कोणत्याही व्यक्तीवर किंवा वस्तूवर आपले जे प्रेम असते ते अंती नैराश्य व दुःखात पर्यवसित होते. पण तेच प्रेम जर ईश्वराकडे वळविले तर त्याने आपल्याला विशुद्ध आनंदाचा लाभ होतो. श्रीरामकृष्ण व्यवहारातील दृष्टांत देतात - ''साध्या काचेवर छायाचित्र उमटत नाही. पण तीच काच जर रसायन लावलेली असेल तर छायाचित्र उमटते. त्याचप्रमाणे भक्तिरसायन लाभलेल्या हृदयावर ईश्वरप्रेमाचा प्रभाव पडू शकतो.'' त्यांनी भक्तीचे दोन प्रकार सांगितले आहेत. पहिली आहे वैधी भक्ती, नियमित ठराविक वेळी पूजा, जप पुरश्चरण करुन ईश्वराचा भाव, विचार मनात जागृत ठेवणे, ईश्वराच्या मूर्तीमध्ये, विशिष्ट चित्रांमध्ये

प्रतिकांमध्ये ईश्वराच्या अस्तित्वाची भावना करणे वैधी भक्तीमध्ये मोडते. परंतु त्याच माध्यमातून ईश्वराशी शांत, दास्य, वात्सल्य, सख्य व मधुर भावसंबंध प्रस्थापित होऊन भाव शुद्ध व घनीभूत होतो तेव्हा भक्ती परिपक्व होते. तिला शुद्धाभक्ती, प्रेमाभक्ती वा पराभक्ती म्हणतात. श्रीरामकृष्ण म्हणतात - ''अनेक लोक नरकयातनेच्या भीतीने भगवंताची पूजा प्रार्थना करतात. प्रारंभिक अवस्थेत हे ठीक आहे. परंतु काही लोकांचा मोठा गैरसमज होतो. धर्मजीवन कशासाठी? तर पापापासून सुटका मिळविण्यासाठी असे त्यांना वाटते. धार्मिक जीवनाची ही प्रथमावस्था आहे, ही खालच्या श्रेणींची गोष्ट आहे, हे ते विसरतात. ईश्वराला आपले माता-पिता मानून त्यांच्यावर प्रेम करणे हा अशा प्रकारच्या भावानेपेक्षा श्रेष्ठ आदर्श आहे.''[१५]

धर्माचरणामध्ये आंतरिकता, व्याकुळता, सत्यवचन व साधुसंग आवश्यक आहे. प्रवचने, व्याख्याने देऊन धर्मप्रचार होत नाही असे श्रीरामकृष्ण म्हणत. धर्माचे आंतरिक भावाने आचरण करीत ईश्वर उपासना केल्याने ईश्वरसाक्षात्कार होतो. मग लोकांना बोलावून आणावे लागत नाही. ते आपणहूनच अशा महात्म्याकडे येतात. कमळ फुलले की भ्रमर आपोआपच त्याच्याकडे आकर्षित होतात. असे श्रीरामकृष्ण म्हणत असत. भगवंताच्या दर्शनासाठी त्याचे नामसंकीर्तन, नामस्मरण, नामजाप व प्रार्थना करायला ते आवर्जून सांगत असत. ते म्हणतात, ''कापसाचा पर्वतप्राय ढीग रचून ठेवला आहे. पण त्यावर एक जरी ठिणगी पडली तरी पुरेशी आहे. पाहता पाहता तो सगळा पर्वत जळून भस्म होतो. त्याचप्रमाणे भक्तियुक्त अंतःकरणाने भगवंताचे नामस्मरण केले असता, पापांचे पहाड सुद्धा नष्ट होऊन जातात.''[१६]

मूर्तिपूजेविषयी बोलताना ते ईश्वर-भावाचा अवलंब करण्याचा उपदेश देतात. ते म्हणतात, ''तिला मातीची, दगडाची मूर्ती का बरे म्हणतात? ती तर चिन्मयी प्रतिमा आहे...मूर्तीची पूजा करताना, ही चिन्मयी आहे असा भाव धारण करुन जर पूजा केली तर पूजकाला प्रत्यक्ष ईश्वरदर्शन घडते... जेव्हा एखाद्या भक्ताला ईश्वराचे दर्शन घडते तेव्हा तो त्या मूर्तीत आणि इतर सर्व पदार्थांत चैतन्याचा प्रकाश पाहू लागतो. त्याच्या दृष्टीला ती मूर्ती मातीची दिसत नाही, ती चैतन्यमयी झालेली दिसते.''[१७]

श्रीरामकृष्णांनी धर्मजीवनात अवतार-उपासनेला फार महत्त्व दिले आहे. आपल्या अंतरी ईश्वरी तत्त्व विद्यमान आहे याचे मनुष्याला अज्ञान-अविद्येमुळे विस्मरण होते. जेव्हा जेव्हा धर्माचे अधःपतन होते आणि अधर्म वाढतो तेव्हा तेव्हा भगवान स्वयं मनुष्यरुपाने अवतीर्ण होतो अशी ग्वाही भगवान श्रीकृष्णांनी भगवद्गीतेत दिली आहे. तसेच अवताराचे दिव्य जन्म व कर्म जो तत्त्वतः जाणतो तो देह सोडल्यानंतर पुनर्जन्माला प्राप्त होत नाही, तर तो (मलाच) ईश्वराला प्राप्त होतो असे सांगितले आहे, श्रीरामकृष्णांनी स्वतःला उद्देशून म्हटले आहे - ''इते म्हणजे स्वयंभू शिव, बसवलेला नव्हे.''[१८] आणखी एकदा ते मास्तरांना (महेंद्रनाथ गुप्तांना) म्हणाले - दिसलं की, ह्या खोलीतून (देहातून) सच्चिदानंद बाहेर आला, आणि बाहेर येऊन म्हणाला की, 'मी युगी युगी अवतार घेत असतो.' तेव्हा वाटलं की बहुधा काहीतरी भास होऊन मीच हे सारं म्हणत आहे. त्यानंतर चुपचाप बघत राहिलो. तेव्हा दिसलं की, (सच्चिदानंद) स्वयं म्हणत आहे - 'शक्तीची आराधना चैतन्यानेही केली होती.' श्रीरामकृष्ण बोलत आहेत, मास्तरांना संबोधून पुन्हा म्हणत आहेत - ''बघितलं की पूर्ण आविर्भाव. तथापि (या खेपेस) सत्त्वगुणाचे ऐश्वर्य.''[१९]

देवत्व प्राप्त करुन दैवी मायेच्या पलीकडे असलेल्या अवतारांना फार थोडे विशिष्ट भक्तच ओळखू शकतात. श्रीरामकृष्णांनी अवताराच्या महिम्याविषयी व अवतार - उपासनेविषयी सांगितले आहे. ते म्हणतात : ''भक्तांना अवतार हवा असतो - भक्तिसुखाच्या आस्वादनासाठी. भगवंताचे दर्शन घडल्यास हृदयातील सर्व अंधःकाराचा लोप होतो. पुराणात सांगितले आहे, रामचंद्र ज्यावेळी सभेत आले त्यावेळी सभेत जणू शेकडो सूर्य उगवल्यासारखं झालं ! तर मग सभासद जळून खाक झाले नाहीत कसे? याचं उत्तर असं की, त्यांची म्हणजे जड ज्योती नव्हे. सभेतील सर्व लोकांची हृदयकमलं तिच्यामुळे प्रस्फुटित झाली. सूर्याच्या उदयानं पद्मफुलं फुलत असतात, खाक होत नाहीत.'' बोलता बोलता त्यांचे मन एकाएकी बाह्यराज्य सोडून अंतर्मुख होऊन गेले. 'हृदयकमलं प्रस्फुटित झाली' हे वाक्य उच्चारण करतात न करतात तोच श्रीरामकृष्ण पूर्णतया समाधिमग्न होऊन गेले.[२०]

धर्मजीवनात आध्यात्मिक प्रगती करण्यासाठी अवतारांचे लीला-चिंतन व ध्यान खूप साहाय्यक होत असते. म्हणूनच रामायणात श्रीरामचंद्राचे लीलाचरित्र व श्रीमद्भागवतात श्रीकृष्णाचा अद्भुत महिमा गाइला आहे. 'श्रीरामकृष्णलीलाप्रसंग' नामक ग्रंथात श्रीरामकृष्णदेवांचे प्रत्यक्ष शिष्य स्वामी सारदानंद लिहितात - 'सत्याच्या लाभासाठी किंवा जीवनात त्याच्या पूर्ण अभिव्यक्तीसाठी अवतारांनी केलेल्या यत्नांना जे लोक खोट सोंग मानीत असतात, त्या वर्गातील भक्तांना आम्हाला सांगावयाचे आहे की, ठाकुरांना त्यांच्यासारखे मन प्रकट करताना आम्ही कधीही एकेले नाही. उलट, अनेक वेळा त्यांना म्हणताना ऐकले आहे की, ''मानवलीलेत सर्वच कार्ये साधारण मानवासारखी होतात; मानवशरीर स्वीकारल्यावर भगवंताला मानवाप्रमाणे सुखदुःख भोगावे लागते, आणि मानवाप्रमाणे उद्यम, यत्न व तपस्या यांद्वारा सर्वबाबतीत पूर्णत्व प्राप्त करुन घ्यावे लागते.'' जगाचा आध्यात्मिक इतिहासही हेच सांगतो.''[२१]

श्रीरामकृष्णांनी सकाम भक्तीतील धोके सांगितले आहेत. ईश्वर कल्पतरु आहेत. त्याला जे मनापासून मागाल ते तो देईल. पण तेच दुःख पर्यवसायी होत असते. म्हणून भगवंताला शुद्ध भक्ती मागितली पाहिजे असे ते म्हणतात. ते गाणं म्हणत - (भावार्थ) ''हृदयाच्या गाभाऱ्यात ज्ञानदीप लावून ब्रह्ममयीचं रुप बघ ना...''[२२] मानवांना भक्ती कशाने लाभते? यासाठी श्रीरामकृष्ण प्रथम साधुसंग करायला हवा असे सांगतात. कारण साधुसंग केल्याने ईश्वराविषयी श्रद्धा निर्माण होते आणि श्रद्धेनंतर निष्ठा निर्माण होते.

ही वैधी भक्ती वा गौणी भक्ती भक्ताच्या निष्ठा व व्याकुळतेमुळे

पराभक्तीमध्ये परिणत होत असते. तेव्हा भक्त आपली सर्व कर्मेभगवंताच्या श्रीचरणी अर्पण करुन केवळ त्याचेच गुणगाण, प्रार्थना व ध्यान करीत त्याच्या दर्शनासाठी आतुर होऊन जातो. ह्यालाच देवर्षी नारदांनी 'तदर्पिताऽखिलाचारता तद्विस्मरणे परम व्याकुलता इति' असे आपल्या भक्तिसूत्रात म्हटले आहे.

**धर्मजीवन आणि धर्मसमन्वय**

भगवद्गीतेत भगवान श्रीकृष्ण पुढील श्लोकात भक्तियोगाचे सार सांगतात –

**मय्येव मन आधत्स्व मयि बुद्धिं निवेशय ।**

**निवासिष्यसि मय्येव अत ऊर्ध्वं न संशय ।।**१२/८

अर्थात – 'अर्जुना, तू माझ्याच ठिकाणी आपले मन स्थापित कर, आणि माझ्याच ठिकाणी आपल्या बुद्धीला प्रविष्ट कर. म्हणजे मग तू माझ्याच ठिकाणी राहशील यात संशय नाही.'

अशी अनन्य वृत्तीच धर्मजीवनाचा केंद्रबिंदू आहे. श्रीरामकृष्ण भावतन्मय होऊन रामप्रसादाचे एक गाणे गात असत – (भावार्थ) 'मातेच्या रहस्याचे चिंतन करता करता मी थक्कच होऊन गेलो आहे. तिच्या नुसत्या नावानेच यम पराजित होतो. तिच्या पायाखाली महाकाल पडलेला आहे. ती कृष्णवर्ण का बरे असावी ? काळी रुपे अनेक आहेत, पण हिचे काळे रुप विलक्षणच आहे. तिला हृदयात धारण केल्यास हृत्पद्म प्रकाशित होऊन जाते. तिचे रुप काळे आहे, तिचे नाव काली (काली) आहे, ती काळापेक्षाही काली आहे! ज्याने तिचे रुप एकदा बघितले आहे तो कायमचाच त्यात मग्न होत असतो – अन्य कोणतेच रुप मग त्याला मोहू शकत नाही. आश्चर्यचकित होऊन 'प्रसाद' विचारतो की ही अशी विलक्षण स्त्री कुठे राहत असते ? – तिला पाहण्यापूर्वीच तिचे फक्त नाव ऐकूनच 'प्रसादा'चे मन तिच्या चरणी लीन होऊन गेले आहे.'

अनंत भावमय श्रीरामकृष्णांचा क्षुद्र अहं (मी पणा) लोप पावून ते अखिल ब्रह्मांडेश्वरी जगन्मातेशी एक झाले होते. म्हणूनच त्यांच्या विराट मनात उदित होणाऱ्या सर्व कल्पना अवघ्या विश्वात व जगातील सर्व धर्मांना समन्वित करतात. सर्वज्ञ, सर्वशक्तिमान, सत्ःचित्-आनंदस्वरुप ईश्वरालाच श्रीरामकृष्ण जगन्माता, कालीमाता म्हणत असत. त्यांच्या विराट, उदार शुद्ध मनात धर्माविषयीचा दृष्टिकोन अत्यंत उदार होता. म्हणून त्यांनी म्हटले आहे –

"माझाच धर्म काय तो बरोबर, बाकी साऱ्यांचा चुकीचा अशी समजूत अत्यंत वाईट होय. ईश्वर तर एक सोडून दोन नव्हे ना ? भिन्न भिन्न लोक त्यालाच विभिन्न नावांनी आळवितात. कुणी म्हणतो गॉड, कुणी म्हणतो अल्ला, कुणी म्हणतो कृष्ण, कुणी म्हणतो शिव, तर कुणी ब्रह्म. जसं तळ्यातलं पाणी. एका घाटावरचे लोक म्हणतात 'जल', दुसऱ्यावरचे म्हणतात 'वॉटर', मुसलमान म्हणतात 'पानी' – वस्तू एकच. मतं म्हणजे मार्ग. एकेक धर्म म्हणजे एकेक मार्ग, – ईश्वराकडे जाण्याचा रस्ता. जसा नद्या निरनिराळ्या दिशेने येऊन समुद्राला मिळून एकत्रित होतात, तसे.

"वेदात, पुराणात, तंत्रात – सर्व प्रतिपाद्य एकच. तोच एक सच्चिदानंद. वेदात सच्चिदानंद ब्रह्म, पुराणात सच्चिदानंद कृष्ण, राम इत्यादी, अन तंत्रात सच्चिदानंद शिव. सच्चिदानंद ब्रह्म, सच्चिदानंद कृष्ण, सच्चिदानंद शिव.[२३] सर्व एकच परमात्मा.

अशा तऱ्हेने श्रीरामकृष्ण परमहंसांनी धर्म-समन्वयाचा आदर्श आपल्या पुढे ठेवला आहे. भगवद्गीतेत भगवान श्रीकृष्णांनी 'अविभक्तं च भूतेषु विभक्तमिव च स्थितम्' – जे ज्ञेय अविभक्त म्हणजे अखंड असूनही प्राण्यांमध्ये विभक्त असल्यासारखे स्थित आहे, असे म्हटले आणि हाच भारतीय संस्कृतीचा उदार भाव आहे.

संदर्भ :


१. श्रीरामकृष्ण – वचनामृत विशेष आवृत्ती (संपूर्ण) पृ. ४९३, प्रकाशक – रामकृष्ण मठ, धंतोली, नागपूर

२. श्रीरामकृष्ण – वचनामृत विशेष आवृत्ती (संपूर्ण) पृ. ८९३

३. श्रीरामकृष्ण – वचनामृत विशेष आवृत्ती (संपूर्ण) पृ. ५९३

४. हिंदुधर्म, प्र. रामकृष्ण मठ, नागपूर, पृ. १०५

५. भगवद्गीता १४/९

६. श्रीरामकृष्ण-वचनामृत विशेष आवृत्ती (संपूर्ण) पृ. ९३९-९४०

७. श्रीरामकृष्ण – वचनामृत विशेष आवृत्ती (संपूर्ण) पृ. ३३६

८. श्रीरामकृष्ण – वचनामृत विशेष आवृत्ती (संपूर्ण) पृ. ८३२

९. श्रीरामकृष्ण – वचनामृत विशेष आवृत्ती (संपूर्ण) पृ. २४४

१०. श्रीरामकृष्ण – वचनामृत विशेष आवृत्ती (संपूर्ण) पृ. ३०२

११. भगवद्गीता १४/११

१२. श्रीरामकृष्ण – वचनामृत विशेष आवृत्ती (संपूर्ण) पृ. १०२

१३. श्रीरामकृष्ण – वचनामृत विशेष आवृत्ती (संपूर्ण) पृ. ५७८

१४. श्रीरामकृष्ण – वचनामृत विशेष आवृत्ती (संपूर्ण) पृ. ७६२

१५. अमृतवाणी – पृ. १७८ (प्र. रामकृष्ण मठ, नागपूर)

१६. तेच....." पृ. ८२

१७. अमृतवाणी – पृ. ७६

१८. श्रीरामकृष्ण – वचनामृत विशेष आवृत्ती (संपूर्ण) पृ. २९७

१९. श्रीरामकृष्ण – वचनामृत विशेष आवृत्ती (संपूर्ण) पृ. ९६७-६८

२०. श्रीरामकृष्ण – वचनामृत विशेष आवृत्ती (संपूर्ण) पृ. १७५

२१. श्रीरामकृष्ण-लीलाप्रसंग, प्रथम भाग (पाचवी आवृत्ती), पृ. ९१, प्र. रामकृष्ण मठ, नागपूर

२२. श्रीरामकृष्ण – वचनामृत, विशेष आवृत्ती (संपूर्ण) पृ. ६०७

२३. श्रीरामकृष्ण – वचनामृत विशेष आवृत्ती (संपूर्ण) पृ. २८४



**स्वामी ब्रह्मस्थानंद**

अध्यक्ष, रामकृष्ण मठ, धंतोली, नागपूर – ४४० ०१२

फोन : २४२३४२२, २४३२६९०



# गणित जीवनाचे

**स्वामी सुविज्ञेयानंद**
रामकृष्ण संघाचे ज्येष्ठ संन्यासी,
१८ वर्षेबेलूर येथे सेवा करुन सध्या रामकृष्ण मठ, पुणे येथे सेवारत आहेत.

श्रीमद् भागवतात येते की दुर्योधनाने अपमान केल्यावर विदुरांनी हस्तिनापुराचा त्याग केला आणि तीर्थयात्रा करीत करीत भारतभर भ्रमण केले. शेवटी ते हिमालयात पोहोचले. तिथे त्यांची उद्धवांशी भेट झाली. उद्धवांकडून त्यांना महाभारत युद्धाविषयी माहिती कळाली. कौरव आणि यादव वंशाचा विनाश तसेच श्रीकृष्णांच्या महाप्रयाणाची वार्ता ऐकून ते फार दुःखी झाले. नियतीचा हा खेळ त्यांची मती गुंग करुन गेला. ह्याच मनःस्थितीत त्यांची मैत्रेय ऋषींशी गाठ पडली. ऋषींशी बोलताना आपल्या मनातील भाव व्यक्त करताना ते म्हणाले –

**सुखाय कर्माणि करोति लोको न तैः सुखं वाऽन्यदुपारमं वा ।**
**विन्देत भूयस्तत एवं दुःखं यदत्र युक्तं भगवान् वदेन्नः ।।**
भा. ३.५.२

अर्थात् मुनिवर्य, या संसारात सर्व लोक सुख प्राप्त व्हावे म्हणून सतत कर्माचरण करीत असतात. पण त्या योगे त्यांना सुख तर प्राप्त होत नाहीच, पण त्यांच्या दुःखाचे निवारणही होत नाही. उलट दुःखाची वृद्धी होत जाते. तेव्हा अशा या दुःखमय संसारात मनुष्याने कोणत्या प्रकारचे आचरण ठेवावे ते कृपा करुन मला सांगा.

वरील भाव व्यक्त करणारे विदुर कोणी सामान्य व्यक्ती नव्हते तर त्या काळातील ते एक ज्ञानी, विचारवंत, प्रज्ञावंत तत्त्वाला धरुन चालणारे म्हणून सर्वांना वंदनीय असे श्रेष्ठ व्यक्ती होते. अशा व्यक्तीने विचारलेल्या ह्या प्रश्नाला काय बरे उत्तर दिले मैत्रेय ऋषींनी ? त्यांनी विदुरांना अधिकारी, प्रभावी (influential) लोकांशी संपर्क करायला सांगितले काय? समाजवाद, साम्यवाद वगैरेची चर्चा केली काय? किंवा राजकीय वा अर्थनैतिक मूल्यांचे काही सिद्धांत सांगितले काय? किंवा सामाजिक सुधारणा करण्याच्या दृष्टीने काही चळवळ घडवून आणण्याबद्दल सांगितले काय? मैत्रेय ऋषींनी ह्यापैकी काहीही सांगितले नाही तर त्यांनी भगवंताचा महिमा गायला सुरुवात केली आणि विदुरांना ईश्वराची आराधना करायला सांगितली म्हणजे मानवी जीवनातील समस्यांचे निरसन करण्यास आध्यात्मिक साधनच सांगितले.

सुखप्राप्तीची आशाच मनुष्याला कर्म करायला उद्यमशील करीत असते. जीवन म्हणजे एक सततचा सुखप्राप्तीसाठी चाललेला मानवाचा संघर्ष आहे. जीवन जगत असतानाच माणसाला जगाच्या परिवर्तनाचा अनुभव येत असतो. मानवी मनाला आपले अस्तित्व स्पष्ट व्हावे एवढ्याकरताच भगवंतांनी ह्या वैचित्र्यपूर्ण विश्वाची निर्मिती केली आहे. सृष्टीला स्पर्श करता करता कदाचित स्रष्ट्याला पाहण्याची आकांक्षा निर्माण होऊ शकेल – ह्याच उद्देशाने ही विराट रचना झाली आहे. सृष्टी पाहताच स्रष्ट्याची आठवण होते. क्षुद्र वस्तूंचा आधार घेऊनच मनुष्य महत्तमाजवळ येऊन ठेपतो. 'सान्ता'चा आश्रय घेऊनच 'भूमा'मध्ये पोहोचता येते. ह्या भूमा अवस्थेची, परम सुखाची प्राप्ती करुन घेणे हेच जीवनाच्या गणिताचे खरे उत्तर आहे.

श्रीरामकृष्ण म्हणत असत, ''या जगात मनुष्य जन्माला येतो तो दोन प्रकारच्या प्रवृत्ती घेऊन. एक विद्या आणि दुसरी अविद्या. मुक्तीमार्गाकडे घेऊन जाणाऱ्या प्रवृत्तीला 'विद्या' म्हणतात तर संसारबंधनात–इंद्रियोपभोगात अडकवणाऱ्या प्रवृत्तीला 'अविद्या' म्हणतात''. मनुष्य जेव्हा जन्माला येतो तेव्हा या दोन्ही प्रवृत्तींची स्थिती रिकाम्या तराजूप्रमाणे असते. दोन्ही पारडी समतोल असतात. परंतु लवकरच असे घडते की मनोरुपी तराजूच्या एका पारड्यात भोगसुखांचे आकर्षण येऊन बसते व दुसऱ्या पारड्यात ईश्वरविषयक आकर्षण टाकले जाते. सांसरिक आकर्षण अधिक असेल तर ते पारडे जड होते आणि माणूस ऐहिक भोगात गुरफटून जातो. पण जर मनाचा कल ईश्वराकडे असेल, तर विद्येचे पारडे वजनदार ठरते आणि मग मनुष्य परमेश्वराकडे अधिकाधिक ओढला जातो. या परमेश्वराला जाणणे, ईश्वरलाभ करुन घेणे, म्हणजेच परम सुखाची 'भूमा' अवस्थेची प्राप्ती करुन घेणे हेच जीवनाचे गणित आहे. श्रीरामकृष्ण म्हणत असत – 'मनुष्य जन्म दुर्लभ आहे. तो प्राप्त झाला असूनही, ईश्वरलाभासाठी जो प्रयत्न करीत नाही, त्याचे जन्माला येणे व्यर्थ आहे.''

श्रीमद् आदि शंकराचार्य विवेकचूडामणी मध्ये म्हणतात,

**''दुर्वारसंसारदवाग्नितप्तं दोधूयमानं दुरदृष्टवातैः ।**
**भीतं प्रपन्नं परिपाहि मृत्योः शरण्यमन्यद्यदहं न जाने ।। ३६**

संसाररुपी अरण्यातील भयंकर वणव्यामुळे पोळलेल्या माझे, पापकर्म फलांमुळे वाहणाऱ्या दुर्दैवरुप वाऱ्यांनी थरथर कापणाऱ्या माझे, मृत्यूपासून भयभीत झालेल्या माझे रक्षण करा, मी आपल्याला शरण जात आहे. कारण आपल्यावाचून अन्य कोणतेही शरणस्थान मी जाणत नाही.

मानवावर (साधक जीव) जी संकटे येतात ती या श्लोकाच्या पहिल्या ओळीत स्पष्ट केलेली आहेत; तर दुसऱ्या ओळीत त्याला आतून त्रस्त करणारी संकटे निर्देशित केलेली आहेत. बाह्यजगात वस्तुमात्रांशी येणाऱ्या संबंधामुळे सतत परिवर्तन होणाऱ्या परिस्थितीतील दुःखामुळे त्याला अतीव वेदना होत असतात; तर आवडी-निवडी, राग-द्वेष, आशा-निराशा या द्वंद्वांमुळे निर्माण होणारे अनंत प्रक्षोभ त्याला अंतर्यामी अनुभवावे लागतात. आत्मज्ञानाच्या दालनात प्रवेश करण्यापूर्वी प्रत्येक साधकाच्या वाट्याला अनित्यतेचे जे अनुभव येत असतात, त्याचा सुंदर गोषवारा प्रथमच्या दोन ओळीत दिलेला आहे.

व्यक्तीला मोक्षाची गरज तेव्हाच वाटू लागते की, जेव्हा ती व्यक्ती जीवनाच्या उणीवांची जाणीव करुन घेण्याइतकी आपली सूक्ष्म संवेदनाशीलता विकसित करते, - जेव्हा तिला त्यांचा अनुभव येऊ लागतो तेव्हा जीवनातील जीवघेण्या अनुभवांपासून, जीवन व्यापून राहणाऱ्या मृत्यूच्या भीतीपासून संरक्षण आणि आसरा शोधण्यासाठी त्यास गुरुंची गरज भासू लागते. वरील श्लोक म्हणजे, शिष्याने गुरुला उद्देशून अगदी मनापासून केलेली प्रार्थना आहे.

श्रीमहेंद्रनाथ गुप्त (मास्तर महाशय) नावाचे श्रीरामकृष्णांचे एक भक्त होते. संपूर्णपणे संसारात गुंतलेले महेंद्रनाथ, संसारतापांनी पोळल्यामुळे खूप निराश झालेले. मनात आत्महत्या करण्याचा संकल्प मूळ धरु लागलेला. ह्याचवेळी अकस्मातपणे त्यांचे श्रीरामकृष्णांकडे येणे झाले. श्रीरामकृष्णांची भेट झाल्यावर ह्रदयात त्यांच्याविषयीची वेगळेपणाची जाणीव झाली. तैलधारावत निरवच्छिन्नपणे ईश्वरचिंतनात मग्न श्रीरामकृष्णांना पाहून ते मुग्ध झाले. प्रत्येक मानवात (जीवात) त्या एकमेव परमात्माचे दर्शन श्रीरामकृष्ण करीत आहेत आणि आध्यात्मिक अनुभूती घेण्यास आग्रही असणाऱ्याला ते सहाय्य करायलाही उत्सुक आहेत असे महिंद्रांच्या लक्षात आले. आत्महत्या करण्याचा संकल्प करणारे त्यांचे मन त्यांच्याही नकळत जणू ऊर्ध्वमुखी होऊ लागले. त्यांच्या मनात विचार घोळू लागला - ''माझे लग्न झाले आहे, मला मुलं-बाळं आहेत, परिवाराचे पालनपोषण तर केलंच पाहिजे - माझे काय होणार?'' जीवनातील जटिल समस्यांचा सामना करता करता हताश झालेल्या महेंद्रनाथांना श्रीरामकृष्णांच्या सान्निध्यात आल्यावर लाभले पथप्रदर्शन, गाढ अंधकारात दिसला आशेचा किरण ! त्यांनी मनोमन ठरवले ह्या प्रेममय, ईश्वरमय, वैराग्यवान महापुरुषाचा संग सोडायचा नाही. ह्या महेंद्रनाथांनी श्रीरामकृष्णांची त्यांच्या शिष्यांबरोबर तसेच इतर भक्त व दर्शनार्थी मंडळींबरोबर जी संभाषणे झाली ती 'श्रीरामकृष्ण वचनामृत' या ग्रंथात श्री 'म' या टोपण नावाने प्रसिद्ध केली. वचनामृताच्या प्रारंभीच त्यांनी श्रीरामकृष्णांना चार प्रश्न विचारले आहेत. हे चार प्रश्न म्हणजेच जणू जीवनाचे गणित. मास्तर महाशयांनी विचारलेले हे प्रश्न आणि त्यांची श्रीरामकृष्णांनी दिलेली उत्तरे ही अशी :

मास्तर : (नम्रपणे) - महाराज, चित्त ईश्वराकडे कशाने लागेल ?

श्रीरामकृष्ण - सर्वदा नामस्मरण आणि निरंतर त्याचे गुणगाण केले पाहिजे शिवाय सत्संग भगवद्भक्तांच्या अथवा साधुपुरुषांच्या चरणांशी अधूनमधून जायला हवं. रात्रंदिवस संसारातच घुटमळत राहिल्यानं आणि सदासर्वदा वैषयिक भागनडीत गढून गेल्यानं मनं ईश्वराकडे लागत नसतं. म्हणून मधेमधे एकांतवास करुन त्याचं चिंतन करणं अत्यंत आवश्यक. सुरुवातीला तरी मधून मधून एकांतवास न केल्यास ईश्वराकडे मन स्थिर ठेवणं फारच अवघड.

''ध्यान करावं मनातं, कोनात (कोपऱ्यात) नि वनात आणि नेहमी सद्सत् - विचार करावा. एक ईश्वरच सत् म्हणजे नित्य व वस्तू आणि बाकी सर्व असत् म्हणजे अनित्य. वारंवार असा विचार करीत राहून अनित्य गोष्टी मनातून काढून टाकाव्यात.''

मास्तर : (नम्रपणे) - संसारात कशातऱ्हेने रहावं ?

श्रीरामकृष्ण - आपल कर्तव्य पार पाडत असावं, मात्र मन भगवंताच्या चरणी ठेवून बायको, पोरं, आई, बाप साऱ्यांना घेऊन चालावं, त्यांची सेवा करावी. खूप आपुलकीनं त्यांच्याशी वागावं, पण मनाशी पक्की खूणगाठ बांधून असावं की ते आपले कुणीच नाहीत.

''थोरामोठ्यांच्या घरच्या मोलकरीण, मालकाचा सारा कामधंदा उरकते, पण तिचे मन मात्र गुंतलं असतं खेड्यातील स्वतःच्या घरात. मालकाच्या पोराबाळांना अगदी पोटचं समजून वागवते, ''सोन्या माझा, माझा बाळ'' करुन त्यांना ओंजारते-गोंजारते. पण जाणून मात्र पक्कं असते की ती तिची कोणीच म्हणता कोणी देखील लागत नाही. !''

''भक्ष्याच्या शोधात कासवी भटकत असते पाण्यात, पण तिचं मन असतं किनाऱ्यावर - जिथे तिची अंडी असतात तिथे. संसारातील सारं कामकाज करावं, पण चित्त ठेवावं ईश्वराच्या पायाशी.''

''हातांना आधी तेल माखा आणि मगच फणस कापा. एरवी चीक हातांना चिटकून जाईन. ईश्वरप्रेमाचं तेल मिळवून मगच संसारिक कामांना हात धाला''. आणि हे बघा, हे निर्जनी मन लावून ईश्वराचं ध्यान केल्यानं मनात ज्ञान, वैराग्य, भक्ती उदय पावतात, पण संसारातच पुरुन ठेवल तर तेच मन नीच होऊन जातं. संसारात केवळ एकच चिंतन - कामिनी - कांचन.''

मास्तर : ईश्वराचं का खरोखरच दर्शन होऊ शकतं ?

श्रीरामकृष्ण : यात काय संशय ? जरुर जरुर होऊ शकतं. त्यासाठी मधून मधून एकांतवास, त्याच नामगुणगान, नित्यानित्य वस्तुविचार - ह्याच साऱ्या उपायांचं अवलंबन करायला हवं.

मास्तर : कोणत्या अवस्थेत त्याचं दर्शन घडत असतं ?

श्रीरामकृष्ण : खूप व्याकुळ होऊन रडल्यास त्याचं दर्शन होऊ शकतं. बायकापोरांकरता रडून लोक घागर घागर टिपं गाळू शकतात,

पैशांकरता आक्रोश करुन डोळे सुजवू शकतात, पण ईश्वराकरता कुणी रडला आहे? त्याला अगदी आळवण्यासारखं आळवा बघू.

इतके बोलून श्रीरामकृष्ण पुढील आशयाचे गाणे म्हणू लागले :-

''मना, अगदी अंतःकरणापासून त्या श्यामा मातेला आळव बघू, पाहा मग ती कशी राहू शकते दर्शन दिल्यावाचून; ती कधीच राहू शकणार नाही. मना, तिच्या दर्शनाची खरोखरच तळमळ लागली असेल तर जास्वंद नि बिल्वदल ओंजळीत घेऊन त्यांना भक्तिचंदन माखून आईच्या पादपद्मी दे.''

''व्याकुळता आली की अरुणोदय झाला म्हणून समजा. त्यानंतर लवकरच सूर्य उगवेल. व्याकुळता उत्पन्न होण्याचाच अवकाश, मग दर्शनाला मुळीसुद्धा उशीर नाही.''

''तीन प्रकारच्या ओढींची शक्ती एकत्र झाल्यास ईश्वर दर्शन देतो. - विषयी माणसाची विषयासंबंधी ओढ, आईची मुलासाठीची अन् सतीची पतीसाठीची. ह्या तीन ओढी कुणा एखाद्यात एकाच वेळी उद्भवतील तर त्या जोरावर त्या ईश्वराचे दर्शन करुन घेणं शक्य आहे.''

''एकूण काय की ईश्वरावर प्रेम करायला हवं. आई जशी मुलावर, सती जशी पतीवर, नि विषयी जसा विषयांवर प्रेम करीत असतो तस्सं प्रेम त्याच्यावर केलं पाहिजे. ह्या तिघांची प्रीती - या तीनजणांची ओढ एक करुन जितकं होईल, तितकं आकर्षण जर ईश्वराविषयी वाटू लागेल तर अवश्य अवश्य त्याची भेट होईल.''

श्रीरामकृष्णांना विचारलेले प्रश्न आणि त्यांची उत्तरे आपण सारांशाने पाहिली. जीवनाच्या गणिताचे स्वरुप आणि त्याचे उत्तर ह्याचा काहीसा बोध आपल्याला त्यातून होतो. श्रीयुत महेंद्रनाथ गुप्त श्रीरामकृष्णांकडे येत राहिले. त्याकाळी प्रसिद्ध असणाऱ्या केशवचंद्र सेन यांची प्रशंसा ऐकून त्यांच्या व्याख्यानांनाही ते जात असत. पण श्रीरामकृष्णांच्या उपदेशाच्या अमृतवाणीसमोर ते सर्व अळणी वाटत असे. केशवचंद्रांसारखे आदर्श गृहस्थ झाले पाहिजे असे त्यांना एकीकडे वाटत असे तर दुसरीकडे श्रीरामकृष्णांचे प्रबळ आकर्षण त्यांना त्यांच्याकडे खेचू पहात असे. त्यांची ही द्विधावस्था पाहून श्रीरामकृष्णांनी त्यांना आता अन्यत्र जाण्यास मनाई केली आणि फक्त त्यांच्याकडेच यावे असा आदेश केला. श्रीरामकृष्णांचा आदेश महेंद्रनाथांनी शिरोधार्य मानला. त्यांच्या मनाचा ठाम निश्चय झाला की श्रीरामकृष्णांच्या कृपेनेच त्यांचे जीवन धन्य होईल. जिज्ञासू महेंद्रनाथांचा आध्यात्मिक प्रवास सुरु झाला श्रीरामकृष्णांच्या मार्गदर्शनाखाली. 'ज्ञान कशाला म्हणतात नि अज्ञान कशाला म्हणतात' हे महेंद्रांना ठाऊक नव्हते. त्यांची आपली अशी समजूत होती की, लिहिणे वाचणे झाले व पुस्तके वाचता येऊ लागली की झाला मनुष्य ज्ञानी. हा त्यांचा भ्रम अर्थातच पुढे दूर झाला. नंतर त्यांना उमजले की, 'ईश्वराला जाणणे म्हणजेच ज्ञान आणि त्याला न जाणणे हेच अज्ञान.

श्रीरामकृष्णांच्या अनुभूतीसंपन्न अमृतवाणीच्या प्रभावाने महेंद्रनाथांच्या हृदयातील अवास्तव बुद्धीवादाचा खडक वितळला आणि अविश्वासाचे ढगही दूर झाले. महेंद्रनाथ (मास्तर) सुरुवातीला हे ठरवू शकेनात की या विश्वाचा जो नियंता, स्रष्टा आहे तो जगत् कारण साकार आहे की निराकार? श्रीरामकृष्णांशी झालेल्या दुसऱ्या भेटीत त्यांनी 'निराकारावरच माझा विश्वास आहे तेच मला आवडते' असे सांगितले. खरे तर 'ईश्वर साकार की निराकार? परस्पर विरुद्ध गोष्टी एकाच वेळी खऱ्या असणं कधीतरी शक्य आहे का?' असा विचार त्यांच्या मनात होता. श्रीरामकृष्णांकडे येऊ लागल्यापासून साधारण आठ महिन्यांनी ते म्हणाले, ''माझं मन साकार मानीत नाही आणि निराकारावरही एकाग्र होत नाही.'' असे मोठ्या दुःखाने सांगू लागले. तेव्हा त्यांना आश्वस्त करीत श्रीरामकृष्ण सांगू लागले, 'अरे, निराकारावर मन एकदम कस बरं स्थिर होणार? म्हणूनच प्राथमिक अवस्थेत साकार मानलं पाहिजे.

सव्वीस महिन्यानंतर महेंद्रनाथांना मनोमनी जाणवले की श्रीरामकृष्ण साकार देवी देवता मानतात. त्यांना ईश्वर दर्शन झाले आहे. ते निर्विकल्प समाधीत सहज सिद्ध आहेत. त्यांच्यासमोर मी किती सामान्य, माझी तशी साधनाही नाही आणि अनुभूतीही नाही. अध्यात्मिक क्षेत्रात मी बालकाहूनही बालक आहे. श्रीरामकृष्ण सांगतात ते ऐकले पाहिजे. महेंद्रनाथांचा हा भाव, हा विचार टप्प्याटप्याने, क्रमाक्रमाने एका दृढ विश्वासात परिणत झाला. या अढळ विश्वासावर महेंद्रनाथ पुढे डॉ. सरकारांना (श्रीरामकृष्णांवर औषधोपचार करणारे डॉक्टर) श्रीरामकृष्णांकडून ऐकलेला दृष्टांत सांगतात, 'भक्तीच्या थंडाव्याने सच्चिदानंद सागरातील काही पाण्याचा बर्फ होतो आणि परत ज्ञानसूर्य उदयाला आल्यावर बर्फ वितळून जाते. तशाच प्रकारे हा साकार-निराकाराचा खेळ आहे.' श्रीरामकृष्णांच्या मार्गदर्शनानुसार ईश्वर साकार की निराकार या समस्येचे समाधान झाल्यावर महेंद्राच्या साधनेला जणू गती आली. श्रीरामकृष्णांनी सांगितलेल्या साधनरुप साखळीची एकएक कडी धरत धरत महेंद्रनाथ अग्रेसर होत होत शरणागतीच्या उच्च शिखरावर आरुढ झाले.

काळ पुढे सरकत होता. साधनेत हळूहळू प्रगती होत होती. महेंद्रनाथ मनातल्या मनात विचार करु लागले - 'श्रीरामकृष्णांनी मला संसारत्याग करावयास सांगितलेले नाही. परंतु त्यांनी वारंवार निर्जनवासाचे महत्व सांगितले आहे. एकान्तात राहून अगदी अंतःकरणापासून ईश्वराचे ध्यान - चिंतन करावे आणि ज्ञान-भक्ती प्रदान करण्यासाठी त्याला आळवावे. मनातल्या मनात हा विचार घोळवावा - 'या जगात माझं कुणीही नाही. ज्यांना मी माझे समजतो ते दोन दिवसांचे साथी आहेत. ते सगळे जाणारे आहेत. परमेश्वरच माझा आप्त आहे, तो माझा आत्मीय आहे. माझे सर्वस्व आहे आणि मला तो कसा प्राप्त होईल? हे चिंतन असेच करीत असावे.' निर्जनवास केला पाहिजे या उपदेशानुसार महेंद्रनाथ १३ डिसेंबर १८८३ पासून जवळपास एक महिना दक्षिणेश्वरला साधनारत झाले. बिल्ववृक्षाखाली बसून जप-ध्यानात निमग्न राहू लागले. एकेदिवशी श्रीरामकृष्ण त्यांना म्हणाले, ''तू

एक चांगला साधक आहेस. उच्च अधिकारी आहेस. तुला मुलंबाळ आहे म्हणून तिरस्काराने बोललेलं आठवतं का? आता तू निश्चिंत मनाने संसार कर. त्यांना (घरच्यांना) सांग की तू त्यांच्यातलाच आहेस परंतु मनातून अगदी पक्के जाणून रहा की ते तुझे कोणीही नाही.

अशा तऱ्हेने गृहस्थ-संन्याशाचे मूळ सूत्र श्रीरामकृष्णांकडून शिकून घेऊन श्रीयुत महेंद्रनाथ संसार-अरण्यात निर्भय होऊन विचरण करु लागले. गृहस्थ-संन्याशाचा उद्देश म्हणजे गृहत्याग न करता ईश्वर लाभासाठी प्रयत्न करणे. एका गृहस्थ भक्ताने श्रीरामकृष्णांना प्रश्न विचारला, ''महाराज अधिक पैसा मिळावा असा मी प्रयत्न करणे योग्य होईल का?'' उत्तरी श्रीरामकृष्ण म्हणाले, ''होय, योग्य होईल विवेकाने व विचाराने जर तू संसार धर्माचे पालन करणार असशील तर अशा संसारासाठी आवश्यक ते धन तू मिळवू शकतोस. पण एक गोष्ट लक्षात ठेव तुझी मिळकत सचोटीची असली पाहिजे. धन मिळविणे तुझा जीवनहेतू नाही. ईश्वराची सेवा करणे हा तुझा जीवनाचा उद्देश आहे. ईश्वराच्या सेवेसाठी पैसे मिळविण्यात कोणत्याही प्रकाराचा दोष लागत नाही.' भक्ताने पुन्हा विचारले, ''संसारासंबंधी हे कर्तव्य कोठवर निभवावं लागेल?'' श्रीरामकृष्ण म्हणाले, ''घरातील सर्वांचा योगक्षेम नीट चालेपर्यंत त्यांची जेवणाखाण्याची, राहण्याची व्यवस्था नीट होईपर्यंत. एकदा का तुझी मुलंबाळं आपापल्या पायावर नीट उभी राहिली की मग तुझं त्यांच्याविषयी काहीही कर्तव्य उरत नाही. तुम्ही संसारात राहता आणि परिवाराचे पालन पोषण करता यात हानिकारक असे काहीच नाही. पण तुम्ही आपलं मन ईश्वराकडे ठेवलं पाहिजे. एका हातानं कर्म करा आणि दुसऱ्या हाताने प्रभूचे चरण घट्ट धरुन ठेवा. नाव पाण्यात राहिली तरी चालेल, पण नावेत पाणी शिरता उपयोगी नाही, अन्यथा नाव पाण्यात बुडून जाईल. साधक संसारात राहिला तरी चालेल पण साधकात संसार शिरता उपयोगी नाही.''

या संसारात राहताना मानवाला जाणवते स्वतःच्या शक्तीला, बुद्धीला, सामर्थ्याला असणारी मर्यादा. अज्ञानाच्या, आसक्तीच्या तुरुंगात जणू तो एक कैदी. महेंद्रनाथांच्या मनीही अशीच भावना होती. पण श्रीरामकृष्णांच्या संपर्कात आल्यावर जागी झाली एक जिज्ञासा. जिज्ञासू महिंद्रनाथांनी मग या अज्ञानरुप तुरुंगाला असलेली एक फट शोधली. वचनामृतात येते की श्रीरामकृष्ण महेंद्रनाथांना म्हणतात, ''असं बघा. एका बऱ्याच मोठ्या मैदानाची कल्पना करा. अगदी क्षितीजापर्यंत पोहोचलेलं मैदान. पण मधे एक भिंत असल्याने हे विस्तीर्ण मैदान आपण पाहू शकत नाही. पण समजा या विशाल भिंतीला एक छोटसं छिद्र आहे, त्यातून त्या अनंत, मोठ्या विस्तीर्ण मैदानाला पाहता येणं शक्य आहे.'' हे ऐकून महेंद्रनाथ म्हणाले, ''ते छिद्र म्हणजे तुम्हीच, तुमच्या माध्यमातून सर्व काही बघणे शक्य आहे.'' महेंद्रनाथांचे हे बोलणे ऐकूण श्रीरामकृष्णांनी प्रसन्न होऊन त्यांचे कौतुक केले.

वरील प्रसंगातील तुरुंगातील फट किंवा श्रीरामकृष्ण म्हणतात तसे भिंतीला असलेले छिद्र म्हणजेच अवतार तत्व. या छिद्राद्वारे महेंद्रनाथांची त्या अनंताशी अर्थात ईश्वराशी ओळख होऊ लागली. श्रीरामकृष्णांचे दिव्यत्व अनुभवता अनुभवता तेच दिव्यात्वाकडे अग्रेसर झाले. श्रीरामकृष्णांच्या अवतार तत्वाविषयी त्याचा भाव स्पष्ट व्यक्त झालेला दिसतो. वचनामृतात आलेल्या २६ ऑक्टोबर १८८४ रोजी ते लिहितात, ''चला, फिरुन त्याचे दर्शन घ्यायला जाऊ या. जो 'आई'खेरीज आणखी काहीच जाणीत नाही त्या महापुरुषाला, त्या 'बालकाला' बघूया. ते आपल्यासाठीच देह धारण करुन आले आहेत. या कठीण जीवनसमस्येची पूर्ती कशी करायची हे ते सांगतील - संन्याशांना सांगतील, गृहस्थांना सांगतील ! दार सगळ्यांनाच उघडं ! दक्षिणेश्वरच्या कालीवाडीत ते आपली वाट बघताहेत ! चला, चला, त्यांना बघू या. ते अनंत गुणांचे आगर आहेत. प्रसन्न त्यांची मूर्ती - चला, चला अहेतुककृपासिंधू, प्रियदर्शन, ईश्वरप्रेमाने अहर्निश धुंद अशा सुहास्यवदन श्रीरामकृष्णांचे दर्शन घेऊन मानव जीवनाचे सार्थक करु.' श्रीरामकृष्ण म्हणत त्याप्रमाणे परमेश्वर नररुपात येतात, अवतार घेतात आणि जीवाला मानव जन्माचे महत्त्व आपल्या आचरणाद्वारे समजावून सांगतात. श्रीरामकृष्ण म्हणजे पराकाष्ठेचा त्याग, सहिष्णुता, ईश्वर-निर्भरता, सत्य-निष्ठा, सतर्कता, सरलता, संयम, सरसता, सुसंवाद यांचे साकार रुप. त्यांच्या जीवनातून प्रेरणा घेऊन ही गुणसंपदा आपल्या जीवनात आणणे म्हणजे जीवनाची सार्थकता. हाच भाव महेंद्रांच्या अंतरी स्पंदू लागला होता. त्यांचे हृदय-मन ह्या बोधाने चिंब भिजलेले होते.

श्रीरामकृष्णांचे दिव्य चरित्र श्री महेंद्रनाथांनी लिपीबद्ध केलेले वचनामृत आणि या वचनामृतात दडलेली आहे महेंद्रनाथानच्या साधनेची आत्मकथा ! ह्या आत्मकथेचे अनुध्यान करता करता वाटू लागते वचनामृताच्या माध्यमातून महेंद्रनाथांनी बांधून काढले आहे एक सुंदर मनोहर मंदिर, गगनाला गवसणी घालणारे त्याचे शिखर (कळस). ह्यामंदिरात यज्ञवेदीवर सुखासनात विराजमान आहेत - खंडन - भव - बंधन - 'जृम्भित युग - ईश्वर श्रीरामकृष्ण' अगणित मनुष्य - सगळ्या वयाची, सर्व स्तरातील, सर्व वर्णातील सर्व धर्मातील माणसे मंदिरात प्रवेश करीत आहेत, दर्शन करुन बाहेर येत आहेत. मंदिराच्या प्रवेशद्वारी उभे आहेत महेंद्रनाथ. श्रीरामकृष्णांच्या दर्शनाने आनंदविभोर झालेल्या दर्शनार्थींच्या हातावर टाकत आहेत वचनामृताचे दोन चार थेंब आणि सांगत आहेत कहाणी आपल्या साफल्याची. ती ऐकून कठीण जीवनसमस्या कशी सोडवायची, जीवनाचे गणित कसे सोडवायचे ह्याचे रहस्य कळल्याने संत्रस्त जीवांना मिळालेला आधार, आनंदाने जणू उजळून निघत आहे हे दर्शनार्थी. प्रसन्न मनाने जात आहेत फिरुन आपल्या घरी - निश्चिंत मनाने. या दर्शनार्थींच्या द्वारेच घडून येईल एक नवीन समाज. ज्यात हरेकाच्या जीवनाचा केंद्रबिंदू असेल एकमेव परमेश्वर.

**स्वामी सुविज्ञेयानंद**
१३१/१अ, रामकृष्ण मठ, सिंहगड रोड, पुणे - ४११०३०
फोन : ०२० - २४३३५१३२, २४३३३७२७



# क्या श्रीरामकृष्ण अवतार थे ?

**स्वामी ब्रह्मेशानंदजी महाराज**
रामकृष्ण संघाच्या वेदांत केसरी या इंग्रजी मासिक पत्रिकेचे संपादक होते. स्वामीजी सध्या रामकृष्ण मिशन आश्रम, चंदीगढ या शाखेचे सचिव आहेत.

''अभी भी अविश्वास ? जो राम, जो कृष्ण, वही अब रामकृष्ण हुआ है । तेरे वेदान्त की दृष्टि से नहीं, प्रत्यक्ष।'' यह श्रीरामकृष्ण का वह उद्घोष है जो उन्होंने युवक नरेन्द्रनाथ (स्वामी विवेकानंद) के मूक प्रश्न के उत्तर में मृत्यु शैया से किया था ।

नरेन्द्रनाथ प्रारंभ से ही श्रीरामकृष्ण के अवतारत्व के विषय में संशयालु थे । दीर्घ पाँच वर्षों तक उन्हें प्रत्येक कदम पर विभिन्न प्रकार से परखने के बाद भी वे इस विषय में पूर्णरुप से आश्वस्त नहीं हो पाये थे । अन्त में, जब गले के कैंसर से पीड़ित हो श्रीरामकृष्ण ने अपनी वाक्शक्ति भी लगभग खो दी थी, तथा अत्यन्त कृशकाय हो वे मृत्यु शैया पर पड़े थे, तब एक दिन उनके पास बैठे-बैठे नरेन्द्रनाथ के मन में अचानक यह विचार उठा था कि यदि इस अवस्था में भी श्रीरामकृष्ण कह सकें कि वे अवतार हैं, तो मैं मानूँगा, अन्यथा नहीं । श्रीरामकृष्ण ने नरेन्द्र का यह विचार जान लिया था, और उन्हें अचम्भित करते हुए स्पष्ट एवं काफी जोर से उपर्युक्त बात कही थी। उस दिन स्वामी विवेकानन्द श्रीरामकृष्ण के अवतारत्व के विषय में निःसंशय हो सके थे या नहीं, यह कहना तो कठिन है, लेकिन परवर्ती काल में उन्होंने उन्हें 'अवतार वरिष्ठ' अवश्य कहा था । उनके अनुसार श्रीरामकृष्ण पूर्वके विभिन्न अवतारों के उच्चतम भावों की समष्टि थे ।

स्वामी विवेकानन्द के पूर्व भी भैरवी ब्राह्मणी, गौरी पण्डित, वैष्णवचरण आदि शास्त्रज्ञ पण्डितों एवं साधकों ने श्रीरामकृष्ण के जीवन, चरित्र एवं उनकी उच्च आध्यात्मिक अनुभूतियों का अध्ययन कर उन्हें अवतार घोषित किया था । गौरी पण्डित तो श्रीरामकृष्ण को उस परम तत्त्व की संज्ञा देने मेंभी नहीं हिचकिचाये जिसके अंश मात्र से युग-युग में जगत् कल्याण के लिये अवतारों का आविर्भाव होता है ।

इसके अतिरिक्त गिरीशचन्द्र घोष, रामचन्द्र दत्त आदि गृहस्थ भक्त श्रीरामकृष्ण को अवतार मानते थे । ये भक्त न तो शास्त्रज्ञ पण्डित थे, और न ही स्वामी विवेकानन्द की तरह इन्होंने श्रीरामकृष्ण की परीक्षा की थी । ये लोग अपने दृढ़ विश्वास के बल पर श्रीरामकृष्ण को अवतार कहते थे । इन भक्तों ने तो श्रीरामकृष्ण की जीवद्दशा में ही उनके अवतारत्व का मुक्त कण्ठ से प्रचार करना प्रारंभ कर दिया था ।

लेकिन स्वामी विवेकानन्द ने कभी भी जनसाधारण में श्रीरामकृष्ण के अवतारत्व का प्रचार नहीं किया, न ही अपनी मान्यता एवं उनके प्रति भक्ति-विश्वास को सर्वसाधारण पर थोपने का प्रयत्न किया । उन्होंने श्रीरामकृष्ण के आदर्शों का प्रचार किया, उनके ईश्वरत्व का नहीं । यही नहीं, उन्होंने अपने गुरुभाइयों को भी ऐसा न करने की ही सलाह दी थी । इस सन्दर्भ में स्मरणीय है कि स्वयं श्रीरामकृष्ण यह नहीं चाहते थे कि जन-साधारण में उनके अवतारत्व का प्रचार हो । जब उन्होंने सुना कि गिरीश एवं रामचंद्र दत्त उन्हें अवतार कह कर प्रचार कर रहे है, तो कुछ अप्रसन्न हो उन्होंने कहा था कि एक तो नाटककार है, और दूसरा डाक्टर (रामचंद्र दत्त डाक्टर थे) । वे क्या जानते हैं अवतार के बारे में ? इसके पहले ही गौरी पण्डित, वैष्णवचरण (आदि शास्त्रज्ञ पण्डित) उन्हें अवतार कह गये है ।

वस्तुतः हम जैसे सामान्य भक्तों का श्रीरामकृष्ण को अवतार कहना कोई अर्थ नहीं रखता । न तो हममें शास्त्रज्ञान है, और न ही अवतार को पहचानने की साधनोपलब्ध अन्तर्दृष्टि, जो गौरी पण्डित और भैरवी ब्राह्मणी में थी । हममें स्वामी विवेकानन्द जैसा सत्यानुसन्धानी आग्रह और क्षमता भी नहीं है । और न गिरीशचन्द्र का - सवा-सौ प्रतिशत विश्वास । ऐसे छिछले विश्वास से तो उन्हें अवतार न मानना ही अच्छा है । स्वामी विवेकानन्द का कथन है कि यदि ईश्वर है तो हमें उसे देखना चाहिये, अन्यथा उसमें विश्वास से क्या लाभ ? इससे तो नास्तिक बने रहना ही अच्छा है । इसी तरह, यह कहा जा सकता है कि अवतार में विश्वास का क्या लाभ, यदि हम उनके शरणागत न हो सकें, उनका अनुसरण तथा उनके आदर्शों के अनुसार चरित्र गठन न कर सकें ?

अतः प्रश्न तो यह है कि क्या श्रीरामकृष्ण को अवतार मानना आवश्यक है ? उन्हें सिद्ध पुरुष, महात्मा, ऋषि, महापुरुष आदि मानने से क्या काम नही चलेगा ? आखिर उनके अवतारत्व के प्रति इतना आग्रह क्यों ? आजकल यह अवतारवाद बहुत सस्ता हो गया है । किसी व्यक्ती में थोड़ी बहुत विशेषता दिखी नहीं कि उनके शिष्य उसे झट 'अवतार', 'भगवान' आदि की उपाधि देकर पूजा करने लग जाते हैं । अभी हाल ही में कलकत्ता शहर में ही पांच अवतार थे । पूर्व बंगाल के उनके भ्रमण के

समय एक युवक स्वामी विवेकानन्द के पास आया और किसी सन्त का चित्र दिखाकर पूछने लगा कि क्या ये अवतार हैं। स्वामीजी ने उसके प्रश्न का उत्तर न देकर उसे पौष्टिक आहार खाने एवं अपने शरीर और मन को बलिष्ठ बनाने की सलहा दी। स्वामीजी की मान्यता थी कि सबल शरीर और मन की सहायता से व्यक्ति स्वयं अवतारत्व आदि का निर्णय कर सकेगा। वस्तुतः किसी भी व्यक्ति को चाहे वे श्रीरामकृष्ण ही क्यों न हों, बिना सोचे समझे अवतार मान लेना निरर्थक है और यह आवश्यक भी नहीं है। उनके अवतारत्व का आग्रह, ईसा, मुहम्मद, राम, कृष्ण आदि को अवतार, पैगंबर अथवा इष्ट मानने वालों के लिए श्रीरामकृष्ण भावधारा का द्वार बन्द कर उन्हें इसके अमृत से वंचित कर देगा। वेदान्तवादी एवम् निराकार, निर्गुण अथवा सगुण ब्रह्म के उपासकों के लिए भी इस आग्रह से श्रीरामकृष्ण के दैवी जीवन एवं चरित्र का कोई उपयोग नहीं रहेगा।

सच्चा भक्त अपने इष्ट के अवतारत्व अथवा महत्ता की चिन्ता नहीं करता। वह तो उन्हें अपना सर्वस्व एवं प्रियतम जानकर प्रेम करने में ही सन्तुष्ट रहता है। इस सन्दर्भ में गोस्वामी तुलसीदासजी एवं लाटू महाराज के दृष्टिकोण उल्लेखनीय है। किसी व्यक्ति ने तुलसीदासजी से कहा कि श्रीकृष्ण तो पूर्णावतार हैं और श्रीरामचंद्र अंशावतार। इस पर तुलसीदास जी ने उत्तर दिया कि अबतक तो मैं श्रीराम को अयोध्या का राजा ही मानता था। अब, जब आपने बता दिया कि वे अंशावतार है, तो और अधिक भक्ति करुँगा। लाटू महाराज श्रीरामकृष्ण को न तो अवतार मानते थे और न ही परवर्तीकाल में अवतार भाव से उनकी पूजा करते थे। पूछने पर उन्होंने कहा था कि वे सिद्धपुरुष है, महापुरुष हैं। अवतार मानने पर उनकी सेवा करना संभव नहीं होता। अपनी सहज निरहंकारिता के साथ वे कहते थे कि वे क्या थे, भला मैं कहाँ समझ सका हूँ। लेकिन वे यह बात अच्छी तरह जानते थे कि श्रीरामकृष्ण ही उनके सर्वस्व हैं, तथा उन्हें छोड उनकी कोई गति नहीं है।

इसका यह अर्थ नहीं कि किसी सिद्ध महापुरुष को अवतार मानने में कोई लाभ ही नही है। मानव का अन्तर्निहित देवत्व स्वाभाविक रुप से उसका बाह्य प्रतिबिम्ब देखना चाहता है। मनुष्य ईश्वर की कल्पना मनुष्य के रुप मे ही कर सकता है, और अवतारी महापुरुष ही हमारी कल्पना के मानो साकार रुप हैं। उन्ही के माध्यम से हम भगवान को समझ सकते है। वे ही वे द्वार है, वे सेतु हैं जिनके द्वारा मानव ईश्वर तक पहुँच सकता है। अतः अवतार को समझना, जानना, उससे सम्पर्क स्थापित करना एक प्रकार की साधना है जिससे हम परमात्मा को पा सकते है। दूसरी बात यह है कि अवतारी महापुरुषों में मानव के पाप नाश करने की दैवी शक्ति विद्यमान रहती है। कर्मपाश काटने की क्षमता के कारण ये 'कपाल-मोचन' कहलाते हैं। अतः दो प्रकार के लोग किसी महापुरुष को अवतार मानने से लाभान्वित हो सकते है। पहले तो वे जो आर्त हैं तथा अपने पापों के बोझ से दबे है। दूसरे वे जो जिज्ञासु है और परमात्मा को जानना चाहते हैं। पहली श्रेणी के लोग स्वयं को निःसहाय एवं असमर्थ जानकर अवतार के शरणागत होते हैं। दूसरी श्रेणी के लोग अवतार के देव चरित्र का श्रवण, मनन और निदिध्यासन करते है। गिरीशचंद्र घोष पहली श्रेणी एवं स्वामी विवेकानन्द दूसरी श्रेणी के भक्तों के उदाहरण हैं। एक तीसरी श्रेणी के भी भक्त हैं, जो महापुरुष विशेष के अवतारत्व के विषय में चिन्ता नहीं करते। वे तो उन्हे अपना सर्वस्व मान कर प्रेम भर करते है। लाटू महाराज इसी श्रेणी के भक्त थे।

श्रीरामकृष्ण के अवतारत्व के पक्ष में पर्याप्त प्रमाण है। सबसे बड़ा प्रमाण उनकी स्वयं की स्वकारोक्ति है। श्रीकृष्ण, ईसामसीह आदि सभी महापुरुषों ने अपने अवतारत्व को स्वयं स्वीकार किया है। उसके बाद स्वामी विवेकानन्द जैसे सत्यानुसन्धानी साधक का भी साक्ष्य है जिन्होंने वर्षों तक ठोक-परख करने के बाद श्रीरामकृष्ण को अवतार वरिष्ठ घोषित किया था। अतः हम जैसे सामान्य भक्तों के लिए इस बात को सरल विश्वासपूर्वक स्वीकार कर लेना ही श्रेयस्कर है। लेकिन जैसा पहले कहा जा चुका है, यदि विश्वास हो तो गिरीशचन्द्र जैसा, जिज्ञासा हो तो स्वामी विवेकानन्द जैसी, और प्रेम और आनुगत्य हो तो लाटू महाराज जैसा, तभी श्रीरामकृष्ण अथवा किसी भी महापुरुष को अवतार मानना सार्थक हो सकता है। यदि हममें उस प्रकार का विश्वास, जिज्ञासा और प्रेम न हों तो इन्हें प्रयत्नपूर्वक बढ़ाने का प्रयत्न करना चाहिए। यह कार्य किसी को अवतार मान लेने मात्र से कही अधिक महत्त्वपूर्ण है।

**स्वामी ब्रह्मेशानंदजी महाराज**
रामकृष्ण मिशन आश्रम,
सेक्टर १५ बी, मध्यमार्ग, चंदिगढ - १६१५०५



# जो राम, जो कृष्ण, तोच श्रीरामकृष्ण

**डॉ. अजित कुलकर्णी**

बी.ए.एम.ए., पीएचडी. (श्रीमत् भगवद्गीता एक जीवनप्रणाली), रजिस्ट्रार- बी.एम.सीसी. कॉलेज (निवृत्त), पुस्तके व लेखमाला प्रकाशित. गेली तीस वर्षेप्रवचन, व्याख्यान व कीर्तने (दासबोध, भागवत, ज्ञानेश्वरी, रामकृष्ण परमहंस व स्वामी विवेकानंद यावर) पुरस्कार- शंकराचार्यांकडून गौरव पुरस्कार, आदर्श शिक्षक व गौरव पदक पुणे महानगरपालिका, धर्मभूषण पदवी.

भारत भूमी संतांची भूमी, देवभूमी म्हणून ओळखली जाते. ज्याप्रमाणे भारत देश हा कृषिप्रधान आहे, तसाच हा अध्यात्मप्रवण असा देश आहे. तसे, बंगाल राज्यात अनेक थोर संत, महापुरुषांचे जन्म झाले. त्यांनी ''मार्गाधिरे वर्तावे । विश्व हे मोहरे लावावे ।'' या संत ज्ञानदेवांच्या उक्तीप्रमाणे या विश्वात संतांनी कार्य केले आहे. या राज्यात रामकृष्ण परमहंस, स्वामी विवेकानंद, अरविंद घोष, चैतन्य महाप्रभु इ. थोर 'युगपुरुष' होऊन गेले. तसेच, थोर समाजसुधारक, राजकारणी मंडळीचे योगदानही लक्षणीय आहे.

देरे या गावात, एक धर्मनिष्ठ, सदाचारसंपन्न, कुलीन, श्रीरामचंद्रोपासक चटर्जी आडनावाचे एक घराणे होऊन गेले. याच घराण्यात श्री गदाधर ऊर्फ रामकृष्ण क्षुदिराम चटर्जी यांचा जन्म झाला. याच रामकृष्णांनी जगद्धोधाराचे कार्य केले. स्वामी विवेकानंदांचे हे गुरु होते. गुरुंचे कार्य विश्वंभर करण्यासाठी विवेकानंदांनी 'श्रीरामकृष्ण मिशनची' उभारणी केली. आज या मिशनतर्फे समाजसेवा, राष्ट्रसेवा, आध्यात्माची ज्योत प्रज्वलित ठेवली आहे.

**गदाधर हेच रामकृष्ण झाले –**

श्री गदाधराचे एकूणच जीवन हे ऐहिक पातळीवरचे नव्हते. विद्या, संपत्ती आणि उद्योग याने मानवीजीवन उन्नत होत असले तरी जीवनरहस्याचे अनुशीलन करुन उत्क्रांतितत्त्वे पाहता आली पाहिजेत. रामकृष्णांचे वैवाहिक जीवनसुद्धा आध्यात्मिक पातळीवरचे होते. त्यांच्या जीवनाचे एक वैशिष्ट्य होते ते म्हणजे गदाधर हे 'कामनाशून्य' होते. त्यांच्या मनाला कोणत्याही प्रकारची इच्छा वा वासना, ईश्वरसेवे शिवाय स्पर्श करु शकली नाही. त्यांचा सर्वच जीवनप्रवास परिमल शुद्ध अशाच पातळीवरचा होता. याकाळात त्यांची प्रचंड साधना झाली. ते एके ठिकाणी म्हणतात, ''कोणतेही साधन करावयास मला तीन दिवसांपेक्षा अधिक काळ वेळ लागला नाही.'' त्यांची साधना फलोन्मुख झाली, त्यांचा अखेरचा निराकाराचा, अनुभव अद्वैताच्या शिखरापर्यंत पोहचला. त्यांना माता कालिकेचे दर्शन झाले होते. गदाधरांनी प्रथम तांत्रिक साधना, नंतर मधुरभावसाधना, त्यानंतर भगवती सान्निध्यातील प्रचिती यातून अध्यात्मसाधना परिपूर्ण झाल्यामुळे गदाधर हेच रामकृष्ण परमहंस पदावर आरुढ झाले.

**रामकृष्णांचे वेळचं समाजजीवन –**

रामकृष्णांचा जीवनकाळ (१९३६ ते १८८६) म्हणजे सामाजिक व राष्ट्रीय दृष्टीने हा पारतंत्र्याचा काळ होता. समाजावर पौर्वात्य व पाश्चिमात्य विचारांचा पगडा दिवसेन्दिवस जास्त बसत चालला होता. प्राचीन भारतात, लोकांचे जीवन ध्येय म्हणजे आत्मा-परमात्मा, जीवात्म्याचे ज्ञान करुन घेणे. हे जीवन म्हणजे पारलौकिक जीवन इंद्रियातीत आहे. त्याचे स्वरुप समजून घेणे. यातून रुढी-चालिरीतीचे प्रचंड प्राबल्य होते. मानवधर्माला कलंकित करणाऱ्या रुढिंची पाळेमुळे खोलवर गेली होती. यातून परकीय सत्तेचे प्राबल्य भारताशिवाय इतर देशात ऐहिक सुखोपभोगाकडेच लक्ष होते. भोगरुप सुखलाभातून लोक दांभिक व स्वार्थ परायण बनले होते. त्यामुळे विषयप्रवणता, स्वार्थपरता, धर्मविश्वासरहित गोष्टीचे प्रचंड स्तोम माजले होते. अशा वेळी ईश्वरीसंकेतानुसार श्रीरामकृष्णांचा जन्म झाला. समाजाला खऱ्या धर्माची, त्याच्या तत्त्वांची ओळख करुन घ्यावयाची होती. नवीन विचार प्रस्थापित करावयाचे होते, हे त्यांच्या जीवन कार्यातून समजून येते.

**भगवंताच्या अवताराचे प्रयोजन –**

श्रीमद्भगवतगीतेच्या अध्याय ४ मध्ये श्रीभगवंतानी श्लोक ४ ते ९ मध्ये श्री भगवंताच्या अवताराचे प्रयोजन सांगितले आहे. वास्तविक ईश्वर नररुपात अवतारीत होत नाहीत आणि देहधारी मनुष्य, व्यक्ती ही ईश्वर बनू शकत नाही. तर हे मग अवतार का? ज्याप्रमाणे प्रकाशाशिवाय प्रकाशकाची सत्ता सिद्ध होत नाही, तसे या जगात चैतन्याशिवाय कोणताही व्यवहार सिद्ध होत नाही. तेव्हा 'जन्म' शब्दाचा अर्थ आहे. 'प्रादुर्भाव' ! संस्कृत भाषेत 'जनि' धातु आहे. जनि प्रादुर्भावे ! म्हणजे जननं जन्म् ! जी गोष्ट गुप्त होती ती प्रकट होणे म्हणजे जन्म ! जगत कार्यासाठी जो कार्यरुपाने प्रकट होतो, भक्तासाठी अभिव्यक्त होतो, तो 'अवतार' असतो. जो भगवंताचे कार्य करतो ती अवतार असतो. भगवतंच केवळ स्वच्छंदी आहे. स्वच्छंद म्हणजे भक्तासाठी अभिव्यक्त होणारा भक्तासाठी सृष्टीकार्यासाठी जो करुणावश होऊन, परवश होवून आपल्या भूमिकेत येतो आणि भक्तांच्याच हृदयात राहून कार्य करतो. तो 'अवतार' होय. भगवंत अर्जुनाला म्हणतात, ''हृद्देशेऽर्जुन तिष्ठती । मी भक्तांच्या हृदयात राहतो. त्याच्या मुखातून मी बोलत असतो, डोळ्यांना

तसे जाणवते, बुद्धित वेदज्ञान प्रकाशित होते. कर्मातून धर्माचरण घडते. हातून सत्कर्म घडू लागतात. भक्तांना शाश्वत प्रेमाची अनुभूती येते. अशी कार्य घडू लागतात. धर्म संस्थापना, सज्जनाचे रक्षण करण्यासाठी जसा अवतार तसा त्याचा जन्मही दिव्य असतो व कर्मही दिव्य असते. म्हणजे ह्या जीवाला सामन्य माणसासारखे जन्माला कारणीभूत कोणतेही कर्म नसते. तरी जगत कार्यासाठी, कोणत्याही स्थितीत कधी राजा बनून राजगृहात तर कधी कारावासातही जन्म घेतात. त्यामुळे रामकृष्ण हे अवतार युगपुरुष होते असेच दिसून येते.

**श्रीराम व श्रीकृष्णांची प्रसाद चिन्हे –**

"शुद्ध बीजापोटी, फळे रसाळ गोमटी !" या उक्तीप्रमाणे श्रीरामकृष्णांचा जन्म क्षुदिरामांचे घरी झाला होता. १८३५ साली म्हणजे वयाच्या साठाव्या वर्षी क्षुदिराम हे गयेला गेले होते. तेथे त्यांनी गयेच्या क्षेत्रात गदाधराच्या श्रीपादपद्मी पिंडदान केले. त्यांना कृतकृत्य झाल्यासारखे वाटले. त्यारात्री त्यांना एक स्वप्न पडले, त्यात त्यांनी असे पाहिले की, "क्षेत्र स्थानातील श्रीगदाधराच्या चरणी पितरांना उद्देशून जे पिंडदान केले. तेव्हा आपल्या सर्व पितरांना दिव्य देह प्राप्ती झाली असून ते आनंदानी आपल्याला आशिर्वाद देत आहेत. त्या दर्शनाने क्षुदिराम आनंदीत झाले आहेत. तेवढ्यात त्यांना असे दिसले की, एका अदृश्य ज्योतीने मंदिर व्यापून गेले आणि सर्व पितर दुतर्फा उभे राहिले. तेथे एक सिंहासन होते. त्यावर एक अद्‌भूत, दिव्य तेजस्वी 'श्यामसुंदर' अशी व्यक्ती होती. सर्वजण त्याची स्तुती करीत होते. तेव्हा हे क्षुदिराम हे सर्व पाहात होते. त्या व्यक्तीने क्षुदिरामांना हास्यमुद्रेने जवळ बोलविले. क्षुदिराम जणु यंत्रवत त्यांचे जवळ गेले. त्यांनी त्यांना साष्टांग नमस्कार केला. तेव्हा ती दिव्य व्यक्ती धनगंभीर पण मधुर वाणीने त्यांना म्हणाली की, "हे क्षुदिराम ! तुझ्या भक्तीने मी अत्यंत संतुष्ट झालो आहे. पुत्ररुपाने तुझ्या घरी मी लवकरच अवतीर्ण होईन व मी तुझी सेवा ग्रहण करीन."

या स्वप्नाने क्षुदिराम आनंदीत झाले. त्यांना कृतार्थ झाल्याचा अनुभव आला. असे हे विष्णुस्वरुपी श्रीरामचंद्र जणु आले होते.

गयेच्या प्रवासावरुन क्षुदिराम घरी आले. त्यांनी आपली पत्नी चंद्रादेवी यांनी हे स्वप्न सांगितले. त्यावेळी चंद्रादेवीनी एक अद्‌भूत अनुभव सांगितला. चंद्रादेवी म्हणाल्या, "एकेदिवशी मला असे दिसले की, त्यांच्या अथंरुणात एक ज्योतिर्मय पुरुष झोपला आहे. तसेच दुसरा अनुभव असा की धनी लोहारणीशी बोलत असताना, एकदम शिव पिंडीतून एक दिव्य ज्योत बाहेर पडली आणि त्या प्रकाशाने सर्व मंदिर व्यापून गेले. नंतर ती ज्योत हळूहळू चंद्रादेवीच्या शरीरात प्रविष्ट झाली. हे पाहून त्या मुर्च्छित झाल्या आणि धनी लोहारणीने त्यांची सेवा केली मग त्या भानावर आल्या. त्यानंतर अनेक दिव्य संकेत प्राप्त होत गेले. अनेक देवदेवतांची दर्शने घडू लागली. सत्यनिष्ठा, संतोष आणि त्याग या गुणांनी भगवद्‌शक्ती क्षुदिरामाचे घरी प्रकट झाली.

**मधुराभावाचे प्रकटीकरण –**

श्रीकृष्ण अवतारात जो आध्यात्मिक दृष्टीने मधुराभाव प्रकट झाला, हाच भाव रामकृष्णांचे जीवनात प्रकट झाला होता. साधना ही एक सूक्ष्म भावाची संवेदना बनणे आवश्यक आहे. मनुष्याचे मन प्रवृत्तीप्रेरणेने अस्वस्थ असते. श्रीरामकृष्ण म्हणत असत, "कामगंधशून्य झाल्याशिवाय महाभावमयी श्रीराधेचा भाव समजणे शक्य नाही." रासलिलेतील श्रीकृष्णावरील राधेचे अलौकिक प्रेम लक्षात घ्यावे म्हणजे झाल ! ईश्वराबद्दल इतके प्रेम मनामध्ये उत्पन्न झाले म्हणजे त्याची प्राप्ती होते. पहा बरे ! वृंदावनातील गोपी पतिपुत्र, कुलशील, मान-अपमान, लाजलज्जा, लोकभय, समाजभय, हे सारे सोडून देऊन श्रीकृष्णासाठी कशा वेड्या झाल्या होत्या. तुम्हाला जर परमेश्वराचे असे वेड लागले, तर तुम्हाला सुद्धा त्याची प्राप्ती होईल."

श्रीरामकृष्णांचे जीवन म्हणजे अखंड असलेली एक भावावस्था होती. ते शुद्ध व एकाग्र चित्ताने ज्या भाावावस्थेत राहात असत. त्यातच भावाच्या पूर्ण प्रकाशात ते बदलून जात असत. रामकृष्णांची भाव अवस्था विलक्षण असे. उदा. एकदा का दास्यभाव जागृत झाला की, त्याची चरमसीमा गाठल्याशिवाय त्याचा मातृत्त्वभाव जागृत होत नसे. कधी जगदंबेचा भाव प्रकट झाला तर, ते आई असे म्हणत. मग बालकभावानेच त्याचे मधुराभाव प्रकट होत. श्रीरामकृष्ण पूर्णपणे निरक्षर असूनही शास्त्रमर्यादांचे त्यांनी उल्लंघन केले नव्हते. शुद्ध पवित्र व ईश्वरप्राप्तीसाठी व्याकूळ अशा हृदयात तरंग यावयाचे, या तरंगाचे दृष्य फल म्हणज शास्त्रे होत. यासंबंधी स्वामी विवेकानंद म्हणाले की, "शास्त्रांमध्ये सांगितलेल्या सर्व अवस्थांची व अनुभवांची सत्यता प्रस्थापित करण्यासाठीच याकाळी ईश्वराने निरधर होऊन अवतार घेतला !"

श्रीरामकृष्णांनी गोपीच्या भावातून मधुराभावाची साधना केली होती. श्रीकृष्णाचे दर्शन व्हावे यादृष्टीने श्रीजगदंबेची व श्रीराधाकृष्णांची ते अनन्यभावाने व अत्यंत व्याकूळ होऊन प्रार्थना करीत असत. सामान्यपणे मनुष्य प्रेम म्हणजे एखाद्या व्यक्तीकडे देहाकर्षणाने किंवा गुणांकडे आकर्षित होणे हे समजतो. परंतु गोपी वा मधुरभावातील कृष्ण गोपींचे प्रेम हे अतींद्रिय प्रेम स्थूल, देहबुद्धी आणि सूक्ष्म भोगलालसे पलिकडे होते. हे प्रेम श्रीराधाराणीकडून प्रकट झाले होते. भगवंताच्या सुखातच स्वतःचे सुख अनुभवणे हेच भक्तीशास्त्राचे वर्म आहे. याच भावातून श्रीरामकृष्ण हे साधना करीत सिद्धावस्थेत पोहोचले होते. मधुराभाव हा केवळ श्रीकृष्ण, राधा व गोपी यांच्यात प्रकट झाला होता. यात शांत, दास्य, सख्य, वात्सल्य व मधुर असे भाव आहेत. ईश्वरावर पतिभावाने प्रेम करुन ईश्वरलाभ करुन घेणे हे मधुराभावाचे उद्दिष्ट असते. श्रीरामकृष्णांनी सहा महिने स्त्रीवेशात राहून ही साधना केली होती. त्यातून भगवंताच्या प्रेमधन रुपाने स्मरण, मनन व ध्यान यात निरंतर मग्न राहता येते. याच अवस्थेत असताना तोतापुरी महाराजांकडून संन्यासदीक्षा प्राप्त होऊन काहीच्या मते त्यांना 'रामकृष्ण' हे नाव प्राप्त झाले. गुरुकृपेने ते आता निर्विकार स्थितीत राहू लागले.

**जो राम, जो कृष्ण, तोच श्रीरामकृष्ण !**

श्रीरामकृष्णांची इहलोकीची यात्रा संपविण्याचा काळ जवळ येत होता. त्यावेळी श्रीरामकृष्णांना नरेंद्राला आपल्याजवळच्या सर्व शक्ती प्रदान करावयाच्या होत्या. या शक्ती ईश्वरकार्यास उपयोगी पडणार होत्या. नरेंद्र म्हणाले, "मला त्या सिद्धी वा शक्ती नकोत. कारण ईश्वरदर्शनास याचा काही उपयोग नाही." रामकृष्णांनी महासमाधी घेण्यापूर्वी पाचसहा

दिवसांची गोष्ट आहे. रामकृष्णांनी नरेंद्राला खोलीत बोलावले तेव्हा खोलीत परमहंस व नरेंद्रच होते. रामकृष्णांनी आपली दृष्टी नरेंद्रावर केंद्रित करुन श्रीरामकृष्ण समाधीत गेले. शरीरातून जणू विजेचा प्रवाह जावा असे नरेंद्राला जाणवले. त्यांचे हळूहळू बाह्य जगताचे भान नष्ट झाले. काही वेळ गेला, किती वेळ गेला हे कोणालाही समजले नाही. मग दोघं भानावर आले तर रामकृष्णांचे नेत्रांतून अश्रूधारा वाहात होत्या. याचे कारण काय नरेंद्राने विचारले तर रामकृष्ण म्हणाले, ''माझ्याकडे जे काही होते ते मी सर्व तुला देऊन टाकले आहे. आता मी फकीर झालो आहे. या शक्तीच्या साहाय्याने तू मानवजातीचे कल्याण करावस, जगोद्धार करावास. मगच तुला स्वस्थानी जाता येईल.''

नरेंद्राच्या शरीरात सर्व शक्ती संक्रमित झाल्या. तथापि, नरेंद्राच्या मनात आले की, रामकृष्ण हे ईश्वराचे अवतार म्हणतात, हे कां? त्यांना असा असाध्य रोग का व्हावा? त्यांना या एवढ्या शारीरिक वेदना का सोसाव्या लागतात? असे का वाटण्यास आले? हे विचार रामकृष्ण महासमाधि घेण्यापूर्वीचे दोन दिवस असावेत. रामकृष्ण विकलांग स्थितीत होते. परंतु शय्येवरच नरेंद्राकडे पाहून रामकृष्ण म्हणाले – 'अजूनही संशय आहे? ध्यानात ठेव, जो राम होता आणि जो कृष्ण होता तोच या देहात रामकृष्ण होऊन आला होता, आणि तेही तुझ्या वेदांताच्या अर्थाने नाही तर प्रत्यक्ष ! हे ऐकूण नरेंद्र खजील झाले. मन जे खिन्न झाले ते केवळ रामकृष्णांचे चरणी लीन झाले.

**राम व कृष्ण स्वरुप रामकृष्ण –**

श्रीराम व श्रीकृष्ण यांचे एकरुप म्हणजे रामकृष्ण असे दिसते. राम हा शब्द जरी दशरथे श्रीराम असला तरी शब्दाचा अर्थ म्हणजे 'चैतन्य' हा आहे. भगवंताचे जे चैतन्य ते रामरुप हेच गदाधरात प्रविष्ट होते. ते प्रत्यक्ष तेजोमयरुपात होते. एक तर श्रीगदाधर मंदिरात गयेला वडिलांनी दिलेला भगवंताचा आशिर्वाद ! तो हे भगवंताचे चैतन्य ! श्रीराम व श्री शिवजी यांचेही नाते अभेय असल्याने त्यावेळी शिव चैतन्यही माता चंद्रादेवीच्या शरीरात प्रविष्ट झाली होती. तसेच, हे चैतन्यरुप रामाचे कार्य श्रीरामकृष्णाकडून या परमेश्वरानी केले. श्रीरामांचे व श्रीकृष्णाचे जीवनात जो असंग राहून पतीपत्नी नात्याचा संबंध होता तोच संबंध येथे या जीवनात प्रकट झाला होता. यातही दोघही परमानंदच्या अवस्थेत होते.

त्याचप्रमाणे साधनेने कृष्णरुपही याच्या जीवनाला प्राप्त झाले होते. कृष्ण शब्दाचा अर्थ आहे, 'कृ' 'कर्षित' करणारा सर्व जगाला आकर्षित करणारी विलोभनीय शक्ती म्हणजे 'कृष्ण' आहे. ही शक्ती रामकृष्णांच्या जीवनात होती. त्यांनी खऱ्या परमार्थाची ओळख सर्वांना करुन दिली. धर्माचे कार्य करुन भक्तीप्रेमानी सर्व समाज, सबंध विश्व भारुन टाकले. हे ते कृष्णाचे कार्य रामकृष्णांचे जीवनात प्रकट झाले. त्यामुळेच मधुराभक्तीची फलोन्मुखता पहावयास मिळाली. सर्वात राहून 'आप्तकाम' स्वरुपातील कृष्णजीवन रामकृष्णांचे जीवनात प्रकट झाले होते.

यादृष्टीनेही राम व कृष्ण हे रामकृष्ण गुण व कार्यानुसार होते हे सिद्ध होते.

**भृगसहितेप्रमाणे विचार –**

ब्राह्मीमुहूर्तावर क्षुदिरामांच्या पर्णकुटीत श्रीरामकृष्ण या महान विभूतीचा जन्म झाला. यांच्या जन्माचे वेळेप्रमाणे भृगसंहितेत असे फल नमूद केले आहे की,

**धर्मस्थानाधिपे तुंगे धर्मस्ये तुंगखेचरे ।**
**गुरुणा दृष्टिसंयोगे लग्नेशे धर्मसंस्थिते ।।**
**केंद्रस्थानगते सौम्ये गुरौ चैव तु कोणभे ।**
**स्थिरलग्ने यदा जन्म संप्रदायप्रभुर्हि सः ।।**
**धर्मविन्माननीयस्तु पुण्यकर्मरतः सदा ।**
**देव मंदिरवासी च बदुशिष्यसमन्वितः ।।**
**महापुरुषसंज्ञोऽयं नारायणांशसंभवः ।**
**सर्वत्र जनपूज्यश्च भविष्यति न संशयः ।।**

अशा प्रकारचा मनुष्य धर्मवित व माननीय होईल व सदा पुण्यकर्माचे अनुष्ठान करीत राहील. तो नवीन धर्मसंप्रदाय सुरु करुन परमेश्वराचा अवतार म्हणून गणला जाईल व सर्व लोकांस पूज्य होईल.

या सर्व विचारातून पाहिले असता, असे लक्षात येईल की, जो राम जो कृष्ण तेच रामकृष्ण होते.

**संदर्भ ग्रंथ :** १) श्रीरामकृष्णचरित्र – श्री. न. रा. परांजपे, रामकृष्ण मठ, नागपूर २) श्रीरामकृष्णचरित्र – संक्षिप्त चरित्र अणि उपदेश, श्री. प्र. ग. सहस्त्रबुद्धे, रामकृष्ण मठ, नागपूर ३) रामकृष्ण आणि विवेकानंद – डॉ. वि. रा. करंदीकर, पुणे

**डॉ. अजित कुलकर्णी**
३४६, शनिवार पेठ, पुणे – ४११०३० फोन : २४४८७०३०



# श्री चैतन्य महाप्रभू व श्रीरामकृष्ण परमहंस जीवन व संदेश

**प्रा. के. टी. कोलते**

सेवानिवृत्त प्राध्यापक व विभाग प्रमुख, भूगोलशास्त्र. भूगोलांच्या पुस्तकांचे लेखक व 'बालभारती' पुणे येथे भूगोल पुस्तकांचे लेखन व संपादन. एम.फिल व पीएचडी चे मार्गदर्शक रामकृष्ण मठ, नागपूर निगडित लेखन व अनुवाद कार्य.

**प्रास्ताविक :** भारताच्या आध्यात्मिक इतिहासाचे अनुशीलन केले असता असे दिसून येते की, ज्ञानसाम्राज्याचे शिखर गाठून देखील येथील ऋषि-मुनी व संत-महात्म्ये सत्-चित-आनंदाच्या अनुभूतिसाठी भक्तिराज्यातच रमले. अध्यात्मशास्त्राची दोन अंगे आहेत - सिद्धांत आणि साधना. सिद्धांताचे अंग विचारप्रधान असते तर साधनेचे आचरणप्रधान असते. विद्वानांना विचारप्रधान अंग आवडते. त्यामुळे साधकांना मात्र आचरणप्रधान अंग अधिक भावते. आचरणप्रधान अंग अनुभवप्रधान असते हे त्याचे कारण असावे. कदाचित विचारप्रधान तत्वज्ञानविषयक ग्रंथाच्या लेखनाने व अध्ययनाने अभ्यासकाला विद्वत्ता व मान मिळत असला तरी मनःशांती मिळत नसावी. श्रीमद्भागवतात सुरुवातीलाच येणाऱ्या नारद व व्यासांच्या संवादातून ते स्पष्ट होते. शिवाय भगवान श्रीकृष्ण देखील उद्धवाला उपदेश करताना म्हणतात -

**''न साधयति मां योगो, न साख्यं धर्म उद्धव ।**
**न स्वाध्यायस्पयस्त्यागो यथा भक्तिर्म मोर्जिता ।।''**

(श्रीमद्भागवत ११-१४-२०)

अर्थात्, ''हे उद्धवा माझ्या अनन्य भक्तीने जसा मी प्राप्त होतो तसा योग, ज्ञान, धर्माचरण, स्वाध्याय, तप किंवा त्याग यांनी मी प्राप्त होत नाही.''

ज्ञानियांचे राजे ज्ञानेश्वर देखील म्हणतात -

**''चहु वेदी जाण साही शास्त्री कारण ।**
**अठराहि पुराणे हरिसी गाती ।।१।।**
**एक हरि आत्मा जीव शिव समा ।**
**वाया तू दुर्गमा न घालि मन ।।३।।** हरिपाठ श्लोक २

जीवांना व्यापणारा आत्माच विश्वाला व्यापतो, एवढे ध्यानात आले तरी पुरेसे आहे. तोच श्री ज्ञानदेवांचा हरि आहे. एकच परमात्म्यतत्व सगळीकडे सारखेपणाने पसरलेले आहे, हे उमजले म्हणजे झाले. मग तत्वज्ञानात्मक विचार, चर्चा, वादविवाद इत्यादी समजायला कठीण गोष्टींमध्ये लक्ष घालण्याची गरज नाही.

अद्वैत वेदान्त साधना व द्वैताचा भक्तिमार्ग यापैकी कोणता मार्ग श्रेष्ठ, याबाबत भारतात विद्वानांनी नेहमी वाद घातला आहे. त्याचे सोदाहरण निराकरण करण्यासाठी सुमारे चारशे वर्षांच्या अंतराने भारतात श्री चैतन्य महाप्रभू व श्रीरामकृष्ण परमहंस येथे अवतरले होते. या दोन महात्म्यांचे जीवन, संदेश व मधुरभावाविषयी थोडे चिंतन करण्याचा प्रयत्न येथे केला आहे.

**श्री चैतन्य महाप्रभू :**

श्री चैतन्यांचा जन्म इ.स. १४८५ सालच्या फाल्गुन महिन्यातील होळी पौर्णिमेला बंगालमधील नवद्वीप येथे झाला होता. पित्याचे नाव जगन्नाथ मिश्र व आईचे शवीदेवी. चैतन्य हे त्यांचे दुसरे पुत्ररत्न. चैतन्यांचे पाळण्यातील नाव विश्वंभर होते. आई त्यांना निर्माह नावाने हाक मारीत असे. त्यांच्या गौर वर्णामुळे त्यांचे गौरांग नावही प्रचलित झाले आहे. हरिबोल शब्द र व ऐकला की ते देखील हरिबोलचा गजर करत. म्हणून लोक त्यांना गौरहरि नावानेही हाक मारत असत. पुढे संन्यासानंतर त्यांचे नाव श्रीकृष्ण चैतन्य भारती असे झाले व त्यावरुनच ते चैतन्य महाप्रभू नावाने प्रसिद्ध झाले.

श्री चैतन्य बुद्धीने कुशाग्र होते. वयाच्या सहाव्या वर्षी पाठशाळेतील शिक्षण अवगत करुन ते लगेच व्याकरणादि शास्त्राभ्यासात व्यग्र झाले. त्या बालवयातच ते विद्वानांशी चर्चा व वादविवाद करु लागले. वयाच्या सोळाव्या वर्षी स्वतःची पाठशाळा काढून तेथे संस्कृत व्याकरण इत्यादीचे अध्यापन करु लागले. दूरदूरुन विद्यार्थी त्यांच्याकडे अध्ययनाकरता येऊ लागले. अल्प काळातच त्यांना विद्वान व उत्तम अध्यापक म्हणून प्रसिद्धी मिळाली. याच सुमारास त्यांचे लग्न लक्ष्मी या अल्पवयीन बालिकेशी करुन देण्यात आले. परंतु सर्पदंशाने लवकरच तिला मृत्यू आला. त्यांचे दुसरे लग्न विष्णूप्रिया या लहान मुलीशी झाले.

विष्णूप्रियादेवी यौवनात प्रवेश करत असतानाच वयाच्या २४ व्या वर्षी चैतन्यांनी संन्यासग्रहण केला होता.

लग्न झालेले, शास्त्रार्थावर वादविवाद करत असतानाच सोबत

हरिनामाचा गजर करत चैतन्यांनी सारा बंगाल दुमदुमून सोडला. परंतु त्यांच्या ध्यानात आले की, लोक मुखाने हरिनाम घेत असले तरी त्यांच्या मनात नामाप्रती प्रेम नाही. अधिकांश भोगलोलुप आहेत. त्यांची कामकांचनाप्रती प्रचंड आसक्ती आहे. कीर्तनाचे वेळी लोक भावविव्हल होत, अश्रू ढाळून जमिनीवर लोटपोट होत. परंतु स्मशान वैराग्याप्रमाणे ते फक्त कीर्तनात असेपर्यंत ! नंतर पुन्हा संसारात गुरफटून विषयोपभोगात रमणे सुरु होत असे. या विचाराने चैतन्य बेचैन झाले. लोकांच्या मनातील विषयासक्ती दूर करण्यासाठी ते त्यांना विवेक व वैराग्याची शिकवण देण्याचा प्रयत्न करु लागले. कशाला पाहून लोक शिकतील ? त्यांच्यापुढे आदर्श तो कोणता ? याबाबत स्वतःचा विचार करताना त्यांना वाटले, ''मी स्वतःच कुटुंबात, नातेवाईकात राहतो आहे. व्यवसाय, धन, तारुण्य, विद्या, बुद्धी, भक्तांकडून व विद्यार्थ्यांकडून सेवा, मान यांनी वेढलेला आहे. हे पाहून लोकांमध्ये कसा काय वैराग्याचा व भगवतभक्तीचा भाव जागृत होईल ? याउलट त्यांचा असा समज होईल की भगवतंनाम व हरिसंकीर्तनाचे फळ म्हणूनच मला संसार-सुखाची सर्व साधने उपलब्ध आहेत.''

प्रत्यक्ष संसारापासून अलिप्त असून व त्यापासून मिळणाऱ्या क्षणभंगूर सुखाला स्वतः अत्यंत निकृष्ट व त्याज्य समजत असूनदेखील वरील विचारांनी ते बेचैन झाले. मूळातच असलेले मनातील तीव्र वैराग्य उफाळून आले. त्यांनी संन्यास घेण्याचा निश्चय केला. लोकांसमोर आदर्श उभा करावयाचा असेल तर 'बोले तैसा चाले' या न्यायाने वर्तन आवश्यक होते. शेवटी संन्यास घेताना आईला व संन्यस्त गुरुला ते म्हणाले होते की, ''संसारात राहणे मला आता क्षणभरही सहन होत नाही. मृत्यू तर केव्हाही येऊ शकतो. म्हणून मनात तीव्र वैराग्याचा उदय झाला असताना संन्यास घ्यावा असे शास्त्र मत आहे. श्रूतीचे वचन आहे 'यदहरेव विरजेत तदहरेव प्रवजेत'. म्हणून मला आता संन्यास दीक्षा घेऊ द्यावी''. त्यानंतर दोघांनीही त्यांना संन्यास घेण्याची अनुमती दिली होती.

संन्यास झाल्यानंतर आपली साधना अधिक तीव्र करत लोकशिक्षण करु लागले. सामूहिकरित्या भगवन्नामसंकीर्तनाची पद्धती त्यांनी सुरु केली. भक्तीभावाने नाम घेत स्वतःला कसे विसरुन जावे हे स्वतःच्या उदाहरणावरुन ते दाखवू लागले. श्री चैतन्यांनी बंगालपासून सुरुवात करीत ओरिसातील जगन्नाथपुरी येथे ते आले. काही काळ घालवून मग पुढे दक्षिण भारतात, नंतर पश्चिम भारतात व वृंदावनमार्गेपुरीला परतले. या भ्रमणात संकीर्तन, भजने, नामजप व अध्यात्माविषयावर चर्चा करत, लोकशिक्षण करत, भक्त व अनुयायी तयार करत ते पुरीला परतले होते. नंतरचा काळ त्यांनी तेथेच घालवला. पुरी मुक्कामी भक्तिरसाची लयलूट करत वयाच्या ४८ व्या वर्षी श्री चैतन्यांनी इ.स. १५५३ मध्ये देह ठेवला.

**श्रीरामकृष्ण परमहंस :**

श्रीरामकृष्णांचा जन्म कोलकत्त्याच्या वायव्येस सुमारे ९० मैल अंतरावर असलेल्या कामारपुकुर नावाच्या खेड्यात इ.स. १८३६च्या फाल्गुन शुद्ध द्वितीया, बुधवार दि. १७ फेब्रुवारी रोजी झाला. त्यांचे मूळ नाव गदाधर होते. वडील क्षुदीराम व आई चंद्रिकादेवी. श्रीरामकृष्णांना दोन वडील भाऊ व दोन बहिणी होत्या. वडील बंधू रामकुमार त्यांच्यापेक्षा ३१वर्षांनी मोठे होते. घरची आर्थिक परिस्थिती यथातथाच असताना क्षुदीरामांना मृत्यू आला. रामकृष्ण पोरके झाले तेव्हा त्यांचे वय ८ वर्षेहोते.

पूर्वी एकदा क्षुदीराम गयेला तीर्थयात्रेसाठी गेले असता त्यांनी तेथे पितरांना पिंडदान केले व गदाधर विष्णूचे दर्शन घेतले. तेथे स्वप्नात त्यांना गदाधराने दर्शन दिले व सांगितले की ते क्षुदीरामांच्या घरी पुत्ररुपाने जन्म घेणार आहेत. या स्वप्नानंतर वर्षभरातच हा मुलगा झाल्यामुळे क्षुदीराम यांनी मुलाचे नाव गदाधर ठेवले होते. तेच पुढे श्रीरामकृष्ण झाले.

श्रीरामकृष्णांना बालपणापासूनच भाव समाधीची अवस्था प्राप्त झाली होती. त्यावेळी त्यांचे बाह्यसंज्ञा शून्य होऊन खाली पडणे, निरनिराळ्या प्रसंगी लोकांनी पाहिले होते. काहीतरी अर्थार्जनासाठी श्रीरामकृष्णांनी शिकावे व करावे यासाठी ते १६ वर्षांचे असताना बंधु रामकुमार यांनी त्यांना कोलकत्त्यास नेले. त्याच सुमारास कोलकात्याच्या राणी रासमणी ह्या सधन व भक्तिमती स्त्रीने कोलकात्यापासून जवळच दक्षिणेश्वर येथे एक भव्य कालीमंदिर उभारले. मंदिरात कालीमातेच्या मूर्तिची प्राणप्रतिष्ठा करण्यासाठी रामकुमारांना निमंत्रित करण्यात आले व त्यानंतर तेथेच पुजाऱ्याचे काम मिळाले. श्रीरामकृष्ण आपल्या भावाला त्यांच्या कामात साह्य करु लागले. लवकरच रामकुमारांना मृत्यू आल्याने आता पूजेच्या कामाची जबाबदारी रामकृष्णांवर येऊन पडली. वास्तविक ते त्यासाठी तयार नव्हते. पण त्यावेळी त्यांच्या बहिणीचा मुलगा हृदयराम तेथे आला व आपल्या जवळ जवळ समवयस्क मामाला त्यांच्या कामात मदत करु लागला.

पितृतुल्य वडील भावाच्या मृत्यूनंतर रामकृष्ण जगाविषयी अधिकच उदासीन झाले. ते आता सदासर्वकाळ कालीमातेपुढे बसून ध्यानधारणा करु लागले. कालीमातेचे प्रत्यक्ष दर्शनानंतर श्रीरामकृष्णांनी भक्तीमार्गातील सर्व प्रमुख पंथांच्या साधना केल्या व त्यांची अनुभूती प्राप्त करुन घेतली. त्यानंतर संन्यासदीक्षा घेतली व निर्विकल्प समाधीत ते लगेच प्रतिष्ठित झाले. पुढे मुसलमान व ख्रिश्चन धर्माच्या साधना करुन तेथेही त्या त्या देवतेचे प्रत्यक्ष दर्शन घेऊन एका तपाच्या काळात सर्व साधना पूर्ण केल्या होत्या. या अनुभूतीतून ते आता लोकशिक्षणाच्या कार्याला लागले. ईश्वर एकच आहे व त्याच्याकडे जाण्याचे मार्ग भिन्नभिन्न असू शकतात हे त्यांनी जाणले. सर्व धर्म, पंथ हे निव्वळ मार्ग आहेत. माणसाला ते शेवटी नेतात एकाच परमात्मातत्वाकडे ! अशा तऱ्हेने विविध मार्गांमधील विरोध दूर करत त्यांनी त्यांच्यामध्ये समन्वय साधला. म्हणून स्वामी विवेकानंदांनी 'सर्वधर्मस्वरुप अवतारवरिष्ठ' असे संबोधून प्रणाम केला आहे.

आपल्या आईच्या इच्छेनुसार श्रीरामकृष्णांनी लग्न केले होते. चोवीस वर्षेवयाच्या श्रीरामकृष्णांचा विवाह सहा वर्षेवयाच्या

शारदादेवींशी झाला होता. पुढे श्रीरामकृष्णांच्या सर्व साधना आटोपल्यानंतर तारुण्याच्या उंबरठ्यावर असताना शारदादेवी दक्षिणेश्वरला पतीची सेवा करण्यासाठी आल्या. तेथे लवकरच श्रीरामकृष्णांनी देवीभावाने त्यांची शोड्षोपचारे पूजा केली होती. पती धर्माचे पालन करत सारदादेवी पतीच्या धर्मकार्यात त्यांना अडथळा न ठरता सहाय्यक म्हणूनच आल्या होत्या. या पुजेनंतर त्यांची जपधारणा अधिक तीव्र झाली असावी असे श्रीरामकृष्णांच्या तिरोधानंतर त्यांनी पार पाडलेल्या जबाबदारीवरुन म्हणता येते. त्यानंतर श्रीरामकृष्णांचे अंतरंग शिष्य व इतर भक्त यांच्या त्या प्रमुख मार्गदर्शक बनल्या होत्या. वयाच्या ५१ व्या वर्षी कॅन्सरसारख्या दुर्धर रोगाने श्रीरामकृष्णांनी देह ठेवला.

**श्री चैतन्य व श्रीरामकृष्ण : विलक्षण साम्य**

श्री चैतन्य व श्रीरामकृष्ण यांच्या जीवनातील बहुसंख्य घटनांबाबत विलक्षण साधर्म्य व सारखेपणा आढळतो. असे वाटते की श्री चैतन्यच, पुन्हा सुमारे ४०० वर्षांनी अवतरले व अध्यात्मशास्त्रातील सर्व प्रमुख मार्गांची साधना करुन व अनुभूती घेऊन त्यांना बळकटी आणली व समन्वयाचा संदेश देण्यासाठी श्रीरामकृष्णरुपात आले. उभयतांच्या जीवनातील काही साम्य दर्शवणारी स्थळे विचारात घेऊ.



**बालपणापासून भावसमाधी :**

हे दोघेही महात्म्ये पूर्वीच्या बंगाल प्रांतातच जन्मले. बालपणापासून श्री चैतन्यांची एक अस्वाभविक अवस्था होत असे. त्यांच्या बाह्य संज्ञेचा लोप होत असे. शरीराचे विस्मरण होऊन ते जमिनीवर पडत असत. कुणी म्हणे त्यांना वायुरोग झाला, कुणी म्हणे भुताने पछाडले तर काही म्हणत कुठल्यातरी देवतेचा हा प्रकोप असावा. वास्तविक ही सर्व भावसमाधीची लक्षणे होती. कारण श्री चैतन्यांची काही वेळ अशी अवस्था होत असली तरी अन्यथा मात्र ते शारीरिक व मानसिकदृष्ट्या साधारण स्थितीतच असायचे. आई शचिदेवींचे मन मात्र गलबलून जात असे व काहीतरी उपाय करण्याचा त्या प्रयत्न करत.

श्रीरामकृष्णांनादेखील भावसमाधीची लक्षणे बालपणापासून दिसू लागली. आईने दिलेले मुरमुरे मजेने खात बालक रामकृष्ण शेताच्या बांधावरुन भटकत होते. आषाढ महिना होता. निरनिराळ्या आकाराचे काळे ढग आकाशात जमा झाले होते. त्याचवेळी पांढऱ्या शुभ्र बगळ्यांचा एक थवा आकाशात उडत जाताना त्यांनी पाहिला. त्यादृश्याने ते भावविभोर होऊन खाली बाह्यसंज्ञा शून्य होऊन पडले होते. असेच एकदा खेडयातील स्त्रियांबरोबर गावाजवळच्या विशालाक्षी देवीच्या दर्शनाला ते जात होते. सोबतच्या स्त्रिया देवीची स्तुतीपर गाणी म्हणू लागल्या. ती गाणी ऐकता ऐकताच त्यांचे भान हरपले. ते खाली संज्ञाशून्य होऊन पडले. श्री चैतन्यांप्रमाणे श्रीरामकृष्णांची देखील इतर वेळी शारीरिक व मानसिक स्थिती चांगली असे. परंतु आई चंद्रिकादेवी अशा घटनांनी काहीकाळ गडबडून जात व देवीची प्रार्थना करत.

**ज्ञानसाधना व भक्तिसाधना :**

श्री चैतन्यांनी सोळा वर्षाच्या वयापर्यंत सर्व शिक्षण पूर्ण करुन, व्याकरणादि अभ्यास करुन स्वतःची पाठशाळा सुरु केली होती. हे आपण पाहिले. ते अतिशय कुशाग्र बुद्धीचे होते. त्यामुळे शास्त्रावर चर्चा, वादविवाद व अध्यापनात त्यांनी चांगले नाव कमावले. परंतु यातून मनाला समाधान व शांती मिळत नसे. त्याकाळाला अनुरुप विद्वान म्हणवून घेत मग चैतन्यांनी जेव्हा लोकशिक्षणाचा व धर्मशिक्षणाचा विचार केला होता तेव्हा त्यांना जाणवले होते की ढोंगी व्यापारी लोकांमुळे समाजाचे उन्नयन तर होत नाही व लोकांपुढे कोणाचा आदर्शही नाही. त्यानंतर प्रथम संन्यास दीक्षा व विवेक वैराग्यांचा आदर्श प्रस्थापित करण्यासाठी सर्वस्वाचा त्याग केला होता.

अधिक वेगाने धावणाऱ्या आधुनिक युगात श्रीरामकृष्ण आले होते. पुस्तकी विद्या व विज्ञानाला अधिक महत्व मिळाले होते. तेव्हा अध्यात्मसाधना निरक्षर राहूनही करता येते व त्यात सिद्ध होता येते हे आधुनिक जगाला दाखवण्यासाठी व अध्यात्मशास्त्र सत्य आहे हे सिद्ध करण्यासाठी श्रीरामकृष्ण आले होते. ते देखील कुशाग्र बुद्धीचे व विलक्षण स्मरणशक्तीचे असूनही त्यांना शिक्षणात रस नव्हता. पंधरा वर्षाच्या वयात बंधू रामकुमार यांना ते म्हणाले होते, 'उदरभरणाची पैसा मिळवून देणारी विद्या मला नको आहे.' त्यांना दिसून आले होते की ईश्वर, आत्मा, अध्यात्म, धर्म, भक्ती हे नुसते शब्द झाले आहेत. वेद, गीता इत्यादी ग्रंथ व्यापारी वृत्तीच्या विद्वानांच्या एकाधिकाराचा विषय बनले आहेत. म्हणून जळजळीत वैराग्य - कामकांचनाचा त्याग - धारण करुन समाजापुढे उच्च आदर्श त्यांनी प्रस्थापित केले.

**अल्पवयात पितृ-छत्र हरपले :**

श्री चैतन्य व श्रीरामकृष्ण या दोघांचेही वडील अनुक्रमे नवव्या व सातव्या वर्षी मृत्यू पावले होते. त्यामुळे दोघेही पितृप्रेमापासून व मार्गदर्शनापासून वंचित राहिले होते.

**गयेच्या गदाधराचे महत्त्व :**

नवद्वीपात शास्त्रार्थ व वादविवादात व्यग्र असताना श्री चैतन्यांचा संबंध श्रीकृष्ण भक्तीत रममाण झालेल्या भक्ताशी व विद्वानाशी श्री ईश्वर पुरी यांचेशी आला होता. श्री पुरी यांनी त्यावेळी 'श्रीकृष्ण व भक्तिमार्ग' या विषयावर एक रसाळ ग्रंथ लिहिला होता. श्री चैतन्यांनी विद्वता व व्याकरणातील गहनता पाहून श्री पुरी यांनीच तो ग्रंथ तपासण्यासाठी

चैतन्यांना दिला होता. त्यानंतर श्री पुरी यांचेशी झालेल्या सत्संग प्रसंगानी तर त्यांचे मन पांडित्य व तर्क विचारातून पूर्णपणे उडाले. यानंतर एकदा ते गयेला पिंडदानासाठी गेले असता गदाधर विष्णूच्या दर्शनानंतर तेथे त्यांची भेट पुन्हा श्री ईश्वर पुरी यांचेशी झाली. गयेलाच श्री चैतन्यांनी त्यांच्याकडून श्रीकृष्ण मंत्राची दीक्षा घेतली. गदाधराच्या दर्शनाने ते आता पूर्णपणे भक्तिसाधनेत व्यग्र झाले.

श्रीरामकृष्णांच्या बाबतीत देखील गयेचे गदाधर दर्शन महत्वाचे आहे. वडील क्षुदीराम तीर्थयात्रेसाठी तेथे आले, त्यांनी पितरांना पिंडदान केले. रात्री झोपले असताना तेथेच त्यांना स्वप्नात श्री गदाधर विष्णूचे दर्शन घडले. स्वप्नात त्यांना गदाधराने सांगितले की ते स्वतः क्षुदीरामाच्या घरी पुत्ररुपाने जन्म घेणार आहेत. वर्षभरात पुढे क्षुदीरामांना पुत्र झाला. श्री विष्णू गदाधराच्या प्रसादाने झालेल्या पुत्राचे नाव गदाधर ठेवले गेले.

**उभयतांच्या पत्नी व त्यांचे धर्मकार्य :**

श्री चैतन्य व श्रीरामकृष्ण या दोघांच्याही पत्नींनी पतीभक्ती करत त्यांच्या निर्वाणानंतर दोघांचेही कार्य पुढे नेण्यात महत्वाची भूमिका बजावली आहे. संन्यास दीक्षेनंतर घर सोडताना श्री चैतन्यांनी पत्नीला आईची व कुटुंबाची सेवा करण्यास सांगितले होते. आता विष्णूप्रिया पतीच्या अनुपस्थितीत नवद्वीप येथेच राहून कुटुंबाची सेवा करत ईश्वरचिंतनात निमग्न झाल्या. पतीचा आदर्श समोर ठेवून त्यांची साधना शांतपणे सुरु होती.

श्रीरामकृष्णांच्या पत्नी शारदादेवी पतीच्या सर्व साधना पूर्ण होत असतानाच वयाच्या अठराव्या वर्षी दक्षिणेश्वरला त्यांच्या सेवेत रुजू झाल्या. तेव्हापासून तेथे राहत असताना कळत नकळत त्यांचे आध्यात्मिक साधना व शिक्षण चालू झाले होते. पुढे श्रीरामकृष्णांनी त्यांची देवीभावाने पूजा केली व त्यांना कायमस्वरुपात अध्यात्म मार्गाची साथीदार व भविष्यात धर्म मार्गदर्शक म्हणून नियोजित केले होते.

येथे हे लक्षात घेण्याजोगे आहे की, वैराग्याचे मूर्तिमंत प्रतीक असलेल्या श्री चैतन्य व श्रीरामकृष्ण यांनी लग्नाला कधीच विरोध केला नाही. गृहस्थाश्रमाची प्रतिष्ठा कायम ठेवत त्यांनी अध्यात्म क्षेत्रात नवे आयाम प्रस्थापित केले.

श्री चैतन्यांच्या तिरोधानानंतर त्यांच्या अंतरंग शिष्याच्या व अनुयायी भक्ताच्या विष्णूप्रियादेवी प्रमुख आधार बनल्या होत्या. शिष्यांच्या व भक्तांच्या आध्यात्मिक मार्गदर्शनात व अडथळे दूर करण्यात त्यांनी आपले आयुष्य खर्ची घातले. त्यांनी चैतन्यांचे शिष्य श्रीनिवास ठाकुर यांच्यामध्ये शक्तीचा संचार करुन त्यांच्याकडून श्री चैतन्यांच्या कार्याचा प्रसार करवून घेतला होता.

श्रीरामकृष्णांच्या लीलासंवरणानंतर सारदादेवींनी श्रीरामकृष्णांच्या अंतरंग शिष्यांचे व भक्तांचे केलेले मार्गदर्शन विलक्षण होय. श्री सारदादेवींच्या मार्गदर्शनाखाली या अंतरंग शिष्यांनी एकत्र येऊन अशा जीवनाचा आदर्श प्रस्थापित केला की आज शंभर वर्षांपेक्षा देखील अधिक काळ लोटला तरी हे कार्य नुसते सुरु नसून वेगाने जगभर प्रसारित होत आहे. श्रीरामकृष्ण मठाद्वारे सेवाभावी तरुण संन्याशांची एक एक फळी सतत तयार होत जावी अशी योजना करण्यात आली. लौकिकदृष्टचा निरक्षर असलेल्या श्रीसारदादेवी, स्वामी विवेकानंदांसहित सर्व शिष्य व भक्तवर्गाच्या आधार बनल्या होत्या. त्यांना विचारल्याशिवाय कोणतेही नवीन कार्य हाती घेतले जात नव्हते. म्हणूनच श्रीरामकृष्णांचे समस्त अनुयायी त्यांना 'संघजननी' संबोधतात.

**गृहस्थाश्रमाचा आदर्श :**

जगासमोर गृहस्थाश्रमाचा आदर्श उभा करण्यासाठी श्री चैतन्यांनी लहान बंधुसमान प्रिय असलेल्या श्री नित्यानंद यांना गृहस्थाश्रम स्विकारण्यास सांगितले होते. त्यावेळी ते नित्यानंदांना म्हणाले होते, 'बंधू, गृहस्थाश्रम धर्माचा आधार आहे. बाकी तीन आश्रमांचे आश्रयस्थान आहे. सद्‌गृहस्थ नसतील तर चारित्र्यवान, धर्मप्रवण पुत्र-पुत्रींचा जन्म न झाल्यामुळे समाजाचे रक्षण कोण करणार? तुम्हाला गृहस्थाश्रमाचा आदर्श प्रस्थापित करायचा आहे. हे अवघड काम सांभाळण्यास तुम्हीच समर्थ आहात.''

श्रीरामकृष्ण तर अधिकाधिक गृही भक्तातच वावरत होते. गृही भक्तांच्या मेळाव्यात व इतर वेळी गृहस्थाश्रमाचे श्रेष्ठत्व त्यांनी समजावून सांगितले होते. याबाबत, त्यांचा उपदेश असा होता की संसारात राहा पण संसार तुमच्यामध्ये येता कामा नये. नाव पाण्यात असते पण पाणी मात्र नावेत येता कामा नये. संसारात धन अवश्य कमवावे परंतु त्याचा उपयोग दीन, दुःखी, दरिद्री, असहाय्य लोकांच्या सेवेत करावा. लोकांच्या सेवेतूनच व्यक्तीचा मोक्षाचा मार्ग प्रशस्त होतो. यावरुन स्वामी विवेकानंदांनी रामकृष्ण मठ व रामकृष्ण मिशनचे ध्येयवाक्य 'आत्मनो मोक्षार्थ जगद्वीतायच' असे ठेवले आहे.

**धर्मप्रसाराचे कार्य :**

वैष्णव धर्माचा व भक्तिमार्गाचा प्रचार करण्यासाठी श्री चैतन्यांनी भारतातल्या बहुतेक भागात भ्रमण केले. त्यांच्या कार्याची सुरुवात नवद्वीपात झाली व जगन्नाथपुरी येथे येऊन त्यांचा शिष्य व अनुयायी वर्ग वाढवला. त्यानंतर फक्त एका सेवकाला सोबत घेऊन ते दक्षिण भारतात गेले. विद्वता प्रचूर असूनही श्री चैतन्य भक्तिमार्गाचे जे विवरण करत असत त्यामुळे तेथेही त्यांना शिष्य व अनुयायी मिळाले. असे धर्मप्रचारक जे सर्वत्र भटकत प्रसार करतात त्यांना 'बहुचक' असे संबोधले जाते.

श्रीरामकृष्ण मात्र 'सर्वधर्मस्वरुप' होऊनही प्रचारासाठी कोठे गेले नाहीत. अशा लोकांना 'वुटीचक' म्हणतात. श्रीरामकृष्ण म्हणत भ्रमणाची आवश्यकता नाही. कमळ फुलले की भुंगे आपोआप एकत्र येतात. तसेच झालेही होते. काळाला अनुसरुन श्रीरामकृष्णांनी हे कार्य मात्र स्वामी विवेकानंदांवर सोपवले होते. त्यावेळी जेव्हा प्रथम स्वामीजींनी हे काम करु शकणार नाही असे सांगितले तेव्हा श्रीरामकृष्ण म्हणाले होते, 'हे (धर्मप्रचाराचे जगन्मातेचे) कार्य तुला करावेच लागेल.

तूच काय तुझी हाडे देखील करतील.' पुढे झालेही तसेच.

**तीन अवस्था :**

श्री चैतन्य व श्रीरामकृष्ण हे दोघेही अपार कारुण्याची मूर्ती व प्रेमाचे सागर होते. त्यांचा जीवनाचा प्रत्येक क्षण त्यांनी मानवजातीच्या उत्थानासाठी व कल्याणासाठी व्यतीत केला. त्यासाठी त्यांनी कुटुंबाची, शरीराची कशाचीही पर्वा केली नाही. असा त्याग, असा आदर्श सर्वच स्थापन करु शकत नाही म्हणून श्रीरामकृष्ण म्हणत असत, 'अरे मी जे सोळा आणे पूर्ण केले, तुम्ही ते निदान एक आणा तर करा, तरी तुमचे कल्याण होईल.'

या दोघांच्याही तीन अवस्था असत. पहिली बाह्य अवस्था. या दशेत ते भक्तांबरोबर नामसंकीर्तन करत असत. दुसरी अर्धबाह्यावस्था. या दशेत ते भक्तांबरोबर नृत्यात मग्न होत व त्यांना भावावस्था प्राप्त होत असे. तिसरी अंतर्दशा. या दशेत ते निर्विकल्प समाधीत असत. अशा तऱ्हेने त्यांच्या सभोवतीचे वातावरण भक्तिभावाने सतत भारलेले असे.

**समान अल्पआयुष्य :**

श्री चैतन्य यांनी पुरी येथे वयाच्या केवळ ४८ व्या वर्षी लीलासंवरण करुन देह ठेवला व श्रीकृष्णस्वरुपात विलीन झाले. श्रीरामकृष्णांनी वयाच्या ५१ व्या वर्षी काशीपूर कोलकत्ता येथे लीला आवरली व ''घटाकाश महाकाशात विलीन झाले. जगज्जननीने आपल्या लाडक्या पुत्राला आपल्याजवळ घेतले.''

**श्री चैतन्य मधुरभाव व श्रीरामकृष्ण :**

स्वामी सारदानंद लिखित 'श्रीरामकृष्ण लीलाप्रसंग' या चरित्रात्मक ग्रंथात श्रीरामकृष्णांनी अनेकदा श्री चैतन्यांबाबत जे गौरवोद्गार काढले आहेत ते विचारात घेऊन मधुरभावाचे अध्यात्मशास्त्रातच कसे महत्व आहे याचा अल्पसा मागोवा घेत श्रीरामकृष्णांच्या मधुरभाव साधनेची माहिती घेऊ. त्या अनुषंगाने आपोआपच या दोघांनी अध्यात्मशास्त्रात केलेले योगदान वाचकांना स्पष्ट ध्यानात येईल.

स्वामी सारदानंद लिहितात, 'मधुरभाव श्री चैतन्य प्रभृती वैष्णवाचार्यांचे आध्यात्मिक जगताला प्रमुख योगदान होय. त्या लोकांनी मार्ग दाखवला नसता तर तो भाव कधीच ईश्वरलाभासाठी साधकांचा आधार बनला नसता व त्यांना शांतीचे आणि विशुद्ध आनंदाचे अधिकारी करु शकला नसता. श्रीकृष्णांच्या जीवनात वृंदावनलीला ही काही निरर्थक घडलेली घटना नाही. श्री चैतन्य महाप्रभूंचा उदय झाला नसता तर श्रीवृंदावन हे नुसते एक मामुली वन गणले गेले असते.'

**मधुरभाव म्हणजे काय ?**

भगवान श्रीकृष्ण एकमेव पुरुष आहेत आणि 'जगातील स्थूल-सुक्ष्मादी सर्व वस्तू आणि प्रत्येक जीव त्यांच्या महाभावमय प्रकृतीच्या अंशाने उत्पन्न झाला आहे, आणि म्हणून त्यांची पत्नी आहे.' तसे तर पती म्हणजे पालक, स्वामी असा अर्थ होतो. तो सर्वस्वी पत्नीचा सांभाळ करतो. आपला संभाळही भगवान श्रीकृष्ण करत नाही काय? म्हणून शुद्ध व पवित्र अंतःकरणाने जीवाने त्यांना पतिरुपाने भजल्यास त्यांच्या कृपेने त्याला मुक्ती व अखंडित आनंदाची प्राप्ती होते. हेच अर्वाचीन काळात श्री चैतन्य महाप्रभूंनी व नंतर श्रीरामकृष्णांनी आचरलेल्या मधुरभावाचे सार होय.

वैष्णव आचार्यांनी 'मधुरभावाला शांतप्रभृती इतर चार प्रकारच्या भावांची सारभूत समष्टी आणि त्याहूनही अधिक काही लेखले आहे. प्रेयसी ही एखाद्या गुलामाप्रमाणे आपल्या प्रियकराची सेवा करते (दास्य), मैत्रिणीप्रमाणे सर्व अवस्थांमध्ये त्याला सल्ला देऊन त्याच्या आनंदाने उल्हसित नि त्याच्या दुःखाने दुःखी होते. (सख्य) आईप्रमाणे सतत त्याच्या शरीर व मनाच्या पोषणात व कल्याणात गढलेली असते (वात्सल्य) आणि अशा रीतीने स्वतःला विसरुन जाऊन आपल्या प्रियतमाचे कल्याण साधून व मन रमवून त्याचे अंतःकरण अपूर्व शांतीने (शांत) तुडुंब भरुन टाकत असते.' भक्त क्रमाक्रमाने एकएका भावाची साधना करत शेवटी सर्वश्रेष्ठ अशा मधुरभावात पोहोचतो व चिरंतन आनंदाचा अधिकारी होतो.

**पुरुष जातीला मधुरभावाची साधना का ?**

ईश्वरावर पतिभावाचा आरोप करुन साधना करणे स्त्री जातीला स्वाभाविक व सहजसाध्य आहे. परंतु पुरुष शरीर असलेल्यांना ते अस्वाभाविक वाटते. मग श्री चैतन्यांनी असा न शोभणारा साधनमार्ग लोकांमध्ये का जागृत केला? याचे उत्तर असे की, 'युगावताराची समस्त कार्येलोककल्याणासाठी घडत असतात. बौद्ध युगाच्या सरत्या काळात वज्रयान मार्ग व त्या मताचे आचार्य उदयास आले होते. परंतु पुढे ते मत विकृत होत गेल्यामुळे देशात व्यभिचाराचे प्रमाण वाढले होते.' म्हणून 'भावाच्या मदतीने अखंडित आनंद प्राप्त करुन घेण्याची अभिलाषा असणाऱ्या ह्या काळातील खऱ्याखुऱ्या साधकांना रस्ता सापडेनासे झाले होते' अशावेळी प्रथम श्री चैतन्य आले व अलिकडील काळात श्रीरामकृष्णांचा अवतार झाला आहे.

श्री चैतन्यांनी अद्भूत त्याग व वैराग्याचा आदर्श स्वतःच्या जीवनात आचरुन तो साधकासमोर प्रस्थापित केला. शुद्ध व पवित्र होऊन स्वतःला प्रकृती म्हणजे स्त्री समजून ईश्वराला पती म्हणून भजल्यास जीव भावराज्यातील अखंडित दिव्यानंदाची प्राप्ती करुन घेण्यास समर्थ होतो, हे त्यांनी दाखवून दिले. भारताच्या अध्यात्मिक वारशाला श्री चैतन्य महाप्रभूंचे हे सर्वात मोठे योगदान आहे.

श्रीरामकृष्ण वृंदावनलीले विषयी उत्साहाने बोलताना पाहात की 'त्यांच्याकडे आलेल्या व इंग्रजी शिकलेल्या नवयुवकांना ती रुचकर वाटत नाही. तेव्हा ते म्हणत असत, ''तुम्ही लोक ह्या लीलेमधील श्रीकृष्णप्रतीची श्रीमतीच्या मनाची केवळ ओढच का बघत नाही? ईश्वराविषयी मनाला जेव्हा अशी ओढ वाटते तेव्हा तो मिळत असतो. बघा, गोपी ह्या पति-पुत्र, कुल-शील, मान-अपमान, लज्जा-घृणा, लोकभय-समाजभय सारे सोडून श्री गोविंदासाठी कोठवर वेड्या होऊन गेल्या होत्या ! असे करु शकल्यासच भगवंताचा लाभ होतो.

कामगंधहीन झाल्याखेरीज महाभावमय श्री राधेचा भाव कळायचा नाही.''

**भावावस्थेचे सत्य :**

माणूस मुळातच स्वार्थी आहे. त्यामुळे सामान्य माणसाला त्याग भाव वगैरे गोष्टी अशक्यप्राय नव्हे तर असत्य व ढोंगीपणा वाटतात. आज मानसशास्त्राचे विद्वानही मान्य करतात की, एखाद्या गोष्टीवर मन एकाग्र करुन तिची तशी कल्पना केली की तिच्याशी एकरुप होता येते. स्वामी विवेकानंद एकदा श्रीरामकृष्णांसमोर श्रीराधाकृष्णाच्या वृंदावनलीलेच्या ऐतिहासिकत्वाविषयी आक्षेप घेऊन तिचा खोटेपणा सिद्ध करण्याचा प्रयत्न करु लागले. यावर श्रीरामकृष्ण त्यांना म्हणाले, ''ठीक आहे. मानले की राधिका म्हणून कुणी कधी नव्हती – कुणातरी प्रेमळ साधकाने राधेच्या व्यक्तित्वाची कल्पना केली आहे. परंतु त्या भूमिकेची कल्पना करतेवेळी त्या साधकाला श्रीराधेच्या भावात अजिबात तन्मय व्हावे लागले होते, हे तर मानतोस ? आणि तसे असेल तर तो साधकच त्यावेळी स्वतःला विसरुन राधा झाला होता आणि वृंदावनलीलेचा अभिनय स्थूलरुपानेही (प्रत्यक्षात) झाला होता हे सिद्ध होते.''

**श्रीरामकृष्णांची मधुरभाव साधना :**

श्रीरामकृष्णांनी मधुरभावाची जी साधना केली ती खरोखरच अद्‌भुत आहे. ही साधना सुरु करताना श्रीरामकृष्णांनी इतर साधनांच्या वेळी देखील जसे वेश, रुप, आचार, विचार धारण करावयाचे असतात त्याप्रमाणे आता संपूर्ण स्त्री वेष धारण केला होता. परमभक्त मथुरामोहन यांनी त्यांच्यासाठी बनारसी साडी, घागरा, ओढणी वगैरे वस्त्रे आणून दिली. परत कुरळ्या केसांचा एक केशकलप आणून दिला. विविध दागिने आणून त्यांना भूषित केले होते. तसल्या वेषभुषेने सजून श्रीरामकृष्ण हरिच्या केवळ प्रेमासाठीच हपापलेल्या व्रजगोपींच्या भावात हळूहळू इतके मग्न होऊन गेले होते की त्यांचा प्रत्येक विचार व बोलणे स्त्रियांसारखे होऊन गेले होते. या साधनेच्या काळात ते सहा महिने संपूर्ण स्त्री वेषात राहिले होते. याकाळात त्यांचे आचरण–चालणे, फिरणे, हसणे, कटाक्ष, हावभाव आणि शरीराची व मनाची प्रत्येक क्रिया हुबेहुब स्त्रियांसारखे होऊन गेले. त्यांच्या साधनेचे वर्णन स्वामी सारदानंद लीलाप्रसंगात असे करतात –

'' श्रीरामकृष्ण अनन्य चित्ताने श्रीराधा व श्रीकृष्णाच्या सेवेत रत झाले. दिवसामागून दिवस जाऊ लागले. दिवस असो वा रात्र... त्यांच्या ह्दयातील त्या व्याकुळ प्रार्थनेला खळ पडत नसे...हळूहळू ही प्रार्थना व्याकुळ क्रंदनात आणि प्रतिक्षा उन्मत्त उत्कंठेत रुपांतरीत होऊन त्यांनी त्यांच्या आहारनिद्रादिकांचा लोप करुन टाकला. आणि विरह? अत्यंत प्रियजनांशी सर्वप्रकारे मिलित होण्याची असीम लालसा नाना विघ्नांनी व अडथळ्यांनी अवरुद्ध झाल्यास मानवाची ह्दय–मन घुसळून काढणारी, शरीर इंद्रिये विकल करणारी जी अवस्था तिलाच विरह म्हणतात. तो त्यांच्या ठायी मनोभावाच्या रुपाने प्रकट होऊनच थांबला नाही तर त्यांनी साधनाकाळी प्रथमावस्थेत अनुभवलेली भयंकर शारीरिक उष्णता व दाह यांच्या रुपानेही अविर्भूत झाला. ह्या काळात त्यांच्या शरीरावरील केसांच्या छिद्राछिद्रातून मधून–मधून रक्त निघत असे, देहाचे सांधे मोडल्यासारखे ढिले वाटू लागत. आणि देह कधी कधी मृतासारखा संज्ञाशुन्य होऊन पडून राही.''

अशा तीव्र खडतर साधनेच्या शेवटी शेवटी ते समजले होते की राधाराणीच्या कृपेखेरीज श्रीकृष्णाचे दर्शन असंभाव्य आहे. त्यामुळे ते तनमनाने श्री राधेच्या पादपद्मी आपल्या ह्दयातील व्याकुळता व उत्कंठा निवेपित करु लागले. लवकरच त्यांना राधाराणीचे दर्शन झाले. या दर्शनानंतर त्यांना काही काळ आपण श्रीमती राधा आहोत असा अनुभव येत राहिला होता. त्यानंतर तीन महिन्यांनी त्यांना प्रत्यक्ष श्रीकृष्णाचे दर्शन झाले व त्यातून दिसलेले रुप इतर सर्व रुपांप्रमाणेच त्यांच्या शरीरात मिसळून गेले.

**उपसंहार :**

मधुरभावात असताना, श्री विष्णूमंदिरासमोरील दालनात श्रीरामकृष्ण श्रीमद्‌भागवताचा पाठ ऐकत बसले होते. ऐकता ऐकता भाबोविष्ट होऊन त्यांना भगवान श्रीकृष्णाच्या ज्योतिर्मय रुपाचे दर्शन झाले. नंतर त्यांना असे दिसले की त्या मूर्तिच्या पादपद्मापासून ज्योत निघून तिने प्रथम भागवताच्या पोथीला स्पर्श केला व नंतर त्यांच्या वक्षस्थलाला स्पर्श करुन काही काळ तेथे स्थिरावली होती. म्हणजे श्रीकृष्णाचे चरण, भागवत पोथी आणि रामकृष्ण यांना त्या ज्योतीने काही काळ जोडून ठेवले होते. यावरुन श्रीरामकृष्णांची अशी पक्की धारणा झाली की भागवत, भक्त व भगवान या तीन वस्तू दिसत असल्या तरी त्या एकच वस्तू आहेत किंवा एकाच वस्तूचे तीन अविष्कार होत. त्यानंतर ते नेहमी म्हणत असत, ''भागवत (शास्त्र), भक्त व भगवान तिन्ही एक, एकच तीन !'' यावरुन मधुर भावाच्या साधनेचे श्रेष्ठत्व व महात्म्य आपोआपच स्पष्ट होते.

श्री चैतन्यमहाप्रभू व श्रीरामकृष्ण परमहंस यांच्या जीवन व संदेशाचा हा अतिशय धावता आलेख आहे. मधुर भावाच्या साधनेतून भक्तिमार्गाचा झेंडा सतत उंचावत ठेवणाऱ्या या महाभागांच्या चरणी विनम्र अभिवादन !

**संदर्भ:**

१. स्वामी सारदेशानंद : श्री चैतन्य महाप्रभु : हिंदी अनुवाद स्वामी विदेशात्मानंद, अद्वैत आश्रम (प्रकाशक विभाग) ५, डी, हीएंटली रोड, कलकत्ता, प्रथम आवृत्ती २००१

२. स्वामी सारदानंद : श्रीरामकृष्णलीलाप्रसंग : मराठी अनुवाद, स्वामी शिवतत्वानंद, रामकृष्ण मठ, नागपूर, आवृत्ती २००२

३. श्री महेंद्रनाथ गुप्त : श्रीरामकृष्णवचनामृत : मराठी अनुवाद, स्वामी शिवतत्वानंद, रामकृष्ण मठ, नागपूर, आवृत्ती २००४

**प्रा. के. टी. कोलते**

५५ अत्रेय लेआऊट, प्रतापनगर, नागपूर – ४४००२२



# श्री नारदभक्तिसूत्र आणि श्रीरामकृष्ण

**सौ. वंदना श्रीराम कुलकर्णी**
गृहिणी, रामकृष्ण मठ, पुणे संबंधित. दीक्षा – ब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराज, अध्यात्मावर लेखन. संत वेणाबाईंवर प्रवचने.

आजच्या विज्ञानयुगात धर्म, भक्ती, देव ह्या संकल्पनांना गुळगुळीत नाण्याप्रमाणे कालबाह्य केला गेलंय असं वरवर पाहता वाटत असतं ! तरी अंतरिक दृष्टीने पाहू गेल्यास त्या गोष्टींचं महत्त्व उलट आता जास्त पटू लागलंय असं वाटतं. अन्यथा स्विझर्लंड सारख्या अतिसमृद्ध देशात त्झुरिचसारख्या अद्ययावत विमानतळावर देखील (Meditation Room) ध्यान–गृहाची रचना झाली नसती.

विज्ञानाने आपल्याला फक्त बाह्य सुखसोई पुरवल्या पण अंतरंगात बदल करणं विज्ञानालाही कधी शक्य झालं नाही. कारण अंतरंगाचं विज्ञान हे वेगळंच शास्त्र आहे. बहिरंग आणि अतरंग हे दोन वेगवेगळे भाग मनाचे, शरीराचे वाटत असले तरी त्याचं अस्तित्व एकाच चैतन्यमय रुपात विद्यमान आहे. हे दिसलं म्हणजे सगळा खेळ–खंडोबा होतो.

आता ह्या अंतरंगाचं जे विज्ञान आहे ते अनेक रुपांनी आपल्या वेदांतात मांडलं गेलंय. अनेक योग आहेत, अनेक साधनांचे प्रकार आहेत पण माणसाच्या मनाला अत्यंत सहजतेनं आणि विनासायास परमेश्वर प्राप्तीकडे अग्रेसर करणारं जर कोणतं शास्त्र असेल किंवा मार्ग असेल तर तो भक्तीचाच होय. कारण भक्तीचं वैशिष्ट्य असं आहे की भक्ती हेच साधन आणि भक्ती हेच साध्य आहे. कसं ! तर हेच आपल्याला समजावून देण्यासाठी भक्तश्रेष्ठ ब्रह्मर्षी श्रीनारदमहर्षींनी ह्या साऱ्या गोष्टी सूत्ररुपांनी आपल्या हाती ठेवल्या आहेत. त्या सूत्ररुपात असल्याने अत्यंत कमी शब्दात पण महद्‌आशयघन अशा आहेत.

विभक्त नव्हे तो भक्त अशी सुंदर व्याख्या समर्थ रामदासांनी केली. पण त्या अनंत चैतन्यरुप परमात्म्याला संलग्न व्हायचं म्हणजे नेमकं काय करायचं हे कळत नाही. त्यासाठी नारद त्या परमात्म्याचं स्वरुप उघड करुन दाखवतात आणि त्याच्या जवळ जाण्याचा जो अगदी सोपा सुलभ मार्ग म्हणजे भक्ती. त्याची व्याख्या सांगतात. नारद म्हणतात, 'अथातो भक्तीम् व्याख्यास्यामः।' म्हणजे अथः म्हणजे आता. आता म्हणजे काय ?

पूर्वी तुमचं सारं मन संसारात अडकून राहिलं होतं. परमेश्वराकडे पाहण्यासाठी, तो आहे, नव्हे तोच आपलं मूळ स्वरुप आहे हे समजावून घेण्यासाठी मन तयार नव्हतं. ह्या संसाररुपी ज्वालेचे भयंकर चटके, दुःखाघात सहन करुन त्याची (संसाराची) फोलता मनोमनी पटून मग मन जेव्हा विचार करु लागतं की, खरंच ! खरं सुख, खरी शांती, स्थायी आनंद जो कधीच कोणी हिरावून घेणार नाही असं सारं मला कुठं व कशामुळे मिळेल. आतला परमेश्वर उत्तर देतो ''तुझं मूळ स्वरुपच आनंदमय, प्रेममय, नुसतं प्रेममय नव्हे तर परम प्रेममय आहे.''

**सात्वास्मिन्परमप्रेमरुपा :**

प्रेम हा आवेग नाही तर प्रेम हा आपला स्थायी भाव आहे. प्रेम हे आपलं स्व–स्वरुप आहे. तो एक विशुद्ध अध्यात्मिक भाव आहे. प्रेमाचं सर्वश्रेष्ठ लक्षण कोणतं ? तर ते घटत नाही. उदा. आईचं प्रेम. ते जन्मभर तसंच राहतं जसं सुरुवातीला आहे. आईच्या हृदयातलं प्रेम सतत वहात राहतं. एकसारख्या धारेसारखं त्यात खंड पडत नाही, ना ते कमी होतं. प्रेम कधीच जुनं होत नाही. नित्यनूतनता हे त्याचं वैशिष्ट्य आहे. त्यामुळे ते नीरस होत नाही. खऱ्या प्रेमात, शुद्ध प्रेमात, रस नेहमी तसाच राहतो जसा तो प्रथम होता. उलट प्रतीक्षण वर्धमान होत राहतो. खऱ्या प्रेमात कधीही तृप्ती होत नाही. त्या परम प्रेमास्पद प्रती नेहमी मन ओढ घेत रहातं. आईला मूल कितीही वेळा पाहिलं तरी तृप्ती होत नाही. प्रेमात भय नसतं. ज्याच्यावर आपण प्रेम करतो त्याची आपल्याला कधीही भीती वाटत नाही. भीती ऐश्वर्यामुळे वाटते. जसं अर्जुनाला विश्वरुप दर्शन दाखवल्यावर तो घाबरुन गेला. म्हणाला, तू नेहमीसारखा माझ्या समोर ये. ह्या रुपाने मला भीती वाटते. म्हणून श्रीरामकृष्ण म्हणत, देवाच्या ऐश्वर्यावर प्रेम करु नका. त्याच्यावर, देवावर प्रेम करा. प्रेमामध्ये अभाव असू शकत नाही. आणि त्याला विलंबही लागत नाही. ज्याक्षणी मूल जन्म घेतं त्या क्षणापासूनच आईचं प्रेम पाझरत रहातं. प्रेमामध्ये निकटता असते. त्याचा आवेग तीप्राती तीव्र असतो. प्रेमास्पदाची ओढ मनाला स्वस्थ बसू देत नाही. श्रीकृष्णाची बासरी वाजू लागताच गोपी घरात थांबू शकत नसत. प्रेम आपल्याहून आपलं असतं. गिरीषचंद्र घोष म्हणत असत, 'मी माझ्यावर करतो त्याहूनही अधिक प्रेम श्रीरामकृष्णांनी माझ्यावर केलं'. प्रेम हृदयापासून होतं. हृदय हे असं स्थान आहे जिथं

आपल्या जाणीवेच्या सर्व अनुभूती येतात. ते विश्वाइतकं मोठं होऊ शकतं, म्हणूनच म्हणतात, वसुंधैव कुटुंबकम् । हृदय अंतःकरणाचा आधार आहे, इंद्रिय निरपेक्ष अनुभूती घेण्याचं ते स्थान आहे. प्रेम आपल्या प्रियगोष्टीत दोष बघत नाही. प्रेमामध्ये व्यवहार नसतो. देणघेणं काही माहित नसतं प्रेमाला. खरं प्रेम हे एकदेशीय असतं. त्यात दोन कधीच राहू शकत नाहीत. त्यामुळेच त्यात विनिमय नाही. प्रेम प्रेमासाठीच असतं. असं हे परमप्रेम ईश्वरा शिवाय मानव कोणावर करु शकत नाही. असा तो 'परमप्रेमरुप' ईश्वर अगदी आपल्या जवळ आहे. केवळ मनाची बाह्य ओढ आतमध्ये परमेश्वराकडे वळवण्याचाच अवकाश !

श्रीरामकृष्ण म्हणतात, ''भक्ताला जात नसते'. त्यांच्या लेखी सर्वमानव म्हणजे केवळ खोळी आहेत. आतमध्ये तो एकच परमेश्वर भरुन राहिला आहे. त्यांच्याकडे एक रसिक मेहतर म्हणून भंगी काम करीत असे. त्याला एकदा काय वाटलं कोणास ठाऊक ? इतके दिवस दाबून ठेवलेली भक्तीची उर्मी उफाळून आली आणि श्रीरामकृष्ण शौचालयाकडून परत येत असता त्यानं वाटेत त्यांना दंडवत घातला. श्रीरामकृष्ण क्षणभर थांबले. त्याची उर्मी बघून आनंदले. त्याच्याकडे पहात म्हणाले, ''काय, आज काय आहे हे ?'' तो म्हणाला, ''तुम्हाला सारे जण अवतार समजतात, थोर पुरुष मानतात. मग माझ्यासारख्या *हीन-दीन माणसावर तुम्ही कृपा करणार नाही का ?'' क्षणाचाही विलंब* न लावता श्रीरामकृष्णांनी त्याच्यावर असीम कृपा केली. त्याचा उद्धार केला. ह्याला म्हणतात परमप्रेम ! प्रेमाला जात माहित नाही. घृणा, द्वेष काही माहित नाही. म्हणूनच भक्तीला मातेची उपमा दिली आहे. माता आपल्या मुलाला घाण, अस्वच्छ बघू शकत नाही. त्याला स्वच्छ करुन, मांडीवर घेऊन त्याच्यावर प्रेमाचा वर्षाव करते. ह्या भक्ती सूत्राचं हेच वैशिष्ट्य आहे. ती आपल्याला आपण जसे व जिथे आहोत तिथून उन्नत करत नेते. अध्यात्मात 'अधिकार' हा एक परवलीचा शब्द आहे. पण भक्तीमध्ये सारे समान आहेत.

भक्तीसूत्रांचं आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे ती अत्यंत सरळ, सोपी, सुलभ आहेत. भक्तीपथ अगदी सोपा सरळ आहे. त्यात ओढून ताणून न्यास करा, क्रिया करा असलं काही बंधन नाही. श्रीरामकृष्णांचं मनही अगदी सरळ होतं. त्या मनाला भगवंताशिवाय दुसरं काही माहित नव्हतं. एकदा त्यांच्या गावातल्या काही स्त्रिया, मुले वगैरे असा जथ्था त्यांच्या गावाजवळ असलेल्या विशालाक्षी देवीच्या दर्शनासाठी निघाला. जाताना वाटेत भक्त स्त्रिया देवीची सुंदर गाणी गात होत्या. त्या नुसत्या तोंडाने ती गाणी गात होत्या पण त्या गाण्यांमधला भाव सरळ हृदयाच्या श्रीरामकृष्णांच्या हृदयात प्रगटत होता. त्या भावाच्या, त्या भक्तीच्या उर्मीमुळे त्यांच्यात एक कसं भावांतर होऊन गेलं आणि ते स्तब्ध होऊन गेले. त्यांची समाधी लागली. भगवंताचं भजन कसं करावं ह्याचं हे उदाहरण. तो भाव हृदयात प्रकटला पाहिजे. अशी सहज, सरल भक्ती, त्यात जे मन रमून जातं त्याला ह्या क्रिया म्हणजे काय ? प्राणायम काय ? समाधी म्हणजे काय ? त्याची जाणीवही न होता त्या प्राप्त होतात. त्यामुळे भक्ताला त्याचा अहंकारही स्पर्शत नाही. व त्या अहंकाराचा नाश करण्याचा खटाटोपही करावा लागत नाही. मन सरळ ईश्वराला जाऊन भिडतं, इतकं की त्याचे सर्व आश्रय सुटून जातात. ''अन्य आश्रयाणां त्यागो अनन्यता'' अशी त्याच्या मनाची स्थिती होऊन जाते. ते भक्तीत रमलेलं मन मग आपल्या इष्ट देवतेशी एकरुप होऊन जातं. त्याला प्रत्येक गोष्ट आपल्या इष्ट देवतेला विचारल्याशिवाय करताच येत नाही.

श्रीरामकृष्ण एकदा गंगेवर आंघोळीला गेले असताना त्यांना लांबून एका साधूने निरखून पाहिलं. त्याचं नाव तोतापुरी महाराज. ते जवळ आले. श्रीरामकृष्णांना विचारलं, ''तू अद्वैत वेदांताची' साधना करशील का ? कारण इतर बाह्य लक्षणांवरुन तोतापुरींना ही व्यक्ती उच्च अधिकारी व वेदांत साधनेस अती मोठा आधार वाटत होता. श्रीरामकृष्ण तत्काळ म्हणाले, ''आईला विचारुन सांगतो.'' श्री तोतापुरींना वाटलं की त्यांची जन्मदात्री आई जवळच कुठे रहात असेल, तिला विचारुन सांगतील. पण बघतायत तर काय ? हे आपले थेट चालले जगदंबेच्या मंदिरात. तिथून बाहेर पडून येऊन म्हणतात की आईने सांगितले, ''हो शिक, तुझ्याचसाठी त्याला इथं आणलंय.'' म्हणजे ? साक्षात जगदंबा, श्रीकालीमाता, ती आनंदमयी माँ. त्यांच्याशी बोलली? हो! अगदी *तसंच ! कारण श्रीरामकृष्णांना त्यांची इष्टदेवता श्रीकालीमाता ही मृण्मयी* मातीची अशी कधी वाटलीच नाही. नव्हे त्यांच्या परम व्याकुळतेच्या आर्त साधनेमुळे तिला प्रकट व्हावेच लागले. ते तिच्याशिवाय अन्य कोणाचा आश्रय घेणार. त्यांचं मन सर्वथैव 'आईच्या' भावांनी ओतप्रोत भरुन राहिलं होतं. त्या मनाला अन्य कोणाचीही आधारासाठी गरजच भासली नाही.

भक्तीची लक्षणं अनेक ऋषींनी वेगवेगळी सांगितली. पराशर म्हणतात, पूजा आदी व्यवहारांविषयी अनुराग म्हणजे भक्ती. भगवद् कथा आदींवर प्रेम म्हणजे भक्ती असं गर्ग्य मुनी म्हणतात. आत्मरती अशी मनाची सतत असणारी अवस्था म्हणजे भक्ती असं शांडिल्य म्हणतात. पण नारद म्हणतात थांबा, तुम्ही एकतर बाहेरचं किंवा आतलं, असं बोलताय. मी म्हणतो (नारद म्हणतात) ''तदर्पितारिबलचारिता, तद् विस्मरणे परम व्याकुळता'' त्या इष्टाच्या, परमप्रेमाच्या आस्पदाप्रती आपली अखिल म्हणजे सगळे आचार-विचार, व्यवहार, हे सर्व त्याला समर्पित असायला हवेत. हे झालं बाहेरचं आणि असे सर्व व्यवहार त्या इष्ट देवतेला घरुन करीत असताना जरा जरी, थोडंस जरी त्याचं विस्मरण झालं तरी अंतरामध्ये अति-तीव्र व्याकुळता निर्माण होते. हे झालं आतलं.! असं बहिरंग आणि अंतरंग दोन्ही जेव्हा त्या परमप्रिय प्रेमास्पदासाठी समर्पित होईल त्याला म्हणतात भक्ती.

श्रीरामकृष्ण जेव्हा कालीमातेचे पुजारी म्हणून काम करु लागले, तेव्हा त्यांच्या सरळ मनाला हे पक्क माहित होतं की ही जी आपल्यासमोर देवीची मूर्ती विराजमान आहे ती केवळ मूर्ती नाही. ती साक्षात् जगदंबा

आहे. पण आपल्याला ती अजून दर्शन का देत नाही? चिन्मय रुपात ! तिच्या चिन्मय दर्शना शिवाय मनाला शांती मिळणार नाही. श्रीरामकृष्णांचं मन इतकं व्याकुळ होऊन गेलं ह्या वेदनेनं की ते आपलं तोंड वाळूमध्ये रगडत असत. सार अंग रक्तबंबाळ होई. पण अजून ती का दर्शन देत नाही? तिच्या विरहानं डोळ्यांमधून इतका अश्रुपात होई की कपडे सारे ओले चिंब होऊन जात. अत्यंत व्याकुळतेनं ते आईला विनवीत. 'आई तू रामप्रसादांना दर्शन दिलंस तू.... ना दर्शन दिलंस, मग मी काय तुझ्या जगा बाहेर आहे का? तू साऱ्यांची आई आहेस ना? मग असा भेदभाव का करतेस? मला लवकर दर्शन दे ! त्यासाठी माझे प्राण व्याकुळ झालेत.'' संध्याकाळ होई, रात्र पडे. श्रीरामकृष्ण म्हणत, 'आई अजून एक दिवस संपला पण तू मला दर्शन दिलं नाहीस'. असं व्याकुळ होता होता एक दिवस असा आला की त्यांना तिच्या दर्शनाशिवाय जगणं कठीण होऊन गेलं. मंदिरात असलेलं खड्ग उचलून ते आपल्या मानेवर मारुन घेऊन प्राणही त्यागण्याची त्यांची तयारी झाली. इतकी परम व्याकुळता उत्पन्न झाल्यावर त्याक्षणी श्रीजगदंबा प्रगट झाली. श्रीजगदंबेच्या दर्शनानंतर श्रीरामकृष्णांमध्ये काय बदल झाले?

श्रीनारद म्हणतात, ''यल्लब्ध्वा पुनमान्सिद्धो भवति, अमृतो भवति, तृप्तो भवति ।। श्रीरामकृष्ण सिद्ध झाले म्हणजे नेमकं काय झालं? आपण ज्या चमत्कार दाखविणाऱ्या सिद्धी म्हणतो तशा सिद्धी खऱ्या भक्तीनं प्राप्त होत नाहीत. तर उलट खऱ्या सिद्धी भक्ताला त्या सिद्धींची फोलता कळून येते. श्रीरामकृष्णांना गळ्याचा रोग झाला तेव्हा कोणीतरी विचारलं 'आईनं तुम्हाला इतक्या जवळ घेतलयं, मग तिच्या अष्टसिद्धिंनी तुम्ही तुमचा रोग बरा का करुन घेत नाही? हे अनय आश्रित, आईला जाऊन म्हणाले, ''आई अमुक असं असं म्हणतो, ह्या सिद्धी वगैरे काय असतात?'' आईनं दाखवलं एक वेश्या आली आणि तिने खूप सारी विष्ठा विसर्जन केली. त्या विष्ठेकडे बोट दाखवून आई म्हणाली, ''ह्या सिद्धी' ! हव्यात? इतकी किळस आली की, ते लगेच म्हणाले, ''नको, नको आई ह्या सिद्धी तुझ्याजवळच ठेव ! मग श्रीरामकृष्ण सिद्ध झाले म्हणजे नेमकं काय झालं?

आपल्याला अतृप्ती का येते? कारण आपण विषयांपासून मिळणाऱ्या सुखांमध्ये तृप्ती मानतो. पण हे सर्व विषय-वस्तू ह्या बदलणाऱ्या आहेत. त्यांच्यामागे धावून क्षणिकचं सुख, तृप्तीची भावना येऊ शकते. पण स्थायी, कधीही न संपणारी अशी तृप्तीची भावना, मनाची अवस्था केव्हा येते? आपल्या जवळात जवळ असणारी, अगदी आपली अशी एक गोष्ट आपल्या जवळ आहे. ती म्हणजे 'भगवंत' तो ! तुम्ही त्याच्याकडे लक्ष द्या, देऊ नका, तुमच्या सर्व व्यवहारात तुम्ही त्याला विसरुन जा. पण तो तुम्हाला विसरत नाही. सोडून जात नाही. तो स्थायी, चिरंतन, अनंतकाळचा आपला सोबती 'आपलं खरं स्वरुप' आहे आणि मी त्याला पकडल्याशिवाय स्थायी शांती, तृप्ती, आनंद मिळणार नाही. स्वतःच बदलणारी गोष्ट तुम्हाला शांती, आनंद, स्थाई स्वरुपाचा कशी देऊ शकेल? म्हणून विषय वासनांच्या उपभोगाने तृप्ती कधीच मिळणार नाही. तर त्यांच्या त्यागानेच, त्यांच्या निर्वासनतेनेच स्थायी तृप्ती मिळू शकेल. वासनांची पूर्ण निवृत्तीच भक्तीची सिद्धी आहे आणि त्यामुळे मिळणारी शांती, आनंद जो न संपणारा आहे हेच भक्तीचं फलित आहे म्हणूनच भक्ती हेच साधन आणी भक्ती हेच साध्य आहे.

परमेश्वरप्राप्तीच्या इच्छेमुळे इतर सर्व इच्छा सुटून जातात. मग अतृप्तीची भावनाही निघून जाते. मनात ईश्वराविषयी परम ओढ, अनुराग उत्पन्न होतो. तो मिळाल्यामुळे, ईश्वर पूर्ण असल्यामुळे मनुष्य 'पूर्णकाम' होऊन जातो.

श्रीरामकृष्णांच्या बाबतीत अगदी तसच झालं. ते ज्या मंदिराचे पुजारी होते, त्या मंदिराच्या मालकांनी श्रीरामकृष्णांना अनेकदा विचारलं की मी काही पैसे तुमच्या नावावर ठेवतो, तुम्ही संमती द्या. श्रीरामकृष्ण त्यांच्या अंगावर धावून गेले व म्हणतात कसे,, ''तू मला विषयी बनवू पहातोस''! बघा एका ईश्वराशिवाय कोणतीच वासना नसलेलं हे स्वच्छ, सुंदर, निर्मळ, सरळ मन! संसारुपी सुमद्रात तरंगत होतं पण ह्या संसारसागराचे बिंदूभरही पाणी त्यांच्या नौकेत त्यांनी शिरु दिलं नाही.

त्यांच्या पत्नी श्रीसारदादेवी तरुण वयात त्यांच्याकडे रहावयास आल्या. त्यांनी आपल्या पत्नीला आपल्या खोलीत एकाच अंथरुणावर निजण्यास सांगितले. पण भक्तीच्या परमप्रेमाचा स्वच्छंद आस्वाद घेणारं त्यांचे मन सामान्य भूमीवर कधीच राहिलं नाही. रात्र रात्र ते अखंड समाधीत बुडून जाई. श्रीसारदादेवी कधी भीत, कधी काळजीत पडत. त्यांचे भाचे हृदयराम मग काही मंत्र म्हणून ते मन निम्नभूमीवर आणीत. इतक्या उच्च कोटीचं त्यांच दांपत्यजीवन ही आतापर्यंतच्या इतिहासात न सापडणारी गोष्ट आहे. विषयवासनांच्या निवृत्तीमुळेच परम अनुराग व प्रेम ईश्वराप्रती निर्माण होत असतं. वासनांच्या लहरी नसल्यानेच ते स्तब्ध होते. यज्ज्ञात्वा मत्तो भवति, स्तब्धो भवति, आत्मारामो भवति.

ह्या 'परमप्रेमा'च्या ईश्वरप्राप्तीच्या आनंद सुखामुळे मन कसं होतं, त्याचं वर्णन नारदांनी केलं. आता नारद त्या परमप्रेमामुळे मनात होणाऱ्या बदलांची चर्चा करीत आहेत. ते मन कसं व्यवहार करतं? ते मन त्या प्रेममयाच्या प्राप्तीनं इतकं तृप्त झालंय की त्याला कशाचीही इच्छा उरली नाही. 'न किंचितवांच्छति'. का? ईश्वर ही सर्व समावेशक सर्वांची अंतरसाक्षी अशी वस्तू आहे. त्या ईश्वरात सर्वांचा समावेश होतो. त्याच्या प्राप्तीनं ! हृदय ही त्याची राहण्याची जागा आहे. ते इतकं मोठं होतं की सारं विश्व हृदयात सामावलं जातं. त्या हृदयाला जर सर्वच मिळाल तर ते कशाची इच्छा करणार? 'न शोचति' कोणाकोणाची चिंता करणार? जर दुःख असेल, चिंता असतील तरच ना शोचति ! पण इथे मन तृप्त आहे, आनंदात आहे. श्रीरामकृष्ण सतत आनंदविभोर असत. त्यांच्या मनाला कसलीच उपाधी नव्हती. ते पूर्णकाम होऊन गेले होते. असं होतं, का त्यांना व्याधी झाली नाही. पण ते म्हणत 'देह जाने दुःख जाने, मन तु भी आनंदे थाको !' देह जाणे दुःख जाणे मना तू आनंदात रहा. कठड्याचा धक्का लागून ते पडले. हात मोडला. डॉक्टर प्लास्टर घालून गेले. त्यांचे शिष्य स्वामी तुरीयानंद महाराज (तेव्हांचे हरी) त्यांना

बघायला आले. श्रीरामकृष्ण त्यांना म्हणतात, ''बघ रे, हात कसा मोडून गेला. खूप दुखतंय रे'' हरी महाराज त्यांना म्हणतात, ''राहू दे, राहू दे. बघत आहे ना, किती आनंदात आहात ते. हे वरवरचं नाटक तुमचं आम्हाला फसवण्यासाठी आहे''. श्रीरामकृष्ण मनापासून हसून म्हणाले, ''पकडलं रेऽ पकडलं बेट्यानं मला.'' पहा! वेदना तर आहेत, पण मन शरीराकडे अजिबात आकर्षित नाही. त्याला बळजबरी शरीरभानावर आणावं लागतं इतकं ते समाधीत बुडून गेलंय.

नद्वेष्टि – देहभिषिक मनोव्यापारांमुळेच वासना, कामना निर्माण होतात. त्यांच्या पूर्ततेसाठी जीवनभर माणसं खटाटोप करीत राहातात. जीवनात वासना जितक्या तीव्र तितका खटाटोप अधिक. वासनापूर्ती झाली नाही की द्वेष, द्वेषामुळे प्रतिशोध, प्रतिशोधामुळे बुद्धिनाश आणि बुद्धिनाशामुळे सर्वनाश. अशी कुसंस्कारजनित शृंखलाच तयार होते. द्वेष कसा असतो. आगपेटीतल्या काडीसारखा ! दुसऱ्यांना जाळायला आपण ती पेटवतो. प्रसंगी दुसरं काही जळणार नाही पण काडी स्वतः मात्र जळून खाक होते. तसा द्वेष ज्या मनात आहे तो एखादवेळेस दुसऱ्याचं अनिष्ट करु शकणार नाही. पण स्वतःच मात्र जळून जाईल. वासनामय प्रेम हे असंच असतं. पण ईश्वरमय प्रेम ते परमप्रेम द्वेषरहित असतं. कारण त्यात व्यवहार नसतो. त्याला घेणं माहित नसतं. देणंच ते जाणतं. स्वामी विवेकानंद तेव्हाचे नरेंद्र अगदी सुरुवातीला श्रीरामकृष्णांकडे येऊ लागल्यानंतरची गोष्ट आहे. नरेंद्र आले की श्रीरामकृष्ण तोंड फिरवून बसत. त्यांच्याशी चकारशब्दही बोलत नसत. कधी उठून जात. पण तरीही नरेंद्रनाथ येतच राहिले. शेवटी एक दिवस श्रीरामकृष्णांनी नरेंद्राला विचारले, ''कारे ? मी तुझ्याशी बोलत नाही. तुझ्याकडे लक्ष देत नाही तरी तू इथे का येतोस ? नरेंद्रही त्यांचाच शिष्य. तो म्हणाला, ''मला काही हवे म्हणून मी इथे येत नाही तर मी तुमच्यावर प्रेम करतो म्हणून इथे येतो.'' असं हे खरं प्रेम, ज्यात व्यवहार नाही. त्यामुळे द्वेष नाही, चिंता नाही, कामना नाही.

न रमते – ते मन संसारी व्यवहारात रमत नाही. आपण संसारात का रमतो ? आपल्याला असं वाटत रहातं की ह्या संसारात सुख आहे. पण ईश्वरप्रेमाने अभिभूत झालेल्या मनाला कशाचीच ओढ नसते. श्रीरामकृष्ण म्हणत असत, ''ईश्वरच वस्तु बाकी सर्व अवस्तु.'' अवस्तु म्हणजे त्यांना नित्य अशी अवस्था नाही. संसारात सर्व वस्तू बदलणाऱ्या आहेत. पण ईश्वर नित्य चिरंतन आहे. त्याचा लाभ झाल्यावर, वस्तुलाभ झाल्यावर अवस्तुंची काय किंमत? हिरा आणि दगड ह्यात निवड करायला सांगितले तर काय कोणी दगड निवडेल? हिराच निवडेल. तसेच एकदा त्या परमप्रेममय, आनंदस्वरुप ईश्वराची गोडी लागल्यावर संसाराची ओढ संपून जाते. सामान्य माणसाचं मन मात्र ओढाळ असतं संसाराकडे. ह्यासाठी श्रीरामकृष्ण एक गोष्ट सांगत असत. एक कोळीणबाई मासे विकायला दुसऱ्या गावी आठवडे बाजारात गेल्या. मासे विकता विकता संध्याकाळ झाली. रात्री दुरच्या गावी परत जाणं शक्य नव्हतं. एका चांगल्या घरी आश्रय घ्यायला गेली. घरधनिण चांगली होती. रहा म्हणाली. रात्र चढत चालली. पण कोळीणबाईंना झोप येईना. का झोप येत नाही ? ते घर होतं एका माळीणबाईचं. घरात फुलांचा सुगंध सुटला होता. पण कोळीणबाईंना तो सहन होईना. शेवटी त्यांनी आपल्या माश्यांच्या टोपलीवर पाणी मारलं आणि ती टोपली तोंडावर घेतली तेव्हा कुठे झोप लागली कोळीणबाईंना ! आपलं मन तसंच असतं.

ईश्वराप्रती मन सहजासहजी रमत नाही म्हणून आपल्या मनाची दिशा बदलण्यासाठी भक्तीचं महत्त्व. ते मन कसं वळवायचं हेच नारद सांगतात. बघ मना ईश्वर कसा आपल्याहून आपला आहे. कसा प्रेमस्वरुप आहे. आनंदस्वरुप आहे. त्याच्या प्राप्तीने तुम्हाला काय मिळेल, इतकी छान प्रलोभनं नारद मनाला देत आहेत. आपलं मन 'ईश्वराभिमुख करत आहेत. मना, ईश्वराचीच कामना कर, इतर कशाची नको न कामयमाना निरोधरुपत्वात । म्हणजे ईश्वराची कामना करीत त्याच्या विरोधी जे जे असेल त्याचा त्याचा त्याग कर. त्याच्या बाबतीत मन उदासीन होऊन जात. 'तस्मिन अनन्यता तद् विरोधीशु उदासीनता । आणि हे सर्व करण्यासाठी दृढ निश्चयाची आवश्यकता असते. भवतु निश्चयदाढ्र्यात उर्ध्व. शास्त्ररक्षणम् । अन्यथा पातित्याशङ्काया ।

ईश्वरप्राप्ती झाल्याशिवाय मनाला शांती नाही, स्वस्थता नाही. मन त्याच ओढीनं व्याकुळ व्हायला हवं. प्रयत्न सोडता कामा नये. ह्यासाठी श्रीरामकृष्ण एक उदाहरण देतात. एक माणूस रोज म्हणत असे माझ्या शेतात एक कालवा खोदला पाहिजे जेणे करुन विहिरीचं पाणी शेतापर्यंत पोहोचेल. पण सुरवात काही होत नव्हती. एक दिवस निश्चय करुन सकाळपासून स्वारी कामाला लागली. दुपारी बायको जेवण घेऊन आली – अहो जेवण करुन घ्या ! पण छे ! ह्याचा निश्चय पक्का ! जेव्हा का काम पूर्ण झालं शेतात पाणी खेळू लागलं मग म्हणतो आण आता खातो-पितो सर्व करतो ! असा निश्चय हवा. मनाने ठरवलं पाहिजे की अनंत प्रयास करीन. ईश्वरप्राप्ती झाल्याशिवाय थांबणार नाही. जर निश्चिय नसेल तर पतन ठरलेलं.

पण काय हो ! अशा पद्धतीनं कोणी प्रयत्न केलाय का? काही उदाहरणे आहेत का? तुम्ही (नारद) म्हणतात, तसे इतके प्रेम इतका निश्चय ईश्वराप्रती किंवा ईश्वरस्वरुप अवताराप्रती कोणी केलाय का? नारद म्हणतात, ''आस्ती एवम् यथा व्रजगोपिकानाम् ।।

गोपी कृष्णावर प्रेम करीत. त्यांची प्रत्येक कृती ही कृष्णसमर्पित असे. सकाळी लोणी काढत. माझा कान्हा येईल, तो लोणी खाईल. जेवण तयार करणं, घर स्वच्छ करणं, गायी दुधवणं, सगळं कृष्णार्पण. रासलीलेत सारे कृष्णमय का झाले ? कारण त्यांची मनं कृष्णात विलीन झाली होती. त्यामुळे त्यांना गोप-गोपांसारखे दिसतच नव्हते. सारे कृष्णमय, सगळीकडे हरीच हरी. कबीर म्हणतात, ''प्रेमगली अति सांकरी जामे दुजो नाही समात । आप है तो हरी नही हरी है तो नही आप । ''अहंकाराचा थोडाही लवलेश त्या भक्ती प्रेमात राहू शकत नाही. त्या प्रेमगली मध्ये दोन राहूच शकत नाहीत. एक हरी नाहीत तुम्ही. म्हणूनच

गोपींना स्वतःचं असं काहीच राहीलं नव्हतं. त्यांना कृष्णाच्या सुखातच सुख वाटत होतं. तत् सुखे सुखित्वम्. ह्या संदर्भात श्रीरामकृष्ण एक गोष्ट सांगत. एकदा नारद श्रीकृष्णाकडे गेले. नारदांना सर्व ठिकाणी मुक्त प्रवेश. थेट श्रीकृष्णाच्या मंदिरात गेले. श्रीकृष्णांचा चेहरा व्यथित बघून काळजी करीत म्हणाले, ''देवा काय झालं आपल्याला.'' देव म्हणतात, ''नारदा डोकं दुखतंय.'' मग औषध का नाही घेत. वैद्यांना पाचारण करा. देव म्हणाले, ''नारदा औषध मला माहीत आहे पण अवघड आहे.'' असं काय अवघड आहे. मी काहीही करुन ते घेऊन येईन. देव म्हणाले, ''नारदा भक्तांची पदधुली डोक्यावर लावली तर डोकं थांबेल, पण जो पदधुली देईल तो नरकात जाईल'. नारद निघाले, सर्व थोर भक्तांकडे गेले. भक्त म्हणतात, ''नारदा हे काय आमची पदधुली देवाच्या डोक्यावर, नरकात घालतोस काय आम्हाला? नारद निराश होऊन परत आले. देव म्हणतात, 'नारदा जिथे जायला हवं होतं तिथं तर तू गेलाच नाहीस.'' कुठे देवा? अरे गोकुळात जा गोपींकडे. नारद आले गोकुळात. साऱ्या गोपी जमा झाल्या. नारदा, श्रीकृष्णाकडून आलास? कसा आहे रे आमचा हरी. नारद म्हणाले, ''त्याचं डोक दुखतंय' अरे मग औषध का नाही आणलंस? इथ काय करतोयस? नारद म्हणाले, ''औषध आणायलाच आलोय इथं. औषध आहे. भक्तांची पदधुली. पण जो पदधुली देईल तो नरकात जाईल.' साऱ्या गोपी जमा झाल्या ''अरे घे नारदा ताबडतोब जा आणि आमच्या प्राणप्रिय माधवाचं डोक दुखणं थांबव. अरे पण तुम्ही नरकात जाल त्याच काय? गोपी म्हणतात, ''आमचा विचार करायला आम्ही शिल्लक कुठे आहोत रे ! सारं तर त्या श्रीकृष्णाला समर्पित केलंय. त्याच्या सुखातच सुख समावलेलं आहे आमचं. जा आधी देवाला औषध दे.''

असं प्रेम असलं तरी तत्रापि न महात्मज्ञान विस्मृत्यापवादः । श्रीकृष्णाच्या खऱ्या स्वरुपाची गोपींना विस्मृती नव्हती. रासलीलेत काही क्षण तो अदृश्य झाल्यावर व्याकुळ होऊन त्या म्हणतात, 'नखलु गोपिकानंदनो भवान्, अखिल देहिनाम् अंतरात्मदृक । आम्हांला माहित आहे की तू केवळ गोपींचा नंदन नाहीस. यशोदेचा नंद नाहीस तर प्रत्येकाचा अंतरात्मा आहे. सर्वसाक्षी परमेश्वर आहेस. परपुरुष नाहीस तर परम पुरुष आहेस. म्हणूनच त्याच प्रेम हे जाराणाम इव । नव्हतं ते वासनामय नव्हतं. शुद्ध, निर्मळ स्वच्छ ईश्वरप्रेम होतं.

ही प्रेमरुप भक्ती कर्मज्ञान योगो अधिकतरा अशी आहे. ईश्वराकडे जाण्याचे कर्ममार्ग, ज्ञानमार्ग, योगमार्ग, ह्या भक्तीत आपोआपच समाविष्ट झाले आहेत. श्रीरामकृष्ण म्हणत असत शुद्ध ज्ञान आणि शुद्ध भक्ती एकच होत. एकाच नाण्याच्या त्या दोन बाजू आहेत. ईश्वर पूर्णज्ञान स्वरुप आहे. त्याची प्राप्ती झाल्यावर साऱ्या क्रिया ईश्वरसमर्पित होतात. कर्मयोग पूर्ण झाला. त्याच्या प्राप्तीनं मनात ज्ञानाचा प्रकाश उदय पावतो, ज्ञानयोग झाला. श्रीरामकृष्ण म्हणत, 'आई माझ्या मनात ज्ञानाच्या राशीच्या राशी ओतते. कधीच कमी पडत नाही'. अशी भक्ती 'फलउपत्वात' आहे.अशा मनाला संसाररुपी मायेचा स्पर्श होत नाही. त्यामुळे ते मन संसार सागरातून तरुन जातं. कस्तरती कस्तरती संङ्गान्स्त्यजति मायाम्? यः संङ्गान्स्त्यजाति यो महानुभावं सेवते, निर्ममो भवती । ते तरुन जातात जे सर्व संगाचा त्याग करतात. संगाचा त्याग करुन मन रिकामे ठेवतात का? तर ते परमेश्वराच्या माहानुभवाचं सेवन करतात. त्यामुळे ते निर्मम म्हणजे माणूस माणसासारखा रहात नाही. ते सामान्य व्यवहार करु शकत नाहीत असं नाही. पण त्यांचे व्यवहार लोकांना वेड्यासारखे वाटतात. श्रीरामकृष्णांना दक्षिणेश्वरचा पागल ब्राह्मण म्हणत असत. ते सदैव समाधीत असत. त्यामुळे लोकांना नशेत असल्याप्रमाणे वाटत. त्यामुळे त्यांना संसारी लोक जवळ येऊ नये असे वाटत असे. कधीकधी ते गच्चीवर जाऊन मोठ्या मोठ्याने हाकारीत असत 'कुठे आहात रे माझ्या मुलांनो ! शुद्ध हृदयाची, भक्तीमान मनं असलेली माझी मुलं ! ह्या संसारी लोकांशी बोलून बोलून माझी जीभ होरपळून गेली आहे.' त्यांना त्यांच्या आईने म्हणजे जगदंबेनं त्यांच्याकडे येणाऱ्या शिष्यांविषयी दाखवले होते. त्यांना संसारी लोक आवडत नव्हते पण म्हणून त्यांनी संसारी लोकांचा द्वेष केला नाही. गळ्याला कॅन्सरसारखं असाध्य दुःखणं झालं असतानाही ते लोकांशी बोलतच राहिले. लोकांना ईश्वराकडे वळवण्यासाठी उपदेश करीतच राहिले. ते तरुन गेले आणि आले होतेच तारण्यासाठी. म्हणून शेवट जवळ आल्यावर श्रीसारदादेवींना म्हणाले, ''पहा हे कलकत्त्यातले लोक, संसाराच्या चिखलात कसे रुतून बसले आहेत. त्यांच्याकडे कोण पाहाणार. तुम्हाला त्यांच्यासाठी काही करावं लागेल.''

**''स लोकांन्सतारयति।''**

अशा भगवद् स्वरुप अवतारी लोकांचा संग मिळाला तर आयुष्य कसं बदलून जातं. अशा अवतारी लोकांच्या हृदयात भगवंताशिवाय दुसर काहीच नसल्याने त्यांचा संग हा भगवंताचाच संग असतो. ''महत्संगत्सु दुर्लभो अगम्यो अमोघश्च''। हा महत्संग दुर्लभ असतो पण ज्याला मिळतो त्याच्यासाठी तो अत्यंत कल्याणकारी अमोघ असतो. श्रीरामकृष्ण म्हणत असत ज्या बेडकाला अस्सल सापाने पकडले त्याचा मृत्यू ठरलेला. त्या जीवाची सुटका तरी होते. पण ज्या बेडकाला साध्या सापाने पकडले आहे त्या जीवाची ना मृत्यू ना जीवन – नुसत्या वेदना, ससेहोलपट अशी स्थिती होते.

श्रीरामकृष्णांकडे कलकत्त्यातले नावाजलेले नाटककार गिरीषचंद्र घोष नेहमी येत असत. त्यांना दारुचा नाद होता. कधी कधी ते दारु पिऊन श्रीरामकृष्णांकडे येत व भांडण मांडीत की तुम्ही मला का पिऊ देता? लोक म्हणत, श्रीरामकृष्णांना की तुम्हीत्यांना इथे का येऊ देता? किती नशेने तर्रर असतात. श्रीरामकृष्ण म्हणत 'पिऊ दे रे किती पितो ते.' एक दिवस ते दारु न पिता श्रीरामकृष्णांकडे आले, त्यांच्या चरणी आत्मसमर्पण करुन म्हणाले, ''आता यापुढे मी काय करावे?'' श्रीरामकृष्ण म्हणाले, ''सध्या जे करीत आहात तेच करीत रहा. दोन्ही बाजू सांभाळा. पुढे एक बाजू (संसाराची) खचून गेल्यावर जे व्हायचे ते ईश्वरइच्छेने होईल. मात्र सकाळ, संध्याकाळ ईश्वराचे स्मरण करीत

जा.' आता आली का पंचाईत? कारण रात्र रात्र नाटके चालत. दारु पिऊन झोपायला सकाळ होई. हे संध्याकाळी नशेत. मग स्मरण केव्हा करणार? बरं श्रीरामकृष्ण असं काही खूप मोठं करायलाही तर सांगत नाहीत. मग लाचार होऊन चकार शब्द न बोलता बसून राहिले. पुढे श्रीरामकृष्णांनी आपण होऊन अनेक सोपे सोपे मार्ग सुचवले. पण हे चूपच! शेवटी श्रीरामकृष्ण म्हणाले तर मग मला "कुलमुखत्यारी दे" हे एकेल्यावर मात्र त्यांना खूप आनंद झाला. गिरीषांना वाटले बचावलो. नियमांचा ससेमिरा वाचला. पण त्या बिचाऱ्यांना काय माहित की आता *एक क्षणही ते स्वतःच्या मर्जीप्रमाणे वागू शकणार नाहीत. कुलमुखत्यारी* दिली होती ना ! प्रतीक्षण श्रीरामकृष्णांचे ध्यान होऊ लागले. त्यामुळे कसा एक प्रकारचा भयंकर अहंकार त्यांच्या मनामध्ये वाढू लागला. जगात कोणी काही म्हणो. कोणी कितीही तिटकारा करो. श्रीरामकृष्ण तर अगदी माझे आपले आहेत ना !

**ईश्वरस्याअपि आणि अभिमानषित्वात दैन्यप्रियत्वातच !**

ही भगवद् कृपा अमोघ आहे ना? ती परिणाम केल्याशिवाय कशी वाया जाईल. गिरीष म्हणत, "माझ्या पापांचा डोंगर केला तर तो हिमालयापेक्षाही मोठा होईल. मला जर माहित असतं की श्रीरामकृष्ण कृपा करणार आहेत तर अजून काही पापं करुन घेतली असती." अक्षरशः श्रीरामकृष्णांनी गिरीष नावाच्या वाल्याचा वाल्मिकी केला. त्यांनी कुलमुखत्यारी दिल्यानंतर त्यांच्या प्रत्येक कृतीवर श्रीरामकृष्णांचा *आधिकार आला. त्यामुळे गिरीषचंद्रांना पहिल्यासारखं जीवन जगता* येईना. एकदा श्रीरामकृष्णांकडे येऊन भांडू लागले की तुम्ही मला हे आतापर्यंत पापकर्म करु कसं दिलंत? इतका हृदयात त्याविषयी तिटकारा निर्माण झाला. शास्त्र म्हणतं 'अवतारा'शिवाय सामान्य गुरुंना असं मी तुझ्या पाप कर्माचा दुष्कर्मांचा भार घेईन व त्याने फळ भोगीन" असे म्हणणे व करणे त्यांच्या सामर्थ्याच्या पलिकडचे असते. म्हणूनच तो महत्संग दुर्लभ आहे आणि तो भगवद् कृपेनेच मिळतो. लभ्यतेऽपि तत्कृपयैव ।

ही कृपा कशी असते? गुणरहितं कामनारहितं प्रतिक्षणवर्धमानम्, अविच्छिन्नम, सूक्ष्मतर अनुभव रुपम् ।

गिरीषचंद्रांमध्ये श्रीरामकृष्णांच्या कृपेमुळे खूपच भावांतर होऊन गेले. प्रेम, ओढ, विश्वास तर होताच. विश्वासाच्या बाबतीत श्रीरामकृष्ण म्हणत असत विश्वास असावा तर गिरीषसारखा. हळूहळू दिवस पालटू लागले. श्रीरामकृष्णांनी समाधी घेतली. गिरीषचंद्रांवर अनेक दुःखाचे डोंगर कोसळले. पण असे होणे माझ्या पक्षी मंगलकारकच आहे असे समजून श्रीरामकृष्णांवर सर्व भार टाकून ते निश्चिंत राहिले. त्याबद्दल नाखुष होण्याचे किंवा कुरकुर करण्याचे त्यांना काय कारण? कारण कुलमुखत्यारी दिली होती ना? गुणरहितं ह्याला म्हणतात.

ही सर्व पापे घेताना श्रीरामकृष्णांनी त्यांच्याकडून कशाचीही अपेक्षा केली नव्हती. कामनारहितं कुलमुखत्यारीचा खरा अर्थ, सूक्ष्म अर्थ गिरीषचंद्रांना पुढेच कळू लागला. ते म्हणत असत की अशी एक वेळ असते की जेव्हा जप-तप असे सारे संपून जाते. परंतु ज्याने कुलमुखत्यारी दिली त्याला प्रत्येक पाऊल टाकताना, प्रत्येक श्वास घेताना बघावे लागते की भगवंतावर भार टाकूनच त्याच्या बळावर मी हे पाऊल टाकले आहे ना? स्वतःचा कःपदार्थ मी संपूर्ण टाकून द्यावा लागतो, झाले मीचे विसर्जन. हे प्रेम मग प्रतीक्षण वर्धमान होईल नाहीतर काय होईल? त्याचा तो सूक्ष्मतर अनुभव घेणाराच ते अनुभवू शकतो. परंतु सांगू मात्र शकत नाही. मुकास्वादनइव । मुक्या माणसाने जेवणाचा स्वाद घ्यावा पण तो *त्याला सांगता कसा येणार त्याप्रमाणे.* हे दिव्य प्रेम फक्त अनुभवता येते. पण त्याच्याविषयी काही बोलता मात्र येत नाही. कारण... मीच नाहीये ना!

महत्संग अमोघ असतो. अगम्य असतो तो आपलं सर्व जीवन उजळून टाकतो. पण तो दुर्लभ असतो. तो भगवद्कृपेमुळेच मिळतो. म्हणून आपण काय करायचं? तर त्याची कृपा प्राप्त करण्यासाठी सर्वथैव प्रयत्नांची पराकाष्ठा करायची. कसं वागायचं ह्याची काही सूत्रं नारद आता सांगत आहेत. दुःसंगः सर्वथैव त्याज्यः । दुःसंग सर्वथा वर्ज करावा. यो विविक्तस्थानं सेवते, यो लोकबन्धमुन्मुलयतिः । एकांताचे सेवन करावे. लोकलज्जेचीही पर्वा करु नये. मीराबाईने कुठे केली लोकलज्जेची पर्वा? वादो नावलंम्ब्यः । वाद घालत बसू नये. सुखदुःखेच्छालाभादिव्यक्तेकाले प्रतिक्षमाणे क्षणार्द्धमपि व्यर्थ न नेयम् । सुख दुःख लाभ हानी आदींची *चिंता न करता एक क्षणही व्यर्थ न जाऊ देता सतत नामस्मरण करावे.* अहिंसासत्यशौच्यद्यास्तिवयादिचारित्र्याणी परिपालनीयानी. आपल्या चारित्र्यात अहिंसा, सत्य, शुचिता या सर्वाचं पालन कराव. कर्मफलांचा त्याग करावा. योगक्षेमासाठीही त्याच्यावरच अवलंबून रहावं. भगवंताविषयी अविच्छिन्न असा अनुराग उत्पन्न करावा. श्रीरामकृष्णदेव म्हणत असत, सतीची पती बद्दलची ओढ, आईची बालका विषयीची ओढ आणि माणसाची विषयाकडची ओढ या तिनही ओढी एकत्र करुन मग ते मन ईश्वराकडे लावल्यास तो ईश्वर प्राप्त होणारच ! ह्यासाठी कोणत्याही प्रमाणाची गरज नाही. कारण भक्तीला । प्रमाणांतरस्य अनपेक्षत्वात स्वयंप्रमाणात । दुसऱ्या कोणत्याही प्रमाणाची आवश्यकता नाही. भक्ती स्वतःच त्याचं प्रमाण आहे कारण भक्ती हेच साधन आहे व भक्ती हेच साध्य आहे. असा भक्तीमध्ये बुडून गेलेला साधक अंतरबाह्य शांत होऊन जातो. चिरोटा जसा पाकात सोडला म्हणजे चिरोटा पाकात शिरतोय का पाक चिरोट्यात हे सांगता येत नाही तसा. भक्त भगवंतामध्ये आणि भगवंत भक्तामध्ये शिरुन एकजीव एकप्राण होऊन जातो. जीवा-शिवाची भेटी ती हीच असते. मग तो जिथे राहील तेच महान तीर्थ होऊन जातं आणि तो जे बोलेल जैसा चालेल तेच शास्त्र होऊन जातं. तीर्थी कुर्वन्ति तीर्थानि सुकर्मी कुर्वन्ति कर्माणि सच्छात्री कुर्वति शास्त्राणि ।

मानवजातीला महान आदर्श देण्यासाठीच अवतार धरणीतलावर येत असतात. त्यांच्या करुणेला अंत नसतो. त्यांच्या कृत्यांचा थांग लागत नाही. आपण फक्त त्यांना अनन्यभावाने शरण जायचं

अशा प्रकारे भक्तशिरोमणी, ब्रह्मज्ञ महर्षि नारमुनींच्या श्रीमुखातून बाहेर पडलेली चिरंतनाचा स्पर्श लाभलेली ही काही भक्ती सूत्रे भगवान श्रीरामकृष्णांच्या जीवन प्रकाशात आपण पाहिली. मनात विचार येतो आपण कुठे आहोत? स्पर्धा, संघर्ष, अशांती, नैराश्य यांच्या पेटलेल्या ज्वालांमध्ये होरपळणारा जीव, जीवाच्या आकांताने सैरावैरा धावतोय त्या शाश्वत शांती समाधानाच्या शोधात! तो विसावा ती सावली आहे प्रभूंच्या चरणांजवळ. मार्ग अनेक आहेत पण हा भक्तीचा सोपा, सहजसाध्य, अवडंबररहित असा सन्मार्ग आहे. तो प्रभू आपल्या हृदयाची कवाडे उघडून वात्सल्यपूर्ण नजरेनं आपल्याला बोलावित आहे. म्हणून आपण प्रार्थना करुया 'हे प्रभू आम्ही अनन्यशरण आहोत, आमचा त्राता विघ्नहर्ता, बलदाता आनंदनिधान असा तूच आहेस. तू आम्हाला उचलून घे आणि तुझं ते परमप्रेम ते असीम वात्सल्य आमच्यावर पांघर. आम्हाला जीवनमुक्त कर, निर्वासन कर. शांत कर.

ओम् शांतीः शांतीः शांती

।।श्रीरामकृष्णार्पणमस्तुः।।


**सौ. वंदना श्रीराम कुलकर्णी**

सुवर्णरत्न गार्डन, बी, ए/१/५०१,

फुडवर्ल्ड लेन, कर्वेनगर, पुणे – ४११०५२



# श्रीरामकृष्ण वचनामृत

**स्वामी राघवेन्दांनंदजी महाराज**
रामकृष्ण संघाचे जेष्ठ संन्यासी आणि इंदौर आश्रमाचे सचिव.

भगवान श्रीरामकृष्ण देव व त्यांचे वचनामृत अर्थात भक्तांशी त्यांचा जो संवाद चाले त्या संवादरुपी अमृत सागराचे दर्शन करविणारे श्री 'म' यांना आज भारतातीलच नव्हे तर साऱ्या पृथ्वीवरील साधक वर्ग ईश्वरानुरागी व्यक्ती जाणतात व त्या सागराच्या दोन चार थेंबांनी स्वतःचे जीवन धन्य करुन घेत आहेत. कोण आहेत हे श्रीरामकृष्ण ? त्यांनी स्वतःच सांगितल्याप्रमाणे व त्यांचे विश्ववरेण्य शिष्य स्वामी विवेकानंद यांनी स्व-अनुभूतीतून पडताळून पाहिलेले – ईश्वराचे एक अवतार ! म्हणजे श्रीरामचंद्र व श्रीकृष्ण यांच्याच तोडीचा ईश्वरावतारी पुरुष । श्रीरामकृष्ण स्वतः वेळोवेळी म्हणत – 'जो राम जो कृष्ण – तोच या खेपी रामकृष्ण' – व त्यांच्या उक्तीची साक्षात अनुभूती स्वामी विवेकानंदांना आली होती हे आपण त्यांना 'विवेकानंदांच्या सहवासात' या ग्रंथात बघतो ।

वचनामृताचे लेखक श्रद्धेय मास्तर महाशय अर्थात श्री 'म' यांनी एके ठिकाणी श्रीरामकृष्णांच्या ५१-५२ उक्तींचा उल्लेख केला आहे. ते म्हणतात की जर मनुष्याने कुठल्याही एका उक्तीला जीवनाचा आधार बनविला – तर त्याचे जीवन एका अपूर्व शांतिने भरुन जाईल व मानव जीवनाचे जे लक्ष्य ते तो सहजच प्राप्त करील. अशाच उक्तींपैकी काही उक्तींचा आपण येथे थोडक्यात विचार करु !

१ – श्रीरामकृष्ण आपल्या भक्त मंडळींना अथवा त्यांचेकडे जो सत्संग चाले त्यात उपस्थित असलेल्या गृहस्थ मंडळींना नेहमी म्हणत ''बघा ! ईश्वरच जगत् झाला आहे'' म्हणजेच आपण जी काय नावरुपे पाहतो ज्यात समस्त वस्तू व व्यक्तिंचा तसेच समस्त स्थूल-सूक्ष्म प्राण्यांचा समावेश आहे ती सारी रुपे व वस्तू स्वयं ईश्वरच होय ! त्यानेच ही सर्वसृष्टी व्यापून ठेवलेली आहे. जे जे काही आपल्या अनुभवास येते ते सर्व ईश्वरच होय ! ईशावास्य उपनिषद पण हेच सांगते. 'ईशावस्यमिंद सर्वं' हे सर्व काही त्या 'ईश्वरतत्त्वाने' व्याप्त होय. साधक जर ही एक उक्ती नेहमी स्मरणात ठेवील – तर त्याचा आचार – विचार व एकंदरीत संपूर्ण व्यवहारच पालटून जाईल. हळूहळू या गोष्टीवरच्या विश्वासाने मनुष्याचे जीवन दर्शन पूर्णपणे वेगळेच होऊन जाईल.

२ – उक्ती क्र. दोन – ''हे जग ईश्वराचा खेळ होय'' श्रीरामकृष्ण आपल्या गृहस्थ शिष्यांना म्हणत असत की हा संसार ईश्वराचा एक खेळ आहे. म्हणजेच आपण या जगात खेळण्यासाठी आलो आहोत. तेव्हा शास्त्रांच्या आदेशाप्रमाणे किंवा महापुरुषांनी दाखवून दिलेल्या मार्गानेच खेळणेच योग आहे. कारण आपल्याच मनाने खेळ राहिल्यास जास्त दुःखे झेलावी लागतात ; व आपण एक खेळ खेळतो आहोत हे देखील लवकर ध्यानात येत नाही. मनुष्य ह्या संसाराला विनाकारण अवास्तव महत्व देऊन बसतो व त्या ओझ्याने सतत भरडला जात असतो. पण तेच जर ह्याने ह्या जगात एका खेळाडूची व खेळापुरती भूमिका आहे हे ध्यानात ठेवले तर तो आपले अल्पसे जीवन आनंदात- खेळ म्हणून जगू शकेल.

३ – ''ईश्वरच एक मात्र कर्ता होय''. श्रीरामकृष्णांच्या या उक्तीवर वचनामृतात आपण अनेक ठिकाणी त्यांचे भाष्य बघतो तर त्यावर भक्तांनी घेतलेले आक्षेप व मनुष्याचा ह्या विधानावरील अविश्वास पाहावयास मिळतो. खरोखरच आपण सर्व जण केवळ बाहुले बाहुल्या असून आपल्याला नाचवणारा कोणी एक वेगळाच आहे अथवा कुणी एक शक्ति आपल्या सर्वांकडून चित्र-विचित्र कार्येकरवून घेत आहे यावर विश्वास ठेवणे माणसाला अशक्यप्राय होऊन बसते. कारण आपण स्वतःला व तसेच दुसऱ्यांनासुद्धा प्रत्येक क्रियेसाठी जबाबदार धरत असतो अथवा कर्तेमानीत असतो. परंतु पूर्ण ज्ञानी मात्र ''एकमेव कर्ता तो ईश्वरच होय' हे बूघून सर्वांनाच ह्दयापासून क्षमा करीत असतो. नव्हे तो कुणालाच खरा कर्ता मानीत नाही.

४- श्रीरामकृष्णांची आणखी एक अत्यंत गोंधळात पाडणारी उक्ती म्हणजे – ''सर्व काही ईश्वराच्याच ईच्छेने घडत असते.'' येथे सुद्धा इच्छा करणारे अथवा आवड निवड ठेवणारे आपण कुणी नसून वास्तविक कुणी दुसराच आपल्याला प्रेरीत करीत असतो किंवा प्रेरणा देत असतो आणि या करिताच 'कर्म' आणि 'कर्मांचा' उहापोह करणारे महान ग्रंथ उत्पन्न झाले आहेत. पण श्रीरामकृष्ण वचनामृतात आपल्याला बघावयास मिळते की ठाकुर म्हणत आहे – ''हे काय म्हणतोस रे । मनात आणेन तसे करु शकेन – पण मला तर 'आई' काही वेगळेच दाखवत आहे. माणूस बिचारा काय करणार ? त्याला तसे करावेच लागते !'' व

शेवटी तर श्रीरामकृष्ण म्हणतात – ''जो जसे कर्म करील त्याला तसे फळ मिळेल ह्या सर्व कल्पना सोडा.'' जर कर्तव्य असेलच तर ते म्हणजे ईश्वराला हृदयापासून शरणागत होणे हेच होय.''

श्रीरामकृष्ण वचनामृतात आपण फक्त इतक्याच उक्ती बघतो असे नव्हे तर येथे सर्वांनाच सर्वांच्या दृष्टीने श्रेयस्कर असे उपदेश व दृष्टांत आढळतात. श्रीरामकृष्ण आपल्याला सांगतात की सर्वांचा मार्ग 'एकच नाही'. ईश्वराने विभिन्न आवडी-निवडीप्रमाणे विभिन्न मार्गाची सृष्टी केली आहे. ज्याला जसे रुचेल व पटेल त्याने तोच मार्ग अवलंबावा. ''मास्टर महाशयांची अशी दृढ श्रद्धा होती की जर श्रीरामकृष्णांच्या या अनेकविध वाक्यातील कुठलेही एक वाक्य आपण जीवनात ध्रुवतारा म्हणून आपलेसे केले तर – निश्चितपण आपण परम कल्याणाच्या मार्गावर अग्रेसर होऊ व अंती शांती – समाधान प्राप्त करु!

''हरि ओम् तत् सत्''

**स्वामी राघवेन्दांनंदजी महाराज**
रामकृष्ण मिशन
रामकृष्ण आश्रम मार्ग, किला मैदान, इंदौर – ४५२००६



# श्रीरामकृष्णदेव आणि मूर्तिपूजा

**आचार्य श्री. गोविंददेवगिरी महाराज**
एम.ए.तत्त्वज्ञान. काशीची आचार्य पदवी. थोर राष्ट्रसंत. भारतभर रामकथा व भागवतकथा प्रवचन. कॅनडात श्री ज्ञानेश्वर गुरुकुलाची स्थापना. भारतात अनेक ठिकाणी वेदव्यास-प्रतिष्ठानतर्फे गुरुकुल विद्यालयांची स्थापना. वेदविद्येचा प्रसार हेच जीवन.

भारतीय संस्कृतीच्या पुनःर्जागरणाचे अग्रदूत म्हणून स्वामी विवेकानंदांचे नाव अजरामर आहे. पूज्य स्वामीजींनी 'माझे गुरुदेव'च्या विषयावरील त्यांच्या प्रसिद्ध भाषणात असे म्हटले होते की एका ठाकुर श्रीरामकृष्णदेवांना शंभर विवेकानंद निर्माण करता आले असते, पण शंभर विवेकानंद मिळून एक रामकृष्ण निर्माण करता येणार नाहीत. या त्यांच्या गुरुभक्तिपूर्ण उद्‌गारातील अलंकारीक भाग वगळला तरी श्रीरामकृष्णांची थोरवी काय असेल याची काहीशी कल्पना त्यांच्या या उद्‌गारांवरुन करता यावी. हे एक अत्यंत निरपवाद सत्य आहे की श्रीरामकृष्ण परमहंस हे काही दृष्टीनी सर्वथा अद्विितीय होते व जगदंबेने भारतवर्षाला प्रदान केलेला तो अमूल्य प्रसाद होता.

विलक्षण योगायोग असा की श्रीरामकृष्णांचा जन्म इ.स. १८३६ मध्ये झाला. त्याच वर्षी इंग्रजांनी भारतात त्यांची शिक्षणपद्धती लागू केली होती. ज्या लॉर्ड मेकॉलेने ही पद्धती निर्माण केली त्याचे उद्दिष्ट त्याच्या उपलब्ध पत्रातून स्पष्ट होते. तो म्हणतो, India has been conquerred once. It must be conqurerred again and the second conquest must be through education. त्याने लिहिलेल्या पत्रात असेही म्हटले आहे की या शिक्षणपद्धतीतून निर्माण होणाऱ्या पुढील पिढया रक्ताने व रंगाने भारतीय असल्या तरी त्यांचे हृदय व मेंदू इंग्रजाळलेले असतील. दुर्दैवाने त्याचे हे विधान अक्षरशः सत्य ठरले. पुढील अनेक पिढ्यांची अशी धारणा बनली की भारतीय संस्कृतीतील सर्व काही त्याज्य असून जे विदेशी आहे तेच फार चांगले होय! ब्राह्मो समाज, प्रार्थना समाज, सत्यशोधक समाज ही सर्व या विचारसरणीची अपत्ये होत.

हा न्यूनगंड भारतीय युवकांत निर्माण करण्याची शिक्षणपद्धती ज्यावर्षी भारतात लागू झाली, त्याचवर्षी यावरचा जालीम उतारा म्हणूनच की काय नियतीने श्रीरामकृष्णांना भारतात जन्म देऊन धाडले. स्वामी विवेकानंद म्हणजे त्यावेळचा युवक नरेंद्र हा इंग्रजी शिक्षणाच्या उपरिनिर्दिष्ट विचारांनी अत्यंत भारावलेला प्रखर बुद्धिमान तरुण. श्री ठाकुरांनी त्यांच्यातील दैवी अंश हेरुन त्यालाच असा घडविला की तो सांस्कृतिक पुनरुत्थानाचा अग्रदूत ठरला. स्वा. विवेकानंदांनी एका ठिकाणी म्हटले आहे की मूर्तिपूजा अजिबात न मानणारा मी. पण नियतीने मला अशा एका सत्पुरुषाच्या चरणी बसवून घडविले की ज्याने आपली सर्व प्रगती एका मूर्तिपूजेतून साधली होती.

स्वामीजींचे हे विधान नितांत सत्य आहे. श्रीरामकृष्णांनी विविध साधना केल्या व सर्व साधना एकाच सत्यापर्यंत पोचवितात हे सिद्ध केले. पण या सर्व साधनांचा मूळ पाया त्यांच्या कालीभक्तीतच आहे हे विसरता येतच नाही. मार्गदर्शक गुरु, सार अध्ययन इ. सर्व साधनांच्या अभावी ही श्रीरामकृष्णांनी साधनेची जी उंची गाठली तिचे रहस्य त्यांच्या तळमळीच्या लालन भावात आहे. जगदंबा कालीमाता माझी आई आहे व मी तिचा अजाण बाळ आहे. मला तिचे दर्शन हवे आहे ही एकमात्र त्यांची तीव्र भावना होती. पुढील सर्व काही केवळ यातूनच घडले.

यातील सर्वात महत्त्वाची बाब ही होती की मोठ्या भावाने गदाधरास ज्या क्षणी सांगितले की 'ही काली आपली माता आहे व तुला तिची सेवा करावयाची आहे' त्याक्षणापासून गदाधरास कधी ती पाषाण प्रतिमा वाटलीच नाही. ती चैतन्यमयी माता आहे हाच प्रबळ भाव त्यांचा सतत राहीला व त्या भावामुळेच पुढील साधनेची दारे उघडली जाऊ लागली. श्री ज्ञानेश्वर महाराजांनी म्हटल्याप्रमाणे -

**भावबळे आकळे । येरवी नाकळे**
**करतळी आवळे । तैसा हरी ।।**

हेच यातील परमसत्य होय ! या प्रसंगी संत मीराबाईची प्रकर्षाने आठवण येते ती एका साधूने दिलेली गिरिधर कृष्णाची प्रतिमा हेच या साध्वीचे सर्वस्व झाले व केवळ त्या आधारे त्यांचे चरित्र व काव्य केवळ अनुपमेय झाले.

वैदिक शास्त्रातील मूर्तिविज्ञान एक गहन व अमूल्य सिद्धांत असून सगुण भक्तिधारेचा तर तो प्राणच आहे. त्याचे विस्तृत विवेचन आवश्यक व शक्य असले तरी तूर्त इतके तरी लक्षात घ्यायलाच हवे की विश्वोत्पत्ती करणारी ती परमशक्ती सर्वत्र व्याप्त असून सर्वसमर्थ आहे, हा सर्वमान्य अध्यात्मसिद्धांत आहे. तो परमात्मा सर्वव्यापक असल्यामुळे प्रतिमेतही आहे. पण आपला भाव त्या ठिकाणी केंद्रित केल्याशिवाय त्याचा प्रत्यय

कसा येणार ? हा भाव जागृत होण्यासाठीच याची पूजा, स्तोत्र, पारायणे इ. आहेत. ती उपासनेने केंद्रित झाली की विश्वचैतन्याशी संपर्क साधता येतो अगदी ज्याप्रमाणे लॅपटॉप अथवा मोबाईलचा आहे. कुठूनही आजकाल जगात कुठेही संपर्क साधता येतो. तसेच हे आहे. पण यासाठी आपले मन भावमयतेने एकाग्र व्हायला हवे. त्यासाठीच विविध साधने आहेत. त्यांचा विस्तार श्रीमद् भागवत किंवा श्रीरामकृष्णदेवांच्या संपूर्ण साहित्यात विखुरलेला आहे. तो सुसूत्रपणे एकत्र मांडताही येतो. कुणीतरी भाग्यवान विज्ञ साधकाने हे करायला हवे. आपली मूर्तिपूजा एक परम विज्ञान आहे व श्रीरामकृष्णांचे संपूर्ण जीवन व उपदेश त्यावरील सुंदर भाष्य आहे इतके लक्षात घेऊन निशंक उपासना करावी. इत्यलम् !

**आचार्य श्री. गोविंददेवगिरी महाराज**
धर्मश्री, मानसर अपार्टमेंट, विद्यापीठ रोड, पुणे

## एक आठवण

नागपूर येथील कै. म. म. श्री. बाळशास्त्री हरदास यांचे गुरु कै. विष्णू केशव पाळेकर तथा श्री अप्रबुद्ध हे माझ्या वडिलांचे स्नेही होते. ते आमच्याकडे येत असत. एकदा त्यांचेशी बोलताना भगवान श्रीरामकृष्ण परमहंसांचा विषय निघाला. तेव्हा त्यांनी प्रत्यक्ष घडलेली एक आठवण सांगितली.

भगवान श्रीरामकृष्णांचे चरित्रलेखक श्री. न. रा. परांजपे हे त्यांचे निकटचे स्नेही होते. त्यांना श्रीरामकृष्णांच्या चरित्र-लेखनास त्यांनी आवश्यक ती सामुग्री म्हणजे संदर्भ-ग्रंथ इ. मिळवून दिली होती.

श्री. अप्रबुद्धांनी सांगितले की, श्री. परांजपे चरित्राचे लेखन करीत असताना ते त्यांचेजवळच बसलेले असत. तेव्हा श्री. परांजपे यांचे मागे तीन चार फुटांवरच भगवान श्रीरामकृष्ण हे बसलेले दिसत. कै. श्री. अप्रबुद्धांनी प्रत्यक्ष त्यांना बसलेले पाहिले होते. अशी प्रत्यक्ष घडलेली हकीकत श्री. अप्रबुद्धांनी मला समक्ष सांगितली होती.

**म. मा. कुलकर्णी,**
ॲडव्होकेट, पुणे-३७

# प्रार्थना कशी करावी.

हळू हळू संध्याकाळ झाली. दिवस आणि रात्र यांचा हा गूढ संधिकाल श्रीरामकृष्णांना नेहमीच भावाविष्ट करून टाकीत असे. भक्तांपैकी जो जिथे बसला होता तो तिथेच बसून राहीला. श्रीरामकृष्ण मधुर भगवन्नाम घेत आहेत आणि सगळेच उत्कंठित व एकाग्र होऊन ऐकत आहेत. इतके गोड भगवन्नाम त्यांनी कधीही ऐकलेले नाही, जणू अमृत वर्षत आहे ! असल्या प्रेममय बालकाचे प्रेमभरले 'आई आई' म्हणून हाक मारणे त्यांनी कधीही ऐकले नव्हते. श्रीरामकृष्णांच्या मुखातून निघणारे ते हरिनाम आणि आईचे नांव ऐकून सगळेजण स्वत:ला कृतार्थ मानीत आहेत. याप्रमाणे नांव घेतल्यानंतर श्रीरामकृष्ण प्रार्थना करू लागले. त्यांना स्वत:ला वस्तुत: याप्रमाणे ईश्वराचे नांव घेण्याची वा प्रार्थना करण्याची काय गरज ? भगवंताचे नांव कसे घ्यायचे, त्याच्याजवळ प्रार्थना कशी करावयाची हे जीवांना शिकविण्यासाठीच ते हे सर्व करीत आहेत हे काय निराळे सांगावयास हवे ? स्वयं भगवानच त्यांच्या रूपाने प्रेमाचा देह धारण करून जीवांना हे सारे शिकवीत आहे-प्रत्यक्ष धडा घालवून देत आहे. श्रीरामकृष्ण प्रार्थना करू लागले- ''आई, मी तुला शरण आलो आहे, तुझ्या श्रीपादपद्मांचा आश्रय घेतला आहे. आई, मला देहसुख नको. नावलौकीक नको. अष्टसिद्धी नकोत. केवळ एवढेच कर की, जेणेकरून तुझ्या श्रीपादपद्मी शुद्ध भक्ती जन्मेल-निष्काम, निर्मल, अहेतुक भक्ती उपजेल. आणि आई, मी जेणेकरून तुझ्या भुवनमोहिनी मायेत-तुझ्या मायेच्या संसारात मुग्ध न होवो. कामिनीकांचनावर प्रेम जेणेकरून कदापि न जन्मो. आई, तुझ्याखेरीज मला आणखी कोणी नाही. मी भजनपूजनहीन, साधनाहीन, ज्ञानहीन, भक्तिहीन आहे.-कृपा करून तुझ्या श्रीपादपद्मी मला भक्ती दे.''

त्यांच्या मुखावाटे निघणारा प्रत्येक शब्द भक्तांच्या ह्दयाला जाऊन भिडत आहे.

श्रीरामकृष्ण वचनामृत (प्रथम भाग) ९८३-९८४

**- स्वामी विष्णुपादानंद**
प्रमुख - रामकृष्ण मिशन आश्रम - औरंगाबाद



# श्रीरामकृष्णांचे वेद – वेदांताविषयी चिंतन

**डॉ. अजित कुलकर्णी**

बी.ए.एम.ए., पीएचडी. (श्रीमत् भगवद्गीता एक जीवनप्रणाली), रजिस्ट्रार- बी.एम.सीसी. कॉलेज (निवृत्त), पुस्तके व लेखमाला प्रकाशित. गेली तीस वर्षेप्रवचन, व्याख्यान व कीर्तने (दासबोध, भागवत, ज्ञानेश्वरी, रामकृष्ण, परमहंस व स्वामी विवेकानंद यावर) पुरस्कार- शंकराचार्यांकडून गौरव पुरस्कार, आदर्श शिक्षक व गौरव पदक पुणे महानगरपालिका, धर्मभूषण पदवी.

श्रीरामकृष्ण हे परमार्थाकडे वा आध्यात्मिक चिंतनाकडे वळले याला कोणते निश्चित कारण नव्हते, तथापि घरातील धार्मिक विचारांनी, सदाचाराचा मनावर संस्कार झाला असावा. यात असेही महत्त्वाचे आहे की, रामकृष्ण हे जन्मजातच ईश्वरपरायण वृत्तीचे होते. अध्यात्मपर धारणेचे होते. एकदा लहान असताना त्यांनी रामकुमार बंधूना सांगितले की, ''पोटापाण्याची विद्या मला नको, हृदयात ज्ञानाचा प्रकाश पडेल व जीवन कृतार्थ होईल अशी विद्या मला हवी.''

श्रीरामकृष्णांची अंतरीक प्रेरणा इतकी विलक्षण होती की, ते म्हणत, साधकाचे मन शुद्ध झाले म्हणजे तेच त्याचे गुरु होते. यासाठी त्याग व संयम यांचा पूर्णपणे अभ्यास करुन त्यायोगे आपल्या इंद्रियांना व मनाला वश करुन साधकांचे अंतःकरण जेव्हा शुद्ध व पवित्र होते, तेव्हा त्याचे मनच त्याचा गुरु होऊन बसते. ते त्याला शीघ्र त्याच्या ध्येयाकडे घेऊन जाते.

श्रीरामकृष्णांचे वेदविषयी चिंतन पाहताना प्रथम आपण वेद व वेदांत म्हणजे काय ते पाहू या. १) भारतीय परंपरा ही वेदाधिष्ठित आहे. हे अपौरुषेय म्हणतात. ते कोणा एकाच्या बुद्धितून निघाले नसून प्रत्यक्ष परब्रह्मस्वरुपी नारायणाच्या श्वासातून बाहेर पडले आहे. एक राशीय वेद होते हे ज्ञान आहे. कालांतराने मनुष्याकडून अभ्यास होईना म्हणून चार भाग झाले. ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, अथर्ववेद. या प्रत्येकाचे उपवेद झाले. उदा. गांधर्ववेद, आयुर्वेद इ. प्रत्येक वेदाला १) संहिता २) ब्राह्मणे व आरण्यके व उपनिषदे असे भाग आहेत. संहिता भगवंताची स्तुती आहे. ते मंत्र आहेत. ब्राह्मण ग्रंथात यज्ञयागादि कर्माचे विधिविधान आहे. आरण्यके व उपनिषदतात तत्वविचार आहे.

वेदपरंपरा ऐकण्यावर म्हणजे श्रवणावर आधारित असल्याने याला 'श्रुति' म्हणतात. तसेच ती स्मृतीत ठेवून त्याचे चिंतन व विकास घडतो, त्याला 'स्मृति' म्हणतात. त्यामुळे भारतीय तत्वज्ञान हे जिवंत असून नित्य नूतन आहे. वेदांनी मनुष्याला जीवन दृष्टी दिली असून धर्म, जगदुत्पत्ती, मृत्युत्तरजीवन, नैतिक संकल्पना इत्यादीचा ऊहापोह आहे. यात ज्ञान, कर्म, उपासना या सर्वांचे चिंतन असते.

'वेदांत' म्हणजे उपनिषदे! उपनिषदे वेदांच्या शेवटी येतात म्हणून ते वेदांत होय. वेदाचा अभ्यास झाला म्हणजे शेवटी उपनिषदांचा अभ्यास असतो. म्हणजेच वेदाचे सार भूतज्ञान हे उपनिषदात सांगितलेले असते. उपनिषदे ही संवादरुपाने सांगितली असतात. यात व्यक्त झालेल्या ज्ञानप्रकाश – विचारांची अनुभूती घ्यावयाची असते. 'एकं विज्ञय सर्व वित्वानं भवतिः। या प्रकारे उपनिषदातील विचार हे समजून घ्यावे लागतात. उपनिषदात दोन विचारधारा असतात. १) ब्रह्माकडून जीवाकडे येणारी विचारधारा. २) जीवाकडून ब्रह्माकडे जाणारी विचारधारा.

तेव्हा श्रीरामकृष्ण म्हणजे चालता बोलता वेद–वेदांतच होता म्हटलं तर वावगे होणार नाही. त्यांनी निरनिराळ्या प्रसंगातून वेद–वेदांताविषयी आपलं मत व्यक्त केल आहे. त्याचा आपण संक्षिप्त आढावा घेऊ या.

ज्ञानाबद्दल श्रीरामकृष्ण म्हणत – 'ईश्वराला जाणणे म्हणजेच ज्ञान आणि त्याला न जाणणे म्हणजे अज्ञान.

वेदानुसार परमहंसांचा निश्चित विश्वास होता की जगत्कारण ईश्वरावर गतिर्भर्ता प्रभुः, साक्षी निवासः शरं सुहृत' अशा प्रकारचा दृढ विश्वास, निर्भर आणि प्रेम यांची पराकाष्ठा होती. यासाठी ईश्वराशी अत्यंत प्रेमाचा, जिव्हाळ्याचा संबंध जुळवून ठेवणे आवश्यक आहे.

श्रीरामकृष्णांची वेदांत साधना त्यांचे चुलतभाऊ हलधारी श्रीराधागोविंदजीचा पूजक होता त्याकडून आली त्यावेळी अध्यात्म–रामायणाच्या चिंतनाचे वेळी श्रीरामकृष्णांना सीता व लक्ष्मणासह श्रीरामचंद्रांचे दर्शन झाले होते. असे त्यांचे चिंतन होते.

वेदांतशास्त्रात जे सांगितले आहे की ब्रह्मज्ञान झाल्यावर मनुष्य हा पूर्ण निर्भर होतो. तो नित्य शुद्ध–बुद्ध–मुक्त स्वभाव, अखंड सच्चिदानंदस्वरुप, सर्वव्यापी, अजर, अमर, आत्मा आहोत याचा अखंड अनुभव घेत असतो. या जगात एका सत्वस्तुवाचून दुसरे काही नाही हे पाहिले जाते. श्रीरामकृष्णांच्या अंतःकरणात वेदज्ञान म्हणजे अद्वैत भावाचे ज्ञान स्थिर झाले होते. याबद्दल ते म्हणत – ही अद्वैत अवस्था अखेरची स्थिती आहे. अनेक मते पंथ असले तरी अंतिम ध्येय एकच व तीच एक अवस्था आहे.

श्रीसमर्थ रामदासांच्या उक्तीप्रमाणे –

**जे वेदांचे अभ्यंतरी। ते काढुनि अपत्यापरी।**
**शिष्यश्रवणी कवळ भरी। उदारवचने।।** दासबोध ५.२.१७

असे वेदाचे अंतरीचे ज्ञान त्यांना अवगत झाले होते. हे ज्ञान देताना

परमहंस व्यवहारातील गोष्टीचे दाखले देवून मूळ ज्ञान लोकांपर्यंत पोहचवित असत. प्रकृती – पुरुष हा सांख्यशास्त्राचा सिद्धान्त सांगताना सांगितले की पुरुष अकर्ता आहे. प्रकृती सर्व काही करते. पुरुष साक्षी भावाने सर्व पाहत असतो आणि या पुरुषावाचून ही प्रकृती काही करु शकत नाही. यासाठी श्रीरामकृष्ण दृष्टान्त देतात – घरात घरधनी हुकूम सोडतो व खुशाल स्वस्थ बसतो. तर घरच्या घरमालकीणीची धांदल उडते. ती सर्व काही करीत राहते आणि घरात नाव मात्र पुरुषाचे होते. तसेच या विश्वाचे आहे. तेव्हा ब्रह्म आणि ब्रह्मशक्ती, पुरुष आणि प्रकृती एकच आहे. हे दोन निरनिराळे पदार्थ नव्हेत. पदार्थ एकच मात्र तो कधी पुरुषभावाने राहतो तर कधी तो स्त्रीभावाने राहतो इतकेच !

तसेच मायाही ईश्वराची शक्ती आहे. ही ईश्वरामध्ये वास करते. ती त्याच्या ठिकाणी असली तरी ती ईश्वराला बद्ध करु शकत नाही. जसे सर्पाच्या तोंडात विष असते तरी ते त्याला बाधत नाही त्यासारखे आहे. असे ते उदाहरण देत असत.

वेद–वेदांतज्ञानासाठी परमहंसांचे मत होते श्रवण, मनन, निदिध्यास, ब्रह्म सत्यं जगत् मिथ्या ही साधना केली पाहिजे. ज्ञानाने वस्तुलाभ होत नाही. तर ही स्वसंवेद्य जाणीव आहे. त्यासाठी धारणा हवी, त्याग हवाच. यात असे आहे की जितकी मते तितके मार्ग! श्रीरामकृष्ण म्हणतात, ज्याला जो मार्ग पसंत वाटत असेल, तोच त्याने धरावा. जो भाव आवडेल तो दृढ धरावा म्हणजे झाले. ईश्वर हा भावाचा विषय आहे. तेव्हा ईश्वराशी कोणता तरी एक संबंध जोडून घेणे म्हणजे भाव. यामुळे ईश्वर भेट होऊ शकते. यासाठी अहंकार गेला पाहिजे. ईश्वर हा साकारही आहे आणि निराकारीपण आहे. जसे पाणी आणि बर्फ तसा ईश्वर आहे. श्रीरामकृष्ण म्हणतात, मी जरी शिकलो नसलो तरी चांगल्या चांगल्या शास्त्री पंडितांकडून वेद, वेदांत व पुराणे सारे ऐकले आहे. ते सारे समजून घेतले. त्या सर्वांची मी एक माळ केली आणि म्हणालो 'आई ही तुझी शास्त्रे आणि पुराणे मला फक्त तुझी शुद्ध भक्ती दे.'' हे मुख्य मुरलेले ज्ञान ठाकुरजींकडे होते.

वेद व वेदांताचे सार म्हणते. या कलियुगात भक्तीयोगच श्रेष्ठ आहे. या भक्तीभावात श्रीरामकृष्णांना समाधी लागत असे. वदनावर दिव्य प्रभा पसरत असे. यासाठी साधना केली पाहिजे. विवेक वैराग्यसंपन्न होता आलं पाहिजे. ज्ञान, कर्म, भक्ती कोणत्याही मार्गाने ईश्वराजवळ जावे. परंतु यासाठी तळमळ हवी. यात ज्ञानयोग म्हणजे सत्य, असत्य सांगतो. जो निवड करु शकतो तो विवेक. विवेक स्थिरावतो तेव्हा समाधी लाभते आणि अंतिम वेदाचे अंतिम उद्दिष्ट ब्रह्मज्ञान ते प्राप्त होते. कर्म म्हणजे, कर्मामधून ईश्वरावर मन जडवून ठेवणे. ईश्वराला कर्माचे फळ समर्पण करुन त्याच्या ठिकाणी भक्ती ठेवून संसाराची कर्मेकरील तो कर्मयोगी. याचाही उद्देश एकच ईश्वर लाभ होय. आणि भक्तीयोग म्हणजे ईश्वराचे नाम गुण संकीर्तन करुन मन त्याच्याकडे ठेवणे. हे सर्व जाणण्यासाठी तपस्या हवी आहे. षट्दर्शने, वेद, वेदांत, तंत्र यात ईश्वर नाही. तो केवळ अभ्यासाने स्वसंवेद्य रुपात प्राप्त होतो. यासाठी पठण, श्रवण व दर्शन हे सर्व तारतम्यभावाने समन्वय करुन अंगिकारावे. कुंडलिनीचा अभ्यास करावा. यासाठी साधुसंग, श्रद्धा, निष्ठा, भाव, महाभाव व प्रेम हवे आहे.

भक्तीची परिपक्व अवस्था म्हणजे भाव आहे. हे भक्तीचे ज्ञान चंद्राच्या प्रभेप्रमाणे असते. अवतार ज्ञान हे सूर्यासारखे असते. संसारी जीवाचे मन गढूळ पाण्याप्रमाणे असल्याने तेथे निवळी (विवेक – वैराग्य) टाकली ते स्वच्छ होते असे त्यांचे मत होते.

अखेरीस असे दिसते की, द्वैत, विशिष्टाद्वैत व अद्वैत ही निरनिराळी वेद वेदांतातील मते आहेत. परमहंसांच्या मते ही मते मुळीच नाहीत. या तीन पायऱ्या आहेत. ज्याला म्हणून आत्मोन्नती करुन घ्यावयाची असेल त्याने याचा अवश्य उपयोग करावा. विषयाने घेरलेले ज्याचे जीवन आहे त्याच्यासाठी द्वैतभावच उपयुक्त आहे. त्याच्या वरची पायरी म्हणजे विशिष्ट द्वैत होय. येथपर्यंत मन–बुद्धि, कल्पना, भावना इत्यादीचा उपयोग होतो. अद्वैत ही अखेरची पायरी आहे. इथे इंद्रिये, वाचा, मन, बुद्धि, भावना कल्पना या सगळ्या गोष्टी जेथे पोहोचू शकत नाहीत अशी ही पायरी आहे.

श्रीरामकृष्णांनी वेद व वेदांताचे ज्ञान जीवनात उतरवले होते. त्यामुळे सर्व धर्माचा अभ्यास करुनही श्रीरामकृष्णांनी हे ज्ञान शिष्यांनी, साधकांनी कसे अंगिकारावे याचा स्थूलरुपाने आढावा घेतला आहे.

संदर्भ : १) श्रीरामकृष्ण वचनामृत, भाग १, २ व ३ २) श्रीरामकृष्ण चरित्र, रामकृष्ण मठ, नागपूर ३) श्रीरामकृष्ण आणि विवेकानंद – ले. डॉ. वि. रा. करंदीकर ४) भारतीय तत्त्वज्ञान – श्रीनिवास दिक्षित

**डॉ. अजित कुलकर्णी**
नवीन मराठी शाळेसमोर, सदाशिव पेठ, पुणे – ४११००२



# श्रीरामकृष्णांच्या साधनेचे तात्पर्य

**स्वामी विष्णुपादानंद**

रामकृष्ण मिशन आश्रम, औरंगाबाद - प्रमुख, रामकृष्ण संघाचे ज्येष्ठ संन्यासी. रामकृष्ण-विवेकानंद-वेदांत-गीता आणि महाभारत या विषयांचे अभ्यासक आणि वक्ते. तदनुषंगाने स्फुट लेखन. रामकृष्ण संघाच्या सन १९९३ तील लातूरच्या भूकंप पुनर्वसन प्रकल्पाचे प्रमुख म्हणून कार्य. तसेच मुंबईच्या आदिवासी सेवा प्रकल्पाचे प्रमुख म्हणून काही वर्ष कार्य आणि रामकृष्ण संघाच्या इतर ठिकाणच्या सेवाकार्यात सहभाग.

श्रीरामकृष्णांचा जन्म १७ फेब्रुवारी १८३६ रोजी आणि देहावसान १६ ऑगस्ट १८८६ रोजी झाले. अर्थात् ते उणेपुरे ५० वर्षेजगलेत. या अवधीत त्यांच्या जीवनात दोन महत्त्वाच्या बाबी घडल्या. एक म्हणजे साधना-तपस्या करून ज्ञान संपादन व दुसरे म्हणजे उपदेशांद्वारे त्याचे वितरण करून स्वामी विवेकानंदादि शिष्यांना घडविणे.

श्रीरामकृष्णांच्या साधनेचे तात्पर्य समजून घेण्याच्या दृष्टीने साधना म्हणजे काय व त्याचे प्रयोजन कोणते हे अगोदर समजून घेणे आवश्यक आहे.

कोणते तरी ध्येय समोर ठेवून ते प्राप्त करून घेण्यासाठी केलेल्या प्रयत्नांना साधना म्हणता येईल. हे प्रयत्न जो करतो त्याला साधक व कालांतराने त्याचे प्रयत्न सफल होऊन जेव्हा तो सिद्धमनोरथ होतो तेव्हा त्याला सिद्ध म्हटले जाते.

परंतु प्रत्येक मनुष्याचे ध्येय हे एकसारखे असू शकत नाही. ते ज्याच्या-त्याच्या संस्काराने ठरत असते. अर्थात् प्रत्येकाच्या दृष्टीने त्याचा पुरुषार्थ वेगवेगळा असतो. धर्म-अर्थ-काम आणि मोक्ष हे ते (४) पुरुषार्थ होत.

मनुष्यांपैकी अधिकांश बहिर्मुखी व देहालाच सर्व काही समजणारे असतात. त्यांची एकाग्रतेची शक्ती यथातथाच असते. मनात उठणाऱ्या अनेक प्रकारच्या इच्छा स्व-कुवतीप्रमाणे पूर्ण करण्याचा जन्मभर प्रयत्न करणे हेच बहुतेकांचे मुख्य ध्येय असते. अर्थात 'काम' हा एकमात्र पुरुषार्थ आहे ही त्यांची मनोमन धारणा असते. (गीता:१६-८) ह्याबाबतीत पशूंच्या आणि मानवाच्या धारणेत फरक असलाच तर तो अत्यल्प असतो.

'काम' पुरुषार्थ अनिर्बंधपणे आणि व्यवस्थित चालू रहावा यासाठी 'अर्थ' पुरुषार्थाचे महत्त्व अमर्याद वाढून भल्याबुऱ्या मार्गांनी तो साध्य करण्यासाठी आटोकाट प्रयत्न केला जातो. (गीता:१६-१२) 'धर्म' पुरुषार्थालाही त्यासाठी जुंपण्यास मनुष्य मागे-पुढे पहात नाही. जिवंतपणी यथेच्छ सुखोपभोग घ्यावयाचे आणि मेल्यानंतर सत्कर्माच्या द्वारे कमावलेल्या पुण्याच्या बळावर स्वर्गीय सुख उपभोगावयाचे यातच मानवी जीवनाची इतिकर्तव्यता असते अशी ठाम समजूत असणारे आणि त्याप्रमाणे वागणारे समाजात बहुसंख्य असतात. अशांच्या दृष्टीने येन-केन-प्रकारेण 'काम' पुरुषार्थच सर्वश्रेष्ठ (परम पुरुषार्थ) ठरतो.

योगमायेच्या अचिंत्य प्रेरणेने (गीता : ७-२५) ही सकामताच (स्वार्थ साधण्यासाठी फलाकांक्षेने व अहंकाराने प्रेरित होऊन आसक्तीपूर्वक कर्म करण्याची मानसिकता) सर्व सामान्यांच्या हाडीमासी खिळलेली असते. हा निकष वापरल्यास वर्तमान समाजात आणि प्राचीन काळीहि 'अधार्मिक' आणि 'धार्मिक' म्हणून मान्य झालेले बहुतेक जण याच सदरात मोडतात. फक्त, जे केवळ अधार्मिकवृत्तीचे असतात त्यांच्यात आसुरी भाव थोडा अधिक असतो, इतकेच काय ते.

संक्षेपात, एकमेव भौतिक उत्कर्षाचा (अर्थ-काम) आदर्श समोर ठेवून केलेल्या प्रयत्नांना पण साधना ह्या पारिभाषिक शब्दाने संबोधिता येईल. परंतु हा साधनामार्ग अवलंबिल्यास त्याला सत्याची-परमशांतीची आणि कृतार्थतेची प्राप्ती होणार नाही. इतकेच नाही तर जन्मोजन्मी अज्ञान-मोह-दु:खसागरात गटंगळ्या खाणे आणि वेठबिगारीचे जीवन जगणे हेच त्याच्या ललाटी लिहिले जाईल. अशाप्रकारची भोगैक सर्वस्व (आसुरी) दृष्टि असणारे परंतु ते भोग धर्माच्या आधाराने प्राप्त करू इच्छिणारे काहीजण असतात. या प्रवृत्तीलाच अध्यात्म शास्त्रात 'अभ्युदय' म्हटले जाते.

याउलट स्वभावाचे काहीजण असतात परंतु ते संख्येने अत्यंत कमी असतात. त्यांना अभ्युदयातही काही रस नसतो. ते संस्काराने निस्पृहवृत्तीचे असतात आणि परमसत्याची प्राप्ति करून घेऊन कृतार्थ होऊ इच्छितात. ज्याला सत्याचा-आत्म्याचा साक्षात्कार होतो तो परमशांतीचा अधिकारी होतो व जन्ममरणाच्या फेऱ्यातून त्याची नेहमीसाठी मुक्ती होते. ह्या निवृत्तीमार्गाला अध्यात्मशास्त्रात 'नि:श्रेयस' असे म्हटले जाते. (अभ्युदय शास्त्रोक्त पद्धतीने आचरिल्यास नि:श्रेयसात परिवर्तित होऊ शकतो. म्हणजेच सकाम साधक कालांतराने निष्काम होऊ शकतो.)

धर्म, अर्थ, काम ह्या पुरुषार्थांच्या माध्यमातून 'प्रकृति' जीवाला दृष्य संसाराशी जखडून टाकते. तसेच ती या ना त्या तऱ्हेने त्याला मुक्तीपासून दूर नेते. प्रकृतीच्या या अदृश्य आणि अनाकलनीय बंधनाची

सुस्पष्ट जाणीव वेदकालीन प्राचीन ऋषींना झाली होती व त्याविरूद्ध ते दंड थोपटून उभे राहीले. श्रीरामकृष्ण त्याच प्राचीन ऋषिपरंपरेतील होते. श्रीरामकृष्णांना तारुण्याच्या उंबरठ्यावर पाऊल ठेवण्याच्या वयात पुरते उमगले की भोगवासनेचा त्याग करणे आणि अंतर्मुखवृत्तिसंपन्न होणे यांमधूनच मानवाच्या मुक्तिलाभाचा मार्ग आहे आणि ह्या गोष्टीची धारणा मानवाला जोवर होणार नाही तोवर त्याला देशकालातीत अखंड सत्याची प्राप्ति होऊन शांति लाभणे दुरापास्तच राहील.

श्रीरामकृष्णांचे वय तेव्हा सतरा वर्षांचे असेल. ज्यावेळी त्यांचे थोरले बंधू रामकुमार यांना आढळले की त्यांच्या लहान भावाचे लौकिक शिक्षणाकडे व पर्यायाने अर्थार्जनाकडे मुळीच लक्ष नाही त्यावेळी वडील भावाच्या नात्याने त्यांनी श्रीरामकृष्णांची थोडी कानउघाडणी केली. त्याच्या उत्तरी श्रीरामकृष्णांनी आपल्या ज्येष्ठ भावासमोर आपले अंतरंग उघड केले ते अशाप्रकारे :-

''चालकला - बांधा बिद्या आमि शिखिते चाहि ना। आमि ॲमन बिद्या शिखिते चाहि, जाहाते ग्यानेर उदय होइया मानुष बास्तबिक कृतार्थ हॉय।''

अर्थात् - 'भाजीभाकरी मिळविण्याची विद्या मी शिकू इच्छित नाही. मी अशी विद्या शिकू इच्छितो की जिच्याने ज्ञानाचा उदय होऊन माणूस खरोखर कृतार्थ होतो.''

श्रीरामकृष्णांचे हे अलौकिक आणि गंभीर उत्तर म्हणजे त्यांच्या साधनेचे तात्पर्य आणि पाया होय.

प्राचीन ऋषींनी नि:संदिग्धपणे घोषणा केली आहे की, ''त्यागेनैके अमृतत्त्वमानषु:''- अर्थात् केवळ त्यागानेच अमृतत्वाची प्राप्ति होते. श्रीरामकृष्ण ह्या सत्याचे ज्वलंत आणि परिपूर्ण उदाहरण होते. भगवत्प्राप्ति हा एकमात्र उद्देश्य डोळ्यांसमोर ठेवून त्याच्या आड जे काही लौकिक वा अलौकिक प्रलोभने येतील त्यांचा संपूर्णत: त्याग हेच त्यांच्या जीवनाचे मध्यवर्ती सूत्र होते. अर्थात् त्याग म्हणजे मोहाचा, अज्ञानाचा, प्रलोभनांचा, बंधनांचा त्याग.

श्रीरामकृष्ण असाधारण कुशाग्रबुद्धिचे तसेच अद्‌भुत स्मरण-शक्तिसंपन्न होते. त्यांना हे समजावयास मुळीच वेळ लागला नाही की ह्या संसारात विद्यासंपन्न होण्यामागे एकमात्र उद्देश असतो तो म्हणजे या ना त्या प्रकारे त्याद्वारे भोगवासनेची तृप्ती करणे आणि जगाच्या लेखी ज्या गोष्टीला मोठेपणा म्हणून मान्यता आहे त्या अधिकाधिक संपादन करून कीर्ति मिळविणे. त्यांना हेही कळून चुकले की हे फक्त लौकिक विद्या संपादनाच्याच बाबतीतच खरे नाही तर आध्यात्मिक विद्यासंपादनाच्या बाबतीत देखील खरे आहे. श्रीरामकृष्णांना मोठेपणा धारण करून मिरविण्याचा स्वभावत:च तिटकारा असल्यामुळे त्यांनी केवळ भाजी-भाकरी मिळविण्याचीच विद्या झिडकारली नाही तर ज्या अध्यात्मविद्या संपादनाने पंडित म्हणून मान्यता मिळविता येते ती विद्या सुद्धा नाकारली. त्यामुळे आता फक्त शिल्लक राहिलेला एकच साधना-पथ त्यांनी हृदयाच्या प्रेरणने स्वीकारला तो म्हणजे ईश्वरावर नि:सीम प्रेम करून अखंडपणे आपल्या हृदयाची व्याकुळता त्याला निवेदन करणे.

श्रीरामकृष्णांनी वयाच्या सतराव्या वर्षी कलकत्याच्या उत्तरेला असलेल्या दक्षिणेश्वर येथील काली मंदीरात पूजकाचे कार्य स्वीकारले होते. त्यांच्या साधनायज्ञाचा तो प्रारंभ होता. त्यांच्या त्यावेळेच्या मन:स्थितीचे वर्णन स्वामी विवेकानंदांनी (१८९६ साली न्यूयॉर्क आणि इग्लंड येथे) 'माझे गुरुदेव' या विषयावर दिलेल्या व्याख्यानात अतिशय मार्मिकपणे केले आहे. त्यातील काही अंश येथे देत आहे. :-

''हळूहळू एका विशिष्ट भावनेचा उदय होऊन तिनेच त्याचे (कुमार श्रीरामकृष्णांचे) संपूर्ण चित्त व्यापून टाकले. 'ह्या मूर्तीच्या पाठीशी खरोखरच काही तथ्य आहे ना?.... धर्मात काही सत्य आहे की सारे थोतांडच?' ह्या एकाच भावनेने त्या मुलाला पुरते पछाडले, अगदी व्याकुळ करुन सोडले.....रात्रंदिवस सदा एकच ध्यास-कशाने ईश्वराचे प्रत्यक्ष दर्शन होईल? एक दोन दिवस नव्हे, दिवसांमागून दिवस ते व्याकूळ होऊन रडत रडत जगन्मातेला उद्देशून म्हणत. - 'माते तू खरोखरच आहेस ना? की ही सारी कवि कल्पनाच?.... तू जर खरोखरच असशील तर मग तू माझ्याशी बोलत का नाहीस?.... मला का बरे अज्ञानात ठेवीत आहेस? सत्य काय ते मला कां बरे कळू देत नाहीस?..... मला तू प्रत्यक्ष कां बरे दिसू शकत नाहीस? लोकांचे सांगणे, शास्त्रांचे म्हणणे, षट्दर्शनांचा भारा हे सारे वृथा; त्याने काय होणार आई? यथार्थ सत्य मला हवे आहे, मी सत्याचा अनुभव घेऊ इच्छितो, सत्याला स्पर्श करू इच्छितो'....

''याप्रकारे या मुलाचे दिवसामागून दिवस आणि रात्रीमागून रात्री व्यतीत होऊ लागल्या. दिवस संपून ज्यावेळी तिन्हीसांजा होत, ज्यावेळी मंदिरामधील शंखघंटांचा नाद आणि सांजारतीचा शुचिगंभीर ध्वनी पंचवटीत निनादू लागे, त्यावेळी अत्यंत व्याकुळ, अत्यंत विषण्ण होऊन ते स्फुंदून स्फुंदून रडू लागत आणि म्हणत-'आई, आजचा आणखी एक दिवस व्यर्थ गेला, आजही तूझे दर्शन झाले नाही ना! ह्या क्षणभंगुर आयुष्यातला आणखी एक दिवस कमी झाला, अजूनही मला सत्याचा साक्षात्कार झाला नाहीच ना!' हृदयामधील या दु:सह वेदनेने व्याकुळ होऊन ते कधी कधी जमिनीवर आपले मुख घासत आणि रडत रडत प्रार्थना करीत असत-'जगन्माते, जगदंबे, तू माझ्यात आविर्भूत हो. दया कर की जेणेकरून माझ्या हृदयात तुझ्याखेरीज आणखी कशाची देखील आस उरणार नाही.''(पृष्ठ क्र.२१ व २४)

असे दिवसांमागून जितके दिवस जाऊ लागले, तसतशी श्रीरामकृष्णांच्या मनात अनुराग आणि व्याकुळताही तितकीच वाढू लागली. त्यांना झालेल्या जगदंबेच्या प्रथम दर्शनलाभाचे जिवंत वर्णन त्यांचे अंतरग शिष्य स्वामी सारदानंद यांनी लिहीलेल्या 'श्रीरामकृष्णलीलाप्रसंग' नामक अधिकृत चरित्र-ग्रंथात (पृष्ठ क्र. २१२) खालीलप्रकारे केले आहे. :-

श्रीरामकृष्ण सांगत -''आईचं दर्शन झालं नाही म्हणून तेव्हा हृदयात असह्य दु:ख होतं; कोरडा करण्यासाठी लोक ज्याप्रमाणे जोरानं पंचा पिळत असतात, वाटू लागलं की माझं हृदय धरून कोणी जणु तसं करतो आहे! आईचं दर्शन बहुदा कधीच लाभायचं नाही असं वाटून दु:खानं तळमळू लागलो. कमालीचा बेचैन होऊन विचार केला की तर मग ह्या जीवनाची आणखी आवश्यकता नाही. आईच्या मंदिरात जी

तलवार होती तिच्यावर एकाएकी दृष्टि पडली. ह्याच क्षणी जीवनाचा शेवट करीन अशा विचाराने वेड्यासारखा धावून ती धरतो आहे एवढ्यात अकस्मात् आईचं अद्भुत दर्शन लाभलं अन् भान लोपून पडून गेलो! त्यानंतर बाहेर म्हणजे काय होत आहे, कोणीकडे तो नि त्यानंतरचा दिवस गेला त्यातलं काहीहि कळू शकलं नाही! आंतमध्ये मात्र पूर्वी कधीहि न अनुभवलेल्या एका सांद्र आनंदाचा स्रोत वाहात होता आणि आईच्या चिन्मय अस्तित्वाचा प्रत्यक्ष प्रत्यय येत होता''.

वर कथन केलेल्या अद्भुत दर्शनाचे ठाकुरांनी (श्रीरामकृष्णांनी) दुसऱ्या एका दिवशी आम्हा लोकांना पुढीलप्रमाणे सविस्तर वर्णन करून सांगितले होते-''घर,दार, मंदिर सारे जणू कुठे लुप्त झाले-कुठेच जणु आणखी काहीहि नाही!-अन् बघतो आहे काय, तर एक असीम अनंत चेतन ज्योति:समुद्र! - ज्या बाजूला जिथपर्यंत बघे, आणि दिसे की चहूकडून त्याच्या उज्वल लाटांमागून लाटा गर्जत ग्रास करण्यासाठी महावेगाने झेपावत येत आहेत.! बघता बघता त्या मजवर येऊन कोसळल्या आणि मला त्यांनी अजिबात कुठे डुबवून टाकले! धापा टाकीत गटंगळ्या खाऊन भान लोपून पडून गेलो''. अशा रीतीने त्यांनी पहिल्या दर्शनाच्या वेळी चेतन ज्योति:समुद्राच्या दर्शन लाभाविषयी आम्हालोकांना सांगितले होते. परंतु चैतन्यघन जगदंबेची वराभयदायी मूर्ति? - ठाकूरांना काय तेव्हा तिचेही दर्शन त्या ज्योति:समुद्रामधे झाले होते? झाले होते असेच वाटते, कारण ऐकले आहे की, पहिल्या दर्शनाच्या वेळी ते जेव्हा थोडेसे भानावर आले होते तेव्हा त्यांनी आर्तस्वरांत 'आई' 'आई' हे शब्द उच्चारले होते.

ह्या प्रथम दर्शनलाभानंतर त्यांच्यापक्षी धर्म ही विश्वासाची बाब राहिली नाही व मूर्ती फक्त पूजेचे माध्यम राहीले नाही. आता ते प्रत्यक्ष अनुभूतीसंपन्न झाले असल्यामुळे त्यांना सर्वच चैतन्यमय दिसत होते. त्यांचे स्वत:चे व्यक्तित्व कुठेतरी विलीन झाले आणि त्याजागी आता श्री जगदंबा आणि तिची इच्छा एवढेच काय ते शिल्लक राहीले. श्री जगदंबा आपल्या त्या बालकाशी जणूकाही एकरूप झाली. तिने आपल्या त्या अद्भूत बालकाच्या शरीर-मनाचा आश्रय करून किती न काय खेळ केला याची पुसटशी कल्पना 'श्रीरामकृष्णलीलाप्रसंग' ह्या ग्रंथात आलेल्या वर्णनावरून आपल्याला करता येते. अगदी थोडक्यात त्याचा उल्लेख खालीलप्रमाणे करता येईल.

त्यांच्या साधनाकाळात हिंदुधर्ममतानुसार प्रचलित असलेल्या सर्व साधना त्यांनी केल्यात-जसे तंत्रसाधनेचे सर्व प्रकार, वैष्णवशास्त्रानुसार वात्सल्यभाव, दास्यभाव, मधुरभाव, वेदांतशास्त्रानुसार अद्वैतमताची साधना इत्यादि. ह्या साधनांचे अंतिम फळ त्यांना अत्यंत कमी वेळात प्राप्त झाले. इतकेच काय विदेशियांचे जे साधना मार्ग आहेत, जसे - इस्लामपंथ, ख्रिश्चनपंथ इत्यादी - त्यांत पण ते अत्यंत अल्पकाळात अनुभूती संपन्न झाले. श्रीरामकृष्णलीलाप्रसंग (साधकभाव) या ग्रंथात या विषयीचा सविस्तर उहापोह झालेला आहे. श्रीरामकृष्णांच्या जीवनाध्यांयावर आपण सखोल चिंतन केल्यास अशा प्रकारचे उदाहरण इतरत्र कुठेही न आढळल्यामुळे आपण थक्क होऊन जातो. बऱ्याच काळानंतर (२ जानेवारी १८८४) श्रीरामकृष्ण आपल्या साधनाकाळातल्या आठवणी भक्तांना सांगत असताना त्यांच्या तोंडून निघालेले शब्द या संदर्भात पाहणे उद्बोधक ठरेल. (श्रीरामकृष्ण वचनामृत-प्रथम भाग पृष्ठ क्र ४५१):-

''आईला मी रडत रडत म्हटले होते की, आई वेदवेदांतामध्ये काय आहे ते मला समजावून दे, पुराणात, तंत्रात काय आहे ते समजावून दे. तिनं एका मागून एक सारं मला समजावून दिलं. ''आईनं मला सारं समजावून दिलं - किती अन् काय सारं दाखवून दिलं.

''ह्या साऱ्या अति गुह्य गोष्टी! तर्क विचाराने काय समजाल? तो जेव्हा दाखवून देतो तेव्हा सगळं कळतं, सगळं मिळतं-कशाचीही उणीव राहत नाही. ज्ञानाची उणीव राहात नाही.''

'जितकी मते तितके मार्ग' - श्रीरामकृष्णांचा हा संदेश मानवजातीला चिरकाल मार्गदर्शक ठरत राहील. ह्याचे कारण त्यांनी इतर विद्वानांप्रमाणे देश-विदेशातील सर्व साधनामार्गांचे अध्ययन न करता श्री जगदंबेच्या कृपेने ते सर्व एकाच सत्याकडे नेणारे आहे असा प्रत्यक्ष अनुभव घेतला. त्यांनी जगाला संदेश दिला की, जगात जितके संप्रदाय 'धर्म' या शब्दाने प्रचलित आहे ते सर्व सत्याकडे-ईश्वराकडे पोहोचण्याचे केवळ विभिन्न साधनामार्ग वा उपासनापंथ आहेत - ते स्वत: धर्म नाहीत. आत्म्याच्या प्रत्यक्ष-अतींद्रिय अनुभूतीलाच फक्त 'धर्म' या संज्ञेने संबोधिता येईल. त्यामुळे प्रत्येकाने स्वत:च्या संस्काराने प्राप्त झालेल्या साधनामार्गाचा अवलंब करून आत्म्याची प्रत्यक्ष अनुभूति मिळविणे एवढेच काय ते प्रत्येक मनुष्याचे परमकर्तव्य-परमपुरुषार्थ ठरतो. हे न करता विविध पंथांतील मतमतांतरांनाच आणि त्यातील बाह्य आविष्कारानांच धर्म समजून निरंतर भांडत-लढत राहिल्यास तो निखालस वेडेपणाच ठरेल.

वेदकाळापासून भारतात धर्माच्या बाबतीत संशोधक वृत्ति आढळून येते. उपनिषदांमध्ये ठायीठायी आत्मज्ञानाची महती सांगितली आहे आणि आत्म्याची अनुभूती हेच मानवजातीसाठी अंतिम ध्येय होय याचा वारंवार उद्घोष केला आहे. तसेच सर्वोच्च अतीन्द्रिय सत्य हे सर्वकालीन आणि सर्वजनीन (Universal) असते आणि कोणताही साधनापथ अवलंबिला तरी शेवटी सर्व एकाच ठिकाणी पोहोचतात याची निश्चित आणि परिपूर्ण कल्पना वेळोवेळी प्राचीन ऋषींनी आम्हाला करून दिली आहे. म्हणूनच धर्माच्या बाबतीत अनुपम उदारता भारतात सदैव आढळून येते. श्रीरामकृष्णांच्या साधनांचा आणि त्यांना प्राप्त झालेल्या अनुभूतींचा विचार केल्यास त्यांच्या जीवनात सनातन धर्माचा हा आदर्श पूर्णपणे प्रतिबिंबित झालेला दिसून येतो. स्वामी विवेकानंदांनी हेच वास्तव त्यांच्या सारगर्भ वाणीने खालीलप्रमाणे व्यक्त केले आहे.

आधुनिक जगाला श्रीरामकृष्णांचा संदेश आहे-''केवळ मत, संप्रदाय, चर्च वा मंदिर इत्यादींमध्ये अडकून पडू नका. प्रत्येक व्यक्तीच्या अंतर्यामी जे सत्य विद्यमान आहे तो खरा धर्म होय, आणि त्याच्या तुलनेने ही सारी तुच्छ होत. त्या आंतरस्थ सत्याचा, त्या खऱ्या खऱ्या धर्माची माणसामध्ये जितकी अधिक अभिव्यक्ती होईल तितकी त्याची जगाचे हित करण्याची शक्ती अधिकाधिक वृद्धिंगत होईल. आधी त्या धर्मांचे उपार्जन करा. तो आत्मसात करा. कुणावरही दोषारोप करू नका, कारण सर्वच पंथ, सर्व मते चांगली आहेत. आपल्या स्वत:च्या जीवनाद्वारे दाखवून द्या की, धर्म म्हणजे केवळ शब्द, नाव वा संप्रदाय नव्हे, तर धर्म म्हणजे आध्यात्मिक अनुभूती, ज्यांना धर्माचा अनुभव आला आहे त्यांनाच धर्म कळेल, तेच धर्म नीट समजू शकतील. ज्यांना स्वत:ला धर्मलाभ झाला आहे, केवळ तेच इतरांमधे तो धर्मभाव संचारित करू शकतील. तेच मानवजातीचे श्रेष्ठ आचार्य होऊ शकतील. केवळ तेच जगामध्ये ज्ञानाच्या शक्तीचा संचार करू शकतील''. (माझे गुरुदेव - पृष्ठ क्र. ५३).

स्वामी विवेकानंदांनी सर्व साधनांचे तात्पर्य त्यांच्या सुप्रसिद्ध 'राजयोग' नामक ग्रंथात (पृष्ठ क्र. १६५) सूत्ररूपात व्यक्त केलेले आहे. ही सूत्रे ग्रथित करतांना त्यांच्या दृष्टीसमोर जणूकाही श्रीरामकृष्णच होते. परमपुरुषार्थ साधू इच्छिणाऱ्या सर्वांनी ही सूत्रे स्मरणात ठेवावी.

प्रत्येक जीव अव्यक्त ब्रह्म होय.

बाह्य आणि आंतर प्रकृतीला वशीभूत करून स्वत:चे हे अव्यक्त ब्रह्मस्वरूप व्यक्त करणेच जीवनाचे परम उद्दिष्ट होय.

कर्म, उपासना, मन:संयम वा ज्ञान यापैकी कोणत्याही एकाचा वा एकापेक्षा अधिकांचा किंवा सर्वच उपायांचा अवलंब करून ते उद्दिष्ट साधा आणि मुक्त व्हा.

यातच सगळा धर्म आला. मते, वाद, क्रियाकांड, अनुष्ठाने, शास्त्रे, मंदिरे वा इतर बाह्य गोष्टी केवळ गौण तपशिलाच्या बाबी होत.

श्रीरामकृष्णांच्या अपूर्व साधनामय जीवनाने मुग्ध होऊन त्यांच्यावर बंगाली भाषेत लिहीलेल्या एका लेखात विश्वकवि श्री रवींद्रनाथ टागोरांनी त्यांचे वंदन सुंदर काव्य रचून केले आहे. त्यात आपण सुद्धा सहभागी होऊ या.

**''विभिन्न साधकांच्या भिन्न भिन्न साधनाधारा**
**तुमच्या जीवनसागरात येऊन मीलित झाल्या आहेत,**
**तुमचे जीवन त्या अनंताच्या वाटेवर**
**एक नवीन तीर्थ होऊन बसले आहे.**
**देशविदेशातील नर-नारी**
**तुम्हाला वंदन करीत आहेत.**
**त्या वंदन-संगीतात मीहि आपला स्वर मिळवीत आहे.''**

**- स्वामी विष्णुपादानंद**
प्रमुख - रामकृष्ण मिशन आश्रम, बीड बायपास,
औरंगाबाद ४३१ ००५, दूरभाष : २३७ ६०१३, २३७ ७०९९



# श्रीरामकृष्ण आणि भक्तियोग

**डॉ. शिरीष गणेश लिमये**
एम.कॉम.एम.फिल, पीएच.डी. – उद्योजकता विकास
सिम्बॉयसिस कला व वाणिज्य महाविद्यालयात प्रपाठक व विकास प्रमुख. १९८३ पासून कार्यरत. १२ पुस्तके वाणिज्य शैक्षणिक विषयावर प्रकाशित. ई.एम.एम.आर.सी. पुणे विद्यापीठ ३० शैक्षणिक विषयातील फिल्म, राष्ट्रीय स्तरावरील २ संशोधन, सेमिनारमध्ये पेपरला बक्षिस मिळाले. रामकृष्ण मठाशी सलंग्न. विवेकानंद भक्त.

'योग' हा शब्द 'युज' या धातूपासून बनलेला आहे. 'युज' म्हणजे 'जोडले जाणे'. 'भक्तियोग' म्हणजे खऱ्या किंवा अकृत्रिम भावाने भगवंताशी जोडले जाणे. भगवंताचे सतत अनुसंधान साधणे. असे अनुसंधान साधण्याचे इतरही मार्ग शास्त्रात सांगितलेले आहेत. उदाहरणार्थ कर्मयोग, राजयोग इ. पण भगवंताचे सतत अनुसंधान साधण्याच्या या सर्व मार्गांमध्ये भक्तियोगाचे एक वेगळेपण आहे आणि ते म्हणजे भक्तियोगाची उत्पत्ती, भक्तियोगाचे परिपोष आणि भक्तियोगाची समाप्ती हे सारे भगवंताच्या प्रेमातच होते. भक्ति म्हणजे भगवंतावरील प्रगाढ प्रेम. भक्तियोग म्हणजे भगवंतावर मन एकाग्र करुन निरंतर त्याच्या भजनात आणि ध्यानात रत राहणे. भगवंताच्या सगुण–साकार रुपाची आराधना करणे.

श्रीरामकृष्णांना भक्तीचे बाळकडू त्यांच्या माता–पित्याकडूनच मिळालेले होते. भगवंताची पूजा आणि चिंतनात राहून जीवनातील सर्व संकटात भगवंतावर पूर्ण श्रद्धा ठेवून स्वतःच्या कुटुंबाचे पालन पोषण करणाऱ्या श्री. क्षुदिराम चटोपाध्याय या आपल्या वडिलांचे जीवन त्यांनी जवळून पाहिले होते. आपल्या मातोश्री चंद्रादेवी यांची शिवभक्ती आणि शिवाची आराधना त्यांनी अनुभवलेली होती. याचा एक खोलवरचा कायमस्वरुपी असा संस्कार गदाधरच्या म्हणजे श्रीरामकृष्णांच्या मनावर न कळत झाला होता, त्यामुळे अगदी बालपणापासूनच आदर्श भक्ताच्या लक्षणांचा अंकूर त्यांच्या जीवनात उगवला होता. पुढे राणी रासमणींनी उभारलेल्या काली मंदिरात पुजारी म्हणून नियुक्त झाल्यावर त्या भक्तीच्या अंकुराचे रोप वाढू लागले.

**श्रीरामकृष्णांची कालीपूजा**

श्रीरामकृष्णांच्या चरित्राचे प्रधान वैशिष्ट्य असे की त्यांना आपल्या आराध्य दैवतेशी सतत जोडलेले राहण्यासाठी त्यांना कोणतेही लहान–मोठे आलंबन पुरत असे. लहानपणी नाटकात शिवाची भूमिका करताना ते शिवाच्या चिंतनात इतके मग्न होऊन गेले की नाटकातील संवाद वगैर न म्हणता ते शिवाच्या चिंतनात स्तब्ध होऊन गेले. एकदा काही भक्तांच्या बरोबर ते सर्कस पाहायला गेले असताना तेथील सिंहाला पाहून त्यांना सिंहवाहिनीची आठवण झाली व याच सिंहावर माता बसते. सिंहच मातेचे वाहन आहे. या अनुसंधानातून त्यांना मातेची आठवण झाली आणि ते भगवंताशी एकरुप झाले. पुढे सर्कस बघायचे भानच त्यांना राहिले नाही.

अशाप्रकारे अगदी लहानश्या आलंबनाने लौकिकाचे भान सुटून अलौकिकावर मन एकाग्र करण्याची उपजतप्रवृत्ती व त्याला अनुकूल असे संस्कार असणाऱ्या श्रीरामकृष्णांना, कोलकत्याच्या दक्षिणेश्वरला राणी रासमणींनी उभारलेल्या काली मंदिराचे पुजारीपद प्राप्त झाल्यावर, आपल्या आराध्य दैवतेशी सर्व भावाने एकरुप होण्याची सोय त्यांना उपलब्ध झाली. श्रीरामकृष्ण काली मातेची पूजा करताना भक्तिरसात न्हाऊन निघत असत. जो ती पूजा दुरुन पाही तोसुद्धा मंत्रमुग्ध होत असे. त्यांच्या पूजेत कृत्रिमपणा नसे. ते पूजा करताना हृदयाच्या तीव्र आवेगाने आणि अगदी नैसर्गिकपणे मुक्त कंठाने समधूर सुरात गात असत. गाताना मातेच्या विरहाने व्याकूळ झाल्याने, त्यांच्या दोन्ही डोळ्यांतून दिव्याश्रू घळाघळा ओघळत असत. त्या अश्रूंनी त्यांची छाती भिजून जात असे. त्यांचे देहभान हरपून जाई. आईचं दर्शन व्हावं म्हणून त्यांचा जीव तळमळत असे. शरीराचा रक्त प्रवाह छातीकडे आकृष्ट होऊन छाती आरक्त होत असे. अशा वेळी ते पूजेचा प्राथमिक मंत्र म्हणत असत. "हे कुलकुंडलिनी माते जागी हो.." असा मंत्र म्हणताच त्यांच्या शरीरावर त्या मंत्राचा प्रभाव पडत असे. खरोखरच ती शक्ती जागी होत असे. अश्यावेळी त्यांचे शरीर विलक्षण तेजःपुंज दिसत असे. आपल्या पूजा स्थानाच्या चोहूकडील जागा पवित्र करण्यासाठी ज्यावेळी पूजा विधीनुसार ते म्हणत 'रं इति जलधारया वह्नीप्राकारं विचिंत्य...' तेव्हा त्यांना असे दिसत असे की शेकडो जिव्हा विस्तारलेल्या अग्निच्या ज्वाला सर्व विघ्नांपासून पूजास्थानाचे संरक्षण करीत आहेत. अशा प्रकारे पूजा हा एक अलौकिक विधी होत असे. या पूजेला काळ आणि वेळ याची मर्यादा नसे. पहाटे फुले तोडून माळा गुंफण्यात आणि कालीमातेला त्या माळांनी सजविण्यात कितीतरी वेळ ते घालवित असत. पूजा विधीच्या वेळी ते आपल्याच डोक्यावर फूल ठेवून दोन–

दोन तास एखाद्या खांबाप्रमाणे स्तब्ध बसून राहात असत. अशी पूजा अनेक तास चालत असे. श्रीरामकृष्ण काली मातेच्या मूर्तीशी संवाद साधत असत. मातेला नैवेद्य अर्पण केल्यावर ते माता प्रत्यक्ष जेवत असल्याचा भाव धारण करुन बसून राहात असत. त्यांना दिसे की आईच्या नेत्रांतून अपूर्व तेजाचा किरण लखलख करीत बाहेर येऊन निवेदिलेल्या समस्त खाद्य पदार्थांना स्पर्श करुन त्याचा सारभूत भाग ग्रहण करुन परत त्या नेत्रांमध्ये तो तेजाचा किरण मागे घेतला जात आहे. श्रीरामकृष्ण मातेशी संवाद करीत असत व मातेला विचारत असत, 'रामप्रसाद प्रभृति भक्तांना तुझं दर्शन लाभलं होतं. तुझं दर्शन लाभत असतं ना, मग मला का बरं तुझं दर्शन लाभणार नाही. आई तू रामप्रसादांना दिसलीस मग मला का बरं दिसणार नाहीस.' दिवसांमागून दिवस चालले आहेत. मातेने दर्शन दिलेलं नाही या मातेच्या विरहातिरेकानं ते जमिनीवर गडबडा लोळत असत. आपली छाती व चेहरा जमीनीवरील वाळूत घासत असत. त्यांचा चेहरा व छाती रक्तबंबाळ होत असे. एक दिवस त्यांनी कालीमातेच्या हातातील खड्ग उचललं आणि मातेचं दर्शन जर झालं नाही तर आता आपला प्राण त्याग करुन टाकायाचा या हेतूनं ते खड्ग आपल्या मानेवर ते आदळणार इतक्यात त्या मंदिराचा सारा गाभारा एका अलौकिक प्रकाशाने उजळून गेला. मृण्मयी रुपातील काली मातेनी श्रीरामकृष्णांना चिन्मयी स्वरुपात दर्शन दिले. शरीराचं भान लोपून ते निपचित पडून राहिले. त्यांना दिसू लागले की आईची वराभयदायीनी मूर्ती हसत आहे, बोलत आहे, परोपरीने सांत्वन करीत आहे. त्यांना शिकवित आहे.



**श्रीरामकृष्णांची दास्यभक्ती**

आपल्या साधनेच्या पहिल्या चार वर्षांत, काली मातेची पूजा करुन श्रीरामकृष्णांनी कालीमातेचे दर्शन प्राप्त करुन घेतले. पण त्यावर ते संतुष्ट राहिले नाहीत. त्यांचे चित्त त्यांच्या कुलदेवतेकडे म्हणजेच भगवान श्रीरामचंद्रांकडे आकृष्ट झाले. हनुमंताच्या दास्य भक्तितून श्रीरामचंद्रांचे दर्शन शक्य होईल अशी त्यांची श्रद्धा होती. त्यांची दास्य भक्तिची साधना सुरु झाली. ते स्वतःला प्रभू रामचंद्रांचे दास म्हणवून घेऊ लागले. ते स्वतःचा देहबोध विसरुन गेले आणि आपण प्रभू रामचंद्रांचे अनन्य दास हनुमंत आहोत हा भाव त्यांनी धारण केला. या काळात त्यांचे खाणे, पिणे, वागणे, बोलणे, राहणे सारे काही बदलून गेले. हनुमंत खात तसा कंदमुळे व फलाहार ते करु लागले. नेसते धोतर शेपटासारखे कंबरेला बांधून ते हिंडत असत. हनुमंताप्रमाणे रघुवीराचा सतत जप करीत असत. आश्चर्याची गोष्ट म्हणजे याच काळात त्यांच्या कंबरेच्या खालचे माकड हाडही इंचभर वाढून गेले होते. ज्या आलंबनाने श्रीरामकृष्ण भगवंताला आळवीत असत त्या आलंबनाचा परिणाम त्यांच्या आहार, विहारावरच नव्हे तर त्यांच्या शरीरावरही होत असे. इतके तन मन अर्पून ते आलंबन स्वतःच्या जीवनाचा अविभाज्य भाग होऊन जात असे. भगवंतावरील प्रेमाचा तो त्यांच्या शरीरावर झालेला एक विलक्षण प्रभाव होता. दास्यभक्तिच्या काळात त्यांना साक्षात सीतामाईचे अलौकिक दर्शन घडले होते. आई, आई असं म्हणत ज्या क्षणी त्यांनी सीतामाईच्या चरणकमलांवर आपले मस्तक टेकविले त्याच क्षणी त्यांना आढळले की सीतामाईच त्यांच्या शरीरात प्रविष्ट झाली. कमालीचे भारावून जाऊन ते बाह्य संज्ञा लोप पावून निपचित पडून राहिले.

**श्रीरामकृष्णांची वात्सल्यभक्ती**

भक्तिशास्त्रात सांगितलेल्या वात्सल्य भावाच्या साधनेकडे श्रीरामकृष्णांचे लक्ष आकृष्ट झाले. वात्सल्य भावातून आपण आपल्या काली मातेचे दर्शन का घेऊ नये असा भाव त्यांच्या मनात उत्पन्न झाला. आपण स्त्री आहोत. आपण जगन्मातेची सखी आहोत. जगन्मातेला आपण आपल्या हातातील चवरीने वारा घालण्याची सेवा करीत आहोत या भावात ते आता रंगून जाऊ लागले. आपण पुरुष आहोत ही गोष्टही ते विसरुन जात. स्त्रीच्याच वेषात ते वावरु लागले. इतकेच नव्हे तर स्त्रीच्याच वेषात इतर स्त्रियांप्रमाणेही तेही मातेचे दर्शन घेऊ लागले. याच काळात त्यांना जटाधारी नावाच्या एका साधूने 'श्री रामलाला' नावाची रामाची एक बालक मूर्ती दिली आणि श्रीरामकृष्णांची वात्सल्यभावाच्या साधनेची खऱ्या अर्थाने सुरुवात झाली. स्त्री भावाच्या जोराने त्यांचे हृदय वात्सल्य रसाने भरुन गेले. रामलाला माझा मुलगा आहे. माझे त्याच्यावर प्रेम आहे. आईला आपल्या मुलाची जशी ओढ आणि प्रेम वाटते तसे प्रेम त्यांच्या हृदयात उत्पन्न होऊ लागले. ती रामलालाची मूर्ती सतत स्वतः जवळ ते बाळगीत असत. जर ती मूर्ती दृष्टीआड झाली तर त्यांची नजर कावरीबावरी होत असे. अगदी जीव कासावीस झाल्याप्रमाणे ते त्या रामलालाची वाट पाहात बसत. या काळात त्यांना श्री रामचंद्रांचे बालक स्वरुपात दर्शन प्राप्त झाले होते.

**श्रीरामकृष्णांची मधुरा भक्ती**

**कृष्णैकरसिका गोपिकेने एकदा असे म्हटले होते की**

**न खलु गोपिकानन्दनो भवान् अखिलदेहिनाम् अन्तरात्मदृक् ।**

अर्थात् - ''प्रिय सख्या, तू काही नुसता यशोदानंदन नाहीस तर यच्चयावत् सगळ्या देहधारी जीवांच्या अंतरात्म्यातला तू द्रष्टा आहेस.''

म्हणजेच, सच्चिदानंदघन परमात्मा श्रीकृष्णच एकमेव पुरुष आहेत बाकी सर्व प्रकृती आहे. जगतातील स्थूल-सूक्ष्म सर्ववस्तू आणि प्रत्येक जीव त्या एकमेवाद्वितीय श्रीकृष्णाच्याच अंशाने उत्पन्न झालेला आहे आणि म्हणून मी त्या श्रीकृष्णाची पत्नी आहे. शुद्ध आणि पवित्र

अंतःकरणाने जर भक्ताने भगवंताला पतिरुपाने भजले तर त्याची प्राप्ती होते असे भक्तिशास्त्र सांगते. भगवान श्रीरामकृष्णांनीही गोपींच्या या कामगंधविहीन शुद्ध भावातून म्हणजेच मधुरभावातून हेच अद्वैत अनुभवले की श्रीकृष्ण हे नुसते त्यांचे पती नाहीत, तर ते सगळ्या जगाचे चिंतामणी आहेत.

या लेखाच्या शेवटी असे म्हणावेसे वाटते की भगवान श्रीरामकृष्णांच्या जीवनात भगवत् भक्ती ओतप्रोत भरलेली होती. भक्तिशास्त्रातील सर्व सूत्रे, दैनंदिन जीवनात कशी उतरवायची, याचे भगवान श्री रामकृष्ण हे एक चालते बोलते उदाहरणच होते. त्यांच्या चरित्राचा अभ्यास म्हणजे भक्तियोगाचा चालता बोलता मानदंडच होय. श्रीरामकृष्णांच्या सर्व साधनांतून समस्त भक्तिशास्त्राचं प्रामाण्य सिद्ध होते.

श्रीरामकृष्णांच्या या साधक भावांविषयी ज्यांना अधिक जिज्ञासा असेल त्यांनी "श्रीरामकृष्णलीलाप्रसंग भाग १" हा श्रीरामकृष्णांचेच अंतरंगी शिष्य स्वामी सारदानंद महाराज यांनी लिहिलेला व रामकृष्ण मठ, नागपूर यांनी प्रकाशित केलेला ग्रंथ अवश्य वाचावा ही नम्र विनंती.

**डॉ. शिरीष गणेश लिमये,**
पुणे, मो. ०९४२१०७७७००
E-mail : dr.limayeshrish@gmail.com



# परम पूज्य श्रीरामकृष्ण आणि ज्ञानयोग

**डॉ. कल्याणी माधव नामजोशी**
M.Sc. (Electronics), M.A. (संस्कृत) Ph.D. (संस्कृत वेदान्त)
'साक्षेप समर्थाचा', 'एक जनार्दनी', 'तेजाचं चांदणं' या पुस्तकाचे सहलेखक, गरवारे महाविद्यालयात प्राध्यापक, १९७२-७४. त्यानंतर शेती. वैदिक वाङ्मय, उपनिषदे, भगवद्गीता, ज्ञानेश्वरी, दासबोध आणि इतर संतवाङ्मय यांवर महाराष्ट्रात सर्वत्र व्याख्याने आणि प्रवचने.

परम पूज्य रामकृष्णांचा तत्त्वज्ञान-कोश म्हणजे 'श्रीरामकृष्ण-वचनामृत' आहे. सर्व संतांचे समन्वयात्मक तत्त्वज्ञान पू. ठाकुरांनी त्यांच्या आपल्या स्वतःच्या शैलीत मांडले आहे. संत वचने म्हणजे तत्त्वज्ञानाची गंगोत्री उपनिषदे यांचा सरल, सोपा, साधा व सुमधुर अनुवाद आहे. उपनिषदांच्या प्रमाणेच साधी, सोपी सरल भाषा, दृष्टान्त, कथा यांच्या आधारे तत्त्वज्ञानाला पारदर्शक करणारे अक्षर वाङ्मय आहे. परम पूज्य ठाकुरांचे वचनामृतही यातील अव्वल दर्जाची बोधसुधा आहे.

पू. ठाकुरांचा ज्ञानयोग याचा अर्थ कसा लावावयाचा हे पू. रामकृष्णांच्या वाङ्मयातून सारग्रहण कोणत्या दिशेने करावयाचे यावर अवलंबून आहे. तसेच लिहिणाऱ्याच्या बौद्धिक कुवतीवर व आकलनशक्तीवर अवलंबून आहे. नाहीतर वचनामृतांतील अमृतसागरात तत्त्वबोधीची अगणित मौक्तिके आहेत, ती किती व कशी वेचावीत हे वेचणाऱ्याच्या भाग्यावर अवलंबून आहे.

भगवद्गीतेच्या आधारे योगाचे प्रमुख चार भाग आहेत. १) भक्तीयोग २) ज्ञानयोग ३) कर्मयोग ४) ध्यानयोग / राजयोग. पू. ठाकुरांना भक्ती, प्रेम, अनुराग प्रिय आहे. त्या भक्तीचे स्वरुप स्पष्ट करताना जे तत्त्वज्ञान मांडले आहे. त्यामध्ये वरील चारही योगांचा फार सुंदर समन्वय आहे, त्यांचा अप्रतिम मिलाप आहे. पू. ठाकुरांना आवडणाऱ्या नारदपंचत्रातील हरि भक्तीच्या खालील श्लोकांनी त्यांचे तत्त्वज्ञान अवगत करुया.

**अंतर्बहिर्यादि हरिः पसा ततः किं नान्तर्बहिर्यदि हरिः तपसा ततः किम् । आराधितो यदि हरिः तपसा ततः किं नाराधितो यदि हरिः तपसा ततः किम् ।। विरम विरम ब्रह्मन् किं तपस्यासु वत्स व्रज व्रज द्विज शीघ्रं शंकरं ज्ञानसिंधुम् । लभ लभ हरि भक्तिं वैष्णवोक्तां सुपक्वां भवनिगड निबंधच्छेदनीं कर्तरींच ।।**

पू. ठाकुर ज्ञानाची व्याखा करताना सांगतात, ''मी मी माझं' हे झालं अज्ञान. 'हे ईश्वरा, तूच कर्ता अन् जे काही आहे ते तुझंच' याच नाव ज्ञान. पांडित्याद्वारा त्याची प्राप्ती होणे शक्य नाही. अन् विचाराद्वारा त्याचे आकलन करुन घ्यायला समर्थ तरी कोण आहे. त्याचं अनंत ऐश्वर्य - कुणाची ताकद आहे ते समजायची? त्याच्या कार्याचा तरी कुणाला थांग लागणार आहे? भीष्मदेव - जे स्वतः साक्षात् अष्टवसूंपैकी एक वसू होते - ते देखील म्हणाले, 'अहो, केवढं हे आश्चर्य तरी! स्वयं भगवान सतत पाठीराखा असताना देखील पांडवांच्या हालअपेष्टांना सीमा नसावी अं! भगवंताचे कार्य कुणाला बरं समजणार!' त्याच्या चरणकमली भक्ती ज्याने उपजेल, त्याचाच अवलंब करणे उचित.''

**पूज्य ठाकुरांचे ब्रह्मतत्त्व**

पू. ठाकुर म्हणतात, 'ब्रह्मतत्त्वाचे साकार व निराकार, सगुण व निर्गुण दोन्ही स्वरुप सत्य आहेत. त्याकरता ते दृष्टांत देतात पाणी आणि बर्फाचा. ते म्हणतात, ''ब्रह्माकरिता पाणी अन् बर्फ ही उपमा ठीक आहे. सच्चिदानंद जणू अनंत जलराशी, महासागराचं पाणी, थंड प्रदेशात ठिकठिकाणी जसं बर्फाचा आकार धरतं, त्याचप्रमाणं भक्तीच्या थंडीनं तो सच्चिदानंद भक्तांकरता साकार रुप धारण करतो. ऋषींना त्याच अतिन्द्रिय चिन्मय रुपाचं दर्शन घडलं होतं, शिवाय त्यांनी त्याच्याशी संभाषण देखील केलं. भक्ताचं प्रेमाचं शरीर; 'भागवती तनू द्वारा त्याच चिन्मय रुपाचं दर्शन होतं.''

पू. ठाकुर पुढे म्हणतात, 'आणखी एक प्रकार - अवाङ् मनस-गोचर ब्रह्म, ज्ञानसूर्याच्या उष्णतेनं बर्फ वितळून जातं. ब्रह्मज्ञानानंतर, निर्विकल्प समाधीनंतर पुन्हा तेच अनंत, वाक्मनाच्या अतीत, अरुप निराकार ब्रह्म उरतं.

ब्रह्माचं स्वरुप तोंडानं वाणीनं सांगता येत नाही. साधक स्तब्ध होऊन जातो, निःशब्द होतो. पक्षी जितका उंच उडतो, त्याच्याही वर आणखी अवकाश आहेच, होय ना? मिठाची बाहुली समुद्राचा थांग लावायला गेली होती, पण परत फिरुन समुद्राच्या खोलीचा निरोप सांगण्याचं मात्र तिथंच राहिलं! शुक्रदेवादिकांनी ब्रह्मसमुद्राचं फक्त दर्शन घेतलं नि स्पर्श केला मात्र, त्यात डुबी दिली नाही.

झाडून साऱ्या वस्तू उष्ट्या होऊन गेल्या आहेत, नाही म्हणायला फक्त ब्रह्ममात्र अजून उष्ट झालेलं नाही. तात्पर्य की, ब्रह्म काय, हे अद्याप

कुणी तोंडानं सांगू शकला नाही, तोंडानं उच्चारताच गोष्ट उष्टी होऊन जाते.''

तैतिरिय उपनिषदातील 'यतो वाचो निवर्तन्ते अप्राप्य मनासा सह!' या मंत्राचे भाषांतर म्हणजे पू. ठाकुरांची वरील उक्ती आहे. ज्ञानमार्गाने, विचारपथाने गेल्यास साकाररुप दिसेनासे होते. ते निराकार होऊन जाते. पण परब्रह्माचीच ही दोन (साकार आणि निराकार) रुपं आहेत हे पक्के लक्षात ठेवावे हा पू. ठाकुरांचा आग्रह आहे.

पू. ठाकुर म्हणतात, की ब्रह्माला जाणून घ्यायचे आहे तर नुसते शास्त्र वाचून काय उपयोग? शास्त्रात वाळू-साखरेची सरमिसळ असते. त्यातून साखर तेवढी निवडून काढणे कठीण असते. म्हणून शास्त्राचे मर्म साधू मुखातून, गुरु मुखातून ऐकावयास पाहिजे. त्यानंतर मग ग्रंथाची आवश्यकता कशासाठी? शास्त्राचे मर्म गुरुमुखातून ऐकून घेऊन त्यानंतर साधना करावयास हवी. ही साधना बरोबर झाली तर दर्शन होते. डूब दिली तरच खरी साधना होते. बसल्या बसल्या शास्त्राची वचने घेऊन नुसता तर्क विचार केल्याने ब्रह्मज्ञान होत नाही.

पू. ठाकुर म्हणतात की ब्रह्म आणि जगन्माता एकच आहेत. त्या एका परमात्म्याखेरीज दुसरे काहीच नाही. तोच परब्रह्म परमात्मा आपल्यात जोवर 'मी' राखून ठेवतो तोवर भासते की आदिशक्तीच्या रुपाने तोच सृष्टीचा उत्पत्ति, स्थिती आणि प्रलय करीत आहे.

जे ब्रह्म तीच आद्यशक्ती, हा त्यांचा तत्त्वसिद्धांत पटवून देण्यासाठी ते एका सुंदर उदाहरणाने पटवून देतात, ''एका राजानं एका योग्याला म्हटलं की मला एका वाक्यात ज्ञान सांगा. योगी म्हणाला, ''ठीक आहे, एका वाक्यातच तुला ज्ञान लाभेल. थोड्याच वेळात एक गारुडी राजासमोर येऊन उभा राहिला. राजानं पाहिलं तो आपल्यापासून केवळ दोन बोट फिरवीत आहे अन् म्हणतो आहे, राजा बघ, बघ हे बघ. राजा शांतपणे सारं बघू लागला. थोड्याचवेळानं त्याला दिसून आलं की दोन बोटांचं एकच बोट होऊन गेलं आहे. याचा अर्थ असा की ब्रह्म आणि आदिशक्ती प्रथम दोन वाटतात. पण ब्रह्मज्ञान झाल्यावर त्या दोन राहत नाहीत. अभेद निर्माण होतो. दोनाच्या विरुद्ध एक नाही तर एकमेवाद्वितीय''.

पू. ठाकुरांची आदिशक्ती विषयीची धारणा हे त्यांचे स्वतंत्र वेगळे मत नाही. अद्वैताच्या मांडणीचे एक कौशल्य आहे. श्रीज्ञानदेवांनी अमृतानुभवात जसे पुरुष-प्रकृतिचे वर्णन केले आहे. तसेच येथे पू. ठाकुरांनी म्हटले आहे. परमात्म्याचे 'एकमेवाद्वितीयत्वा' म्हणजे त्या एका खेरीज दुसरे काही नाही.

**साधनामार्ग** – पू. ठाकुरांनी ज्ञान, भक्ती आणि योग या मार्गाच्या विषयी चर्चा केली आहे. भक्तीतील प्रेम – अनुराग, योगातील समाधी व ज्ञान्याची परब्रह्माविषयी धारणा त्यांनी त्यांच्या पद्धतीने स्पष्ट करुन सांगितली आहे.

ज्ञानमार्गाविषयी पू. ठाकुर म्हणतात की 'वेदांत विचारासमोर रुप वगैरे सर्व बेपत्ता होतं. ब्रह्म सत्य आणि नामरुपात्मक जगत सर्व मिथ्या आहे व ब्रह्म निर्गुण आहे. पण जोपर्यंत स्वतः सत्य आहे असे वाटते तोपर्यंत जगही सत्य आहे. ईश्वराची नानारुपेही सत्य आहेत. एवढेच नाहीतर ईश्वराचा व्यक्तिबोधही सत्यच आहे.

वेदाने ब्रह्मज्ञान्याच्या नाना प्रकारच्या अवस्था वर्णन केल्या आहेत. ज्ञानमार्ग फार कठीण आहे. विषयवासना क्लेषमात्र असली तर ज्ञान होत नाही. हा मार्ग कलियुगासाठी नाही. वेदाने ज्ञानाच्या सप्तभूमिका सांगितल्या आहेत. मनाच्या भिन्न भिन्न अवस्थांची ही स्थाने आहेत. मन प्रपंचात घुटमळत त्यावेळी उर्ध्व दृष्टी असू शकत नाही. प्रवृत्ति पूर्णपणे प्रभावी असते.शक्ती (कुंडलिनी) अधोमुख असते प्रभाव मूलाधार, स्वाधिष्ठान आणि मणिपूर चक्राचा असतो. मनाच्या चवथ्या भूमिकेत चैतन्य जागृत होते. या स्थितीत चोहोबाजूने ज्योती दिसतात. यानंतर मन अधोमुख, अधोगामी बनत नाही. मनाची पंचभूमी कंठ आहे. मन इथवर आलं की अविद्या-अज्ञान संपुष्टात येतं व भगवत्कथा सोडून अन्यरुची संपून जाते. मनाची सहावी भूमी कपाळ आहे. मन जेव्हा इथे पोहाचतं तेव्हा अहर्निश ईश्वरीय व्यापक स्वरुपाचं दर्शन घडतं. पण त्यातही थोडा मी असतोच. त्यामुळेच प्रत्यक्ष त्या रुपाचा स्पर्श घडत नाही. सप्तमभूमी शिरोदेश. तिथे मन जाताच समाधी लागते व ब्रह्मज्ञान्याला प्रत्यक्षदर्शन ब्रह्मदर्शन होते. पण त्या दशेत शरीराला फार काळ टिकाव धरता येत नाही, धरत नाही. एकवीस दिवसात मृत्यू. ही ब्रह्मज्ञान्याची अवस्था. एक गडवा पाण्याने जर माझी तहान भागत असेल तर तळ्यात पाणी किती हे मोजण्याची नसती पंचाईत कशाला? असा बिनतोड सवाल पू. ठाकुर करतात.

**योगमार्ग** – पू. ठाकुर समाधीविषयी विवरण करतात, समाधी विभिन्न प्रकारची असते. जड समाधी, चेतन समाधी, स्थिर समाधी, उन्मनासमाधी वगैरे, समाधीत बाह्यसंज्ञेचा लोप होतो. पण तरीही भगवान बहुतेकवेळा थोडासा अहं राखून ठेवतात. नाहीतर आस्वादन लीला कशी होणार? कधीकधी तो थोडा अहं देखील भगवान नाहीसा करुन टाकतात. त्या अवस्थेला म्हणतात 'जड-समाधी-निर्विकल्प समाधी'. पू. ठाकुरांनी या स्थितीचे फार सुंदर वर्णन केले आहे, 'त्यावेळी काय वाटत असतं शब्दांनी सांगता येत नाही. मिठाची बाहुली समुद्राचा थांग लावायला गेली, पाण्यात पाय द्यायचाच उशीर - गेली ती गेलीच! 'तदाकारता'. मग वर परतून खबर देणार तरी कोण - समुद्र किती खोल आहे याची?''

वेदांताच्या सप्तभूमिकांचे योगशास्त्राच्या दृष्टीने पू. ठाकुरांनी दिलेले स्पष्टीकरण पाहण्यासारखे आहे. ज्ञानमार्गातील पहिल्या तीन भूमिका म्हणजे वर उल्लेख केल्याप्रमाणे मूलाधार, स्वाधिष्ठान आणि मणिपूर ही चक्रे मन तेव्हा येथे वसती करते. चौथी भूमिका म्हणजे योग्यांच्या अनाहतपद्मस्थानी मन जातं त्यावेळी जीवात्मा अग्निशिखेसारखा आहे असं दर्शन होतं. ज्योतीच दर्शन होतं. मनाची पंचभूमी म्हणजे विशुद्धी चक्र. ईश्वर कथेत मन या स्थानावर रममाण होतं. पष्ठभूमि म्हणजे आज्ञाचक्र. त्या ठिकाणी मन गेल्यास ईश्वराचं दर्शन होतं. सहाही चक्रांना भेदून गेल्यावर सप्तमभूमी लागते. तिथे गेल्यावर मनाचा ब्रह्मात

लय होऊन जातो. जीवात्मा परमात्मा एक होऊन जातात. साधक समाधीत प्रवेश करतो. देहबोध निमतो. बाह्यसंज्ञा लुप्त होते, विचार लोपून जातो, नानात्त्वज्ञान निघून जाते. पण ह्या भूमीत काय होतं हे शब्दांनी सांगता येत नाही.

पू. ठाकुरांची खास आवडती योगभूमिका म्हणजे भक्ती, प्रेम, अनुराग. अनुरागाखेरीज केवळ यज्ञयाग करुन कुणी परमात्म्याला जाणू शकत नाही. अनुराग, प्रेम, पक्व भक्ती ही आवड जर एकदा निर्माण होईल तर साकार आणि निराकार दोन्ही रुपात त्याचं दर्शन घडेल. पण म्हणून कसल्याही सवंग भक्तीने ईश्वराचा लाभ होत नाही. ते म्हणतात प्रेमभक्तीचं दुसरं नाव रागभक्ती. तर भक्तीचा दुसरा प्रकार म्हणजे वैधी भक्ती. वैधी भक्तीतून क्रमाक्रमाने हळूहळू भक्तीचा उदय होतो. जोपर्यंत त्याच्याविषयी प्रेम उत्पन्न होत नाही, तोपर्यंत भक्ती म्हणजे अपरिपक्व भक्ती. अपक्व भक्ती, ज्याची भक्ती कच्ची, तो अध्यात्मिक विषय, उपदेश वगैरेची धारणा करु शकत नाही. भक्ती परिपक्व झाल्यावरच यथार्थ धारणा होते. पू. ठाकुरांनी त्यांची धारणा व भक्तीतील भूमिका ते खालील दोह्यांमध्ये असलेल्या आशयाच्या द्वारा एके ठिकाणी प्रकट केली आहे.

**जो राम दशरथका बेटा, वही राम घर घर मे लेटा।**

**वही राम जगत पसेरा, वही राम सबसे न्यारा।**

**ऐसी भक्ति करो घट भीतर, छोड कप चतुराई।**

**सेवा बन्दि और अधीनता, सहज मिले रघुराई।**

ब्रह्मप्राप्तीनंतर समाधीलाभानंतर, कुणी कुणी खाली येऊन 'विद्यामय अहं' 'भक्तीचा अहं' राखून राहत असतात. बाजार आटोपल्यावर कुणी कुणी स्वखुशीने तिथेच थांबतात. जसे नारद वगैरे. ते लोकोपदेशासाठी 'भक्तीचा अहं' घेऊन राहतात. शंकराचार्यांनी लोकशिक्षेस्तव 'ज्ञानाचा अहं' धरला होता. ज्यांना ईश्वर प्राप्ती झाली असेल त्यांचे कामक्रोध नावाचेच असतात. जणू जळलेली दोरीच. आकार दोराचा नुस्ता फूं केला की बेपत्ता. चित्त अनासक्त होताच त्याचे दर्शन होते. शुद्ध मन, शुद्ध बुद्धी अन शुद्ध आत्मा ही तीनही एकच वस्तू आहेत'. ठाकुर आपले ब्रह्मज्ञानी पुरुष व ब्रह्मज्ञानाचे स्वरुप या विषयीचे मत प्रकट करतात. कारण ब्रह्मज्ञानानंतर जीव व परमात्मा एकरुप झाल्यावर देह स्थितीत फार काळ राहत नाही. असे ज्ञानी जेव्हा ईश्वरप्रेरणेने कार्य करण्यासाठी पृथ्वीतलावर अवतीर्ण होतात तेव्हा ते अहंकार धारण करुनच कार्याला उद्युक्त होतात, कार्य करतात व ईश्वरेच्छेने अवतार संपवतात. पू. ठाकुरांनी त्यांच्या भावना भक्तीशास्त्रातील भक्तीचे प्रकाशाच्या तारतम्याने प्रकट केल्या आहेत. ते आधारपरत्वे शक्तिवैचित्र्य मानतात. रामच सारं काही झाला आहे. पण कुठे त्याच्या भक्तीचा प्रकाश कमी, कुठे जास्त. अवताराच्या ठायी त्याचा प्रकाश एका प्रकारचा तर जीवाच्या ठायी दुसऱ्या प्रकारचा. अवतारी पुरुषात देहबुद्धी असतेच. अवतारी पुरुष स्वेच्छेने आपल्या डोळ्यावर पट्टी बांधतात. तर जीवाच्या बाबतीत फडक्याने पक्के त्याच्या डोळ्यांना बांधलेले असते. ते फडकं जणू पाशच. हे पाश आठ आहेत – लज्जा, घृणा, भय, जाती, कुल, शील, शोक आणि जुगुप्सा गुरुने सोडल्याखेरीज सुटत नाहीत.

पू. ठाकुर अवतारी पुरुष आहेत. त्यांचे जीवन ही त्यांचीच लीला आहे. कारण ते स्वतः प्रभु रामचंद्रांचा विग्रह अवतार आहेत. लीलाधारकाने केलेली ही लीला त्यांच्या लीलासहधर्मचारिणी पू. माताजींच्या सहाय्याने संपन्न केली आहे.

परमेश्वराची लीला दोन प्रकारची असते. नित्य आणि अनित्य. ती एकाच सत्तेची दोन रुप आहेत. तो नाना लीला करतो. ईश्वरलीला, देवलीला, नरलीला, जगत् लीला इत्यादी असे पू. ठाकुरांचे तत्त्वज्ञान आहे.

पू. श्रीरामकृष्णांची अधिष्ठात्री देवता कालीमाता आहे. तिच्या स्वरुपाने वर्णन सर्वदेवतांच्या ठायी जो ब्रह्मभाव भक्ताला प्रतीत होतो. तसाच पू. ठाकुरांना मातेच्या ठायी प्रत्ययाला येतो. ते म्हणतात, 'तूच एकमेव तारण करणारी आहेस. तूच त्रिगुणांचा आश्रय आहेस, तूच परात्पर आहेस. तूच संध्या, तूच गायत्री आणि तूच जगद्धात्री आहे. तू शिवाला अत्यंत प्रिय आहेस. जली, स्थली तूच आहे. तूच सर्वांचे आदि मूळ आहेस, माझ्यात नी सर्व भूतात तू वसत आहेस, तू साकार दिसत असूनही निराकार आहेस.' ह्याच भावाने त्यांनी कालीमातेची साधना केली. त्यांना कालीमाता ही परमात्म्याची माया नाही. ते राम, कृष्ण, विष्णु यासारखे आराध्य रुप आहे. म्हणून ते माता आणि ब्रह्म एकमेवाद्वितीय आहे असे म्हणतात.

पू. ठाकुर म्हणतात की शुद्ध ज्ञान आणि शुद्ध भक्ती एकच. जिथं शुद्ध ज्ञान तिथच शुद्ध भक्तीही माणसाला घेऊन जाते. भक्तीचा पंथ सोपा आहे. ज्ञान्याची स्थिति गंगेच्या पूर्वप्रवाहासारखी असते. एकाच दिशेने वाहाणारी. ज्ञान्याच्या दृष्टीने अवघेच मिथ्या – स्वप्नवत्. तो नेहमी स्वरुपी स्थित असतो. भक्ताचा भावप्रवाह सरळ एकाच दिशेने वाहत नसतो. त्यात भरती ओहोटी चालूच असते. भक्ताला देवाबरोबर विलास करणे आवडते. सच्चिदानंद सागरात तो कधी पोहतो, कधी डुबी मारतो तर कधी वर तरंगतो. सच्चिदानंद एकमेवाद्वितीय आहे. पण शक्तिच्या नामरुपात्मक भेदानुसार भिन्न उपाधींशी संलग्न होते. म्हणून ईश्वराचीही अनेक रुपे प्रत्ययाला येतात. वस्तुतः ब्रह्म आणि शक्ती एकच आहे, अभिन्न आहे. जो सच्चिदानंद तोच सच्चिदानंदमयी. जसा हिरा आणि त्याची प्रभा. त्यामुळे ईश्वरभक्तीत ज्ञानापेक्षा न्यूनाधिक काहीच नाही. किंबहुना भक्तीच्या आसण्याने साधना केली तर ज्ञान आणि भक्ती दोन्ही लाभतात. भक्ती म्हणजे चंद्राचा प्रकाश आणि ज्ञान म्हणजे सूर्याचा प्रकाश. अवतारादिकात भक्तिचंद्र व ज्ञानसूर्य एकाच ठिकाणी पहावयास मिळतात.

शुद्ध भक्ती सिद्ध होण्यासाठी साधकाच्या ठिकाणी ती गोपींची प्रेमाभक्ती, अन्यभिचारिणी–एकनिष्ठ भक्ती पाहिजे असे ठाकुरांचे मत आहे. तर्कज्ञानाची करकर जिच्यात मिसळलेली आहे किंवा असते तिला व्यभिचारिणी भक्ती. असल्या भक्तांची अशी धारणा असते की कृष्णच सारे काही झाला आहे. तोच परब्रह्म, तोच राम, तोच शिव आणि तोच

शक्ती! प्रेमभक्तीत या असल्या ज्ञानाची भेसळ झालेली नसते. या प्रेमभक्तीत दोन गोष्टी असतात. 'अहंता' आणि 'ममता' प्रेमाचा स्वभाव असा आहे की प्रेमिक स्वतःला बलवान समजून आपल्या प्रेमास्पद व्यक्तीला दुर्बल समजत असतो. न जाणो त्याला कष्ट होतील म्हणून प्रेमिक डोळ्यात तेल घालून जपतो, ही त्याची अहंता आणि त्याची रुपासक्ती ही ममता. गोकुळातील गोपींना गोपाळकृष्ण प्रिय आहे तर द्वारेकतल्या भक्तांना अर्जुनाचा कृष्ण प्रिय आहे. त्यांना राधा नको ! ज्ञानमिश्र भक्ती आणि प्रेमभक्ती यात कोणती भक्ती निवडावी असे ठाकुरांना विचारले तर ते म्हणतात ईश्वरठायी अत्यंतिक अनुराग उत्पन्न झाल्याखेरीज प्रेमाभक्ती उपजत नसते. प्रेमात माझी धारणा एकच – साकार माझी आई, निराकार माझा बाप. मी कुणाला वंदू आणि कुणाला निंदू ? दोन्ही पारडी सारखीच भारी !

**श्रीरामकृष्णांचा ज्ञानयोग व भक्तीयोग** – पू. ठाकुर म्हणतात, 'मी तो' 'शुद्ध आत्मा'' हे झाले ज्ञान्यांचे मत. भक्त म्हणतो, 'हे विश्वब्रह्मांड भगवंताचेच ऐश्वर्य, त्याचाच महिमा'. साधकांची भक्ती बघून संतुष्ट होऊन भगवान जे म्हणतील की 'तू म्हणजे मी', ती एक वेगळीच गोष्ट होईल.

तात्पर्य काय की मन स्थिर नसल्यास योग साधणार नाही. मग तुम्ही कोणत्याही मार्गाचा अवलंब करा. मन योग्याच्या काबूत असते. योगी मनाच्या नव्हे. मन स्थिर झाल्यास प्राणवायू स्थिर होतो. कुंभक साधतो. कुंभक भक्तियोगानेही साधतो. भक्तीने प्राणवायूच्या क्रिया स्थिर होऊन जातात. सत्वगुणातून भक्तीची निपज होते. पण भक्तीत देखील सत्त्व, रज, तम असतात. भक्तीतील सत्वगुण विशुद्धसत्त्व असतो. हा एकदाचा लाभल्यास भक्ताचं मन ईश्वराखेरीज इतर कशातच रमेनासे होते. शरीराकडे त्याचं अवधान फक्त देह रक्षणापुरतंच उरते.

त्या साधना काळात सगुणाचीच भक्ती करावी. रुपावर विश्वास ठेवावा. ब्रह्मज्ञान झाल्यावर मग अभेद दर्शन होतं. ब्रह्म आणि त्याची भक्ती एक आहेत याचा अनुभव येतो. पण ब्रह्मज्ञानाच्याही पलिकडची एक अवस्था आहे. ज्ञानानंतर विज्ञान येते. आपल्याला ज्ञान झाले आहे असा ज्याला बोध असतो त्यालाच अज्ञानाची जाणीव असते. ज्याला उजेडाची जाणीव आहे त्याला अंधाराची जाणीव असणारच. विज्ञान म्हणजे ज्याला विशेष प्रकारे जाणणे. लाकडात अग्नि आहे ह्या जाणीवेचं विश्वाचं नाव ज्ञान. तो अग्नि चेतवून त्यावर भात शिजवून खाणं हे विज्ञान. ईश्वर आहे असा प्राणोप्राण बोध होणं याचं नाव ज्ञान आणि त्याच्याशी गप्पागोष्टी करणं, वात्सल्य, सख्य, दास्य, मधुर वगैरे भावांनी त्याच्या सहवासाचा आनंद लुटणं याच नाव विज्ञान. जीव जगतो तो स्वतःच झाला आहे असं दर्शन होण्याला म्हणतात विज्ञान.''

पू. ठाकुरांचा ज्ञानयोग म्हणजे लेखकाच्या मते पू. ठाकुरांची तत्त्वज्ञानाची सिद्धांतिक बैठक, भूमिका, पू. ठाकुरांना भक्तीयोग मान्य आहे. शुद्ध भक्ती, निष्काम भक्ती मान्य आहे. योगाचा कोणताही मार्ग निवडला तरी पुढे कर्म निष्काम होऊन जाते व गलित फल होते. कदाचित कर्माची आवश्यकताही राहत नाही. सर्वांनी मनापासून आणि मुळाशी जाऊन भक्ती करावी, जगत ही आदिमातेची लीला आहे. त्याचा आनंद घ्यावा, सर्व व्यवहार, जीवन सुख दुःख तिच्यावर सोपवावे आणि बालभावात निष्पाप निरागस जीवनाचा आनंद लुटावा.

पू. ठाकुरांचे चरित्र आणि वचनामृत यांची गोडी अवीट आहे. काय आणि किती स्मरावे कसे स्मरावे समजत नाही. ते ब्रह्मासारखेच उष्टे होत नाही. हृदयाने, हृदयाचे, हृदयातून वाचावे. लिहिणाऱ्याच्या सर्व मर्यादा लक्षात घ्याव्यात आणि उदार अंतःकरणाने क्षमाशील होऊन वाचन करावे.

पू. ठाकुरांच्या आवडत्या श्लोक पंक्तींनी लिखाणास विराम ! हृदय कमलामध्ये –

**''निर्विशेष निरीहं हरिहरविधिवेद्यं योगिभिर्ध्यानगम्यम् । जननमरणभीतिभ्रंशि सग्वित् स्वरुपं सकलभुवनबीजं ब्रह्म चैतन्यमीज्ये ।।''**

**डॉ. कल्याणी नामजोशी**
१०१२/४, शिवाजीनगर, पुष्कराज, मित्रनगर कॉलनी,
पुणे – ४११०१६, फोन : २५५६४८६६

# श्रीरामकृष्ण परमहंसांना अभिप्रेत असलेला सेवायोग



**डॉ. रविंद्र माधव भाल्डे,** एम.व्ही.एससी., एम.आय.एस.एस.ए.आर.
(पशु वैद्यक शास्त्रातील पदव्युत्तर पदवी - प्रथम वर्ग - विशेष प्राविण्यासह)
भारतीय पशुप्रजनन संस्थेचे सदस्य. शासकीय सेवेत ३५ वर्षे, सह आयुक्त पदावरुन सेवा निवृत्त. निरनिराळ्या वर्तमानपत्रांतून व नियतकालीकांतून शास्त्रीय विषयावर लेखन व व्याख्याने. रामकृष्ण मठ व मिशन - १४ वे अध्यक्ष प. पू. स्वामी गहनानंदजी महाराज यांचे कृपेने मंत्रदीक्षा प्राप्त. जीवन विकास मासिकातून नियमित लेखन. श्रीरामकृष्ण विवेकानंद सेवा समिती, आलिबाग, जि. रायगड-उपाध्यक्ष. विविध शैक्षणिक, आरोग्य विषयक व आध्यात्मिक कार्यात कार्यरत.

**यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ।**
**अभ्युत्थानम धर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम ।।**
**परित्राणाय साधूनां विनाशायच दुष्कृताम् ।**
**धर्म संस्थापनार्थाय संभावामि युगे युगे ।।** गीता - ४/७-८

वेदान्ती धर्माची जी प्रस्थान त्रयी (मोक्ष संपादक असे तीन सर्वोत्कृष्ट ग्रंथ) १) उपनिषदे २) ब्रह्मसूत्रे व ३) भगवद्‌गीता आहे. त्यापैकी गीता हा एक प्रमुख ग्रंथ मानला जातो. गोंधळलेल्या मनःस्थितीत असलेल्या अर्जुनाला त्याच्या स्वतःच्या कर्तव्याचे स्मरण करुन देतांना भगवान श्रीकृष्णांनी आपल्या स्वतःच्याही अवतार कार्याचे प्रयोजन स्वतःच वरील श्लोकात निविश केले आहे.

आपल्या पुराणकारांनी अवतारांचे गुण, त्यांची कर्मे, स्वभाव इत्यादी बद्दल विशिष्ट सिद्धांतच बनविले आहेत. इतकेच नव्हे तर अवतारांचा जन्म कधी होतो याबाबत पुराणकारांचे ठाम मत असे आहे की, जसजसा काळ जातो तसतशी धर्माला ग्लानी येते. सनातन धर्म (जो पूर्वीपासून चालत आलेला असतो) शक्तीहीन किंवा निष्प्रभ होत जातो. अशावेळी सामान्य माणूस किंवा एकूणच मानवजात मायेच्या, अज्ञानाच्या पडद्याखाली गुरफटून जाते. त्यामुळे तो मानव या मर्त्य जगतालाच सत्य मानतो, त्यातील सुख भोगालाच जीवन मानून आयुष्य घालवू लागतो. त्यामुळे अशांतीच्या अफाट सागरात वाहवत जाऊन शेवटी दुःखाने त्रस्त होतो. सत्याचा त्याला विसर पडतो. अशावेळी या दुबळ्या मानवाच्या उद्‌धारासाठी, त्याच्यावर कृपा करण्यासाठी परमेश्वराचा अवतार होत असतो. असा हा कार्यकारण संबंध आहे. काहीतरी कारण असल्याशिवाय कुठलेच कार्य घडत नाही. असे दिसून येते.

असाच एक अतिशय भव्य दिव्य कार्यकारण संबंध एकोणीसाव्या शतकाच्या पूर्वार्धात, बंगाल प्रांतात श्रीरामकृष्णांच्या जन्माने घडून आला, असे म्हटल्यास ती अतिशयोक्ती ठरु नये.

या काळात आपल्या देशात अनेक उलथापालथी घडून येत होत्या. सनातन हिंदू धर्मावर परकीयांची, विशेषतः इस्लाम धर्मीय राज्यकर्त्यांची सतत ७०० वर्षांपासून आक्रमणे होऊन सामान्य माणूस भरडला जात असताना त्याला स्थैर्य, शांती लाभेल असा ठोस प्रकाश दिसत नव्हता. विजयनगरचे साम्राज्य, छत्रपती शिवाजी महाराज यांच्या सारखे राज्यकर्ते व संत ज्ञानेश्वर, तुकाराम, रामदास यांच्या सारखी अनेक संत-महंत मंडळी जनसामान्यांना आशेचा किरण दाखवित त्यांचे मनोधैर्य वाढवित होती. पण त्याचवेळी व्यापाराचे निमित्त करुन सर्व जगभर हातपाय पसरणाऱ्या जुलमी इंग्रजी सत्तेचा उदय होत होता व याची सुरुवात आपल्या देशात बंगाल प्रांतातच झाली होती. अशा रीतीने ''उषःकाल होता होता काळ रात्र परत आली होती.''

अशा या कसोटीच्या क्षणी परमेश्वराने श्रीरामकृष्णांच्या रुपाने एका सर्वसामान्य माणसाच्या स्वरुपात अवतार घेतला होता. असे श्रीरामकृष्ण परमहंसाच्या जीवन चरित्राचा अभ्यास करताना आढळून येते. त्याकाळात भिन्नभिन्न धर्म, पंथ, उपपंथ, मते, मतांतरे यांचा नुसता गलबला झाला होता. परस्पर विरोधी विचार व भावना यांचा सुळसुळाट झाला होता व याचवेळी कामारपुकुर, जिल्हा हुगळी, पश्चिम बंगाल या गावी १७ फेब्रुवारी १८३६ रोजी श्री. चंद्रमणी देवी व क्षुदिराम चट्टोपाध्याय या गरीब ब्राह्मण दांपत्याचे पोटी एका बालकाचा जन्म झाला. त्याचे नाव ''गदाधर'' ठेवण्यात आले. हा गदाधर म्हणजेच भावी काळातील ''रामकृष्ण परमहंस'' होत.

श्रीरामकृष्ण स्वतः वैदिक-धर्मी होते. कलकत्त्यातील दक्षिणेश्वरच्या काली मंदिराचे 'भवतारिणी' देवीचे ते पुजारी होते. त्यावेळी त्यांनी अत्यंत व्याकुळ, प्रेमभावाने तिची (देवीची) दर्शने प्राप्त करुन घेतली व त्यानंतरही एकंदर १२ वर्षेपर्यंत ते निरनिराळ्या कठोर साधनांमध्ये मग्न होते. या १२ वर्षांचे ढोबळ मानाने - १) १८५५ ते १८५८ २) १८५९ ते १८६२ व ३) १८६३ ते १८६६ असे प्रत्येकी ४ वर्षाचे, तीन भाग पाडता येतील.

पहिल्या भागात श्री रामकृष्णाच्या अंतःकरणात ईश्वरप्राप्ती विषयी अत्यंत व्याकुळता उत्पन्न झाली व त्याचे आधारे त्यांनी स्वतःच जगदंबेच्या दर्शनाचा लाभ करुन घेतला. याच काळात त्यांनी श्री

केनाराम भट्ट यांचेकडून शक्ती मंत्राची दीक्षा घेतली.

दुसऱ्या भागात भैरवी ब्राह्मणीच्या देखरेखीखाली त्यांनी गोकुलव्रतापासून आरंभ करुन तंत्रविद्येत सांगितलेल्या मुख्यमुख्य ६४ साधनांचे अनुष्ठान केले.

तिसऱ्या भागात रामायतन पंथाच्या जटाधारी नामक साधुकडून राम मंत्राची दीक्षा घेतली. वैष्णव तंत्रातल्या सखी-भावाचा लाभ करुन घेण्यासाठी सहा महिने स्त्री वेषात राहून ''सखी-भाव'' साधना केली. परमहंस ''तोतापुरी'' यांचेकडून संन्यास दीक्षा घेऊन वेदान्तात वर्णन केलेल्या निर्विकल्प समाधीचा लाभ करुन घेतला. ''सख्य-भावाची'' साधना केली. 'कर्ताभजा', 'नवरसिक' वगैरे वैष्णव मतांमधील इतर पंथांचीही माहिती करुन घेतली व शेवटी श्री गोविंदराय या आधिकारी व्यक्तीकडून इस्लाम धर्माचाही उपदेश घेतला व त्या धर्मातील साधनाही केल्या. या सर्व खटाटोपाचे कारण असे दिसते की, जगन्मातेने जगताच्या कल्याणासाठी त्यांना पृथ्वीवर पाठविले होते व त्यामुळे 'आचार्यपद' भूषविण्यासाठी या साधना करणे आवश्यक होते.

या सर्व कठोर परिश्रमामुळेच श्री रामकृष्णांना ''सर्व धर्म समन्वयाच्या दिव्य संदेशाचे प्रणेते'' मानले जाते. सुप्रसिद्ध फ्रेंच विचारवंत व नोबेल पारितोषिक विजेते लेखक श्री. रोमाँ रोलाँ याबाबत म्हणतात, ''श्री रामकृष्णांच्या जीवन संगीतातून जगातील हजारो धर्मपंथ व उपपंथ यांच्या भिन्न भिन्न व विसदृश स्वरांच्या मीलनाचा मंजुळ ध्वनी निघतो.'' राष्ट्रपिता महात्मा गांधी म्हणतात, ''श्री रामकृष्ण हे देवत्वाची सजीव मूर्तीच होत. त्यांची वचने (वाक्ये) म्हणजे पढत पंडीतांच्या शुष्क गप्पा नसून, त्यांच्या स्वतःच्या जीवन ग्रंथाची पृष्ठेच होत. त्यात त्यांचे स्वतःचे अनुभव प्रकट झाले आहेत. श्री रामकृष्ण म्हणजे आत्मज्ञानवंचित व अंधारात चाचपडणाऱ्या हजारो स्त्री पुरुषांसाठी तेजोदीप व आधारस्तंभच होत.''

अशा रितीने सर्वधर्म साधना करुन त्या त्या धर्म, पंथातील अंतिम सत्यापर्यंत पोहोचून स्वानुभवाने श्रीरामकृष्णांनी जे सत्यरुपी नवनीत जगापुढे ठेवले ते थोडक्यात असे - १) जगातील सर्व धर्म हे सत्य असून, एकाच ध्येयाकडे पोहोचण्याचे भिन्न भिन्न मार्ग आहेत. २) ईश्वर तत्व अस्तित्वात आहे व ते केवळ अनुमान करण्याची वस्तू नसून इंद्रियातीत भावाद्वारे अनुभव घेण्याची वस्तू आहे. ३) कोणतीही कल्पना केवळ कल्पनेत न ठेवता काया वाचामने प्रत्यक्षात आणली पाहिजे.

वरील प्रमाणे ज्ञान व अनुभव संपन्न होऊन ते 'सिद्ध' झाले तेव्हा त्यांच्या अनुभूती संपन्न स्वभावाला प्रचंड भरती आली व आपल्याकडून दुसऱ्याचे कल्याण कसे होईल, आपल्याला प्राप्त झालेले अनुभव दुसऱ्यांना कसे प्राप्त करुन देता येतील, हा एकच ध्यास त्यांना लागला व त्यांनी आपल्या भोवती निःस्वार्थ, शुद्ध व प्रामाणिक शिष्य गोळा करण्यास सुरुवात केली. अनेक तरुण, हुशार व ध्येयवादी विद्यार्थी त्यांचेकडे आकर्षित झाले, ज्यामध्ये नरेंद्र, राखाल, तारक, काली, निरंजन, हरी, लाटू इ. भावी संन्यासी शिष्य व मथुरबाबू, बलराम बसू, महेंद्रनाथ गुप्त, गिरीषचंद्र घोष, रामचंद्र दत्त आदि संसारी, गृहस्थी भक्त होते. हे सर्व दक्षिणेश्वरला (कलकत्ता) नियमित येऊ लागले.

श्रीरामकृष्णांचा यापूर्वीच विवाह झाला होता व श्री सारदा देवी या त्यांच्या धर्मपत्नी होत्या. पण हे दोघेही सर्वसामान्य माणसांप्रमाणेच 'वैवाहिक जीवन' कधीच जगले नाहीत. उलट श्री सारदा देवी व श्री रामकृष्णांच्या साधक जीवनाला 'मारक' न ठरता 'पूरक'च ठरल्या व श्री रामकृष्ण हे सारदादेवीकडे 'मंदिरातल्या कालीमातेप्रमाणे किंवा 'जन्मदाती मातेच्याच' भावनेने पहात असत. असे हे जगावेगळे पण प्रखर त्याग व वैराग्यमय जोडपे होते.

अशा या स्वानुभव संपन्न व अलौकिक अवतारी पुरुषाला अभिप्रेत असणारी जीवनप्रणाली, सेवावृत्ती, त्यागाची भावना या गोष्टीही अलौकिकच असणार हे क्रमप्राप्तच होय. श्रीरामकृष्णांनी 'प्रवचन' ज्याला म्हणतात असे 'प्रवचन' कधीच केले नाही. कारण प्रवचन हे एखादा विषय ठरवून त्याच विषयावर सविस्तर विवरण करणारे असते. पण श्री रामकृष्ण असे कधीच न करता श्रोत्यांशी, भक्तांशी 'संभाषण' करीत. संभाषण म्हणजे सहजपणे येईल त्या विषयावर मारलेल्या 'गप्पा' किंवा 'हितगुज' होय व तेही त्यावेळच्या वातावरणानुसार, वेळेचे, विषयाचे बंधन नसलेले हितगुज !

एक दिवस असेच संभाषण चालू होते. नरेंद्रादी भक्तगण ते ऐकत होते. वैष्णव पंथावर गप्पा गोष्टी सुरु झाल्या. वैष्णव पंथाचे वैशिष्ट्य स्पष्ट करताना श्री रामकृष्ण म्हणाले, ''या पंथातील साधकांसाठी काही महत्वाच्या गोष्टी अशा १) परमेश्वराच्या नामस्मरणाचा आनंद घेणे. २) वैष्णवांची सेवा करणे ३) प्राणीमात्रावर, जीवांवर दया करणे. असे म्हणत असतानांच त्यांना भावावेश प्राप्त होऊ लागला. अर्धभावावस्थेतच ते स्वतःशीच म्हणाले, ''जीवांवर दया'' - ''जीवांवर दया?''...केवढा हा मूर्खपणा? - या प्रचंड विश्वातील एक क्षुद्र कीटक तू आणि तू जीवांवर काय दया करु शकणार? आणि दया करणारा तू कोण? नाही. नाही. जीवांवर दया करण्याची तुझी पात्रताच नाही. तू जीवांची ''शिव भावाने'', प्रत्येक 'जीव' हा 'शिव' आहे. त्या अगाध, अनंत परमात्म्याचे सूक्ष्म रुप आहे, असे समजून त्याची 'सेवा' केली पाहिजेस, ''शिव भावे जीव सेवा'' केली पाहिजेस.

श्री रामकृष्णांना अभिप्रेत असलेला सेवाभाव हा असा अलौकिक होता. नुसते सेवाकार्य करण्यामागे अनेक, विविध प्रकारचे उद्देश असू शकतात. उदा. केवळ कर्तव्य भावनेने सेवा करणे किंवा दया, करुणा, सहानुभूती या भावनापोटीही माणूस सेवा करायला प्रवृत्त होतो. आपल्या हातून घडलेल्या एखाद्या अपराधाचे परिमार्जन करण्याचे भावनेने सेवा केली जाते. कधीकधी किर्ती, यश, प्रसिद्धीची हाव, हे ही हेतू असल्याचे आढळते. मृत्यूनंतर सद्गती मिळण्याचे आशेनेही मनुष्य सेवा कार्यास प्रवृत्त होतो. परंतु श्रीरामकृष्णांच्या मते ही अशा कारणांनी केलेली सेवा ही 'खरी सेवा' म्हणता येत नाही. कारण अशी सेवा कार्येही फारतर 'चांगली कार्ये' या विशेषणास पात्र ठरतील पण त्यांचेपासून

कृतकृत्यतेचा आनंद मिळणार नाही; त्यामुळे आध्यात्मिक उन्नती होणार नाही.

श्रीरामकृष्णांना अभिप्रेत असलेल्या सेवा धर्मामध्ये वरील पैकी कोणतीही कृत्रिम भावना नसून, एकात्मतेची भावना असते. प्रत्यक्ष परमेश्वराची सेवा करण्याचा भाव असतो. त्यामुळे 'आप-पर भाव', 'मी-तू'पणाची भावना नष्ट होते व 'भक्ती' केल्याचे समाधान मिळते. मनःपूर्वक प्रेम भावना निर्माण झाल्याचे 'ज्ञान'ही होते. याप्रमाणे सेवा करणाऱ्याची टप्याटप्याने आध्यात्मिक प्रगती होते व सेवा करणारा स्वतःच हळूहळू 'शिव-स्वरुपा' प्रत पोहोचतो. त्यामुळे श्रीरामकृष्णांना अभिप्रेत असलेली 'शिव भावे - जीव सेवा' ही सेवावृत्ती सर्व श्रेष्ठ होय हे मनावर ठसते.

आपल्या स्वतःच्या वर्तनावरुनही श्रीरामकृष्णांनी हेच सत्य जगासमोर ठेवले. काशीवृंदावन येथील तीर्थयात्रेला निघाल्यावर वैद्यनाथजवळी एका खेड्यात दरिद्री लोकांना पाहून त्यांना पोटभर जेवण व वस्त्र देण्याचा मथूर बाबूजवळ त्यांनी धरलेला हट्ट किंवा स्वतः हातात केरसुणी घेऊन मंदिराचे आवार झाडून स्वच्छ करणे, स्वतःच्या डोक्यावरील केसांनी रस्ते, अंगण इतकेच काय पण शौच्यकूपही साफ करणे, भिकाऱ्यांच्या पंगती उठल्यावर तेथील जागा साफ करणे, नारायण स्वरुप समजून त्यांचे उष्टे अन्न प्रसाद म्हणून खाणे; श्रीरामकृष्णांच्या जीवनातील या सर्व गोष्टींवरुन या कृतींमधून त्यांचा सेवाभाव आपल्याला कळून येतो. आपल्या राष्ट्र संत गाडगेबाबांच्या कृती वरील गोष्टींशी साधर्म्य दाखविणाऱ्या आहेत. आणि नरेंद्र विश्वनाथ दत्त नावाच्या कलकत्ता विश्वविद्यालयाच्या उच्च पदवीधर, हुशार, तेजस्वी परंतु अत्यंत चिकित्सक नास्तिकत्वाकडे झुकणाऱ्या तरुणाला याच 'शिवभावे जीव सेवा' या कल्पनेचे व त्यातील गूढ अर्थाचे ज्ञान होऊन, त्याचे जीवन अमूलाग्र बदलले. निर्विकल्प समाधीत बुडून राहण्याची इच्छा करणारा नरेंद्र जगाला सावली देणारा महान वटवृक्ष झाला. नरेंद्रचा स्वामी विवेकानंद झाला व याच मूळ कल्पनेवर आधारलेला 'रामकृष्ण संघ' या आता 'विश्वविख्यात असलेल्या संघटनेची स्वामी विवेकानंदानी स्थापना करुन आपल्या गुरुची ही तेजस्वी आणि या युगातील मानव जातीला दिलेली ही अमूल्य देणगी, ही नवी 'प्रकाशवाट', मूर्त स्वरुपात जगापुढे साकार केली. यात त्यांना आपल्या सर्व गुरुबंधूंचे मोलाचे सहकार्य लाभले होते.

गेल्या १००-१२५ वर्षापासून 'शिव भावे जीव सेवा' ही विचारधारा अव्याहतपणे प्रवाहित आहे व यापुढेही ती अशीच अखंड चालू राहील यात तीळमात्र संशय नाही. कारण ती सत्य आहे, शुद्ध आहे व पवित्र आहे व 'आत्मनो मोक्षार्थ जगद्हितायच' हा तिचा पाया आहे.

**संदर्भ :**


१) श्रीमद् भगवत गीता

२) श्रीरामकृष्ण चरित्र - ले. श्री. न.र. परांजपे, रामकृष्णमठ, नागपूर प्रकाशन - ५ वी आवृत्ती

३) रामकृष्ण संघ, एक शतकाची वाटचाल - ले. डॉ. वि. रा. करंदीकर, रा. कृ. मठ, नागपूर प्रकाशन

४) श्री रामकृष्ण लिला प्रसंग - ले. स्वामी सारदानंद, रा. कृ. मठ, नागपूर प्रकाशन (मराठी अनुवाद)

५) 'जीवन विकास' - एप्रिल २००५ रा. कृ. मठ, नागपूर

६) 'श्रीरामकृष्ण प्रणीत सेवा योग' - ले. स्वामी सुविज्ञेयानंद, वार्षिक अहवाल २००५-०६, श्रीरामकृष्ण सेवा मंडळ, सातारा



**डॉ. रविंद्र माधव भाल्डे**

सरगम, एम-८, श्रीबाग नं. २, अलिबाग,

जि. रायगड-४०२२०१


## (ब्रह्मचैतन्य श्रीगोंदवलेकर महाराजचरित्र - श्री. के. बि. बेलसरे यांतून साभार)

श्री महाराज श्रीरामकृष्णांना भेटण्यासाठी दक्षिणेश्वरला गेले. श्रीरामकृष्ण दक्षिणेश्वराला नसून कलकत्त्याला गेले आहेत असे कळल्यावर श्रीमहाराज कलकत्त्याला आले. रस्त्यामधून चालत असतानाच समोरुन श्रीरामकृष्ण येत आहेत असे दिसले. तेव्हा श्रीमहाराजांनी रस्त्यातच त्यांना साष्टांग नमस्कार घातला. श्रीरामकृष्णांनी त्यांना पोटाशी उचलून धरले आणि ''तू स्वतःचा खून कर, तू स्वतःला मारुन टाक'' असे बोलले.

प्रश्न : बंगालचे प्रसिद्ध श्रीरामकृष्ण परमहंस यांना आपण पाहिले होते का? ते कसे होते?

उत्तर : श्रीमहाराज

होय. खुद्द कलकत्त्यामध्येच ते मला भेटले. श्रीरामकृष्ण फार चांगल्यापैकी, फार थोर संत होते. त्यांनी इतर धर्मांची साधने करुन पाहिली. हा त्यांचा स्वभावविशेष होता. असे करणे जरुर आहे असे मुळीच नव्हे. कारण जे आपल्या धर्मामध्ये आहे तेच सर्व ठिकाणी आहे अशी खात्री असल्यावर दुसऱ्या धर्माचे साधन करण्याची जरुर नाही शिवाय, असे साधन करणारा भक्कम पाहिजे; नाहीतर तो वाहत जाण्याचा संभव फार. श्रीरामकृष्ण फार चांगले होते. त्यांचे अंतःकरण अति निष्पाप आणि शुद्ध असल्यामुळे त्यांची उपास्यदेवता त्यांच्यासमोर प्रत्यक्ष येऊन उभी राही. आपण खऱ्या उत्कंठेने ज्याची आठवण करावी ते आपल्याला दिसते. खरी उत्कंठा म्हणजे, 'मी ध्यान करतो' हे सुद्धा आपण विसरुन गेले पाहिजे.



# श्रीरामकृष्णांचा साधना-समन्वय

डॉ. श्री. द. देशमुख

श्रीरामकृष्ण परमहंस हे सगुण-भाव-सम्राट होते. विवाह केल्यापुरतेच प्रापंचिक होते. श्री. तोतापुरी ह्यांचेकडून वेदान्त शिकण्यापुरते वेदान्ती होते. भैरवी ब्राह्मणीकडून योगविद्या समजावून घेण्यापुरते योगी होते. परधर्मीय प्रार्थना-स्थळामधे जाऊन तेथील दर्शन घेण्यापुरते सर्वधर्मसमभावी होते. पण ह्या सर्वाहून ते कालीमातेचे असीम भक्त होते, हेच खरे. अष्टसात्विक भाव त्यांचे रुपाने मूर्त झाले होते. वैराग्याने त्यांच्या रुपाने अवतार घेतला होता. करुणेचे ते शरीर होते. देहतादात्म्य किती मर्यादेपर्यंत सुटणे शक्य आहे त्याचे ते साक्षात् उदाहरण होते. सद्गुरुपदाचा जराही बडेजाव नसणारे ते जगद्गुरु होते. पंडिताची देहबोली व भाषा नसणारे ते महापंडित होते. जे श्रीराम व श्रीकृष्ण होते तेच श्रीरामकृष्ण झाले असे आश्वासक बोलणारे ते सुहृद होते. अशा महान् अवताराचे जीवन किती साधे असू शकते ह्याचे ते आदर्श होते. स्वामी विवेकानंदांसारखा महान् शिष्य मिळाल्याने त्यांच्या श्रीगुरुत्वाचेही सार्थक झाले होते.

'अधिकार तैसा करु उपदेश। साहे ओझे त्यांस तेंचि देऊं ।।' ह्या जगद्गुरु श्री संत तुकाराम महाराजांच्या वचनाप्रमाणेच श्रीरामकृष्णांचे जीवन व्यापलेले होते. त्यांच्या सभोवती वैराग्यसंपन्न साधकांपेक्षा प्रापंचिक आर्त, अर्थार्थी व जिज्ञासूंचीच संख्या जास्त होती. प्रसंगी प्रापंचिकांची खुसखुशीत भाषेत किंचित् बोचरी थट्टा करुनही त्यांचे कारुण्य अबाधित राहिले. परलोकाच्या अस्तित्वासंबंधी चर्चा सुरु झाली तर तो विषयच ते उडवून लावीत असत. त्यांचे आंब्याच्या बागेचे उदाहरण प्रसिद्ध आहे. बागेत गेल्यावर 'आंबे खावेत. इतर उठाठेवी करु नयेत. बागेचा मालक, क्षेत्रफळ, झाडाचे वय, पानांची संख्या, पाणी पुरवठा इत्यादी चौकशा न करता झाडाखाली पिकून पडलेले मधुर आंबे खावेत. मृत्यूसमयी जो विचार बलवान असेल त्यानुसार जन्म मिळतो. म्हणून ईश्वराचाच विचार बलवान ठेवावा. त्यासाठी जप, ध्यान, पूजा इत्यादी साधना करावी. पुनर्जन्म, परलोक इत्यादी भाकड विचारात व चर्चेत वेळ घालवू नये. हे झाड अनादि, अनंत, ब्रह्मरुप असून ते कल्पवृक्षाप्रमाणे आहे. त्याला धर्म, अर्थ, काम व मोक्ष अशी चार प्रकारची फळे लागतात. ज्याला जे हवे ते मिळते.

प्रापंचिक माणसांच्या कामिनी व कांचनाच्या हव्यासाची श्रीरामकृष्णांना जेवढी घृणा आहे, तेवढीच त्यांचेविषयी आत्मीयता आहे. प्रपंच सोडून परमार्थ करणे एक वेळ सोपे आहे. पण प्रपंचात राहून परमार्थ करणारा धन्य आहे असे ते म्हणत. वीस मणांचा दगड बाजूला सारुन त्या खालची वस्तू पाहण्यासारखे ते कठीण आहे. पण अशक्य नाही. त्रिगुणातीत होऊन संसारात कोणी राहू शकला तर त्यालाही परमगतीचा लाभ होऊ शकतो, असेही ते एकदा म्हणाले, 'निस्त्रैगुण्यो भवार्जुन' हा गीतोपदेशच ते सांगत असत. 'गुणा गुणेषु वर्तन्ते इति मत्वा न सज्जते'. सत्वादि तीन गुणच त्यांच्या त्यांच्या अभिवक्तीच्या रुपाने खेळत असतात व हा खेळ प्रत्येक जीवाच्या शरीरात चालतो हे त्रयस्थपणे लक्षात घेऊन जीवन जगणारा सफळ परमार्थ करु शकतो. पण त्यासाठी परिपूर्ण विवेक सतत जागा असावा लागतो. देण्याघेण्याविषयी अखंड जागरुक असणारा माणूस असा विवेक सांभाळू शकत नाही. श्रीरामकृष्ण अशा विवेक्याला बालकाचा दृष्टान्त देतात. हा संवाद घडत असताना समोरच बसलेले स्वामी विवेकानंद मित्राकडून पैसे उसने घेऊन तीन महिन्यांसाठी त्यांच्या घराचा बंदोबस्त करण्याचा विचार बोलून दाखवीत होते. तो ऐकून श्रीरामकृष्ण काहीच बोलले नाहीत. प्रपंचाच्या जबाबदारीचे ओझे किती मोठे व खोल दडून बसलेले असते ह्याचा येथे अंदाज येतो. कर्म करणे हा प्रापंचिकाचा स्थायीभाव असतो. कर्म कटकट न करता त्याने कर्मयोग साधला तर त्याचेही शाश्वत कल्याण होऊ शकते. जनक राजा भोगी व योगी दोन्हीही होता. तो कर्मयोगी होता. मात्र चालू घडीला शास्त्रोक्त कर्मकांड पार पाडणे महाकठीण आहे असे श्रीरामकृष्ण म्हणत असत. शिवाय ते निष्काम करणे त्याहून कठीण आहे. मी केले, माझ्यामुळे झाले, मी नसेन तर होणार नाही, माझ्यामागे कसे होईल इत्यादी प्रकारे विचार करणारा कर्मयोगी होऊ शकत नाही. खाण्यापिण्याविषयी कोणताच आग्रह त्यांचा नाही. ह्या विषयीच्या कर्मठपणाचा त्यांचे ठिकाणी मागमूसही नव्हता. ''डुकराचे मांस खाऊन जर ईश्वराची ओढ असेल तर तो धन्य होय. उलट उपवासाचे पदार्थ खाऊनही कामिनी कांचनात घुटमळणारा धिःकारणीय आहे.'' मात्र ह्याही बाबतीत ते स्वतः काही नियम पाळत होते. जात-पात न मानणारे

श्रीरामकृष्ण त्यांच्या विशिष्ट अवस्थेत ब्राह्मणाने देवाला नैवेद्य दाखविल्याशिवाय ते जेवत नसत. पण नरेंद्राला मात्र त्यांनी तशी मुभा दिली होती. असा सर्व विचार करुन कर्मापेक्षा भक्ती सोपी आहे असे त्यांचे स्पष्ट मत होते.

श्रीरामकृष्णांचे बाबतीत भक्ती हा शब्द व ती साधना बरीच साकल्याने समजावून घ्यावी लागते. ज्या कालीमातेचे ते निस्सीम उपासक होते तिच्या रुपाबरोबरच तिच्या स्वरुपाचेही वर्णन ते भजनांच्या माध्यमातून करीत असत. ते वर्णन खरोखर अद्‌भुत व वेदान्तशास्त्राला जवळचे आहे. उपासनेचे दैवत पूर्ण समजावून घ्यावे असा संदेश त्यातून मिळतो. बाह्य आकाराला रुप म्हणतात. ब्रह्मरुप स्वरुप त्यांत व्यापून रहाते. श्रीरामकृष्ण व स्वामी विवेकानंद बहुतेक वेळा ब्रह्म ह्या अर्थाने ईश्वर हा शब्द वापरतात. अनादि, अनंत इत्यादी ब्रह्माची स्वरुप लक्षणे असून सर्वज्ञ, सर्वसाक्षी, इत्यादी त्याच्याच ईश्वरस्वरुपाची तटस्थ लक्षणे आहेत. ब्रह्म निर्गुण, निराकार असून ईश्वर सगुण निराकार आहे. ही वेदान्ताची सरणी प्रत्यक्ष ह्या पद्धतीने न सांगता तात्पर्यरुपाने सांगितली आहेत. ईश्वररुप कालीमातेची स्तुति करताना श्रीरामकृष्ण म्हणतात, ''हे भवतारिणी, मला तार, उशीर करु नको. यमदेवाच्या त्रासाने मी त्रस्त झालो आहे. तू जगताची आई आहेस, जगताचे पालन करणारी आहेस. तूच जगताला मोह पाडणारी आहेस. साकार (अवतार) व निराकार (ईश्वर) तूच आहेस.'' ब्रह्मरुप कालीमातेचे वर्णन करताना ते म्हणतात, ''हे कालीमाते, तू सदानंदमयी आहेस. तू महाकालाचे मन मोहविणारी आहेस. तू आपणच नाचतेस, आपणच गातेस व आपणच टाळ्या पिटतेस. तू सनातन व आद्य आहेस.'' अनेकवेळा ह्या दोन्ही तत्वांची सरमिसळही त्यांच्या भजनात दिसते. कर्म, वेदान्त, योग हे रामकृष्णांच्या अवतार जीवनाचे व्यभिचारी भाव असून भावावेशयुक्त भक्ती हा स्थायीभाव आहे. 'कृपालेशात वा' या नारदभक्तिसूत्रानुसार असा भावावेश ईश्वरकृपेनेच मिळतो. पण श्रीरामकृष्णांचे बाबतीत ज्याने कृपा करावयाची त्याचेच ते अवतार असल्याने त्यांचा भावावेश हा 'स्व-भाव' ठरतो. वाद्यसंगीतादि ऐकून त्यांचा हा भाव जागा होत असे. हाच उद्दीपन विभाव होय.

अक्रोध, दया, कृपा, क्षमा, करुणा इ. सर्व लक्षणे पराभक्तीच्या पोटात सहजच सामावली आहेत. एकदा ब्राह्म भक्तांचा भक्तिसंगीताचा कार्यक्रम संपल्यावर त्या कार्यक्रमाच्या यजमानाने भोजनाचा प्रबंध केला होता. पण यजमान आमंत्रितांचे आगत स्वागत करण्यात एवढा गुंग होता की, त्याने श्रीरामकृष्णांची दखलही घेतली नाही. त्यांच्या बरोबर असलेला राखाल त्यामुळे चांगलाच संतापून कार्यक्रम सोडून जाण्याची भाषा बोलू लागला. पण कार्यक्रमाने उत्तेजित झालेल्या यजमानाविषयी कोणतीच विपरीत भावना त्यांच्या मनात डोकावली नाही. ईश्वराच्या संदर्भातील कार्यक्रमात मानापमान कसले? त्यामुळे क्रोध तरी कसा निर्माण होणार? श्रीरामकृष्णांनी एका कोपऱ्यात बसून धूळ व कचऱ्याने भरलेल्या जागेवर मांडलेल्या ताटांत थोडे जेवण केले. नंतर त्यांच्या पराशान्तीला धक्का न लागता ते तेथून बाहेर पडले.

बहुतेक साधकांना अस्सल उपासना सुरु होण्यापूर्वी बरेच दिवस निष्काम कर्म करावे लागते. त्याने चित्त शुद्ध होऊन वैराग्याचा उदय होतो. पुढे ईश्वराकडे मन लागून शेवटी त्याच्यातच विलीन होते. ईश्वरचंद्र विद्यासागराचे संदर्भात श्रीरामकृष्णांनी हा क्रम सांगितला असला तरी तो सर्वांसाठीच आहे हे स्पष्ट आहे. कोणत्याही सांप्रदायिकाने महापुरुषांच्या जीवनातून स्वतःच्या शाश्वत कल्याणाची होणारी व्यवस्था जागरुकतेने टिपली तरच त्यांच्या गुणगायनाला अर्थ प्राप्त होतो.

उपासना शुद्ध म्हणजे निष्काम असावी हे साधकाच्या मनात ठसावे म्हणून श्रीरामकृष्ण श्रीनारद व श्रीरामाचा संवाद उद्‌धृत करतात. श्रीनारद म्हणाले, ''रामा तुझ्याजवळ आणखी कोणताही वर मागत नाही. फक्त मला शुद्ध भक्ती दे. आणि ज्यामुळे तुझ्या जगन्मोहिनी मायेने मोहित होणार नाही असा आशीर्वाद दे.'' हा आशीर्वाद फलद्रूप होण्यासाठी संत तुकाराम महाराज सांगतात - 'तुका म्हणे इहलोकींच्या व्यवहारे । नका डोळे धुरे भरुनी राहू' । साधकाने सांभाळलेले हे पथ्य व श्रीरामांचा आशीर्वाद ह्यांचा संगम होणे आवश्यक आहे. कर्म व उपासना ह्या दोन्हीत निष्कामतेचे अपार महत्त्व आहे. सकामतेची कीड लागलेला परमार्थ वाळून जातो. शरणागती परिपूर्ण असल्याशिवाय निष्कामता साधत नाही. शरणागती का असावी त्याचे कारण श्रीरामकृष्ण सांगतात - ''ज्याने हे अपार दृश्य जग, जडचेतनात्मक सृष्टी निर्माण केली, प्राण्यांच्या पोटापाण्याची सोय केली, मुले सांभाळण्यासाठी आईबापात वात्सल्य निर्माण केले, धान्यासाठी पावसाची व्यवस्था केली, असा भगवान अंतर्यामी असून तो सर्व जाणतो, अशी श्रद्धा ज्याचेपाशी आहे, त्याला सकामतेचे दैन्य पत्करावेच लागत नाही.''

साकार मूर्तीची उपासना व निराकार ब्रह्माची उपासना ह्यात भेद मानण्याची मुळीच गरज नाही असे श्रीरामकृष्णांचे ठाम सांगणे आहे. साकाराचा सगुणाशी तर निराकाराचा निर्गुणाशी संबंध आहे. हा तात्त्विक ऊहापोह फेटाळून लावताना श्रीरामकृष्ण म्हणतात की, कालीमातेने सगुणाचे ढेकूळ निर्गुणावर व निर्गुणाचे ढेकूळ सगुणावर फेकून तो भेदच नाहीसा केला आहे. श्री संत ज्ञानदेव मूर्तीपूजेचे स्पष्टीकरण करताना म्हणतात - **'देव देऊळ परिवारु । कीजे कोरुन डोंगरु ।**

**तैसा भक्तीचा व्यवहारु । का न व्हावा ।।** अमृता०।।

वेरुळ सारख्या लेण्यांमध्ये पाषाण कोरुन देऊळ, देव व पूजेचे साहित्य त्यातूनच तयार केले जाते. ब्रह्मवस्तूमध्ये ह्या प्रकारे भक्तीचा व्यवहार का होऊ नये?

श्रीरामकृष्णांची ज्ञानसाधना व योगसाधना श्रीकालीमातेशीच निगडीत आहे. तिच्या स्वरुपाचे ज्ञान, तिचेच ध्यान व तिच्याशीच योग असे त्या साधनेचे स्वरुप आहे. ज्ञानातून भावोन्मेष व योगातून भावोन्मतता असा भावावेशाचाच आविष्कार आहे. ध्यान, ब्रह्म, योग इ. पारिभाषिक शब्द ते वापरतात व तशी साधनाही करताना दिसतात. पण ह्यांचा सर्व संबंध भावाशीच आहे. भावावेशात होणारे सर्व संवाद व त्यातून भानावर आल्यानंतर केला जाणारा उपदेश कर्म, उपासना, ज्ञान,

ध्यान, न्याय, नीति, धर्म, लोकव्यवहार इत्यादी प्रकारे सर्वसमावेशक आहे. त्यात एकसूरीपणा, संप्रदायाचा अभिनिवेश, व्यक्तिमाहात्म्य, गुळमुळीतपणा, अस्पष्टता इत्यादींना जागा नाही. जे जेवढे बरोबर ते बरोबर व चूक ते चूकच असा त्यांचा बाणा आहे. कोणत्याही साधना पद्धतीत हा विचार करावाच लागतो. चालू परिस्थितीमध्ये समाजाशी फटकून साधना करणे खूपच कठीण आहे.

पुढील परिच्छेदामध्ये श्रीरामकृष्णांच्या अंतर्मुख चिंतनाचे सार आहे. ''जगन्माते, दोष खरोखर इतर कोणाचाच नाही. स्वतःच्या हाताने खणलेल्या विहिरीत बुडून मी मरत आहे. षड्रिपूंच्या कुदळीने ह्या पुण्यक्षेत्रात मी विहीर खणली व तिला कालरुपी पाण्याचा झरा लागला. मीच माझा शत्रू बनलो. माझ्या अंगात खोट्या अभिमानाचा विलक्षण ताप भरुन सर्वांगाची लाही होत आहे. त्यातच भ्रम होऊन 'मी व माझे' अशी बडबड मी करीत आहे. धन व मानाची भयंकर तृष्णा शमत नाही. अनित्य गोष्टींची चर्चा करण्याचा मला वात झाला आहे. मत्सरादिकांनी मला व्यापले आहे. माते, तूच आता मला तारुन ने. तुझाच फक्त मला आधार आहे. कृपाकटाक्षाने माझा उद्धार कर.''

विस्तीर्ण सरोवराचे पाणी चमचा घेऊन मोजणे जसे अशक्य त्याप्रमाणे श्रीरामकृष्णांच्या अंतरंगाचा ठाव घेणे आहे. तरी सरोवरातीलच पाणी चमच्यातही असते, एवढेच समाधान मानता येईल. श्रीरामकृष्णांची साधनापद्धती सर्वसमावेशक असल्याने त्या पद्धतींचा सहजच समन्वय होतो. प्रामाणिक साधकाला त्यांच्या कृपेचा लाभ होऊन त्या समन्वयाचे सार्थक होवो हीच त्यांचे चरणी प्रार्थना.

डॉ. श्री. द. देशमुख
मुरगुड, ता. कागल, जि. कोल्हापूर

### 'श्रीरामकृष्ण म्हणतात' पुस्तकातून साभार

**श्रद्धा-विश्वास पाहिजे. विश्वासाची शक्ती केवढी प्रचंड ते पाहा. एका माणसाला समुद्र पार करुन लंकेहून भारतात यायचे होते. बिभीषणाने त्याला काहीतरी देऊ म्हटले, ''हे आपल्या वस्त्राच्या टोकाला बांधून घे म्हणजे तू अनायासे समुद्रावरुन चालत निघून जाशील. विश्वास ठेव. परीक्षा पाहायला जाऊ नकोस. नाहीतर बुडशील.'' तो माणूस छान समुद्रावरुन चालत जाऊ लागला. विश्वासाचा महिमा विलक्षण! पण थोड्या वेळाने त्याला कुतूहल वाटले - ''बिभीषणाने मला असं काय दिलं असेल बरं की ज्याच्या बळावर मी चक्क पाण्यावरुन चालत जात आहे?'' त्याने वस्त्राची गाठ सोडून पाहिले तर त्याला एका पानावर रामनाम लिहिलेले आढळले. तो म्हणाला, ''बस, एवढंच!'' आणि लगेच तो बुडाला.**

# श्रीरामकृष्ण आणि सर्वधर्मसमन्वय



**श्री. वासुदेव मोरेश्वर लोहित**
शिक्षण व नोकरी नागपुरात
१९८९ साली डाक व तार खात्याच्या ऑडिट कार्यालयातून स्वेच्छानिवृत्ती. तेव्हापासून नागपूर रामकृष्ण मठ प्रकाशन विभागात लेख. इंग्रजी पुस्तकांचे मराठी व हिंदी भाषांतर. जीवन विकास मासिक व मराठी हिंदी पुस्तकांची प्रुफे तपासणे इ. द्वारे सेवा.

गीतेमध्ये भगवान श्रीकृष्णांनी आश्वासक वाणी उच्चारली आहे ती अशी –

**''यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवती भारत ।**
**अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ।।''** ४-७

''जेव्हा जेव्हा धर्माची ग्लानी होते आणि अधर्म बळावू लागतो तेव्हा मी स्वतःला जन्मास घालतो''. भारतात सुमारे पावणे दोनशे वर्षांपूर्वी श्रीरामकृष्णांच्या जन्मकाली धर्मग्लानी कशा प्रकारे आलेली होती ते आपण पाहू.

ब्रिटिशांनी मोगलांना व मराठ्यांना पराभूत करुन सुमारे दोनशे वर्षांपूर्वी आपली राजसत्ता भारतात प्रस्थापित केली होती. खरे पाहता इंग्रज हे व्यापार करण्याच्या इच्छेने भारतात आले होते. ग्राहकांचा अनुनय करणे हे त्यांच्या वृत्तीतच होते. त्यांनी जो काही माल आणला तो त्या काळच्या भारतीयांना नवीन वाटावा असाच होता. जसजसे भारतातील लोक इंग्रजांच्या संपर्कात येऊ लागले तसतसे त्यांच्या संसर्गाने 'त्यागासाठीचे भोग', 'परलोकासाठीच ऐहिक जीवन', 'संयमाच्या साहाय्यानेच व्यक्ती व समाज यांनी आपले जीवन व्यतीत करावे' ह्या शास्त्राज्ञांचा त्यांना विसर पडून त्यांच्या आचार – विचारांत व पूर्वपरंपरागत संस्कारांत विलक्षण क्रांती घडून आली, कारण इंग्रजी राज्य व इंग्रज लोकांसोबतच पाश्चात्यातील वैज्ञानिक जडवाद, भोगप्रधान जीवन जगण्याची वृती, ख्रिश्चन मिशनऱ्याद्वारे सेवेच्या माध्यमातून मूर्तीपूजेची अवहेलना व थट्टा यातून प्रसारित होणारा ख्रिश्चन धर्म, स्वातंत्र, समता, बंधुता व लोकशाही इत्यादी नवनवीन संकल्पना आदिंचे शिक्षित, सुजाण व्यक्तींनाही आकर्षण वाटू लागले. मेकॉलेने सुरु केलेल्या शिक्षणपद्धतीतून औद्योगिक क्रांती, यंत्रप्रधान तंत्रज्ञान याचाही प्रभाव पडू लागला.

याशिवाय बंगालमधील हिंदुधर्माचे स्वरुप अनेक अनावश्यक रुढींनी व मिथ्याचारांनी मलिन झाले होते. तिथे शाक्ताकडून उपासने – प्रीत्यर्थ होणारे बलिदान व यथेच्छ मद्यमांससेवन, तांत्रिकांचे अनीतीमय वामाचार, वैष्णवधर्मियांची मधुरभावाच्या आचरणातून दिसून येणारी विषयासक्ती ह्यामुळे धर्माचे पवित्र स्वरुप नष्ट होते की काय असे वाटू लागले होते.

हिंदुधर्मात अनेक पंथोपपंथ अगोदरच अस्तित्वात असूनही त्यात दयानंद सरस्वती ह्यांच्या 'आर्य समाजाची' व राजा राममोहन रायांच्या 'ब्राह्मो समाजाची' भर पडली. ब्राह्मोसमाज उच्चभ्रूंपुरता मर्यादित होता तर आर्यसमाजाने अनेक लोकांना आकर्षित केले. त्यांच्या तत्वज्ञानात वैदिक होमहवनावरच भर दिला होता.

याशिवाय जाती-जातींमधील उच्च-नीचतेच्या, स्पृश्या-स्पृश्यतेच्या कट्टर भावनेनेही समाजातील माणूसकी, प्रेम आणि सामंजस्य इत्यादींचा अभाव निर्माण होऊन समाज जीवन दुभंगले होते. एका दृष्टीने ती धर्मग्लानीच होती.

अनेक पंथ व उपपंथ एकाच उद्देशाने व एकाच मूळ धर्मातून निर्माण झाले तरी त्यांच्यामधे एकतेचा अभावच दिसून येत असे. योग्य मार्गदर्शन न मिळाल्याने त्यांच्यातील आध्यात्मिकतेचा लोप होत गेला आणि केवळ बाह्य अवडंबर व स्थूल कर्मकांड ह्यावर त्यांनी भर दिला. आमचाच धर्म श्रेष्ठ, आमचाच पंथ श्रेष्ठ असा दावा करण्यात येत गेला. साहजिकच, त्यांच्यामधे संघर्ष होऊन खरा धर्म लोप पावतो की काय अशी परिस्थिती आली. धर्माचे असे ओंगळ रुप पाहून काही लोकांमधे नास्तिकता आली.

या परिस्थितीचा एकूण परिणाम असा झाला की भारतवर्षाने आपले त्याग व संयमप्रधान जीवन टाकून भोगप्रधान जीवन पत्करले. त्यामुळे पूर्वीच्या संस्कृतीचा व शिकवणुकीचा लोप झाला व भारतातील लोकांत परानुकरणप्रियता व आत्मविश्वासविहिनता या दोषांचा उदय होऊन ते आपला उज्ज्वल पूर्वेतिहास आणि पूर्वगौरव विसरुन निःसत्व बनले. अशा रीतीने पाश्चात्यांबरोबर त्यांची धर्मग्लानीही भारतात शिरली.

धर्मभूमी भारतात जी काय धार्मिकता उरली होती ती केवळ निष्प्राण रुढींना कवटाळून बसण्यापुरतीच. ह्या रुढी ज्यांची कवचे होत त्या धर्मरुपी प्राणाचा – आध्यात्मिक अनुभूतीचा – लोप झाल्यामुळे इतकी धर्ममते संप्रदाय, पंथोपपंथ अस्तित्वात असूनही नसल्यासारखेच होते. ह्या निष्प्राण रुढींना, मतांना, संप्रदायांना चिकटून राहणे आणि स्वतःच्या खेरीज इतर सर्वांच्या धर्ममतांविषयी, पंथांविषयी, संप्रदायांविषयी तिरस्कार, द्वेष, घृणा व्यक्त करणे एवढ्यानेच धर्मपालन संपुष्टात येत होते.

अशा या धर्मग्लानीच्या काळी भगवंत बंगालमधील कामारपुकुर

नामक खेड्यात क्षुदिराम व चंद्रमणी ह्या चट्टोपाध्याय दांपत्याच्या पुत्ररुपाने १८३६ इसवी सनात बुधवार, १७ फेब्रुवारी रोजी अवतरले. क्षुदिराम तीर्थयात्रेनिमित्त गयेस गेले असताना भगवान गदाधरांनी त्यांना स्वप्नात दृष्टांत देऊन सांगितले होते की मी पुत्र रुपाने तुझ्या घरी अवतीर्ण होऊन तुझी सेवा स्विकारीन. म्हणून त्यांनी मुलाचे नाव गदाधर ठेवले. गदाधराच्या बाल्यकाळात त्यांच्या वडिलांचे निधन झाले. गदाधराची किशोरवस्था आल्यानंतर ते शिक्षणासाठी आपले वडिलबंधू रामकुमार यांच्यासह कलकत्त्यास आले. पण लौकिक शिक्षणात त्यांना मुळीच रुची नव्हती. ते म्हणायचे, ''भाजी-भाकरी मिळवून देणारी विद्या मला नको आहे. मला अशी विद्या हवी की जिने यथार्थ ज्ञानाचा उदय होऊन माणूस खरोखर कृतार्थ होतो.'' बालपणापासूनच त्यांच्यात अपूर्व धार्मिक तळमळ होती. त्यांच्यामधे मनुष्यमात्र व वस्तुमात्रासंबंधीच्या ज्ञानाची अति सूक्ष्मदृष्टी आढळून येत होती. मानवी शक्ती, संपत्ती व भौतिक सुख ह्या गोष्टी कशा फोल व क्षणभुंगर आहेत हे त्यांना पुरेपूर कळून चुकले होते. लौकिक शिक्षण जरी त्यांनी घेतले नसले तरी अनेक विद्वानांचा सहवास त्यांना लाभून देशातील प्रचलित विचारप्रणालीचे व धर्मतत्वज्ञानाचे आवश्यक ज्ञान त्यांना झाले होते.

अशा विचारांची त्यांची धारणा पक्की झाली असता त्याच सुमारास कलकत्ता शहारापासून जवळ असलेल्या दक्षिणेश्वर नामक खेड्यात पुण्यतोया, प्रसन्नसलिला भागीरथीकाठी राणी रासमणीने भवतारिणी कालीमातेचे एक भव्य व सुंदर मंदिर बांधले. तिथे त्यांचे वडिल बंधू रामकुमार यांची पुजारी म्हणून नियुक्ती झाली. त्यांच्या सोबत यौवनात पदार्पण केलेले गदाधरदेखील दक्षिणेश्वरी गेले. त्यानंतर रामकुमार वृद्ध झाल्यामुळे तीन महिन्यांनी गदाधरांनी देवीच्या पूजकाचे काम स्विकारले. यथार्थ ज्ञानाने कृतार्थ व्हावे अशा दृढनिश्चयाने ते आनंदमयी भगवतीच्या सेवेत निमग्न झाले, संपूर्ण आत्मविस्मृत झाले. केवळ मातेच्या दर्शनाचाच ध्यास. व्याकुळ होऊन सदा एकच प्रार्थना - 'आई, मला धन, मान, भोगसुख, काहीही नको, मला दर्शन दे, मला केवळ तूच हवीस.' जगन्मातेची पूजा, आरती करुन झाल्यानंतर उरलेल्या वेळात जवळच्या एकांतात असलेल्या पंचवटीत अविरत ध्यान धारणा रात्री मधेच केव्हा तरी शय्या सोडून पंचवटीत जात नी सारी रात्र प्रगाढ ध्यानात घालवीत. आईचे दर्शन होत नाही म्हणून व्याकुळ होऊन रडत व अविरत आसवांनी त्यांची छाती भिजून जाई. काया-वाचा-मने सर्वस्वाचा त्याग करुन अविश्रामपूर्वक साधना चालली होती. कांचनावरील आसक्तीचा मातेचे दर्शन होण्यात अडसर होऊ नये म्हणून एका हातात पैसे व दुसऱ्या हातात माती घेऊन - 'माती पैसा, पैसा माती' म्हणत म्हणत दोन्ही गंगेत टाकून देत असत. इतकी प्रार्थना करुनसुद्धा आई दर्शन देत नाही म्हणून रडत रडत जमिनीवर तोंड घासत, चेहरा रक्ताळून जाई. ओक्साबोक्शी रडू लागत, प्राण व्याकूळ होत - ओला पंचा पिळावा तसे हृदय कुणी पिळत आहे असे त्यांना वाटे. आणि मग एक दिवस त्यांना वाटू लागले की आई दर्शन देत नाही तर मग जिवंत तरी कशाला राहायचे? मंदिरात भिंतीवर एक तलवार टांगलेली असे. जीवनाचा शेवट करण्याकरता ते ती हातात घेणार तोच त्यांना एकाएकी मातेचे दर्शन लाभले. कालीवाडी, मंदिर, दारे, भिंती त्यांच्या दृष्टीपुढून लुप्त झाले. प्रत्ययास येत होता केवळ एक असिम, अनंत, चेतन, ज्योतिः समुद्र. आत मात्र अननुभूत सांद्र आनंदाचा स्त्रोत वाहत आहे हे त्यांना जाणवत होते. अशा रीतीने केवळ व्याकुळतेच्या बळावर अत्यल्प काळातच जगन्मातेचे दर्शन लाभून श्रीरामकृष्ण कृतार्थ झाले.

जीवाला कायमचे तृप्त करणारे हे फळ लाभूनही श्रीरामकृष्ण तृप्त झाले नाहीत. यासंबंधी ते म्हणाले होते - ''समुद्राच्या तीरावरच सर्वदा वास करणाऱ्याच्या मनात जसा कधीकधी अशा वासनेचा उदय होतो की या रत्नाकराच्या गर्भात किती प्रकारची रत्ने आहेत ते बघावे, तसेच जगन्मातेचा लाभ होऊन आणि तिच्या सान्निध्यात सर्वदा राहूनही मला त्यावेळी वाटे की त्या अनंतभावमयीला, त्या अनंतरुपीणीला नाना भावे नि नाना रुपात बघावे. कोणत्याही एका विशिष्ट भावाने तिला बघण्याची इच्छा होताच मी तिच्यापाशी व्याकूळ होऊन धरणे धरुन बसे. कृपामयी जननी मग, तिला त्या भावाने बघण्यासाठी ज्या कशाचे म्हणून प्रयोजन, ते सारे जुळवून आणून माझ्याकडून आवश्यक ते सर्व काही करवून घेत असे, आणि त्या भावाने दर्शन देऊन माझा हट्ट पुरवित असे. अशा तऱ्हेने भिन्न मतांची साधना होऊन गेली.''

आता हनुमंताच्या दासभावाचा अवलंब करुन श्रीरामकृष्ण फिरुन साधनेत मग्न झाले. एके दिवशी ते पंचवटीत बसले होते. ध्यान वगैरे करीत नव्हते. असे शांत बसलेले असताना थोड्याच अंतरावर एक अनुपम ज्योर्तिमय स्त्री आविर्भूत झाली. प्रेम, दुःख, करुणा, सहिष्णुता आदि अपूर्व भाव तिच्या मुखमंडलावर विलसत होते. ती त्यांच्या दिशेने धीरगंभीर पदक्षेप करीत येत असताना एकाएकी एक वानर कुठून तरी आला आणि हुप करीत त्याने तिच्या चरणी लोटांगण घातले. लगेच त्यांच्या चित्तात प्रकाश पडला की ती जन्मदुःखिनी, जनक राजनंदिनी, राममयजिविता भगवती सीता होय. 'आई' 'आई' म्हणत तिच्या चरणी निपतित होण्यासाठी ते पुढे सरसावले तोच ती चटकन येऊन त्यांच्या शरीरात प्रविष्ट झाली. आनंदाने, विस्मयाने ते अभिभूत झाले व स्वतःला सावरता न येऊन बाह्यसंज्ञा हरवून खाली पडले.

तंत्रसाधनेच्या वेळी एक मंत्रमताची अनुयायिनी असलेली संन्यासिनी 'भैरवी' दक्षिणेश्वरी प्रगटली. जगदंबेच्या कृपेने तिला अगोदरच कळले होते की गंगातीरी श्रीरामकृष्णाशी तिची गाठ पडेल. 'आई'ची अनुमती घेऊन आणि कलुषित झालेल्या तंत्राचे खरे, पावन स्वरुप जगापुढे ठेवून तंत्रसाधनेचे यथार्थ पुनरुज्जीवन करावे ही तिचीच इच्छा आहे हे तिच्याकडून प्रत्यक्ष जाणून घेऊन 'भैरवी'च्या मार्गदर्शनानुसार त्यांनी तंत्रसाधनेतील एकेक कठीण साधना तन्मयतेने करुन त्यातही समाधी ही परमोच्च उपलब्धी 'आई'च्या कृपेने प्राप्त केली.

त्यानंतर दक्षिणेश्वराच्या कालीवाडीत रामायत पंथाचे 'जटाधारी' नामक एक साधू आले. ते बाल रामचंद्राची वात्सल्यभावाने उपासना करुन तीत सिद्ध झाले होते. त्यांच्या सान्निध्यात येऊन, त्यांचा अपरुप भाव बघून श्रीरामकृष्णांचे हृदय वात्सल्यभावाने भरुन आले. त्यांच्याकडून राममंत्राची दीक्षा घेऊन व त्यांच्या जवळच असलेल्या रामचंद्राच्या बालकमूर्तीची पूजा - आराधना करीत. वात्सल्यभावाने

भगवंताची उपलब्धी व्हावी म्हणून त्यांनी व्याकुळ अंतःकरणाने निरंतर प्रार्थना करण्यास सुरुवात केली. थोड्याच दिवसात त्यांना कौशल्यामातेच्या लाडक्याचे बालकस्वरुपात दिव्य दर्शन झाले.

भक्तीशास्त्रानुसार आपण भगवंताशी शांत, दास्य, सख्य, वात्सल्य आणि माधुर्य या पाच भावांनी संबद्ध होऊ शकतो. ह्या सर्व भावामध्ये मधुर भाव सर्वात गोड व सधन होय. इतर भावांनी भगवंताशी ऐक्य होऊनही श्रीरामकृष्णांची तृप्ती होईना. म्हणून त्यांनी राधाराणीच्या भावाचा काया-वाचा-मने आश्रय घेऊन 'हे जगज्जननी, हे महामाये, तो नंदाचा पुत्र मला पती लाभो' अशी व्याकुळतेने अविरत काकुळती सुरु केली. ते त्या साधनाकाली सहा महिने स्त्री वेषात होते. त्या भावात ते इतके तन्मय होऊन गेले की आपण पुरुष आहोत हा त्यांचा बोध पूर्णपणे नष्ट झाला होता. त्यांना प्रथम दर्शन झाले ते श्रीराधेचे. इतर सर्व मूर्तींप्रमाणे ती मूर्तीही त्यांच्या शरीरात प्रविष्ट झाली. हा मधुरभाव घनीभूत झाल्यानंतर थोड्याच काळात त्यांना सच्चिदानंदघन भगवान श्रीकृष्णाचे दर्शन झाले. ती मूर्तीही श्रीरामकृष्णांच्या शरीरात प्रविष्ट झाली. चिन्मय धाम, चिन्मय श्याम !

वैष्णवशास्त्रातील सर्वश्रेष्ठ भावाची साधनापूर्ण झाल्यानंतर एकेदिवशी श्रीरामकृष्ण मंदिर परिसरात बसले असताना नागा संप्रदायाचे श्रीमत् तोतापुरी नावाचे संन्याशी दक्षिणेश्वरी उपस्थित झाले. श्रीरामकृष्णांना पाहून त्यांनी सूक्ष्मदृष्टिने ओळखले की हा मनुष्य वेदान्तसाधनेचा उत्तम अधिकारी होय. "तुम्ही वेदान्त साधना कराल काय?" ही एका अपरिचित संन्याशाची पृच्छा ऐकून "ते सारे माझ्या आईला माहित. ती आदेश देईल तर करीन". असे त्यांनी उत्तर दिले. पुरीजींनी त्यांना, आईला विचारुन या, असे सांगितले. श्रीरामकृष्ण मंदिरात गेले. भावावेशात त्यांना जगन्मातेची वाणी ऐकू आली - "जा, वेदान्त साधना कर, त्यासाठीच त्या संन्याशाला इथे आणले आहे."

शुभ दिवस बघून श्राद्धादि सर्व विधी आटोपल्यावर दुसरे दिवशी एका कुटीत विरजा होम करण्यात आला. त्यात शिखायज्ञोपवितादींची आहुती दिल्यावर गुरुकडून श्रीरामकृष्णांनी कौपीन, भगवी वस्त्रे व नाम स्वीकारली. वेदान्तात असलेला अस्ति-भाति-प्रिय स्वरुप ऐकमेवद्वितीय ब्रह्माचा ज्वलंत शब्दात बोध करुन तोतापुरींनी श्रीरामकृष्णांना ध्यान मग्न होण्यास सांगितले. थोड्याच वेळाने त्यांच्या मनाने ध्यानसीमा ओलांडून पाहता पाहता निर्विकल्प समाधीत प्रवेश केला. ध्यानमग्न श्रीरामकृष्णांना कुणी त्रास देऊ नये म्हणून तोतापुरींनी बाहेरुन कुटीचे दार बंद केले. शिष्य थोड्याच वेळात हाक मारील म्हणून ते जवळच पंचवटीतील आपल्या आसनावर बसले. तास गेले, दिवस मावळला, रात्र उलटली, तीन दिवस गेले पण शिष्याची हाक ऐकू आली नाही म्हणून विस्मयचकित होऊन ते कुटीत प्रवेशले. ज्या स्थितीत रामकृष्ण तीन दिवसांपूर्वी बसले होते त्याच स्थितीत ते आताही होते. त्यांच्या अवस्था तपासून तोतापुरी विचार करु लागले की हे जे पाहतो आहे ते खरे ना? सतत चाळीस वर्षेकठोर साधना करुन मी जे मिळवू शकलो ते ह्या पुरुषोत्तमाने एका दिवसात मिळविले असेल काय?

नंतर 'हरिओम्'च्या मंत्राच्या गंभीर ध्वनीने पंचवटी निनादून गेली आणि पुरीजींच्या प्रयत्नांनी श्रीरामकृष्ण निर्विकल्प समाधीतून द्वैत भानावर आले. आणि त्यांना दिसले की आत बाहेर, सर्वत्र तोच असून तोच सर्व रुपांनी नटलेला आहे.

काही दिवसांनंतर एक मुसलमान फकीर कालीवाडीत आले. त्या फकिराचे तिथे वास्तव्य असताना श्रीरामकृष्ण त्यांची प्रेमळ वागणूक, धर्मानुराग, भक्तीभाव व सरळ विश्वास बघून त्यांच्याकडे आकृष्ट झाले व त्यांना इस्लाम धर्माची साधना करण्याची इच्छा झाली. लगेच त्यांनी त्याच्याकडून यथाविधि 'अल्ला' मंत्राची दीक्षा घेऊन त्यांच्या धर्मानुसार मंत्रजप सुरु केला व ते त्या साधनेत मग्न झाले. या साधनाकाली त्यांचा वेश, जेवण वगैरे गोष्टी मुसलमानांप्रमाणेच होत्या. दिवसातून तीन वेळा नमाज पढत असत. तीन दिवसानंतर श्रीरामकृष्णांना प्रथम एका लांब दाढी वाढलेल्या गंभीर, भव्य आणि ज्योतिर्मय दिव्य पुरुषाचे दर्शन झाले व मग सगुण विराट ब्रह्माची अनुभूती होऊन तुरीय निर्गुण ब्रह्मात त्यांचे मन लीन होऊन गेले.

त्यानंतर एक दिवस ते दक्षिणेश्वरच्या कालीवाडीला लागूनच असलेल्या श्री. शंभु मल्लीकांच्या उद्यानगृहातील दिवाणखान्यात बसले असताना भिंतीवरील येशु ख्रिस्तांच्या चित्राकडे त्यांची दृष्टी गेली. येशूंच्या जीवनाविषयी श्रीरामकृष्णांनी बरेच काही ऐकले होते. जननी मेरीच्या कडेवर बालक येशू असे ते भाव मधुर चित्र तन्मय होऊन पाहत असताना श्रीरामकृष्ण येशूंच्या अद्भुत जीवनकथेचा विचार करताहेत तोच ते चित्र जिवंत, ज्योतिर्मय होऊन गेले आहे असे त्यांना दिसले, व देवशिशूच्या शरीरातून निघणारे ज्योतिःकिरण त्यांच्या (श्रीरामकृष्णांच्या) शरीरात प्रविष्ट झाले. त्यांच्या मानसिक भावात अमूल परिवर्तन घडून एक भिन्न अपरिचित भाव त्यांच्या मनातील हिंदु संस्कारांना बाजूस सारुन त्यांच्या मनात प्रबल आवेगाने उदित झाला, आणि येशू ख्रिस्त व त्यांनी प्रवर्तीत केलेला धर्म यांवरील अनुरागाने व श्रद्धेने त्यांचे हृदय भरुन जाऊन ते निरंतर येशूंच्या चिंतनात गढून गेले. तीन दिवस या भावात गेल्यानंतर चौथे दिवशी पंचवटीत फिरत असताना त्यांना एक विदेशी, विजातीय, अदृष्टपूर्व, सुंदर गौरवर्णाचा देवभावयुक्त पुरुष त्यांच्याकडे स्थिर दृष्टीने पाहत येत असताना दिसला. श्रीरामकृष्णांच्या अंतःकरणातून आवाज आला-'येशू ! दुःख यातनांतून जीवांना मुक्त करण्यासाठी स्वतःच्या हृदयाचे रक्त देणारे येशू!' त्याच क्षणी देवमानव श्रीरामकृष्णांना अलिंगन देऊन त्यांच्या शरीरात विलिन झाले. भावाविष्ट होऊन बाह्यसंज्ञा लोपून श्रीरामकृष्ण समाधिमग्न होऊन गेले.

एकापाठोपाठ एक इतक्या कठोर साधना केल्यानंतर त्यांना कळून चुकले की सर्व मार्ग एकाच ध्येयाप्रत जातात. तेथे सर्व भेद गळून जातात आणि उरतो तो फक्त एकमेवाद्वितीय सच्चिदानंदस्वरुप परमात्मा. - रुचींनां वैचित्र्यात् ऋजुकुटिलनानापथजुषाम् नृणाम् एको गम्यः त्वमसि पयसाम् अर्णव इव"-"वेगवेगळ्या उगमातून निघणाऱ्या नद्या ज्याप्रमाणे अंती सागरालाच जाऊन मिळतात त्याचप्रमाणे स्वतःच्या आवडीप्रमाणे निरनिराळ्या सरळ वा वक्र मार्गांनी जाणारे सर्व साधक, प्रभो अंती तुझ्या प्रतच येऊन पोहोचतात." ह्या परमभक्त पुष्पदंताच्या अमर ओळीतून आपल्याला 'जितकी मते तितके मार्ग' हा सर्वधर्मसमन्वायाचा सिद्धांत

आढळून येतो. परंतु ह्या सत्याची आजवर कितीदातरी घोषणा झाली असली तरी ती केवळ तात्विक सिद्धांताच्या स्वरुपातच एखादाच मार्ग चोखाळून त्याद्वारे सिद्ध झालेल्या व्यक्तींनी हे सत्य तात्विक सिद्धांताच्या रुपानेच आजवर उद्घोषित केले आहे.

श्रीरामकृष्णांनी मात्र हिंदु धर्मातील संप्रदाय व पंथोपपंथांच्या सोबतच भारताबाहेरील प्रमुख धर्मांची निष्ठेने, प्रत्यक्ष अनुष्ठानपूर्वक त्या त्या धर्माची बाह्यचिन्हे यथाविधि, यथाशास्त्र धारण करुन, त्या त्या धर्मांच्या नियमांनुसार साधना करुन भगवंताचा लाभ करुन घेतल्यानंतरच त्या योगे 'जितकी मते तितके मार्ग' हा सर्वधर्मसमन्वयाचा सिद्धांत घोषित केला. श्रीरामकृष्ण हे स्वयंम् सर्वधर्मसमन्वयस्वरुप होते. शिकागो शहरी भरलेल्या सर्वधर्मपरिषदेविषयी बोलताना भगवान श्रीरामकृष्णांविषयी उल्लेख करुन स्वामी विवेकानंद एकदा उद्गारले होते – ''कसली सर्वधर्मपरिषद घेऊन बसला आहात? अशा एका पुरुषोत्तमाच्या चरणांजवळ बसण्याचे सौभाग्य मला लाभले आहे की जो स्वतः एक मूर्तिमंत सर्वधर्मपरिषद होता!'' श्रीरामकृष्णांचे अवतार महात्म्य लक्षात घेऊन ते आपली श्रद्धा खालील ओवीत व्यक्त करुन त्यांच्या चरणी नतमस्तक होतात – **स्थापकाय च धर्मस्य सर्वधर्मस्वरूपिणे । अवतारवरिष्ठाय रामकृष्णाय ते नमः ।।**

श्रीरामकृष्णांनी कोणताही नवीन धर्म अथवा पंथ स्थापन केला नाही. कारण तसे करणे म्हणजे पूर्वीच्याच धर्म संप्रदायात व सांप्रदायिकेत भर घालणे होय. ते न करता त्यांनी अगोदरच अस्तित्वात असलेल्या धर्माला सार्वजनीन स्वरूप प्रदान केले. आणि त्यामुळे ते जगातील निरनिराळ्या धर्मांच्या लक्षावधी लोकांना 'आपले' वाटतात. त्यामुळेच मॅक्समुलर, रोमाँ रोलाँ, आल्डस् हक्सले आदि सत्यान्वेशी विदेशी विद्वानांनी श्रीरामकृष्णांचे जयगान गाण्यात कृतज्ञता, आनंद व अभिमान मानला आहे.

इतर धर्मांविषयी कोणता भाव असावा याबद्दल भक्तांशी बोलताना श्रीरामकृष्ण म्हणतात, ''पण माझ्यामते सर्वचजण त्या एकाच ईश्वराला आळवीत असतात. द्वेषाद्वेषीची काय गरज? कुणी म्हणतात तो साकार, कुणी म्हणतात तो निराकार. मी म्हणतो, ज्याचा साकारावर विश्वास आहे तो साकाराचच चिंतन करो आणि ज्यांचा साकारावर विश्वास नसेल तो निराकाराचं ध्यान. मला म्हणायचं फक्त इतकच की स्वमतान्धता चांगली नाही. माझाच धर्म तो काय बरोबर, बाकीचे सारे चूक ही भावना चांगली नव्हे.....''

ते म्हणत, ''ईश्वरच नित्य, बाकी सारं अनित्य. ईश्वरलाभच मानवजीवनाचे उद्दिष्ट, व्याकुळता असल्यास या जीवनातच ईश्वराचा लाभ करुन घेता येतो. सर्वच धर्म सत्य आहेत. धर्मांच्या बाह्य अंगावरुन भांडणे माजवू नका. आत बाहेर सर्वत्र सर्व रुपांनी विराजणाऱ्या परमेश्वराची अनुभूती करुन घेणेच खरा धर्म. ती अनुभूती मग तुम्ही कोणत्याही मार्गाने जाऊन मिळवा. स्वतःच्या मार्गावर निष्ठा ठेवा, पण इतर कोणत्याही मार्गाविषयी द्वेष, घृणा वा तिरस्कार बाळगू नका. इतरांच्या मार्गाविषयी आपुलकी बाळगून परस्परांना मदत करीत आपला मार्ग आक्रमा. त्यातच तुमचे व जगाचे कल्याण आहे. एखाद्या विस्तीर्ण पुष्करिणीला अनेक घाट असतात. एका घाटावरुन हिंदू पाणी घेतात, म्हणतात – 'जल'. दुसऱ्यावरुन मुसलमान पाणी घेतात, म्हणतात – 'पानी'. तिसऱ्यावरुन ख्रिश्चन पाणी घेतात, म्हणतात – 'वॉटर'. पाणी तेच – एकच. त्याचप्रमाणे त्या एकाच सच्चिदानंद भगवंताला निरनिराळ्या धर्मांचे व पंथांचे लोक निरनिराळ्या नावांनी व निरनिराळ्या भावांनी आळवीतात. म्हणून लक्षात ठेवा – जितकी मते तितके मार्ग. पाणी घेऊन तृष्णा मिटवण्याशी काम – मग ते कोणत्याही 'घाटा'वरुन घेतलेले असो.

श्रीरामकृष्णांनी आपल्या जीवनाद्वारे हा संदेश दिला की तो एकमेवाद्वितीय सच्चिदानंद भगवान सर्वांचाच असून जगातील समस्त धर्म त्या एकाच सनातन धर्माचे निरनिराळे अविष्कार असून त्याच्या प्राप्तीचे भिन्न भिन्न उपाय होत. तोच हिंदुंचे 'ब्रह्म', बौद्धांचा 'धम्म', 'ख्रिस्तांचा 'स्वर्गस्थ पिता', मुसलमानांचा 'अल्ला', पारशांचा 'अहुरमज्झ्व' व यहुद्यांचा 'जिहोवा' होय. म्हणूनच श्रीरामकृष्णांची शिकवणूक आहे की स्वतःच्या धर्मावर निष्ठा ठेवा आणि इतर सर्व धर्मांविषयी आपुलकी बाळगा आणि त्या सत्यस्वरुप भगवंताची प्राप्ती याच मानव जीवनात करुन घ्या.

**श्री. वासुदेव मोरेश्वर लोहित**
४९/३, उज्ज्वलनगर, सोमलवाडा,
वर्धा रोड, नागपूर – ४४००२५



# जितकी मते तितके मार्ग

**श्रीमती सविता ओगिराल,** मराठी व समाजशास्त्र विषयांत एम.ए., बंगाली भाषेतून ॲडिशन, बी.ए.ला पत्रकारितेचा अंशकालीन अभ्यासक्रम. नागपूरातून प्रसिद्ध होणाऱ्या 'तरुण भारत, लोकमत, नागपूर पत्रिका' इ. वृत्तपत्रातून लिखाण. 'अमृत, स्त्री, युगवाणी, मातृसेवा' इ. मासिकांतून असंख्य अनुवाद व स्वतंत्र लिखाण प्रसिद्ध. सन १९९४ ते ९९ तरुण भारत, नागपूर घरसंसार महिला पुरवणीचे यशस्वी संपादन. रामकृष्णमठ नागपूर तर्फे प्रकाशित होणाऱ्या 'जीवन विकास' मासिकासाठी अनुवाद व स्वतंत्र लिखाण. गेली २० वर्षे 'श्री शिव महिम्न स्तोत्र' लेखमालेला शालीनीबाई पाठक पुरस्कार, बालवाङ्‌मय, अनुवाद, चरित्र, लेख, प्रवासवर्णन, कथा संग्रह मिळून ११ पुस्तके प्रकाशित.

श्रीरामकृष्णांचे गृही भक्त सुरेन्द्र मित्र एक दिवस त्यांच्याकडे आले व त्यांनी श्रीरामकृष्णांना एक चित्र दाखविले. त्या चित्रात मंदिर मस्जिद – गिरिजाघर – अशी निरनिराळ्या धर्मांची प्रार्थनास्थळे व त्या त्या धर्मातील धर्मगुरु आपापल्या वेशात उभे आहेत असे दाखविले होते. चित्राकडे पाहून श्रीरामकृष्ण म्हणाले, 'ह्यात सारे काही आहे'. धर्म व प्रार्थनास्थळे व त्याप्रमाणे आचार विचार भिन्न असले तरी प्रत्येकाचे उद्दिष्ट एकच असते, ते म्हणजे अंतिम सत्याची प्राप्ती किंवा परमेश्वरप्राप्ती. अर्थात 'जितकी मते तितके मार्ग'.

मते व मार्ग भिन्न असतात परंतु मूळ तत्व एकच असते. यासाठी भगवान श्रीरामकृष्ण एक उदाहरण देऊन त्याचे स्पष्टीकरण करतात. 'एका तळ्याला अनेक घाट असतात. हिंदू लोक एका विशिष्ट घाटावरुन आपल्या कळशीतून पाणी नेतात आणि त्याला 'जल' अथवा 'पाणी' म्हणतात, मुसलमान दुसऱ्या घाटावरुन पाणी नेतात आपल्या चामड्याच्या डोलीतून व त्याला नाव देतात 'पानी', ख्रिस्ती आणखी तिसऱ्या घाटावरुन पाणी नेऊन नाव देतात 'वॉटर'.

'पाणी' एकच केवळ त्याची नावे निराळी. हिंदू-मुसलमान-ख्रिस्ती जर आपल्याच नावाचा आग्रह धरतील व हे पाणी नव्हे पानीच किंवा वॉटरच तर तो दुराग्रस्ह ठरेल व त्यातून कलह निर्माण होईल. त्यांनी एकमेकांच्या घाटावरुन व त्या त्या उपकरणातून पाणी नेले तरी 'पाणी' हे मूळ तत्व तेच असते केवळ प्रत्येकाने त्या तत्त्वाला दिलेली नावे भिन्न असतात इतकेच.

बंगाली भाषेत एक वाक्‌प्रचार आहे 'गाईचे रंग काळा, पांढरा, करडा असे वेगवेगळे असले तरी दुधाचा रंग मात्र पांढराच असतो.' ह्याप्रमाणे निरनिराळे धर्म, त्यांची नावे व त्यातील आचार-विचार वेगवेगळे असले तरी प्रत्येकाचे उद्दिष्ट एकच असते व प्रत्येक धर्माचे सार एकच असते. श्रीरामकृष्णांच्या लीलासहधार्मिणी श्री माँ सारदादेवी अगदी सोप्या शब्दात याची उकल करुन सांगताना म्हणतात, ''ज्याप्रमाणे एकाच वृक्षावर पांढरे-काळे व अनेक रंगीबेरंगी पक्षी येऊन बसतात व आपापली बोली बोलतात, ऐकताना साऱ्यांचे बोल वेगवेगळे भासत असले तरी आपण त्या साऱ्या पक्ष्यांच्या चिवचिवाटाला 'पक्ष्यांचे बोल' असेच म्हणतो.''

'जितकी मते तितके मार्ग' हा महामंत्र भगवान श्रीरामकृष्णांनी प्रथमच या विश्वाला दिला. श्रीरामकृष्णांच्या आविर्भावापूर्वी अनेक संत, महात्म्ये, ऋषी, तपस्वी या भारतभूवर येऊन गेले. त्या साऱ्यांचे विचारधन व चरित्र प्रातःस्मरणीय आहे यात वाद नाही. भगवान श्रीरामकृष्णांचा काळ यासाठी विचारात घ्यावा लागेल.

इ.स. १७५७ मध्ये प्लासीचे युद्ध झाले व या युद्धानंतर भारतीय इतिहासाला वेगळेच वळण लागले होते. वाणिज्य-व्यापाराच्या मिषाने इंग्रजांनी भारतात पाऊल ठेवले. सर्वप्रथम त्यांनी त्यावेळचा बंगालचा नबाब असलेल्या सिराजउद्दौलाला कपटाने ठार केले. हळूहळू इथल्या एकूण परिस्थितीचा अंदाज घेऊन त्यांची कटकारस्थाने वाढू लागली. अठराव्या शतकाची अखेर व एकोणिसाव्या शतकाचा आरंभकाळ होता. इंग्रजी राजसत्तेने भारत देशाचे राष्ट्रीय, अध्यात्मिक, सामाजिक, कौटुंबिक जीवन ढवळून टाकले. स्वदेश-स्वधर्माचा अभिमान नष्ट होऊन भारताचे पूर्वीचे वैभव-परंपरा-अध्यात्म सारे लयास जाऊ लागले. पाश्चात्यांचा जडवाद व भोगपरायणवृत्ती तत्कालीन उच्चभ्रू समाजात स्थिरावू लागली होती. 'चाकरमानी' जमात निर्माण करुन इंग्रजांनी शिक्षित मध्यमवर्गाला पोटापाण्याचे साधन तर दिले परंतु त्याचवेळी त्यांचे स्वत्व हरण केले. परंपरागत देवपूजा, अनुष्ठाने, सोवळे पार पाडण्यात प्रजा स्वतःला धन्य मानू लागली. खरा सनातन धर्म विस्मरणात जाऊ लागला. 'त्यागासाठी भोग' म्हणजे पुरोहित वर्गाचा निव्वळ स्वार्थ होय'. 'मरणोत्तर जीवन व आत्म्याचे अस्तित्व केवळ कविकल्पना होत.' अशा प्रकारचा प्रचार सुरु झाल्याने इथल्या त्याग, संयम, नीतिनियमांना हादरे बसू लागले. परिणामी भोगप्रवणता वाढून आपली मूलभूत उच्च मूल्ये विस्मरणात जाऊ लागली. 'संभवामि युगे युगे' हे भगवंतांनी दिलेले वचन पूर्ण करण्याची वेळ आता आली होती.

'कलकत्त्यातील लोक किड्यांप्रमाणे वळवळत जगत आहे.' हे जाणणारे भगवान श्रीरामकृष्ण अशा काळात आविर्भूत झाले होते. कलकत्ता म्हणजे केवळ सांकेतिक, तसे सारे विश्वच त्यांना म्हणायचे असावे. धर्माधर्मातील झगडे व द्वेष वाढून पराकोटीला जात असताना आपल्या घरापासून आरंभ करायचा होता. 'ब्राह्म समाज', 'प्रार्थना समाज' आणि आणखी काही पंथ-संप्रदायांनी या काळात कार्य सुरु

केले. त्या साऱ्यांचे विचार व कार्यपद्धती उत्तम असल्या तरी ते सारे दीर्घकाळ टिकू शकले नाहीत. कारण धर्ममते ही मूलतः परमेश्वरी संकल्पनेशी निगडित असतात.

'बहु' आणि 'एक' ही दोन्ही एकच सत्य असून एकाच मनाने भिन्न समयी व भिन्न अवस्थातून बघितल्यामुळे ती तशी दिसत असतात हीच गोष्ट श्रीरामकृष्णदेवांच्या शब्दात सांगायची तर 'ईश्वर साकार आणि निराकार दोन्ही आहे.' तसेच साकार आणि निराकाराच्या पलीकडचा आहे. हीच संकल्पना म्हणजे 'जितकी मते तितके मार्ग' होय. या संकल्पनेमुळे श्रीरामकृष्णांचे विचार केवळ पूर्व व पश्चिमच नव्हे तर भूत आणि भविष्याची मिलन भूमी ठरेल.

श्रीरामकृष्णदेव उणेपुरे पन्नास वर्षांचे आयुष्य जगले. ह्या अल्प जीवनात त्यांनी सर्व धर्मांच्या साधना केल्या. त्यासाठी त्यांना कधीही गुरुच्या शोधात फिरावे लागले नाही. भैरवी ब्राह्मणी, तोतापुरी, गोविंद राय असे एकामागे एक गुरु या शिष्यवराच्या शोधात आले. दक्षिणेश्वरी भवतारिणीच्या व पवित्र भागीरथीच्या साक्षीने अल्पकाळात सर्व साधना-संपन्न झाल्या, एवढ्यानेच संपले नाही तर सर्व संप्रदाय-पंथ-भाव सारे काही त्यांनी आत्मसात केले. धर्म ही तर्कबुद्धीच्या पलीकडची वस्तू आहे. गूढ, अलौकिक, प्रकृतीच्या अतीत आहे. त्याची धारणा करणे म्हणजे अर्थातच त्यावर विश्वास हवा. विभिन्न धर्मांच्या साधना करताना ते पूर्णपणे त्याच्याशी एकरुप होत. त्यातील आचार-विचार-पोषाख इत्यादी सारे अवलंबीत आणि त्यानंतरच 'जितकी मते तितके मार्ग'चा महामंत्र ते जगाला देऊ शकले. विभिन्न धर्ममतांच्या सोपानाने तत्त्वानुभूतीच्या माथ्यावर आरोहण करुन भेदाभेदांच्या भिंती त्यांनी नष्ट केल्या. कारण ती काळाची गरज होती. भ्रांतचित्त मानवाच्या सादाला दिलेला प्रतिसाद होता. अतिशय साधी-सरळ-सोपी व व्यावहारीक उदाहरणे देऊन ते आपली मते मांडीत. 'सारे लोक आपापल्या जमिनीची मर्यादा भिंती घालून ठरवितात. परंतु अखंड आकाशाला कोणी खंडित करु शकत नाही. आकाश साऱ्यांवर सारखेच विराजमान झालेले असते. तद्वतच माणूस केवळ आपलाच धर्म श्रेष्ठ असे समजतो. धर्माच्या सखोल अभ्यासाने - चिंतनाने त्याला ज्ञान प्राप्त होते ते अंतिम सत्याचे. नंतर त्याला समजते की सर्व धर्मांवर अखंड सच्चिदानंदांचे राज्य आहे.'

श्रीरामकृष्णांचा प्रगाढ विश्वास होता की, ज्यांचा खरोखरच परमेश्वरावर विश्वास असतो ते त्याच्या साधनेत, भजन, पूजनात दंग असतात. तसेच कुठलेही पंथोपपंथ मानत नाहीत. परंतु तो काळ असा होता की धर्माला विकृत स्वरुप प्राप्त झाले होते. आपापल्या धर्ममतांवर आंधळेपणाने प्रेम करणे, धर्माभिमानीपणाचे लक्षण समजले जात होते. श्रीरामकृष्णांनी सांगितले, 'प्रत्येकाला आपलेच घड्याळ बरोबर असे वाटते' परंतु हे विश्व विविधतेने नटले आहे. 'एकोहम्'ला 'बहु' व्हावेसे वाटले आणि विश्वब्रह्मांड प्रसविले. विविधता हाच त्यांचा मूलाधार मग आपल्याच मनाला चिकटून राहून दुसऱ्याला तुच्छ का लेखावे! अगदी साधी गोष्ट आहे, एक व्यक्ती दुसऱ्या व्यक्तीसारखी नसते. साहजिकच धर्माइतका सर्वश्रेष्ठ पैलू भिन्न असणारच. देश-काल-परिस्थितीप्रमाणे त्यात मूलभूत भिन्नता असणारच. त्यासाठी कलह का असावा? स्वतः भगवंत भगवद्गीतेत म्हणतात, 'मयि सर्वविदं प्रोतं सूत्रे मणिगणा इव' प्रत्येक धर्म वा पंथ वा मत-एकेक-मणि-व त्या सर्वांमधून जाणारे एक सूत्र म्हणजे परमेश्वर.

आपल्या तारुण्यात 'तुम्ही ईश्वराला पाहिले आहे का?' असा प्रश्न विचारीत अनेक मंदिर-मठातून भटकणाऱ्या नरेंद्रनाथांना त्यांच्या प्रश्नांचे समाधानकारक उत्तर मिळाले होते ते केवळ दक्षिणेश्वरी. दक्षिणेश्वरच्या श्रीरामकृष्णांच्या रुपात त्यांच्या हृदयाला व बुद्धीला आवश्यक प्राचीन शास्त्रविधानांचा पडताळा पाहायला मिळाला. ग्रंथात वर्णन केलेले सत्य इथे प्रत्यक्ष साकारले होते. आजवर केलेली भटकंती सार्थकी लागली. नरेंद्रांच्या मते त्यावेळचे धर्माचे स्वरुप म्हणजे 'सांप्रतकाळी धर्म भाताच्या भोगोण्यात बंद झाला आहे, असे होते. खरा मानव धर्म व त्याची दिशा ठरविणे आवश्यक होते. दक्षिणेश्वरी नरेंद्रनाथांना अपेक्षित व जीवनाला योग्य दिशा देणारे गुरु भेटले. सर्व धर्मांचे सार पचवून नवीन संकल्पना रुजविणारे जगद्गुरु!

आर्य जातीचा खरा धर्म काय हे प्रत्यक्ष दाखवून देण्यासाठी श्रीरामकृष्णांनी अवतार धारण केला होता. आपसात सदैव झगडणाऱ्या, एकमेकांपासून वेगळ्या भासणाऱ्या व परस्परविरोधी आचार पाळणाऱ्या अशा पंथोपंथांनी त्यावेळी धुमाकूळ घातलेला होता. सोवळे-ओवळे, श्रेष्ठ-कनिष्ठ भाव वाढीस लागून धर्ममतांची भ्रष्ट नक्कल होताना दिसत होती. म्हणूनच स्वदेशवासियांना गोंधळात टाकणाऱ्या व विदेशियांना किळसवाण्या वाटणाऱ्या साऱ्या देशभर इतस्ततः विखुरलेल्या हिंदू धर्माच्या नाना तुकड्यांमध्ये व शाखाप्रशाखांमध्ये एकता कुठे आहे हे प्रत्यक्ष दाखवून देण्यासाठी भगवान श्रीरामकृष्णदेवांनी अवतार धारण केला होता.

इथल्या चिरंतन धर्माचे सार्वकालीन व सार्वजनिक स्वरुप स्वतःच्या जीवनातून प्रकट करुन त्या चिरंतन धर्माचे जिवंत उदाहरण म्हणून स्वजीवन जगत्कल्याणार्थ विश्वासमोर उन्मुक्त करणे हेच त्यांच्या अवताराचे प्रयोजन होते. नरेंद्रनाथांनी अनेकदा अनेक प्रकारे श्रीरामकृष्णांची परीक्षा घेऊनच त्यांना आपले गुरु मानले होते.

आपल्या गुरदेवांचे सारे विचारधन नरेंद्राचे स्वामी विवेकानंद झाल्यावर त्यांनी साऱ्या विश्वासमोर मांडले. कारण केवळ भारत देशापुरतेच ते मर्यादित नव्हते. एक भारत जागृत करुन भागणार नव्हते. श्रीरामकृष्णांचे जीवन व 'जितकी मते तितके मार्ग', 'शिवभावे जीवसेवा', 'आत्मनोमोक्षार्थम् जगद्हितायच' ही सूत्रे संकुचित नव्हे तर जागतिक होती. भूत-भविष्याला व्यापून उरणारी होती. शिकागोच्या सर्वधर्मपरिषेदत व त्यानंतरही आजन्म स्वामी विवेकानंदांनी त्या अनमोल विचारधनाची लयलूट केली.

प्रत्येक धर्माचे तीन विभाग असतात. १) तत्त्वज्ञान २) पुराण ३) कर्मकांड. काही धर्म पहिल्या व दुसऱ्यात तर काही तिसऱ्यावर भर देतात. ज्याला जे अधिक महत्त्वाचे वाटते तेच बरोबर असे समजणे व इतरांचे चुकीचे समजणे हा धर्मवेडेपणा होय. सर्व धर्ममतातील मूलभूत तत्वज्ञान, पुराण व कर्मकांडे कधीही एकसारखी असू शकत नाहीत. देश-काल-परिस्थिती व वातावरणाचा परिणाम म्हणून त्यात भिन्नता असणारच. तरीही आपलेच खरे मानल्याने धर्माधर्मातील द्वेष व झगडे

निर्माण होतात. त्यातच त्यातील संप्रदाय पंथोपंथही अनेक असतात. अर्थातच एकसूत्रीपणाचा अभाव निर्माण होतो. यावर सोपा-सरळ उपाय म्हणजे इतरांच्या मतांचा आदर करुन आपल्या धर्माचे पालन करणे. हे सांगायला सोपे असले तरी अवघड आहे. हे जरी खरे असले तरी असाध्य मात्र नाही. त्यासाठी ते द्वेषबुद्धीचा, हीनबुद्धीचा त्याग करायला सांगतात. श्रीरामकृष्णांचे एक साधे उदाहरण ते वानगीदाखल देत. एखाद्या खानदानी कुटुंबातील सून सासरघरी आल्यावर सासू-सासरे-दीर-नणंद सान्यांची सेवा करते, त्यांना योग्य तो मानही देते परंतु आपल्या अगदी मनातील गोष्टी मात्र आपल्या पतीजवळच बोलून दाखविते. कारण ती जाणून असते की पतीमुळेच सासू-सासरे ही सारी मंडळी आहेत. आपल्या इष्टावर पतीप्रमाणेच प्रेम करावे. त्याबरोबर इतरांशीसुद्धा प्रेमाचे संबंध ठेवावेत.' खरेच आहे, इतरांशी असे एकरुप होता आले तर द्वेषभावना उरणार नाही. शैव-शाक्त असे भेद संपुष्टात येतील. साकार-निराकार-सगुण-निर्गुण-द्वैती-अद्वैती असे भेद नाहीसे होतील. हा हिंदू, हा मुसलमान, हा ख्रिस्ती म्हणून नावे ठेवणे व एकमेकांची निंदा करणे, घृणा करणे बंद होईल.

याच विचाराचा विस्तार करताना स्वामी विवेकानंद म्हणाले होते 'जर ईश्वर सर्व धर्मांचे' केंद्र ही गोष्ट सत्य आहे व आम्हाला प्रत्येकाला एकाच वर्तुळाच्या व्यासावरुन त्या केंद्रांकडे पोहाचायचे आहे तर आम्ही निश्चितच तिथे जाऊन पोहोचू आणि ज्या केंद्रात सर्व त्रिज्या जाऊन मिळतील त्या केंद्रबिंदूशी आमच्यातील सर्व विषमता नाहीशी झालेली असेल. परंतु जोपर्यंत आम्ही ते ठिकाण गाठत नाही तोपर्यंत विषमता असणारच.''

ही विषमता दूर करण्यासाठी सर्वप्रथम आपल्यातील 'कूपमंडूक'वृत्तीचा त्याग करणे आवश्यक आहे. शिकागोच्या धर्मपरिषदेत स्वामी विवेकानंदांनी सांगितलेली गोष्ट याठिकाणी अप्रस्तुत ठरु नये. गोष्ट अशी, एका विहिरीत एक बेडूक राहात होता. ती विहिर म्हणजे त्याचे विश्व होते. एक दिवस अचानक त्या विहिरीत एक समुद्रातील बेडूक येऊन पडला, विहीरीतील बेडकाने त्याला विचारले, कोण रे तू? कुठून आलास? समुद्रातील बेडुक म्हणाला, 'मी समुद्रात राहातो. त्यावर समुद्र? तो काय असतो असे कुपमंडुकाने विचारले. समुद्रातील बेडूक म्हणाला समुद्र खूपखूप मोठा असतो. त्यावर कुपमंडूकाने विहिरीतच या टोकापासून त्या टोकापर्यंत उडी मारुन विचारले, 'एवढा मोठा?' समुद्रातील बेडूक नाही म्हटल्यावर त्याने पुन्हा विहीरीतील त्या टोकापासून या टोकापर्यंत उडी मारुन विचारले, 'मग काय एवढा मोठा?' छे छे समुद्रातील म्हणाला. समुद्र फार फार विशाल असतो. हे ऐकल्यावर कुपमंडूकाला फार राग आला. त्याने त्याला शिव्या देऊन हाकलून लावले. कारण आपल्या विहीरीपेक्षा काही मोठे असूच शकत नाही अशीच त्याची समजूत होती. धर्ममतांची हीच अवस्था असते. आपणच श्रेष्ठ व इतर सारे तुच्छ अशी पक्की धारणा करुन घेतलेली असते. पुढे जाऊन स्वामीजी म्हणाले होते याचा अर्थ असा नव्हे की हिंदूंनी मुसलमान किंवा मुसलमानांनी हिंदू अथवा ख्रिस्ती लोकांनी हिंदू अथवा मुसलमान धर्म स्वीकारावा. आपापल्या धर्माचे-विचारांचे पालन करीत इतरांच्या विचार-आचारांचा आदर करावा इतकेच. आपली मते-आचार-परंपरा-कर्मकांड सोडून द्यावीत असे नव्हे. परंतु त्याचवेळी इतरांना त्यांचे त्यांचे आचार-विचार पाळू द्यावेत. त्यासाठी जोर, जबरदस्ती, भांडणे, श्रेष्ठ, कनिष्ठता याचा त्याग करावा. तेव्हाच विश्वबंधुत्वाची संकल्पना साकार होईल.

ज्याप्रमाणे वेगवेगळ्या प्रवाहांना स्वतःचे वेगवेगळे स्रोत असतात तरीही ते सारे समुद्राच्या पाण्याला जाऊन मिळतात. त्याचप्रमाणे मानवांची मते वेगवेगळी असली व प्रवाहाप्रमाणे त्यांचे मार्ग निराळे असले तरी ते सारे एका परमेश्वररुपी सागरालाच जाऊन मिळतात. खरा धर्म मानवाला मानवाकडून पशूत्वाकडे नव्हे तर ईश्वरतत्वाकडे जायला सांगतो.''

याप्रमाणे श्रीरामकृष्णांनी दिलेला 'जितकी मते तितके मार्ग' हा महामंत्र धर्माशी निगडीत आहे. मानवी सभ्यतेच्या विस्ताराबरोबर या धर्ममतांचा त्यातील पंथ-संप्रदायांचा विस्तार झाला. पशुधन-जमीन, प्रत्येक देशाचे क्षेत्रफळ व त्याचा विस्तार करणारा व त्यासाठी अर्थात स्वार्थासाठी कलह करणाऱ्या मानवाने आपापल्या धर्मासाठीही झगडे सुरु केले. ते साहजिकही होते. परंतु वंशविस्तार धर्मविस्तार करताना त्याच्या स्वार्थीपणाने कळस गाठला व छळ-बळ कौशल्याने आपल्या धर्माबाहेरील लोकांना स्वधर्मात ओढून आणणे, आपल्या धर्माचा स्वीकार करायला लावणे असेही घडू लागले. एकमेकांवर कुरघोडी करणे, दुसऱ्याला तुच्छ लेखणे असा धर्मांधपणा वाढला. आजही भारतावर व सर्व जगातील काही देशांवर आतंकवादी हल्ले होत आहेत. स्फोट घडवून मानवी रक्ताच्या नद्या वाहात आहेत. हे एक प्रकारे क्रूर धर्मयुद्धच आहे. धर्मासाठी त्याच्या प्रेमासाठी आपण पशूत्वाकडे जात आहोत हे निंदनीयच. अशावेळी स्वामी विवेकानंदांनी शंभर वर्षांहून अधिक काळापूर्वी जे तत्त्वज्ञान जगापुढे मांडले त्याचे चिरंतनत्व लक्षात येते. तेच त्रिकालबाधित व वैश्विक आहे. आपल्या गुरुदेवांच्या श्रीरामकृष्ण परमहंसांच्या चरणाजवळ बसून त्यांनी जे आत्मसात केले, त्या युगस्त्रष्ट्याच्या साधनेतून जे साकारले ते विचाराधन आजच्या संक्रमणकाळी उपयुक्त ठरेल यात शंका नाही.

**श्रीमती सविता ओगिराल**
१०३, इम्प्रेशन प्लाझा, डॉ. मुंजे मार्ग, धंतोली,
नागपूर-४४००१२

**'श्रीरामकृष्ण म्हणतात' पुस्तकातून साभार**

**सूर्य पृथ्वीपेक्षा केवढा तरी मोठा असतो, पण दूर असल्यामुळे तो नुसता एका ताटाएवढा वाटतो. त्याचप्रमाणे भगवान अनंत आहेत, परंतु आपण त्यांच्यापासून फार दूर असल्यामुळे त्यांचे यथार्थ स्वरुप आपल्याला आकळता येत नाही.**



# श्रीरामकृष्णांच्या जीवन व उपदेशांचे महत्त्व

**सौ. संध्या श्रीकृष्ण आगटे**, बी.एस.सी. एल.आय.सी.मधून स्वेच्छानिवृत्ती. रामकृष्णमठ अनुग्रहित. सातारा श्रीरामकृष्ण सेवा मंडळाच्या स्थापनेपासून १९६७-२००२ पर्यंत सक्रीय कार्यकर्ती. नागपूर येथील श्रीरामकृष्णमठ अध्यक्ष ब्रह्मलीन स्वामी व्योमरुपानंदजी महाराज यांचे आशिर्वादाने व सूचनेनुसार खालील ग्रंथांचे मराठीत अनुवाद व नागपूर मठातर्फे जीवन विकास मासिकातून बराचसा अनुवाद प्रसिद्ध. १) शिवानंद स्मृतिसंग्रह भाग १ ते ३ संकलक स्वामी अपूर्वानंद - हिंदीमधून प्रसिद्ध २) स्वामी अपूर्वानंद संकलित - स्वामी विज्ञानानंदजीनी अलाहाबाद येथील मठात केलेल्या धर्म चर्चेचा व आध्यात्मिक संभाषणाचा इंग्रजीमधून मराठीत अनुवाद.

अवतारांच्या जन्मग्रहणाचे महत्त्व -

**यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ।**
**अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ।। गीता अध्याय ४.७**
**परित्राणाय साधूनाम् विनाशायच दुष्कृताम् ।**
**धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे** ।। गीता अध्याय ४.८

अवतारांच्या जन्मग्रहणाचा आणि जीवनाचा उद्देश या श्लोकात सांगितला आहे. श्रीरामांनी अवतार घेतला. श्रीकृष्णांनी अवतार घेतला अधर्माच्या संहारासाठी. दुष्टांचा संहार करुन भूभार हलका करण्यासाठी त्या त्या युगात त्यांनी अवतार घेतला. गीतेद्वारे भगवंताने प्रतिज्ञा केली आहे - जगात धर्मग्लानी उद्‌भवताच ते देहधारण करुन आविर्भूत होतील, धर्मग्लानी दूर करुन मानवाला शांतीचा अधिकारी बनवतील. त्यांची ही पवित्र आशिर्वादवाणी आहे.

शब्द वा नाम याचा अर्थाशी नित्य संबंध असतो. दोन प्रकारचा अर्थ असतो. शब्दार्थ आणि मर्मार्थ. राम म्हणजे रमन्ते योगिनोऽस्मिन् इति रामः । कर्षति भक्तानाम् दुःखम् पापम् मनोवेति कृष्णः । योगीजन ज्याच्यात रमण करतात तो राम. जो भक्तगणांचे दुःख वा पाप आकर्षण करुन नष्ट करुन टाकतो अथवा भक्तागणांचे मन आपल्याकडे मन आकृष्ट करुन घेऊन आपल्या भक्तीत तल्लीन करुन देतो तो कृष्ण. या युगात या उभयतांचा समावेश श्रीरामकृष्ण नामात झाला आहे. सत्‌चित्-आनंदस्वरुप ब्रह्म. सनातन सार्वजनीन धर्माला काळाच्या ओघात ग्लानी येते. अज्ञान आणि माया यांच्या प्रभावाने मोहित होऊन मानव इहलोकाला आणि ऐहिक भोगसुखालाच सर्वस्व मानून आयुष्य घालवीत राहतो. ऐहिक संपदा आणि इंद्रियसुखे प्राप्त करुन घेऊनही आपल्या अंतःकरणाची तळमळ नाहीशी करु न शकल्याने अशांतीच्या अफाट सागरात गटांगळ्या खाऊ लागतो. दुःख शोकाने रंजीस येतो. अशावेळी भगवान दुबळ्या मानवजातीवर असीम करुणा व कृपा करीत देह धारण करुन मानवाचा हात धरुन त्याला पुन्हा धर्म मार्गाला लावून देतात. सनातन धर्माला उज्ज्वल रुप देतात. मानव कितीही काळ, वा कितीही दुराचरणी होईना का भगवंताची अपार करुणा त्याला कधीही चिरकाल विनाशाच्या वाटेने जाऊ देत नाही. नवीन नवीन आध्यात्मिक मार्ग शोधून काढून धर्माची प्राप्ती करुन देते. या युगी अवताराचे हे प्रयोजन आहे. मायेपलिकडील ब्रह्मस्वरुपाची आणि जगत्कारण ईश्वराची प्राप्ती करुन घेण्याचे पूर्वी माहीत नसलेले नवे-नवे मार्ग त्यांच्याद्वारा या युगात शोधून काढले गेले आहेत.

**श्रीरामकृष्णांची बाल्यावस्था - बालक गदाधर**

बालक गदाधर बालपणापासून स्वभावतःच एकाग्रचित्त. ज्यावेळी एखाद्या विशिष्ट गोष्टीत मग्न होई त्यावेळी त्याच्या शरीरबोधाचा ऱ्हास होऊन, आपल्या मनाची पकड घेतलेल्या त्या कल्पनेशी तो तद्रूप होई. सळसळत्या भातशेतांमधे मनःपूत भटकताना एका तुकतुकीत काळ्या मेघासमोरुन आपले पांढरेशुभ्र पंख फैलावून लयबद्ध रीतीने उडत जाणाऱ्या बगळ्यांच्या माळेची मनोहर व स्वच्छंद गती पाहून बालक गदाधर इतका तन्मय झाला की स्वतःचे शरीर व जगाची जाणीव लोपून संज्ञाशून्य होऊन गेला त्यावेळी त्याचे वय होते केवळ सात वर्षे. ही पहिली सविकल्प, भावसमाधि. विशालाक्षी देवीच्या दर्शनाला जाताना बालकाच्या अतिंद्रियानुभूतीच्या स्वाभाविक ओढीची आणि चिंतनशीलतेची वाढ झाल्यामुळेच त्याला दुसऱ्यांदा भावसमाधी प्राप्त झाली. देवीचे चिंतन करता करता तिच्या पादपद्मी मन लीन झाल्यानेच अशी समाधीअवस्था प्राप्त झाली.

त्याच वयात एकदा शिवरात्रीच्या उत्सव प्रसंगी बालक उपाशी राहून विशेष निष्ठेने देवाधिदेव महादेवाची पूजा करीत तन्मय झाला होता. अशा वेळी मित्रांनी येऊन आग्रह केला की त्याने शिवरुप सजून नाटकात काही वाक्य म्हणावीत. नाईलाजाने कबूल होऊन गदाधर शिवाची भूमिका घेऊन रंगभूमीवर आला. जटा, रुद्राक्ष, भस्म यांनी भूषित होऊन तो शिवाच्या चिंतनात इतका काही तन्मय झाला की बाह्य संज्ञाशून्य होऊन गेला. अशा प्रकारची भावसमाधी त्याला पुन्हा पुन्हा प्राप्त होत असे.

बालक गदाधराची स्मरणशक्ती अद्‌भूत होती. फक्त एकदा ऐकून धार्मिक नाटकातील भाषणे, गाणी, भजने पाठ होऊन जात. त्याची संगीत शक्ती विलक्षण होती. अमृतमधुर कंठ, गाण्यातील आशयभूत भावाचा

स्वतःवर पुरेपूर आरोप करीत मधुर स्वरात त्याची यथायोग्य अभिव्यक्ती आणि तालाची विशुद्धता यामुळे त्याने गायलेली भजने ऐकताना समोरचे श्रोते देहभान विसरुन जात. भावच संगीताचा प्राण होय. बालक त्या भावात तन्मय होऊन जाई. त्या वयातही दृढनिश्चय हे त्याचे स्वभावजात वैशिष्ट्य होते. कामारपुकुर या त्याच्या जन्मगावी लोहार जातीची धनी नावाची एक महिला होती. गदाधरावर तिची अपार स्नेहममता होती. उपनयनाच्या वेळी पहिली भिक्षावळ धनीकडून घेऊन तिला भिक्षामाता करण्याचा हट्ट गदाधराने धरला. नातेवाईकांचा रोष, समाजामधे प्रचलित असलेली प्रथा, समाजाचे निर्बंध, कुटुंबियांचा विरोध, धनीची भीतीजन्य काकुळतीची मनाई बालकाला तसे करण्यापासून परावृत्त करु शकली नाही. धनीबद्दल त्याच्या मनात असलेली मातृभावना, त्यासाठी दिलेला शब्द आणि त्यावेळी समाजाचा विरोध असतानाही योग्य तेच करण्याचे साहस अद्‌भुत आणि विलोभनीय आहे. नंतरच्या कालखंडातही कोणत्याही जातीचा भक्त असो, कशीही घरची परिस्थिती असो, सोबतच्या इतरेजनांची नाराजी असो श्रीरामकृष्णांनी त्याला जवळ केले. ते म्हणत, भक्ताची जात एकच. बाल्यजीवनातील अशा अनेक घटना आहेत, त्यातून त्यांच्या मनातील असाधारण विश्‍वास, तीक्ष्ण बुद्धी, निःस्वार्थता ओतप्रोतपणे व्यक्त होत असल्याचे दिसून येते. त्यांचे मन जणू स्वभावतःच विश्‍वास, पवित्रता, स्वार्थरहितता या द्रव्यांनी निर्मित झाले होते.

**श्रीरामकृष्णांच्या जीवनातील साधना काळ**

अशा प्रकारचे मन घेऊन ठाकूर (यापुढे श्रीरामकृष्णांचा उल्लेख 'ठाकुर' या नावाने करुया). साधनेस प्रवृत्त झाले होते. असे मन जे धरील ते करीलच करील, जे ऐकले ते कधीही विसरणार नाही. इच्छित गोष्ट प्राप्त करुन घेण्याच्या मार्गात जे अडथळा म्हणून वाटेल ते सबळ हाताने तत्क्षणी भिरकावून देईल. असल्या प्रकारचे हृदय ईश्‍वरावर, आपल्या स्वतःवर आणि मानवमात्राच्या अंतःस्थ दैवी स्वभावावर दृढ विश्‍वास ठेवून जगातील सर्व कार्ये करण्यास प्रवृत्त होईल. हीन, अपवित्र विचार, संकुचितपणाची गोष्ट कधीच ग्राह्य म्हणून स्वीकारु शकणार नाही. केवळ पवित्रता - प्रेम - करुणा हेच त्याचे सर्वदा सर्व बाबतीत नियमन करतील. ''पैसा मिळविणारी विद्या मी शिकू इच्छित नाही. मी अशी विद्या शिकू इच्छितो की जिच्यामुळे ज्ञानाचा उदय होऊन माणूस कृतार्थ होतो.'' हा त्यांचा साधकभावाचा पहिला आविष्कार होता. इतक्या लहान वयात संसारी मानवाच्या सर्व प्रकारच्या धडपडीचे व जन्मभराच्या यातायातीचे कारण ते जाणू शकले. दोन दिवसांच्या मोठेपणाला व भोगसुखांच्या लाभाला कःपदार्थ लेखून मानवजीवनाचा उद्देश ठरवू शकले.

ईश्‍वरानुरागरुपी पवित्र अग्नीने त्यांच्या हृदयात निरंतर धडाडत राहून दीर्घ बारा वर्षे बेचैन केले होते. नाना प्रकारे साधनेस प्रवृत्त केले होते. त्यांच्या अंतःकरणातील परम व्याकुळता पाहून श्रीजगदंबेने त्यांना प्रथम दर्शन देऊन कृतार्थ केले. ईश्‍वराबद्दल मातृभाव हृदयात घेऊन ठाकुरांनी साधना केली. दक्षिणेश्‍वर मंदिरातील भवतारिणी माता जगदंबा आणि ते तिचे बालक, सर्वस्वी आईवर भार टाकून असलेले ठाकुर कधीही 'मी', 'माझे' म्हणू शकत नसत. 'आईची इच्छा' असे म्हणत. श्रीजगन्मातेने अद्‌भुत गुणसंपन्न अशा नाना व्यक्तींशी त्यांचा परिचय करुन, त्या व्यक्तींकडून निरनिराळ्या शास्त्रीय मार्गांनी त्यांना दर्शने व आध्यात्मिक अनुभव ताडून पाहाण्याची संधी दिली. चौसष्ट तंत्रग्रंथातील सर्व साधना एकामागून एक करुन घेतल्या. वैष्णवमतोक्त भावपंचकाच्या अनुरोधाने जितक्या प्रकारच्या साधनापद्धती भारतात प्रचलित आहेत त्या साऱ्यांचे यथाविधी अनुष्ठान त्यांच्याकडून करुन घेतले.

सनातन वैदिक मार्गाचे अनुसरण करुन, विधिपूर्वक संन्यास घेऊन श्रीजगदंबेच्या निर्गुण निराकार रुपाचे दर्शन त्यांनी प्राप्त करुन घेतले. इस्लाम मताच्या साधनेस प्रवृत्त करुन जगन्मातेने त्यांना अनुरुप फलाचा लाभ करुन दिला. अद्‌भुत देवशिशु परमयोगी ईशदूत येशूंचे पवित्र दर्शन लाभून ठाकुरांचे मन सगुण विराट ब्रह्माशी काही काळ एकीभूत होऊन राहिले. 'माझ्या आईची' इतर धर्मभावातून कशी साधना करता येते ते जाणून घेतले. भगवान श्रीबुद्धदेव, जैनधर्मप्रवर्तक सर्व तीर्थंकर, शीखधर्मप्रवर्तक नानकसाहेबांपासून तो गुरु गोविंदसिंगजी यांच्यापर्यंतचे दहा गुरु यांच्याबद्दल त्यांनी जाणून घेतले होते. त्या सर्वांविषयी ठाकुरांच्या मनात विशेष श्रद्धाभक्ती उद्‌भवली होती.

ठाकुरांच्या या साधनेचे वैशिष्ट्य असे आहे की, सर्व मतांच्या साधनांमधे सिद्धिलाभ करुन घेऊन ठाकुरांची दृढ धारणा झाली होती की सर्व धर्म सत्य असून जितकी मते तितके केवळमार्ग आहेत. या सत्याचा प्रचार करुन जगातील धर्माधर्मामधला विरोध दूर करण्यासाठी आणि धर्मग्लानी निवारण्यासाठीच युगावतार ठाकुरांचे वर्तमानकाळी आगमन झाले होते. कारण कोणत्याही ईश्‍वरावताराने यापूर्वी या सत्याची स्वतःच्या जीवनात पूर्ण उपलब्धी करुन घेऊन जगाला त्यासंबंधी उपदेश दिलेला नाही. एकमेकांची विचारपद्धती, धार्मिक विश्‍वास आणि आचरण समजावून घेतल्यावर हे अडथळे दूर होऊन कालांतराने सर्व धर्म बंधुभावाने मिलीत होतील हे ठाकुरांनी सांगितले आहे.

सर्वधर्मसमन्वय हा या युगावताराचा अद्वितीय अलौकिक संदेश आहे. याशिवाय द्वैत-विशिष्टाद्वैत आणि अद्वैत मत हे प्रत्येक मानवाच्या आध्यात्मिक उन्नतीबरोबर आपोआपच त्याला प्राप्त होत असते. म्हणून ठाकुर म्हणतात ते परस्परविरोधी नाहीत. तर मानवी मनाची आध्यात्मिक उन्नती व अवस्था यांवर अवलंबून आहेत. स्वतः अनुभव घेऊन त्यांच्यात असला अद्‌भुत मेळ असल्याचे त्यांनी सिद्ध करुन दाखविले आहे.

**अदृष्टपूर्व विवाह संबंध**

केवळ मनानेच विषयांचा त्याग न करता बाह्य आचरणानेही, कायावाचामनाने त्याग आवश्यक आहे. योग आणि भोग दोन्ही एकदमच करीन असे म्हणून मानव स्वतःला फसवीत असतो. उजेड आणि अंधार एकत्र नांदू शकत नाहीत. त्याप्रमाणे कामकांचनमय संसाराची आणि ईश्‍वराची सेवा एकत्र एकाच वेळी पार पाडता येत नाही. ठाकुरांनी

कामगंधहीन जीवनाचा जो आदर्श जगापुढे ठेवला आहे – जगाच्या आध्यात्मिक इतिहासात कोणत्याही महापुरुषाच्या संबंधात ऐकण्यात नाही. ठाकुर म्हणाले आहेत मी सोळाआणे करुन दाखविले आहे. तुम्ही एक आणा करा. ठाकुरांनी श्रीसारदादेवींशी विवाह केला. देहबोधरहित ठाकुरांची प्रायः उभी रात्र ह्या काळात समाधीत निघून जात असे. समाधीतून व्युत्थित होऊन बाह्यबोधभूमीवर मन उतरले तरीही त्यांचे मन इतक्या उच्च अवस्थेत वावरत असे की साधारण माणसासारखी देहबुद्धी त्यात क्षणभरासाठीही उदय पावत नसे. या अद्‌भुत देवाच्या आणि अलौकिक देवीच्या संयमाचा बांध कधीही भंग पावला नाही. श्रीसारदादेवी दररोज एक लाख जप करीत. पहाटे तीन वाजता उठून स्नानादी उरकल्यानंतर ध्यानाला बसत. त्यानंतर त्यांचे घरकाम अविरत सुरु असे. सारी रात्र ध्यानात व्यतीत होई. ठाकुरांची सेवा त्यांनी कोणत्याही स्वामीत्वभावनेने केली नाही, किंबहुना दासीभावाने केली. त्या ठाकुरांच्या पहिल्या शिष्या होत्या. ठाकुर म्हणाले आहेत, ''ती (माताजी सारदादेवी) जर इतकी चांगली नसती, तर माझ्या संयमाचा बांध भंगून देहबुद्धी उद्‌भवली असती की नाही हे कोण सांगू शकणार?'' ठाकुरांनी देहत्याग केल्यानंतर माताजी शोक करीत असताना म्हणाल्या आहेत, ''माझे आई कालीमाते, मला सोडून तू कोठे निघून गेलीस?'' यावर भाष्य करण्याची आवश्यकता नाही. एकदा ठाकुरांचे पाय चेपीत असताना माताजींनी त्यांना विचारले, ''मी तुम्हाला कोण वाटते?'' उत्तरी ठाकुर म्हणाले, जी आई (जगन्माता) मंदिरात आहे, जिने या शरीराला जन्म दिला आहे, तीच आता माझे पाय चेपीत आहे. प्रत्यक्ष आनंदमयी जगन्मातेचे एक रुप अशाच तुम्ही मला सर्वदा खरोखरच दिसत असता.''

ठाकुर आणि माताजी दोघेही नव्या युगाच्या धर्मसंस्थापनेसाठी एकमेकांचे पूरक होते. फलहारिणीदेवीच्या पूजेच्या दिवशी ठाकुरांनी माताजींची षोडशीभावाने प्रत्यक्ष देवीबोधाने पूजा केली. समाधिमग्न पूजक आणि समाधिमग्न देवी आत्मस्वरुपात एक होऊन गेले. ठाकुरांनी देवीच्या चरणी आत्मनिवेदन करुन सर्व साधनांचे फल त्याचबरोबर जपाची माळ सर्व काही अर्पण केले. जगत् जननीच्या रुपात सारदादेवी प्रतिष्ठित झाल्या. ठाकुर म्हणतात, ''स्त्रीजातीकडे जगदंबेची साक्षात् मूर्ती म्हणून बघणे आणि त्यांना यथाशक्ती आपल्या हृदयातील निःस्वार्थ प्रेम देणे हे न कराल, जगाच्या मातृस्थानातील समस्त स्त्रियांना केवळ आपल्या भोगाचे साधन, पराधीन दासी म्हणून समजून सदैव त्यांच्याकडे पशुभावाने पाहाल तर तुमचा नाश अगदी उंबरठ्याशी येऊन ठेपला आहे हे समजा.''

**ठाकुरांच्या उपदेशाचे वैशिष्ट्य**

मी का जगायचे? माझ्या जीवनाचा उद्देश काय? उद्दिष्ट काय? माझे जीवन योग्य मार्गाने योग्य दिशेने ठीक गंतव्य स्थानाकडे चालले आहे याचा मापदंड काय? तर ठाकुरांचे उपदेश त्याचे अनुसरण केल्याने, अभ्यास केल्याने माझे हे जीवन वृथा जाणार नाही, कृतार्थ होईल. ठाकुर सांगतात, ''मनुष्यजन्माचे उद्दिष्ट आहे ईश्वरलाभ करुन घेणे''. आपण कुठे आहोत – पायथ्याशी, शिखरापर्यंत पोचायचे आहे. ठाकुर अभयवाणी उच्चारुन मदतीसाठी हात पुढे करतात. आपल्यात न्यूनगंड निर्माण होऊ नये, निराश होऊ नये अशी आश्वासक वाणी ऐकवतात. ठाकुर म्हणतात, ''जिथे आहात तिथून पुढे चला. संसार हा किल्ला आहे. सुरक्षित किल्ल्यातून लढा, कसे जगायचे हे सांगताना ठाकुर जी उदाहरणे देतात ती चपखल, मार्मिक रोजच्या जीवनातील, अनुभवातील आहेत. प्रत्येक प्रश्नाला उत्तर आहे. अचूक–निःसंदिग्ध, परिपूर्ण. प्रश्नकर्त्यांचे सर्व संशय छिन्न करणारे. स्वामी विवेकानंदांनी (त्यावेळच्या युवक नरेंद्रनाथांनी) पहिल्या भेटीत प्रश्न विचारला – ''आपण देव पाहिला आहे का?'' उत्तर मिळाले, १) होय मी देव पाहिला आहे.२) तुला पाहातो त्यापेक्षा कितीतरी स्पष्ट ३) तुलाही तो दाखवू शकेन ४) मी सांगतो त्याप्रमाणे करशील तर. इतके अचूक उत्तर इतके परिपूर्ण, इतके प्रश्नाच्या, प्रश्नकर्त्याच्या मर्माला स्पर्श करणारे.

साधकाच्या मनात भगवद्‌भक्ती आणि बाहेरची सांसारिक स्थिती यात ींस ेष ुरी सुरु असते. रस्सीखेच सुरु असते. संसारात राहून ईश्वरभक्ती, ईश्वरप्राप्ती हे कसे जमणार? ठाकुर उपाय सांगतात – सर्वदा ईश्वरस्मरण, निरंतर ईश्वराचे गुणसंकीर्तन, ईश्वराचे ध्यान, सदसद्‌विचार, नित्यानित्य विचार करावा. संसार मायामय, ईश्वरच एकमेव सत्य हा बोध ठेवावा. संसारातील कर्म करताना एका हाताने भगवंताला धरा. दुसऱ्या हाताने कर्म करा. कर्तव्यकर्म संपल्यावर दोन्ही हातांनी त्याला पकडा. खरा संसार मनात आहे. षड्‌रिपू+मीची आसक्ती+माझा अहंकार+त्यावर वेगवेगळ्या उपाधींची कठीण पुटे आहेत. या सर्वांमुळे मी माझे आत्मस्वरुप चैतन्यस्वरुप विसरलो. ठाकुर दृष्टान्त देतात – ''एकदा एक वाघाचे पिल्लू आईपासून दुरावले. मेंढपाळाने मेंढ्यांच्या कळपात त्याला वाढविले. मेंढ्याबरोबर तेही बें बें करी, गवत खाई, एका वाघाने एकदा त्याला पाहिले. आश्चर्य वाटून तो त्या पिलाजवळ आला, तर वाघाला घाबरुन ते मेंढ्याबरोबर पळून जाऊ लागले. त्याची मानगूट धरुन वाघाने त्याला पाण्यात त्याचे प्रतिबिंब दाखवले. एक मांसाचा तुकडा त्याच्या तोंडात कोंबला आणि सांगितले, मूर्खा, तू मेंढी नाहीस. वाघ आहेस त्याप्रमाणे सद्‌गुरु आपल्याला आपले मूळ स्वरुप दाखवतात''. ठाकुर म्हणतात, ''मन अशुद्ध आहे. ईश्वररुपी चुंबकाचे आकर्षण त्यांच्यापर्यंत पोचत नाही. सुईवरची माती दूर झाली की चुंबकाकडे ती आकर्षिली जाते. मनाला शुद्ध करण्यासाठी साधनेची आवश्यकता आहे. मग ईश्वररुपी चुंबकाकडे ते खेचले जाईल.'' ''जगात राहायचे तर दुष्ट लोकांशी संबंध येणारच.'' त्यासाठी एक ब्रह्मचारी आणि नागाची गोष्ट सांगतात – एका कुरणात एक विषारी साप राहात असे, सर्वजण सापाच्या भयाने अत्यंत सावधगिरीने राहात. एक ब्रह्मचारी त्या कुरणातून जात असताना साप त्याच्या अंगावर आला. त्याने मंत्र उच्चारुन सापाला शांत केले आणि म्हणाला, ''अरे का बरे तू लोकांचा प्राण घेत फिरतोस. मी तुला एक मंत्र देतो. त्यामुळे ईश्वराबद्दल

तुझ्या मनात भक्ती निर्माण होऊन हिंसाप्रवृत्ती नाहीशी होईल. सापाने त्याप्रमाणे वागण्यास सुरुवात केली, जेव्हा गुराख्यांच्या ध्यानात आले की साप काही चावायला धावून येत नाही, तेव्हा त्यांनी यथेच्छ धोपटून सापाला दिले भिरकावून. बिचारा गतप्राण झाल्यासारखा निश्चेष्ट होऊन पडला. काही काळानंतर ब्रह्मचारी पुन्हा त्याच रस्त्याने परत आला. त्याच्या गलितगात्र अवस्थेचे कारण विचारल्यावर तो आता सत्वगुणी बनलेला साप उत्तरला गुराख्यांनी एक दिवस मारले होते. त्यावर ब्रह्मचारी म्हणाला, ''इतका कसा रे मुर्ख तू ! मी तुला चावायला मना केले होते, फुत्कारायला नाही याप्रमाणे दृष्ट लोकांवर फुत्कारायला हरकत नाही. त्यांना भय दाखविलेच पाहिजे. फक्त त्यांचे अनिष्ट न केले म्हणजे झाले''.

ठाकुर म्हणतात काम, क्रोध, लोभ जात नाहीत. ठीक आहे, त्यांचा मोड फिरवून द्या ईश्वराकडे. रागवा देवावर, लोभ त्याच्या प्रेमाचा धरा, कामना त्याच्या भक्तीची करा.'' जितके ईश्वराकडे जाल तितका संसार मागे पडत जाईल. आसक्ती तुटत जाईल. जितके पूर्वेकडे चालत राहू पश्चिम आपोआप मागे पडत जाते. ईश्वरावर अनुराग वाढला की संसाराबद्दल विराग आपोआप निर्माण होतो. ठाकुर अभ्यासयोग सांगतात. खेड्यात बायका धान्य कांडतात. त्याचवेळी एकीकडे मुलाला मांडीवर घेऊन दूध पाजतात, इकडे आलेल्या गिऱ्हाईकाशी आधीच्या पैशाचा हिशोब करतात, उधारी चुकती करण्याबद्दल बोलतात, धान्य वरखाली करतात. पण त्यांचे बारा आणे मन केंद्रित असते मुसळावर, आपल्या हातावर येत नाही ना. त्याप्रमाणे बारा आणे मन ईश्वराकडे लावून चार आणे मनाने संसाराचे कामकाज उरका. सद्उपयोगाने पैसा मिळवावा, योग्य मार्गाने खर्च करावा. भगवंताची सेवा, भक्तांची सेवा, गरीब-नडलेल्यांना दान करावे. ठाकुरांचे एकेक वाक्य हिऱ्याप्रमाणे आहे. पारखून निरखून घ्यावे, तो तो आणखी आणखी झळाळी वाढते. अधिक अधिक गहन अर्थ लक्षात येतो.

**अनन्यशरणागती**

ठाकुर म्हणतात भगवंताला आममुख्त्यारी द्या. (Power of attorney) सर्व रोगांवर एकच रामबाण औषध आहे. मामेकम् शरणम् व्रज । त्यामुळे अंतःकरणात भगवंताच्या करुणेची जाणीव सतत उचंबळत राहील. देव माझ्या भल्याकरिता सारे करीत आहे. देव माझा मी देवाचा, मग भगवंताविषयी प्रेम व भक्ती वाटू लागेल. ईश्वर निर्भरता वाढेल. मन भगवंताच्या चरणी ठेवा. साधनेला चिकटून राहायला हवे पण मिळमिळीत, पुचाट भक्ती करु नये. जळजळीत विश्वास असायला हवा. मला भगवंताचे दर्शन लाभेलच लाभेल. ह्याच जन्मात करुन घेईन असा मनात जोर असायला हवा. गळाने मासा धरताना लागते तशी चिकाटी हवी. ईश्वरलाभ हेच जीवनाचे अंतिम उद्दिष्ट आहे हे जाणून सर्व कर्मेकेली पाहिजेत. सन्मार्गाने चालून संसारयात्रा करा. ईश्वराला पूर्णपणे मनप्राण अर्पण करुन त्याची उपासना करा.

**शिवज्ञानाने जीवसेवा**

वैष्णव धर्मात जीवांवर दया करावी असा उपदेश आहे. ठाकुर म्हणाले, ''छीः ! कीटानुकीट तू ! तू जीवांवर दया करणार? दया करणारा तू कोण? जीवांवर दया नाही, शिवज्ञानाने जीवसेवा.'' ठाकुरांच्या या वचनाने जगाला अद्‌भुत प्रकाश दिला आहे. स्वामी विवेकानंदांनी त्याचा जगात प्रचार केला. रामकृष्ण मिशनचे हे ध्येय आहे. स्वामीजी म्हणतात, ''ज्या वेदान्तज्ञानाला लोक शुष्क, कठोर, प्रेमरहित समजतात, त्याचा भक्तीशी मेळ घालून ठाकुरांनी सहज - सरस - मधुर प्रकाश दाखविला आहे. वनातील वेद ठाकुरांनी घरात आणता येतो हे सांगितले. जगातील सर्व कार्यांमध्ये त्याचा उपयोग करता येऊ शकतो. मनुष्य जी कामे करतो ती तो करो, त्यात हानी नाही. केवळ सर्वप्रथम त्याने हृदयापासून ईश्वरच जीवाच्या व जगताच्या रुपाने त्याच्यासमोर प्रकट झाला आहे या गोष्टीवर विश्वास ठेवला पाहिजे व ती जाणून घेतली पाहिजे. जीवनातील प्रतिक्षणी तो ज्यांच्या संपर्कात येतो, ज्यांच्यावर ज्यांच्यावर प्रेम करतो, त्यांच्यावर त्याची श्रद्धा आहे, ज्यांना तो मान देतो, ज्यांच्यावर तो दया करतो ते सर्व ईश्वराचे अंशच आहेत, स्वतः ईश्वरच आहेत.

जगातील सर्व व्यक्तींना तो जर याप्रमाणे शिवरुप मानू लागला तर स्वतःला मोठा समजून त्यांच्याविषयी क्रोध-द्वेष-दंभ किंवा दया बाळगण्याचा त्याला अवसर कुठे आहे? अशा रीतीने शिवज्ञानाने जीवसेवा करता करता चित्त शुद्ध होऊन थोड्या काळात मी चिदानंदमय ईश्वराचा अंश आहे, शुद्धबुद्धमुक्त स्वभाव आहे अशी त्याची धारणा होऊ शकेल. ठाकुरांच्या या उपदेशामुळे भक्तीमार्गातही विशेष प्रकाश प्राप्त होतो. जोपर्यंत साधक सर्वभूतांमध्ये ईश्वराला बघत नाही, तोपर्यंत यथार्थ भक्ती वा पराभक्ती लाभणे ही त्याच्यापक्षी अशक्य गोष्ट आहे. शिवज्ञानाने किंवा नारायणज्ञानाने जीवांची सेवा केल्याने भक्तसाधक सर्वांमध्ये ईश्वराला पाहिल. त्याला यथार्थ भक्ती प्राप्त होईल आणि अल्पकाळातच तो कृतार्थ होईल. कर्मयोगाच्या व राजयोगाच्या मार्गाने जे साधक पुढे जात आहेत त्यांनाही या उपदेशामुळे विशेष प्रकाश लाभेल. शिवज्ञानाने जीवसेवारुपी कर्म करणे हेच त्यांचे कर्तव्य आहे आणि ते केल्यानेच त्यांना लवकर ध्येयाची प्राप्ती होईल.

**संसारात दासीभावाने राहा**

ठाकुर म्हणतात, ''संसारात दासीभावाने राहा'' दासाला मालकाची आज्ञा प्रमाण असते. इतरांकडून Return Appreciate (मोबदला, परतफेड) कौतुकाची अपेक्षा नसते. मालकाला प्रसन्न करणे हे त्याचे ध्येय. मालकाच्या घरात त्याचा कशावरही हक्क नसतो. मालकाची सेवा, आज्ञापालन हेच त्याचे कर्तव्य. मुलेमाणसे त्याने दिली, हे सर्व त्या मालकाचे म्हणजे देवाचे. देव जगाचा नियंता. देव प्रतिपालक, मी त्याचा अंश. अनेक जन्म-नातेसंबंध बदलले, पण देव माझा - मी देवाचा हे नाते कायम आहे, सतत आहे. मालकावर सारा भार टाकून सेवक बिनघोर असतो. कशाबद्दलही त्याला चिंता नसते, मालक पाहून घेईल. तो माझे रक्षण करील. घरातील सर्वजण मालकाची मुले. ठाकुर म्हणतात, ''त्यांच्याशी अत्यंत प्रेमाने वागा, पण मनात पक्की

खूणगाठ बांधून ठेवा हे माझे कुणी नव्हते, मी त्यांचा कुणी नव्हेत.'' पण हे वरकरणी प्रेमाचे ढोंग नव्हे तर ही सर्व ईश्‍वराची माणसे, ईश्वर माझा, म्हणून हे सर्व माझे त्यांच्याबद्दलचे कर्तव्य व्यवस्थित करणे ही माझी ड्युटी, जबाबदारी. एकच भगवंत नाना नामरुपात आपल्यापुढे उभा आहे. ठाकुर म्हणतात, ''चित्त भगवंताकडे लावा. देवाशी नाते जोडा.'' एकनिष्ठ, दृढविश्वास आणि अनन्यभक्ती यांच्या साहाय्याने वासनांचा क्षय होतो. या भावाने कर्म करता करता ईश्वरनिर्भरता वाढेल, मन शुद्ध होईल, हा कर्मयोग साधेल. शुद्ध मनापासून ईश्वर दूर नाही. आपली धारणा असते व्यावहारिक जीवन आणि आध्यात्मिक जीवन या दोन भिन्न गोष्टी आहेत. एकदा दोन तास जप केला की उरलेला बावीस तास व्यावहारिक जीवन जगण्यास मुक्त. ठाकुर सांगतात तसे नाही आध्यात्मिक पायाभूत आधार नसेल तर 'संसारात शांती-सुख-समाधान शोधू जाल तर ते मिळणार नाही.

समुद्राला तळ आहे, पैलतीरही आहे. पृथ्वीला सीमा आहे, भौगोलिक लांबीरुंदीही आहे. आकाशाला अंत आहे, परिघाची सीमा आहे. ईश्वर मात्र अथांग, अपार, निःसीम, अमित, अनंत, अखंड, अरुप, अद्वितीय आहे. माणसाची सीमित-मनबुद्धी अनंत ईश्वराला जाणू शकत नाही. म्हणून तो दयाघन, भक्तकरुणाकर भक्ताच्या प्रेमासाठी, त्याला उचलून घेण्यासाठी मानवदेह धारण करुन आपल्याजवळ येतो, हात पुढे करतो. आपल्यासाठी या युगात श्रीरामकृष्णरुपात परब्रह्म आले आहे. त्यांनी इष्टप्राप्तीचा मार्ग आपल्यासाठी प्रशस्त करुन दिला आहे, साधा-सोपा-सरळ राजरस्ता करुन दिला आहे. गल्लीबोळ, अरुंद अंधारी पायवाटा आता नाहीतच. आता फक्त आपले चालणे बाकी आहे. विमानाने-रेल्वेने-गाडीने-बैलगाडीने की रमतगमत पायी हे आपण ठरवायचे आहे पण गंतव्य स्थानी पोचणार हे नक्कीच. कारण भगवंतांनी सांगितले आहे

**प्रतिजानीहि न मे भक्तः प्रणश्यति ।**

**अहम् त्वाम् सर्वपापेभ्यो मोक्ष्ययिष्यामि मा शुयः ।**


आधारभूत ग्रंथ

१) श्रीरामकृष्णलीला प्रसंग - लेखक स्वामी सारदानंदजी

२) श्रीरामकृष्णेर सान्निध्ये (बंगाली) - स्वामी चेतनानंदजी



**सौ. संध्या श्रीकृष्ण आगटे**

प्रभुकृपा, १०६ अ, रामाचा गोट, सातारा - ४१५००२

फोन : २१६२ २८०४७४


## मोहनदास करमचंद गांधी यांचे श्रीरामकृष्ण परमहंस यांच्याबद्दलचे वक्तव्य

श्रीरामकृष्ण परमहंसांचे चरित्र म्हणजे व्यवहार्य धर्माचे विवरणच होय. त्यांचे चरित्र वाचून आपणास परमेश्वराचा साक्षात्कार करुन घेता येईल. त्यांच्या चरित्राचे पठण करीत असता केवळ एक परमात्माच सत्य असून इतर सर्व आभासमात्र आहे याची खात्री पटल्यावाचून राहणार नाही. श्रीरामकृष्ण हे देवत्वाची सजीव मूर्तीच होत. त्यांच्या उक्ती म्हणजे पढिक पंडितांची कोरडी वचने नव्हेत; तर ती त्यांच्या जीवनग्रंथातील पृष्ठेच होत. त्यात त्यांचे स्वतःचे अनुभवच प्रकट झालेले आहेत; व म्हणूनच त्यांचा वाचकांच्या मनावर अचूक परिणाम झाल्याखेरीज राहत नाही. ह्या संदेहवादी युगात ज्यांना एरवी आत्मज्योतीच्या प्रकाशाला मुकल्यामुळे अंधारात चाचपडत राहावे लागले असते, अशा हजारो स्त्री-पुरुषांना श्रीरामकृष्ण म्हणजे तेजोमय व प्रत्यक्ष धर्माचे जिवंत उदाहरणच असून ते त्यांना आधारस्थान वाटेल. श्रीरामकृष्णांचे चरित्र म्हणजे अहिंसेचे नमुनेदार उदाहरणच होय. त्यांच्या अपरंपार प्रेमाला भौगोलिक किंवा इतर कसल्याही मर्यादा ठाऊक नव्हत्या. प्रस्तुत चरित्रग्रंथ जे जे वाचतील त्या सर्वांना श्रीरामकृष्णांचे दैवी प्रेम अंतःस्फूर्ती देवो अशी माझी प्रभूजवळ प्रार्थना आहे.

मो. क. गांधी

साबरमती, मार्गशीर्ष कृ. १

विक्रम संवत् १९८१



# भगिनी निवेदितेच्या दृष्टिकोनातून श्रीरामकृष्ण

**सौ. जयश्री नातू**, एम.ए.बी.एड.
प्रथमपासून घराच्या आजुबाजूला असलेल्या झोपडपट्टीतील मुलांच्या शिकवण्या घेत असत. १९८९ ते २००५ पर्यंत 'श्री सारदा मठ' संस्थेतर्फे चालविण्यात येणाऱ्या 'स्वामी विवेकानंद विद्या मंदिर'मध्ये सेवाभावी शिक्षिका. शाळा दुर्बल घटकांसाठीच आहे. रामकृष्ण मठाच्या 'बालक सेवा संघातील' १०वीच्या मुलांना व 'प्रज्ञावर्धीनी' उपक्रमांतर्गत इंग्रजी विषय व स्पोकन इंग्लीशचे वर्ग घेत. शालेय मुलांसाठी नाटुकले, प्रहसने, गीत लिखाण. 'जीवन विकास' नागपूर मासिकात संत साहित्यावर लेखमाला प्रसिद्ध होत आहेत.

मुलांच्या शाळेत एका भिंतीला श्रीरामकृष्णांचे एक चित्र लावलेले होते. एके दिवशी कोणीतरी पृथ्वीचा नकाशा आणून त्या चित्राच्या वरती लावून दिला. निवेदिता त्या खोलीत येताच तिने ते पाहिले. तिने तो पृथ्वीचा नकाशा तिथून काढला आणि रामकृष्णांच्या चित्राखाली तो लावला. मुली हे सर्व पाहात होत्या. त्यांच्याकडे पाहून हसत हसत निवेदिता म्हणाली, ''अगं पोरींनो, श्रीरामकृष्ण हे जगत्गुरु ! तेव्हा जगाचा हा नकाशा त्यांच्या पायाशीच असणं योग्य नाही का?''

कोलकत्त्याच्या रामकृष्णभक्त श्रीमती सरलाबाला सरकार यांच्या 'निवेदिताके जामोन देखियाछी' (निवेदितांच्या सहवासात) या बंगाली पुस्तकात वरील आठवण लिहिलेली आहे. निवेदिता रामकृष्णांकडे कोणत्या दृष्टीने पाहत होती, हे तिच्या वरील उद्‌गारावरुन स्पष्ट होते.

स्वामी विवेकानंदांच्या चरणी आपले जीवन समर्पित केलेली त्यांची निष्ठावंत आणि उदंड कर्मशील शिष्या, भगिनी, निवेदिता ही मूळची मार्गारेट एलिझाबेथ नोबेल. हिचा जन्म २८ ऑक्टोबर १८६७ मध्ये डुंगॅनॉन शहरात उत्तर आयर्लंड येथे झाला. सॅम्युअल आणि मेरी नोबेल हे तिचे माता-पिता. मार्गारेट हे त्यांचे पहिले अपत्य. त्या काळातील भाविक स्त्रियांप्रमाणे मेरीनेही 'हे बाळ सुखरुप झाल्यास त्याला देव सेवेला अर्पण करेन', असे देवापुढे वचन दिले होते. त्याप्रमाणे ईश्वरानेच मार्गारेटला सेवेमध्ये खेचून आणले. दहाव्या वर्षीच पित्याचे छत्र हरपल्याने या कुटुंबाला अनंत अडचणी सोसाव्या लागल्या. मार्गारेटलाही परिस्थितीचे तीव्र चटके सहन करावे लागले. परंतु तिच्या आईचे कष्ट आणि तिची जिद्द यांच्या बळावर मार्गारेटने महाविद्यालयीन शिक्षण पूर्ण केले. पुढे तिच्या अत्यंत आवडीचे असलेले शिक्षण-क्षेत्र हेच तिने आपल्या कार्यासाठी निवडले. घरातील धार्मिक वातावरण, ग्रंथ वाचनाची प्रचंड आवड, अत्यंत अभ्यासूवृत्ती आणि यासाऱ्याला शोभेल अशी धारदार बुद्धीमत्ता तरुण निवेदिताकडे होती. तिच्या तडफदार आणि समाजप्रिय व्यक्तिमत्त्वामुळे इंग्लंडच्या उच्चस्तरीय बुद्धिमंतांच्या वर्तुळात ती लवकरच प्रवेश करु शकली. आयरिश असलेली ही विदुषी पुढे इंग्लंडची रहिवाशी झाली. ती इंग्लंडमध्ये असताना १८९५ साली तिच्या जीवनाने एक क्रांतीकारक वळण घेतले. नोव्हेंबर महिन्यातल्या एका रविवारी तिला लेडी इसाबेल मार्गेसन या प्रतिष्ठीत महिलेने आमंत्रित केले होते. इंग्लंडमधील काही प्रतिष्ठित विद्वतजनही त्या ठिकाणी जमलेले होते. एका हिंदू योग्याला भेटण्यासाठी या साऱ्या इंग्रज स्त्री-पुरुषांना लेडी इसाबेलने निमंत्रीत केले होते. सर्वांनाच त्याला पाहाण्याची व ऐकण्याची उत्सुकता होती. कारण आपल्या अमोघ वक्तृत्वाने त्याने पाश्चात्य जगात चांगलीच खळबळ उडवून दिली होती. हा हिंदू योगी अर्थातच स्वामी विवेकानंद होते.

मार्गारेटने त्या ठिकाणी प्रथमच स्वामीजींचे दर्शन घेतले. भगव्या वेशातील त्या तेजस्वी योग्याच्या डोळ्यातील सौजन्यपूर्ण परंतु उत्तुंग भाव मार्गारेटने टिपले. हिंदु धर्म, त्याचे तत्वज्ञान आणि इतरही धर्म यावर स्वामीजींनी थोडक्यात विवेचन केले. त्या विवेचनातील सत्यता या वक्त्याने अनुभवलेली आहे, हे सतत जाणवावे इतका त्याच्या बोलण्यात ठाम आत्मविश्वास होता. 'धर्म ही केवळ श्रद्धा नसून ती एक अनुभवण्याची गोष्ट आहे.' हे स्वामीजींचे विधान त्या इंग्रज लोकांचा मेंदू ढवळून काढणारे होते. त्यांच्या या धर्मविषयक विवेचनामुळे मार्गारेटच्या मनात विलक्षण उलथापालथ झाली. हा योगी चुंबकीय व्यक्तीमत्त्वाचा असून एक अभूतपूर्व संदेश घेऊन साऱ्या जगापुढे उभा आहे हे सत्य मार्गारेटने मनोमनी अधोरेखित केले.

तिची पावले स्वामीजींच्या सभेकडे वारंवार वळू लागली. या माणसाला पूर्णपणे समजून घेतले पाहिजे या उद्देशाने ती त्यांचे एकामागून एक विचार ऐकू लागली. ती मूळची आयरिश होती आणि आयरलंड हा देश ब्रिटिशांच्या अधिपत्याखाली असल्याने गुलामीचा विषारी काटा तिच्याही काळजात सलत होता. त्यामुळेच स्वामीजींच्या हृदयातील पारतंत्र्याची दाहक वेदना तिच्या काळजाला थेट जाऊन भिडली. परंतु ती जशी राष्ट्रभक्त होती, तशीच ज्ञानाची उपासक होती, प्रखर बुद्धीवादी होती आणि त्याचबरोबर ईश्वरावर तिची श्रद्धाही होती. असे सर्व गुण असल्याने तिला तिच्या प्रत्येक प्रश्नाचे बुद्धीला पटेल असेच उत्तर लागत असे. त्याशिवाय ती कोणतीही गोष्ट मानायला तयार होत नसे.

स्वामीजींच्या प्रथम दर्शनानंतर त्यांची प्रचंड विद्वत्ता, अमोघ वक्तृत्व आणि पाश्चत्य जगातही उठून दिसतील असे सभ्य व सुसंस्कृत शिष्टाचार या सर्व गुणांमुळे निवेदिता त्यांच्याकडे वेगाने खेचली गेली. अत्यंत आदराने ती त्यांच्याकडे पाहू लागली. तरीही तिचा बुद्धीवाद त्यांना पूर्णपणे स्वीकारत नव्हता. त्यांच्या वेदांत धर्म मतांना तिने प्रथम कडाडून विरोध केला. स्वामीजींनी तिच्या त्या विरोधासाठी काहीही नाराजी दाखवली नाही. उलट ते तिला म्हणाले, ''तुला पटत नसेल म्हणून तू नाराज होऊ नकोस, मलाही हे माझ्या गुरुदेवांशी असाच लढा द्यावा लागलेला आहे. सलग सहा वर्षांच्या संघर्षानंतर माझ्या सर्व समस्या मिटल्या. परंतु या प्रदीर्घ संघर्षामुळेच माझ्या मार्गातील अगदी इंचन् इंचाची मला सखोल कल्पना आली.'

स्वामीजींनी दाखविलेला हा उमदेपणा निवेदितेला स्पर्श करुन गेला. सत्याच्या शोधकाने अत्यंत खुलेपणा दाखवून नविन संकल्पनांचे मोकळेपणाने स्वागत केले पाहिजे. या मताशी मात्र निवेदिता पक्की होती. त्यांच्या वेदान्त धर्माचे सिद्धांत यांना तिने प्रथम कडाडून विरोध केला तरी ते सर्व तिने शांतपणे समजावून घेण्याचाही आटोकाट प्रयत्न केला. तिने स्वामी विवेकानंदांना अशा प्रदीर्घ वादविवादानंतरच गुरु म्हणून स्वीकारले. हा पुरुष अत्यंत तेजस्वी असून विलक्षण जागृत अस्मितेचा आहे हे ही तिच्या चाणाक्ष बुद्धीने ताडले. असा हा आपला गुरु एवढा परिपूर्ण घडला तरी कसा? हा एवढा विजिगीषु कसा झाला? हा एवढा आदर्श धर्मवक्ता कसा घडला? अशा प्रश्नांचे मोहोळ तिला बैचेन करु लागले. हळूहळू त्यांच्याच मुखातून आलेल्या महत्वपूर्ण मुद्यांवरुन सारे धागेदोरे जुळू लागले.

त्यांच्याच म्हणण्याप्रमाणे त्यांनी एका अशिक्षित, सामान्य पुजाऱ्याच्या पायाशी बसून समस्त ज्ञान ग्रहण केले. या लौकिकदृष्ट्या अशिक्षित माणसाने या एकाच जन्मी जगातल्या समस्त धर्ममतांची प्रत्यक्ष अनुभूती घेतली होती. त्यातूनच एक नवीन विश्वकल्याणकारी भावधारा त्यांच्यापासून निर्माण झाली. त्याच भावधारेचा प्रचार करीत असताना स्वामी विवेकानंद विश्वविजयी ठरले, हे सत्य होते. या पार्श्वभूमीची नाही तरी स्वामीजींच्या विश्वविजयाची निवेदिता प्रत्यक्ष साक्षी होती. साहजिकच ती पाहत असलेल्या त्या ज्ञानसूर्याच्या गुरुविषयी उदंड श्रद्धा, भक्ती, आदर वाटणे अगदी स्वाभाविक आहे. सुंदर मूर्तीच्या मागे त्या मूर्तीकाराचे अपार कौशल्य आणि बुद्धिवैभव उभे असते हे सत्य समजण्याइतकी निवेदिता सुजाण होती. म्हणूनच न पाहिलेल्या रामकृष्णांचे असिम सामर्थ्य ती ओळखू शकली. स्वामीजींचे उदार धोरण, समत्वभाव, विश्वकल्याणाची तळमळ आणि मानवतावादी विशाल धर्माचे तत्वज्ञान या सर्व गोष्टी म्हणजे श्रीरामकृष्णांकडून त्यांना मिळालेल्या अनमोल ज्ञानाच्या देणग्या आहेत. आणि या ज्ञानाचा प्रसार साऱ्या विश्वात होणे अत्यंत गरजेचे आहे, ती काळाची नितांत आवश्यकता आहे. हे कार्य करण्यासाठी स्वामीजींसारखी सुपात्र अशी दुसरी व्यक्तीच नाही. म्हणूनच श्रीरामकृष्णांनी या शिष्याची या कार्यासाठी नियुक्ती केली होती. ही एक अजोड गुरु-शिष्याची जोडी होती. मार्गारेटच्या चिंतनशील वृत्तीने हे सर्व धागे जुळवताच ती विवेकानंद चरणी समर्पित झाली. सिंहिणीसारख्या पराक्रमी असलेल्या या लाडक्या कन्येचे स्वामीजींनी नामकरण केले 'निवेदिता'!

स्वामजींची शिष्या असणाऱ्या निवेदितेने 'श्रीरामकृष्णांची निवेदिता' हे नाव पसंत केले. यावरुनच तिची रामकृष्णांवरील अपार श्रद्धा दिसून येते. ती त्यांना नुसते जगद्गुरुच नव्हे, तर ईश्वरी अवतार, अगदी प्रत्यक्ष शिवच मानत असे. श्रीश्रीसारदामातांशी बोलताना ती एकदा म्हणाली, ''श्रीरामकृष्ण हे आमचे शिव आणि तुम्ही आमच्या काली!''

१९९९ सालच्या १८फेब्रुवारीला 'द स्टेटस्‌मन' या वृत्तपत्रात प्रसिद्ध जर्मन तत्वज्ञ मॅक्समुल्लर यांनी लिहिलेल्या 'ठराझीळीहपर - क्ळी ड्ळषश रपव डूळपसी' या पुस्तकाची समीक्षा भगिनी निवेदिताने लिहिली होती. श्रीरामकृष्णांविषयीचे हे तिचे छापील स्वरुपात असलेले प्रथम उद्गार होत, असेही म्हटले जाते. त्यात ती म्हणते, ''कोलकत्त्याजवळ असलेल्या एका मंदिरातील प्रसिद्धीपराङ्मुख असलेला हा देवीचा पुजारी ! तरुण वयात सार्वजनीत धर्माचे रहस्य उद्घोषित करतो काय आणि तत्कालीन विचारवंत, पंडित, तत्त्वज्ञानी त्याला उचलून धरतात काय?' सारेच अद्भूत वाटणारे गूढ गहन कार्य या ठिकाणी निवेदिताने स्पष्ट केले आहे.

निवेदिताने रामकृष्णांना पाहिले नाही, मात्र, श्रीसारदादेवींचा सहवास, प्रेम, कृपा यांचा तिला उदंड लाभ झाला. त्यांच्या श्रीमुखातूनही तिने श्रीरामकृष्णांच्या अनेक गोष्टी ऐकल्या. पहिल्या भेटीतच श्रीसारदादेवींनी तिचे अंतरंग जिंकून घेतले. १८९८ सालचा तो समाज जात-पात-धर्म या बंधनांनी पुरता जखडलेला होता. परधर्मीयांशेजारी बसणे हे देखील निषिद्ध समजले जाई. मग त्यांच्यासह आहार घेणे म्हणजे धर्मविरोधी कृत्यच ठरत असे. २२ मे १८९८ ला निवेदिताने इंग्लंडच्या नेल हॅमंडला या भेटीचा वृत्तांत कळवला आहे. त्यात ती म्हणते, ''सर्व आचारविचारांचे पद्धतशीरपणे त्या पालन करतात. तरीही ते सर्व बाजूला सारुन आम्हा प्रथमच भेटलेल्या विदेशी महिलांचे त्यांनी फार मनःपूर्वक स्वागत केले. एवढेच नव्हे तर आमच्यासह थोडा प्रसादही ग्रहण केला. आम्हाला जी फळे त्यांनी दिली तीच त्यांनीही खाल्ली. ते पाहून सर्वजण अवाक् झाले. याप्रमाणे त्यांनी जातीपातीच्या पलिकडे जाऊन आमच्या भावी कार्याचा रस्ता अगदी मोकळा करुन दिला. एरव्ही अन्य कोणत्याही उपायाने हे शक्य झाले नसते.''

श्रीसारादादेवींचे हे आचरण पाहून त्या व त्यांचे गुरु श्रीरामकृष्ण हे अगदीच वेगळ्या मुशीतून घडलेले आहेत, हे त्या सूज्ञ विदेशी स्त्रियांच्या ध्यानी यायला वेळ लागला नाही. निवेदिता तर या पहिल्या भेटीतच कायमची माताजींची झाली.

या विदेशी शिष्य गणांना व स्नेह्यांना स्वामीजींनी विदेशामध्ये हिंदू धर्मातील उदात्त व उदार विचारधन ऐकवले होते. वेदान्त, जात-पात धर्म मानत नाही, तर तो प्रत्येकातच ईश्वर पाहतो, हे गर्जून सांगितले होते. शिवाय 'माझ्या गुरुदेवांकडून हे ज्ञान प्राप्त केले व तेच मी आता सर्वांपुढे मांडत आहे.' हे त्यांनी वारंवार स्पष्ट केले होते. साहजिकच भारतात आल्यावर त्या विदेशी शिष्यांनी तशाच अनुभवाची अपेक्षा केली असणार. श्रीसारदादेवींनी त्यांच्या प्रत्यक्ष वागण्यातून त्यांना तो अनुभव दिला. शिवाय स्वामीजींप्रमाणेच 'माझ्याजवळ जे काही आहे ते सर्व त्यांनीच (रामकृष्णांनी) कृपा करुन दिलेले आहे, हेही माताजींनी त्या स्त्रीयांना सांगितले. म्हणूनच स्वामीजींनी त्यांच्या मनात उभी केलेली रामकृष्णांची उदात्त मूर्ती श्रीसारदादेवींच्या वागण्यामुळे निवेदिताच्या अंतःकरणात सुप्रतिष्ठित झाली.

निवेदिता श्रीसारदादेवीविषयी म्हणते, ''भारतीय नारीच्या आदर्शाचा रामकृष्णांचा शेवटचा शब्द म्हणजे श्रीसारदादेवी होत, असे मला नेहमी वाटते.''

''रामकृष्णांच्या शिष्यगणांमध्ये त्या सर्वश्रेष्ठ आहेत. रामकृष्णांना त्या अतिप्रिय असूनही पतीविषयी बोलताना त्या स्वतःला बाजूला ठेवतात.''

''श्रीरामकृष्णांच्या विश्वप्रेमाला धारण करु शकणारे योग्य पात्र म्हणजेच श्रीसारदादेवी !''

वरील सर्व उद्‌गारांवरुन निवेदिताने माताजींना तर नेमके ओळखले होतेच; परंतु रामकृष्णांविषयीही तिच्या धारणा स्पष्ट आणि अचूक होत्या, असे दिसते.

निवेदिताने तिच्या जीवनात रामकृष्णांना जे अत्युच्च स्थान दिले होते, त्याचे कारण केवळ ते तिच्या गुरुचे गुरु होते हे नसून रामकृष्णांच्या दिव्य चरित्राचा परिसस्पर्श तिलाही झाला होता. ती त्या महामानवाची उंची समजू शकत होती. म्हणूनच ती पुढे एके ठिकाणी म्हणते, ''माणसाचे ईश्वरावर असलेले प्रेम याचे एक मूर्तिमंत उदाहरण म्हणून नव्हे तर प्रत्येकावर मातृभावाने त्यांचे संतानवत् प्रेम होते. हे स्पष्टपणे प्रकाशित झालेले मला जाणवले आणि त्यांच्या या थोर स्वरुपाला मी शरणागत आहे.''

निवेदिता श्रीसारदादेवींवर जितकी बोललेली आहे, तितकी रामकृष्णांवर निश्चितच बोललेली नाही. श्रीसारदादेवींचा तिला अनेक वर्ष सहवास लाभला हेही त्याचे एक कारण आहे. परंतु श्रीरामकृष्णांविषयीच्या तिच्या भावना, तिची श्रद्धा हे सारेच अत्यंत दृढ आणि हृदयात पक्के स्थित झालेले आहे. त्या आसनावरुन ती त्यांना जन्मजन्मांतरी हलवू देणार नाही असे वाटावे ऐवढी तिची भक्ती पराकोटीची आहे. परंतु ह्या तिच्या धारणेमध्ये कोणताही भाबडेपणा किंवा उद्रेकही नाही. अत्यंत विचारपूर्वक आणि पूर्ण अभ्यास करुनच तिच्या मनाने त्यांना स्वीकारले आहे. त्यांच्या अंगी असलेले विश्वमातृत्व जाणवून ती अत्यंत मुग्ध झाली. एखादा पुरुष एवढा तरल संवेदनशील होत जातो, त्याचे प्रेम इतके विशाल होत जाते की तो साऱ्या विश्वालाच आपल्या कवेत घेऊ शकतो, हे अद्‌भूत, हे दिव्य तिच्या इंग्रज संस्कारांना फार मोठे आश्चर्यच होते. शिवाय ते सर्व प्रत्यक्ष अनुभवलेला पुरुष दुसरा तिसरा कोणी नसून तिचा गुरुच होता. ज्याचे आभाळाएवढे व्यक्तिमत्त्व तीच नव्हे तर सर्वजण मानत होते. म्हणूनच निवेदिता श्रीरामकृष्ण चरणी लीन झाली होती. त्यांचे नेमके गुण ओळखून, जाणून त्यांच्यापुढे शरणागत होत होती.

श्रीरामकृष्णांपुढे ती शरणागत झाल्याचे वर लिहिलेले एक कारण ती स्वतःच देते. ते म्हणजे विश्वमातृत्व, तसेच दुसरे कारणही ती स्वतःच देते, ते म्हणजे त्यांची विश्वमानवता ! ती म्हणते, ''अगदी खेड्यातल्या एका शेतकरी ब्राह्मण कुटुंबात जन्माला आलेला, खरेतर अगदी निरक्षर माणूस, पण त्याचे अमूल्य विचार आणि त्यांचे अनुशीलन करणारा हा व्यापक समाज पाहिला तर त्यांना महापंडितच म्हणावे लागेल. त्याही पलिकडे जाऊन ते महान ठरले. कारण प्रत्येकाच्या मनात प्रवेश करण्याची विस्मयकारक शक्ती त्यांच्याकडे होती. म्हणूनच आजच्या आधुनिक काळातही वैश्विक मनाचे तेच एकमात्र अधिकारी ठरतात.''

तिच्या मते प्राचीन भारतीय ज्ञानाचे श्रेष्ठत्व श्रीरामकृष्णांनी सप्रमाण सिद्ध केले. त्यांनी स्वतःचे जीवनच त्याप्रमाणे जगून दाखविले. म्हणूनच ते फक्त भारतापुरतेच मर्यादित होते, हे मानायला मात्र खरतर ती तयार नाही. उलट ती म्हणत असे, ''ते समग्र मानवजातीचा विचार करत किंवा त्यांची अनुभूतीही साऱ्या मानवजातीला वेढून होती. त्यामुळेच... "and he, Ramkrishna represents Humanity' असे ती ठामपणे सांगते. स्वामी विवेकानंदांनी त्यांच्या देहत्यागापूर्वी चार महिने, काशीहून निवेदिताला एक पत्र लिहिले होते. या पत्रावर १२ फेब्रुवारी १९०२ अशी तारीख आहे. त्यात ते म्हणतात, ''जर रामकृष्ण सत्य असतील तर त्यांनी मला ज्याप्रमाणे माझ्या कार्यात मार्गदर्शन केले, त्याचप्रमाणे किंवा त्यापेक्षाही हजारपट स्पष्टपणे ते तुलाही तुझ्या कार्यात मार्गदर्शन करतील.''

यावरुन तेही स्वतः जीवनभर रामकृष्णांच्या निर्देशनाप्रमाणे कार्य करत राहिले व निवेदितानेही श्रीरामकृष्णांच्या दिशादर्शनाप्रमाणेच अखेरपर्यंत कार्य केले. यातून आणखी एक गोष्ट स्पष्ट होते. ती म्हणजे विवेकानंद आणि रामकृष्ण यांना निवेदिता वेगळे मानत नव्हती. त्या दोघांचे एकत्व तिने अचूक जाणले होते. या गोष्टीचा ढळढळीत पुरावा म्हणजे निवेदिताने लिहिलेला ग्रंथ - "The Master as I saw him' या ग्रंथात ती म्हणते - ''ज्या रात्री स्वामीजींनी देह सोडला त्याच रात्री मी स्वप्नात प्रत्यक्ष रामकृष्णांना पुन्हा देह सोडताना पाहिले.'' तसेच - ''माझ्यामध्ये जो आत्मा विराजमान आहे त्याचे नाव आहे रामकृष्ण-विवेकानंद. रामकृष्ण आणि विवेकानंद नाही.''

रामकृष्ण-विवेकानंदरुपी एकच सत्ता इथे नांदते हेच निवेदिताच्या दृष्टीने एकमात्र सत्य होते. ते तिने निःसंदिग्धपणे प्रगट केले आहे. तिच्या दृष्टीने रामकृष्ण हे सर्वश्रेष्ठ अध्यात्मिक शिल्पकार होते. ते इच्छामात्रे किंवा स्पर्शमात्रे माणसाचे मन पालटू किंवा घडवू शकत होते. जितक्या सहजतेने

चिखलाच्या नरम गोळ्याला कुंभार लीलया आकार देतो, अगदी तितक्याच सहजतेने ! अशा महामानवाचा अंश म्हणजे स्वामी विवेकानंद. म्हणूनच त्यांची शिष्या होण्यामध्ये निवेदिता तिच्या जीवनाची सार्थकता मानत होती.

''रामकृष्णांची निवेदिता'' म्हणून ओळखली जाणारी ही निवेदिता भारतीय जीवनाशी, भारतीय लोकांशी, भारतीय संस्कृतीशी एवढी एकरुप होऊन गेली की, ती भारताच्या नसानसात उतरली. तिच्या या भारतप्रेमाला प्रतिसाद म्हणून भारतीयांनी तिला 'लोकमाता निवेदिता' असे संबोधून गौरवाचे मातृस्थान दिले. धन्य ती निवेदिता !

संदर्भ :


१) विश्वचेतनाय श्रीरामकृष्ण - (बंगाली) संपा. स्वामी प्रेमेशानंद

२) Sister Nivedia - Pra. Atmaprana

३) Complete Works of Sister Nivedita - Published by - Adwait Ashram Kolkata

४) जन्मजन्मांतरेर माँ (बंगाली)
Published by - Sri Sarada Math, Kolkata



**सौ. जयश्री नातू**
ए/१२, अनुबंध सोसायटी, रामकृष्णमठाजवळ,
पुणे - ४११०३०.

## संन्यस्तशिष्यषोडशी – श्रीरामकृष्ण परमहंस यांचे सोळा संन्यस्त शिष्य

| अनु. | संन्यासोत्तर नाव | संन्यासपूर्व नाव | मूलस्थान | जन्म/समाधी | व्यक्तिमत्व |
|---|---|---|---|---|---|
| १ | विवेकानंद | नरेंद्रनाथ दत्त<br>विले वीरेश्वर | कलकत्ता | १२.१.१८६३<br>४.७.१९०२ | सप्तर्षींपैकी एक कवी, गायक,<br>न्यासंग वक्ते, संघटक, तीव्र बुद्धिमत्ता |
| २ | ब्रह्मानंद | राखालचंद्र घोष | सिक्रा कुलिनग्राम<br>कलकत्त्याजवळ | २१.१.१८६३<br>१०.४.१९०२ | प्रखर बुद्धिमत्ता किर्तनकला<br>विवाहोत्तर संन्यास |
| ३ | शिवानंद | तारकनाथ घोषाल<br>महापुरुष महाराज | बारासात<br>कलकत्त्याजवळ | १६.११.१८५४<br>३०.७.१९१८ | उत्तम शिक्षक |
| ४ | प्रेमानंद | बाबूराम घोष | ऑटपूर<br>कलकत्त्याजवळ | १०.१२.१८६१<br>३०.७.१९१८ | जन्मतः विरक्त श्रीरामकृष्णांना<br>भावावेशात सावरत. |
| ५. | योगानंद | योगिन रॉयचौधरी | दक्षिणेश्वर<br>हे खेडे | ३०.३.१८६१<br>२८.३.१८९९ | बाल्यावस्थेत ब्रह्मजिज्ञासा<br>सक्तीने विवाह. ईश्वरनाम जप |
| ६ | निरंजनानंद | नित्यनिरंजन घोष | राजरहाट विष्णुपूर<br>२४ परगणा (बंगाल) | ऑगस्ट १८६२<br>९.५.१९०४ | हिप्नॉटिझम माध्यम होते. |
| ७ | रामकृष्णानंद | शशीभूषण चक्रवर्ती<br>शशीमहाराज (बंगाल) | इचापूर, जि. हुगली<br>(बंगाल) | १३.७.१८६३<br>२१.८.१९११ | प्रखर बुद्धिमत्ता, शरत् महाराजांचे<br>चुलतभाऊ बायबल व इतर<br>धर्मग्रंथांचा सखोल अभ्यास |
| ८. | सारदानंद | शरच्चंद्र चक्रवर्ती<br>शरत् महाराज | कलकत्ता | २३.१२.१८६५<br>१९.८.१९२७ | प्रेमळ,<br>'रामकृष्णलीलाप्रसंग'चे लेखक |
| ९. | तुरीयानंद | हरिनाथ चट्टोपाध्याय | उत्तर कलकत्ता | ३.१.१८६३<br>२१.७.१९२२ | ज्ञानमार्गी, अद्वैतवादी<br>संन्यस्त |
| १०. | अद्भुतानंद | धनगर लाटू (प्लेटो)<br>रखतूराम | छाप्रा<br>जि. बिहार | १८५०<br>२४.४.१९२० | रामकृष्णकृत सर्वोच्च परिवर्तन<br>चमत्कार, हनुमान उडी |
| ११. | अभेदानंद | कालिप्रसाद चंद्र | गोस्वामी लेन<br>अहिरीतोला<br>उ. कलकत्ता | २.१०.१८६६<br>८.९.१९३९ | प्रतिविवेकानंद संस्कृत व्यासंग<br>एडिसन भेट, शंकराचार्यांपासून प्रेरणा,<br>देशभर हिंडले, महाराष्ट्रातही संचार |
| १२. | त्रिगुणातीतानंद | सारदाप्रसन्न मित्र | नावरा, २४ परगणा<br>बंगाल | ३०.१.१८६५<br>१०.१०.१९१५ | विपुल पाठांतर, खानदानी घराणे,<br>आत्मनिग्रही |
| १३. | अद्वैतानंद | गोपालचंद्र घोष<br>बडो गोपाल | सिंथी कलकत्ता<br>जन्म राजपूर, बंगाल | १८२८<br>२८.१२.१९०९ | तबलावादक,<br>श्रीरामकृष्णांचे निकट सेवा |
| १४. | सुबोधानंद | सुबोधचंद्र घोष<br>खोकामहाराज | ठणठणिया विभाग<br>कलकत्ता | ८.११.१८६७<br>२.१२.१९३२ | पाणी-अंधार-भीती<br>अपयश ओढवून घेतले. |
| १५. | अखंडानंद | गंगाधर<br>गंगोपाध्याय | अहिरीतोला<br>पश्चिम कलकत्ता | ३०.९.१८६४<br>७.२.१९३७ | नट, प्रभावी व्यक्तिमत्त्व<br>हिमालय, तिबेट परिभ्रमण |
| १६. | विज्ञानानंद | हरिप्रसन्न चट्टोपाध्याय | एटवाह, उत्तर प्रदेश | ३०.१०.१८६८<br>२५.४.१९३८ | बुद्धिवादी, स्थितप्रज्ञ<br>अंगापिंडाने मजबूत |

# दक्षिणेश्वरच्या पुष्करिणीत उमललेले ब्रह्मकमळ



**श्री. म. वि. कोल्हटकर**

बी. ए. (ऑ). एफ.एफ.आय.आय. आयुर्विमा महामंडळ प्रबंधक, १९९४ साली निवृत्त. बालकथा, लघुकथा, ललित लेख, कादंबरी व विनोदी कथा इ. विपुल लेखन – मान्यवर नियत कालिकातून. ३१ पुस्तके प्रसिद्ध, आकाशवाणीवर विविध कार्यक्रम. इंग्रजी व संस्कृत मधून बरेच कथालेखन प्रसिद्ध. अध्यात्म व संस्कृतभाषा विशेष आवडीचे विषय. जीवन विकास व अन्य अध्यात्मिक नियत कालिकातून बरेच लेखन प्रसिद्ध होत असते.

धर्माला अवकळा येते, अधर्माला उत येतो, संतसज्जनांना वाली उरत नाही अशावेळी ईश्वर अवतार घेतो. वस्तुतः व्यक्तिमात्रांचे आणि तेणेकरुन समाजाचे जीवन स्वस्थ, शांत आणि आनंदी करणे हेधर्माचे वास्तविक स्वरुप आहे. समाजाच्या सुखस्वास्थ्याची आचारसंहिता खरे तर कोणत्याही काळात आणि कोणत्याही प्रदेशात एकच असायला हवी. तथापि अर्वाचीन काळात वेगवेगळे धर्म निर्माण झाले. त्या धर्मांमधे भेद निर्माण झाले. भेदांच्या भिंती अजस्त्र झाल्या. जुलूम अत्याचार, प्रलोभने यांच्याद्वारे धर्मबदल घडवले जाऊ लागले. संख्याबळ हेच धर्माच्या श्रेष्ठतेचे गमक मानले जाऊ लागले. धर्माच्या नावाखाली युद्धे, रक्तपात होऊ लागले. धर्माला असे ओंगळ स्वरुप प्राप्त झाले. अशावेळी विचारवंतांना घेऊन श्रीरामकृष्ण उगमाच्या प्रदेशाकडे गेले. तिथे त्यांनी त्यांना त्या निरनिराळ्या उगमस्थानातील जलाचे स्नान घडवले. आपल्या स्वतःच्या जीवनाचा यज्ञ त्यांनी प्रदीप्त केला. असे हे अलौकिक कार्य श्रीरामकृष्ण परमहंस या अवतारी पुरुषाने एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धात केले.

भगवान श्रीवेदव्यासांचे सुपुत्र शुकदेव मातेच्या उदरातच बारा वर्षेसंन्यस्त अवस्थेत पडून होते. ते जन्माला आले तेच संन्यासी या रुपाने. श्रीरामकृष्ण असेच संन्यस्तावस्थेत जन्माला आले. भगवी वस्त्रे परिधान केली, मुंडण केले, अग्नी पेटवला नाही, कर्म केले नाही म्हणजे माणूस संन्यासी होत नाही. विरक्त वृत्तीने जो सारी कर्मेकरतो तोच खरा संन्यासी असे श्रीमद्भगवत् गीता स्पष्टपणे सांगते. श्रीरामकृष्ण अशा प्रकारचे खरे संन्यासी होते. त्यांचे जीवन हे एक ईश्वरीय नाट्य होते. दर्शन होते. होय त्यांनी विवाह केला. पण अगदी पहिल्याच दिवशी पत्नीला देवतास्वरुपात पाहिले. सोळा संन्यस्त शिष्य, अठ्ठावीस गृही शिष्य आणि अगणित भक्त त्यांनी अपत्यरुपात पाहिली. त्यांनी व्यक्तिप्रपंच केला नाही. त्यांनी विश्व प्रपंच केला.

रामकृष्णांचा सगळा व्यवहार रोखीचा होता. त्यात उधारीला अवसर नव्हता 'तुम्ही ईश्वर पाहिला आहे काय, तुम्ही मला ईश्वर दाखवाल काय? या नरेंद्राच्या प्रश्नांना रामकृष्णांनी अगदी रोखठोक उत्तरे दिली आहेत. रामकृष्ण म्हणाले, ''होय, मी ईश्वर पाहिला आहे. तू दिसतोस त्याहूनही प्रत्यक्ष तो मी तुलाही दाखवीन चल माझ्या मागोमाग.'' एवढे म्हणून रामकृष्ण थांबले नाहीत ते पुढे म्हणत राहिले, 'मी म्हणजे राम, मी म्हणजे कृष्ण, मी म्हणजे ईश्वर'. बुद्धिवाद्यांचे अग्रणी स्वामी विवेकानंद पुढे श्रीरामकृष्णांची अनेकवार कठोर परीक्षा घेत राहिले.

रामकृष्णांची रास कुंभ. विवेकानंदांची रासही कुंभ. कुंभ ही बुद्धिवादी विचारवंतांची रास आहे. रामकृष्णही प्रखर बुद्धिवादीच म्हणायला हवेत. रामकृष्णांनी बुद्धिवादानेच बुद्धिवादाच्या तटबंदीला खिंडार पाडले. बुद्धिवाद्यांना (ब्राह्मो समाज सदस्यांना) किल्ल्यामध्ये नेले आणि आत विराजमान असलेल्या सिंहासनाधीश्वराचे प्रत्यक्ष दर्शन घडविले.

बुद्धिवादी म्हणजे नास्तिक असा सर्वसाधारण समज असतो. वास्तविक खऱ्या अर्थाने कोणीही माणूस नास्तिक नसतो. ईश्वर या शब्दाला त्याचा आक्षेप असेल; पण एक दिव्य अद्भूत विश्वव्यापी चैतन्य याचे अस्तित्व कोणताही नास्तिक अमान्य करीत नाही. शिवाय नास्तिकालाही भावजीवन असते. मूर्त अमूर्त अशा वस्तु वा व्यक्तीवर त्याचा भाव घनीभूत झालेला असतो. अशा भाव जीवनाविरहित तो जिवंत राहू शकत नाही. अशा या भावाचा उत्कर्ष होत राहणे प्रत्येक माणसाला आवडते. या भावाचा विश्वचैतन्यापावेतो उत्कर्ष होणे यालाच परम भक्ती असे म्हणतात. अशा भक्तीभावाची बेटेही नास्तिकाच्या जीवनात आढळतात. ही बेटे किंवा विश्रामस्थाने नास्तिकानेच निर्माण केलेली असतात. केवळ हटवादीपणाने किंवा देहसापेक्ष अहंकारापोटी नास्तिक ईश्वरगत भक्तिभावाचे अस्तित्व मान्य करीत नाही.

बुद्धिवादी रामकृष्णांनी बुद्धिवादी नरेंद्राला म्हणजेच विवेकानंदांना प्रारंभीच्या भेटीत पदस्पर्श करुन या भावरुपी कुंडलिनीच्या विळख्यात हलकीशी कंपने निर्माण केली. त्यामुळे चमक उठावी त्याप्रमाणे एक क्षण नरेंद्राचे देहातीत अवस्थेकडे म्हणजेच आत्मबोधाकडे उड्डाण झाले. पण अद्यापपावेतो मनबुद्धीची पुरेशी परिशुद्धी न झाल्यामुळे ही दिव्य अनुभूती नरेंद्राला सहन होईना. त्याचे मन प्रमाथी वेगाने देहबोधाकडे धावले आणि

याचाच आविष्कार 'अहो मला आईवडील आहेत' या उद्‌गारात झाला. यावर रामकृष्ण म्हणाले, 'हुं सध्या एवढे पुरे आहे.''

रामकृष्णांचे आणखी एक संन्यासी शिष्य रामकृष्णानंद (शशीमहाराज) हेही प्रखर बुद्धिवादी होते. रामकृष्णांनी त्यांचेही आपल्या शिष्यमेळाव्यात स्वागत केले. रामकृष्णांनी रामकृष्णानंदांचा देहबोधही असाच स्पर्शमात्रेकरुन संपवला आणि त्यांची ईश्वराच्या राज्याकडे त्यांनी वाटचाल सुरु केली.

रामकृष्णांचा देहबोध जन्मतःच समाप्त पावला होता. तथापि हेतुतः प्रयत्नपूर्वक त्यांनी मुक्तीच्या प्रदेशाकडे उत्थान रोखून ठेवले होते किंबहूना हेतुपूर्वकच ते मुक्तीच्या प्रदेशातून वारंवार जगत्‌कल्याणार्थ देहबोधावस्थेत उतरत होते. आपल्या एका संन्यस्त शिष्यांसमवेत बोलताना भोजनप्रसंगी रामकृष्ण सहजपणे उद्‌गारले, ''हे अन्नपदार्थ मी वेगवेगळे खातो. ते सर्व एकत्र कालवून खाल्ले तर तेवढ्या त्या कृतीने मी अद्वैतात जाईन आणि माझे देहगत अस्तित्व समाप्त होईल. ''एखादी तरी वासना मी अळेबळेच शिल्लक ठेवून आहे. अन्यथा मी मुक्त होईन''. रामकृष्णांना करंगुलीवर जप करताना बोटाच्या पेरांच्या विभाजनरेषांवर बोट ठेवताना त्रास होई. कारण ही विभाजनरेषा द्वैताची द्योतक आहे.

स्वामी प्रेमानंद या संन्यस्त शिष्यवराची काही संस्मरणे या दृष्टीने पाहण्यासारखी आहेत. स्वामी प्रेमानंद म्हणतात, ''रामकृष्णांना मच्छरदाणीचा लोंबणारा पडदा गादीखाली खोवणे पसंत नसे. शर्टाची बटणे लावून स्वतःला बंदिवान करणे त्यांना रुचत नसे. दाराला अडसर लावणे त्यांना मंजूर नसे. कुणी एकाने टर्रकन् कापड फाडले तर रामकृष्णांना यातना होत.'' रामकृष्णांची संवेदना एवढी तरल होती की कुणी ईश्वराचे नाव उच्चारले, भजनाचे वाद्य दिसले तरी ते भावावेशात प्रविष्ठ होत.

विस्मयाची गोष्ट म्हणजे रामकृष्णांचे संन्यस्त शिष्य प्रवर विवेकानंद यांनाही निर्विकल्प समाधी घेऊन मुक्ती-प्राप्त करुन घेण्याची घाई झाली होती. जगत्‌कल्याणासाठी खडे बोल सुनावून रामकृष्णांनी त्यांना अशी समाधी घेण्यापासून रोखून ठेवले होते.

श्रीरामकृष्ण म्हणजे केशरी वर्णछटा असलेले एक ब्रह्मकमळ होते. या कमळाच्या आतल्या मण्डलात सोळा पाकळ्या होत्या. बाहेरच्या मण्डलात अठ्ठावीस पाकळ्या होत्या. याशिवाय या कमलाभोवती रुंजी घालून अनेक भ्रमरांच्या झुण्डी दक्षिणेश्वरीच्या पुष्करिणीत लोटत होत्या.

रामकृष्णांचे सोळा संन्यस्त शिष्य श्रीरामकृष्णांच्या सहवासात काही एक पूर्वसंकेत असावा त्याप्रमाणे आपल्या पायांनी चालत आले आहेत. त्यांना पाहताच प्रथम भेटीत रामकृष्ण अगदी जुनी ओळख असावी असे हास्य करतात. अंगखुणांचे अद्‌भुत शास्त्र रामकृष्णांना अवगत आहे. अंगखुणांवरुन माणूस कसा पडताळून पहावा याचे आडाखे श्रीरामकृष्ण सांगतात. त्याचा हात हातात घेऊन श्रीरामकृष्ण जोखतात. तो हात हलका लागला तर ती व्यक्ती अध्यात्मप्रवण असल्याचे श्रीरामकृष्ण म्हणतात. अशा व्यक्तीला प्रारंभी ध्यान करायला सांगून त्याची प्रतवारी ते ठरवतात. त्याच्या जिभेवर दिव्य अक्षरे लिहून त्याचे ध्यानामधे उड्डाण घडवतात. तर कधी त्याच्या वक्षस्थळावर हात फिरवून त्याला देहबोधावर आणतात. असे हे संस्कार शिक्षण तात्काळ सुरु होताना दिसते.

श्रीरामकृष्णांचे हे सोळा संन्यस्त शिष्य समाजाच्या विविध स्तरांमधून आलेले आहेत. कोणी मागासवर्गीय, कोणी उच्चवर्णीय, कोणी सधन, कोणी निर्धन, कोणी विद्वान, कोणी कलावंत, काही भाबडे, काही बुद्धिवादी अशी विविध पार्श्वभूमी असलेले हे शिष्य आहेत. हे सर्व शिष्य उपजतच ईश्वराची ओढ असणारे आहेत. त्यांचे आईवडील आणि पूर्वज काही ना काही आध्यात्मिक वाटचाल केलेले आहेत. या सोळा शिष्यांपैकी २ ग्रॅज्युएट, ३ महाविद्यालयीन शिक्षण अर्धवट सोडलेले, १० माध्यमिक शिक्षण अर्धवट सोडलेले आणि १ तर निरक्षर, डोंगरकपारीत धनगर जमातीत जन्मलेला, मातापित्यांचे छत्र वयाच्या पाचव्या वर्षी हरवलेला आहे. या शिष्याचे नाव लाटू महाराज तथा स्वामी अद्‌भुतानंद असे आहे.

विवेकानंदांची प्रथम भेट होण्यापूर्वी कितीतरी आधी श्रीरामकृष्णांनी त्यांना सप्तर्षि मंडलातील ध्यानस्थ ऋषीच्या स्वरुपात पाहिले आहे आणि स्वतःला दुडूदुडू रांगत त्या ऋषीकडे जाऊन त्याच्या गळामिठी पडणाऱ्या बालकाच्या रुपात पाहिले आहे.

रामकृष्णांनी सर्व साधना अत्यंत कठोरपणाने, व्रतस्थ होऊन केल्या. त्यासर्व साधना एकाहून एक दिव्य होत्या. जनलज्जेची पर्वा न करता दीड वर्षेस्त्रीवेष परिधान करुन ते राधाभावात राहिले. तर दुसरीकडे सहा महिने पावेतो हनुमंत भावात वावरुन त्यांनी रामदर्शन घेतले. चर्चमध्ये, मशिदीत जाऊन त्या त्या धर्मतत्त्वांचे पालन करुन ईश्वर प्राप्त केला. भिकारी, कुत्रे, कावळे यांच्या गर्दीत सामील होऊन उष्ट्या पत्रावळी चाटून दीनानाथाला शोधला, मेहतराचा मेहेतर होऊन त्यांचा संडास स्वतःच्या दाढीने साफ करुन 'ततो न विजुप्सते' (तो कुणाचीच घृणा करीत नाही) या ईशावास्यातील चरणाचा साक्षात्कार त्यांनी करुन घेतला. तांत्रिक पंथाचेही पाठ त्यांनी गिरवून पाहिले.

श्रीरामकृष्णांना बरेच अभिजन इतकेच काय तर स्वामी विवेकानंद, स्वामी योगानंद दक्षिणेश्वरचा वेडा ब्राह्मण म्हणून प्रारंभी समजत. एकेक व्यक्ती श्रीरामकृष्णांच्या सान्निध्यात येत गेली आणि हे वेड सामान्य नाही तर ते ईश्वर लाभासाठी तळमळणारे विशुद्ध आत्मतत्व आहे हे एकेकाला समजत गेले.

रामकृष्णांना घशाचा कॅन्सर झाला होता. त्यांच्या घशात अन्नपाणी शिरत नव्हते. त्यांची शुश्रूषा करण्यास शिष्यवर्ग कुचराई करीत असे. त्यांना भीती वाटे की यांच्या संसर्गाने ही व्याधी आपल्यालाही ग्रस्त करील. विवेकानंदांनी हे पाहिले आणि त्यांना शिष्यांचा राग आला. ते म्हणाले, ''केवढी ही देहाची आसक्ती !'' एवढे म्हणून विवेकानंद थांबले नाहीत. तर त्यांनी रामकृष्णांच्या घशातून निघणारा रक्त, पू यांचा स्त्राव ज्यात साठला होता ते मडके उचलून तो स्त्राव त्यांनी प्राशन केला. आपल्या गुरुप्रती एवढी प्रगाढ अलौकिक भक्ती आणि देहबोधाची समाप्ती याचे अलौकिक उदाहरण अन्यत्र क्वचितच आढळेल.

जमिनीत पुरलेल्या गुप्तधनाची ओढ माणसाला लागावी तशी या संन्यस्त शिष्यांची ओढ रामकृष्णांना लागली होती. गंगातीरावर दक्षिणेश्वरी कालिकामातेच्या मंदिरात सायंकाळचा धूप पडण्यापूर्वी रामकृष्ण मंदिराच्या सौधावर जात आणि मोठ्याने आरोळी देत, ''या रे या, सारे या. आईच्या आरतीची वेळ झाली.'' ही हाक त्या संन्यस्त शिष्यांच्या दूरदूर असलेल्या बाल रुपापावेतो पोचत असली पाहिजे.

एका पहिल्या भेटीतच रामकृष्ण नावाचे लोहचुंबक त्या शिष्यांना आकृष्ट करुन ठेवीत असे. तो एक लोहचुंबक नव्हता तर तो परीसचुंबक होता. तो त्या लोखंडाला ओढून घेऊन सुवर्णकांती देणारा होता.

या शिष्यांना रामकृष्णांचा लाभलेला सहवास पाच वर्षांहून कमीच होता. स्वामी सुबोधानंदांना तर रामकृष्णांचा केवळ एक वर्षाचा सहवास लाभला. तथापि रामकृष्णांचे निर्वाण झाल्याचे वृत्त ऐकताच सुबोधानंद बेशुद्ध पडले. सुबोधानंदांची बुद्धिमत्ता तल्लख होती पण त्यांना लागलेली संन्यासाची ओढ एवढी प्रबळ होती की त्यांनी शालेय शिक्षणात अपयश ओढवून घेतले. या सर्व शिष्यांची संन्यासोत्तर नावे अभ्यासली तर भक्ती, ज्ञान, कर्म, योग इ. पैकी कोणत्या वाटेने त्यांची साधना गतिमान झाली याचाच जणू काय पत्ता लागतो.

लाटू महाराज उर्फ स्वामी अद्‌भुतानंद हे नावाप्रमाणेच एक अद्‌भुत असे आश्चर्य होते. धनगर जमातीमधील बिहार प्रांतातील या अनाथ मुलाला पोसणे चुलत्याला अशक्य झाले. चुलत्याने त्याला कलकत्ता येथे नेऊन डॉ. रामचंद्र दत्त यांच्याकडे घरगडी म्हणून कामाला लावले. हा घरगडी तासन्‌तास डोक्यावरुन कांबळे घेऊन ध्यान करीत असे. त्याला ध्यान कोणी शिकवले हे एक कोडेच आहे. डॉक्टर दत्त रामकृष्णांचे भक्त होते. डॉ. दत्तांच्या घरी अधूनमधून श्रीरामकृष्णांचा विषय निघून चर्चा होत असे. लाटू ही चर्चा जिवाचे कान करुन ऐकत असे. मग त्याने आपले धनी डॉ. दत्त यांच्याकडे श्रीरामकृष्णांचे दर्शन घेण्याचा हट्ट धरला.

डॉ. दत्तांनी लाटूला श्रीरामकृष्णांकडे नेले. त्याला पाहताच प्रथमदर्शनी रामकृष्ण म्हणाले, ''या मुलाच्या ठिकाणी अध्यात्मिक लक्षणे स्पष्ट दिसतात.'' श्रीरामकृष्णांच्या सहवासात आल्यानंतर लाटूचा तिथून पाय निघेना.

लाटूला कुणी नाव गाव विचारल्यावर तो ते कधीच सांगत नसे. 'कशाला त्या अनावश्यक गोष्टी? मी जसा आहे तसा तुमच्यापुढे उभा आहे'' असे लाटू म्हणे. लाटूचे मन अगदी साफ, शुद्ध आणि कोरे होते. त्यामुळे गुंतागुंतीच्या आध्यात्मिक समस्यांवर लाटू सहजपणे योग्य उत्तर देत असे. त्याने अनेकदा स्वामी विवेकानंदांनाही निरुत्तर केले आहे. विवेकानंद लाटूला 'प्लेटो' म्हणत. विवेकानंद म्हणत, 'श्रीरामकृष्णांचे सर्वात अलौकिक आणि अद्‌भूत कार्य म्हणजे लाटू या अनपढ व्यक्तीचे महान संन्यासी पुरुषामध्ये रुपांतर'.

रामकृष्णांच्या संन्यस्त शिष्यांपैकी स्वामी सुबोधानंद उर्फ खोकामहाराज हे असेच पंचवर्षबालभाव असणारे श्रेष्ठ संन्यासी होते.

श्रीरामकृष्ण म्हणत वीट भाजलेली असेल तर विटेवर कोरलेली अक्षरे कधीच पुसत नाहीत. श्रीमंती आणि ऐषआराम हे साधना प्रवासातील मोठे अडसर आहेत. दारिद्र्य आणि जीवनसंघर्ष साधनेला गतिमान करतात.

सारदा (स्वामी त्रिगुणातीतानंद) हे खानदानी श्रीमंत घराण्यातील होते. श्रीरामकृष्णांची त्यांच्याशी पहिली भेट १८८४ साली झाली. त्यांना पहिल्या भेटीतच श्रीरामकृष्णांनी 'गंगेचे पाणी आण आणि माझे पाय धू' अशी आज्ञा केली. सारदा यांनी मोठ्या कष्टाने आणि मिनतवारीने श्रीरामकृष्णांचे पाय धुतले. अशा प्रकारे अगदी पहिल्या भेटीतच श्रीरामकृष्णांनी या शिष्याच्या खानदानी अहंकारावर प्रहार केला.

श्रीरामकृष्णांच्या या सर्व शिष्यांमध्ये एक समानसूत्र जाणवते. ते असे की हे शिष्य मुळात निग्रही आणि मनस्वी स्वभावाचे होते. उदा. स्वामी त्रिगुणातीतानंद हे जसे पट्टीचे खादाड होते तसेच ते जिद्दीने दीर्घ उपवासही करणारे होते. ऐन थंडीत पातळ कुडता घालून ते वावरु शकत तर ऐन उन्हाळ्यात दोन दोन रग लपेटून घेत असत.

श्रीरामकृष्णांनी शिष्य पारखून घेतले तसेच स्वतःला गुरु म्हणून वरचेवर पारखून घेण्यास सुचवले. श्रीरामकृष्णांनी त्यांचा आचार, त्यांचा विचार आणि उच्चाराप्रमाणे घडतो आहे ना हे शिष्यांनी तपासून पहावे असा त्यांचा आग्रह होता. नोटा आणि नाणी तपासून खरी असल्याचे नेहमी पहावे असे त्यांचे सांगणे असे. त्यांच्या संन्यस्त शिष्यांनी श्रीरामकृष्णांची अनेकवार परीक्षा घेतली आहे आणि अशी परीक्षा घेतल्याबद्दल श्रीरामकृष्णांनी या शिष्यांचे अभिनंदन केले आहे. स्वामी विवेकानंद तर अगदी श्रीरामकृष्णांच्या महासमाधीपावेतो श्रीरामकृष्णांची वारंवार परीक्षा घेताना आढळतात. कधी श्रीरामकृष्णांच्या बिछान्याखाली नाणे ठेवून तर कधी ते रात्री कुठे जातात याच्यावर पाळत ठेवून विवेकानंद आपल्या गुरुची परीक्षा घेत राहिले. रामकृष्ण म्हणत गुरुची पारख जनात, वनात, दिवसा, रात्री काम आणि कांचन यांच्या संदर्भात सतत घ्यावी. श्रीरामकृष्ण या सर्व कसोट्यांना उतरले आहेत. अगदी श्रीरामकृष्णांना मृत्यूसमीप दिसत असतानाही विवेकानंद त्यांना विचारतात, ''आता या क्षणीसुद्धा तुम्ही मी राम आहे, मी कृष्ण आहे असे म्हणू शकता काय?'' त्यावेळी श्रीरामकृष्ण सहजपणे म्हणतात 'यात काय संशय.' श्रीरामकृष्णांच्या महासमाधीनंतर त्यांच्या अस्थींचा कलश वेदीवर स्थापन करतेवेळी नरेंद्र मनाशी म्हणतात, 'हे जर खरेच ईश्वर असतील तर दोन दिवसाच्या आत रायपूरचे महाराज या स्थळी येतील.' कुठले कोण रायपूरचे महाराज हे विवेकानंदांना माहित नव्हते. पण आश्चर्य म्हणजे खरोखरच हे महाराज दोन दिवसात तिथे येऊन गेले.

आपल्या गुरुची अशी पुनःपुनः परीक्षा घेणाऱ्या विवेकानंदांनी अखेरीस कबुली दिली की, 'होय मी ईश्वर पाहिला. स्वतःहूनही प्रत्यक्ष, उपनिषदातील सर्व साधना इथे दृश्यमान झाल्या. हे तर अवतारवरिष्ठ आहेत' श्रीरामकृष्णांची खंडन भवबंधन...' ही विवेकानंदविरचित अशी सुप्रसिद्ध पारंपारिक आरती म्हणजे विवेकानंदांनी 'होय मी ईश्वर पाहिला' अशी स्पष्टपणे दिलेली कबुलीच होय.

प्रत्येक शिष्याचा प्रकृतिधर्म पाहून त्यानुसार श्रीरामकृष्णांनी त्यांना वेगवेगळे संस्कार शिक्षण दिले. यासंदर्भात शब्दबद्ध झालेली संस्मरणे पाहण्यासारखी आहेत.

पक्षी मादी आपले पंख पसरुन पिलांचे रक्षण व संगोपन करते त्याप्रमाणे श्रीरामकृष्णांनी आपल्या शिष्यांचे संगोपन आणि संवर्धन केले. दक्षिणेश्वर येथील श्रीरामकृष्णांची मध्यम आकाराची बैठकीची खोली आणि नौबतखाना या नावाचे एक अगदी लहानसे स्वैयंपाकघर यामधे सोळा शिष्यांचे रामकृष्णांचे हे ऋषीकुळ कसे काय नांदत होते हा एक आश्‍चर्याचा विषय आहे.

स्वामी निरंजनानंद हे श्रीरामकृष्णांच्या सहवासात येण्यापूर्वी हिप्नॉटिझम करणाऱ्या टोळीमध्ये माध्यम म्हणून काम करीत होते. त्यांना श्रीरामकृष्णांनी या छंदातून अलगद सोडविले. श्रीरामकृष्ण त्यांना म्हणाले, ''या विद्येच्या नादी लागू नकोस. चल तुला मी पवित्र भूत दाखवितो.''

स्वतः श्रीरामकृष्णांनी सर्व प्रकारच्या साधना केल्या. त्यामध्ये तांत्रिक, अघोरी साधनांचाही समावेश होता. श्रीरामकृष्ण म्हणत, ''घरात जाण्यासाठी महाद्वार असते. त्याप्रमाणे घरात जाण्यासाठी भंग्याकरताही दार ठेवलेले असते. पण त्या भंग्याच्या दाराने कधी जायचे नसते. त्याप्रमाणे अघोरी साधना, माणसाने करु नयेत.''

श्रीरामकृष्ण म्हणतात, ''माणूस एखाद्याने ९९ चांगल्या गोष्टी केल्या आणि एक वाईट गोष्ट केली तर चांगल्या गोष्टी तो विसरुन जातो आणि एक वाईट गोष्ट तो उगाळत राहतो. ईश्‍वराची गोष्ट अगदी याहून उलट आहे. माणसाने ९९ गोष्टी वाईट केल्या आणि एक चांगली गोष्ट केली तर ईश्‍वर वाईट गोष्टी विसरुन जातो आणि चांगली गोष्ट ध्यानी ठेवतो.'' पापोऽहं पापकर्माहं असे म्हणून खंत करणाऱ्या माणसाला हे केवढे मोलाचे अभिवचन श्रीरामकृष्ण देतात हे पाहण्यासारखे आहे.

एक ठिकाणी श्रीरामकृष्णांची कुचेष्टा केली जाते. तिथे उपस्थित असलेल्या श्रीरामकृष्णांच्या एका सौम्य प्रकृतीच्या शिष्याने ती कुचेष्टा निमूटपणे ऐकली. तेव्हा ते या शिष्याला खडसावतात, 'आपल्या गुरुची निंदा तू शांतपणे ऐकून घेतोस? काय म्हणावे तुला?' असाच एक प्रसंग त्यांच्या शीघ्रकोपी आणि आक्रमक शिष्याच्या उपस्थितीत घडतो, तेव्हा त्या शिष्याला श्रीरामकृष्ण म्हणतात, 'तू अशावेळी कानांवर हात ठेवून दूर निघून जाणे इष्ट आहे.

श्रीरामकृष्ण कित्येकदा ऐन मध्यरात्री आपल्या शिष्यांना उठवीत आणि त्यांच्यासमवेत नामस्मरणाचा आणि भजनाचा आनंद घ्यायला लावत. 'या निशा सर्वभूतानां...' या गीतेतील स्थितप्रज्ञदर्शन घडवणाऱ्या श्लोकाचा हा एक साक्षात्कार म्हणायला हवा.

आपल्या या सोळा संन्यस्त शिष्यांना रामकृष्ण म्हणत, 'मी जी साधना करतो त्याच्या १/१६ साधना तुम्ही केलीत तरी तुम्ही मुक्तीचे वाटेकरी व्हाल. २६ दैवी संपत्तीची लक्षणे विशद् करणाऱ्या भगवद्‌गीतेतील १६ व्या अध्यायाकडे तर हा निर्देश नाही ना?'

श्रीरामकृष्णांनी आपले हे १६ संन्यासी शिष्य असे काही तयार केले ते शिष्य स्वतः उच्च कोटीचे साधक झाले आणि उच्च कोटीचे गुरुही झाले. या सोळा शाखांना अनेक उपशाखा फुटत जाऊन चिदानंदाचा वृक्ष बहरत गेला. आणि त्याच्याभोवती दिशादिशातून पाखरांचे थवे येत गेले.

१६ ऑगस्ट १८८६ या दिवशी श्रीरामकृष्णांनी महासमाधी घेतली. त्यावेळी त्यांचे १२ संन्यस्त शिष्य त्यांच्या प्रकृतीची देखभाल करीत होते. या १२ शिष्यांचे पुढे भवितव्य काय असा प्रश्‍न निर्माण झाला. विदेहरुपाने साक्षात्कार देऊन श्रीरामकृष्णांनी तो सोडवला. सुरेंद्रनाथ मित्र नावाच्या भक्ताला दर्शन देऊन श्रीरामकृष्णांनी या १२ शिष्यांच्या निवासाची सोय करण्यास सांगितली. सुरेंद्रनाथ मग या शिष्यांना दरमहा थोडी आर्थिक मदत देऊ लागले. एवढ्या अल्पशा रकमेत घर भाड्याने मिळणे शक्य नव्हते. तेव्हा या शिष्यांनी वराहनगर येथे पडझड झालेले भुताटकीने झपाटलेले एक जुनाट घर भाड्याने घेतले. इथे त्यांनी साफसफाई केली. नंतर तिथे श्रीरामकृष्णांचे पार्थिव अवशेष स्थापन केले. नंतर तिथे ध्यानधारणा करीत हे शिष्य राहू लागले. हे सर्वजण कौपीनधारी होते. फक्त एकाजवळ अंग झाकून घेता येण्यासारखी कफनी होती. रोज एकजण आळीपाळीने ही कफनी परिधान करुन भिक्षेसाठी बाहेर पडे. ही भिक्षाही पुरेशी नसे. पण मिळतील ते दोन घास आनंदाने भक्षण करुन हे शिष्य इथे दीर्घकाळ समाधिसुखाचा अनुभव घेत.

स्वतः रामकृष्णांनी आपल्या साधनेच्या प्रारंभकाळी कामारपुकुर येथे भुतांचा वावर असलेल्या स्मशानात उपासना केली. तिथे उपासना करण्यामध्ये सर्वाधिक शापित अशा भूतयोनितील जीवात्म्यांना प्राधान्य देऊन त्यांना ऊर्ध्वगती देण्याचा त्यांचा मानस होता काय? ईश्‍वर सर्वत्र आहे. तो स्मशानातही असतो. त्यामुळे उपासनेला कोणतेही स्थान अपवित्र नाही असा त्यांचा शुद्ध बुद्धीवादी दृष्टिकोन त्या उपासनेमागे होता काय?

वराहनगर येथे भुताटकीच्या बंगल्यात आद्यमठ स्थापन करण्यामध्ये नेमकी तीच धारणा त्यांच्या शिष्यांकडून व्यक्त होताना दिसते. हा योगायोग अपूर्व म्हणायला हवा. रामकृष्णांचे हे सोळा संन्यस्त शिष्य बंगाल आणि त्याच्या आसपासच्या प्रदेशातील दिसतात. स्वतः श्रीरामकृष्णांनी फारसा संचार कुठे केला नव्हता. पण त्यांच्या शिष्यांनी भरपूर परिभ्रमण केले आहे. विवेकानंद हे त्यांचे अग्रणी होते. विवेकानंद आणि आणखी तिघे शिष्य यांनी पाश्‍चात्यदेशात झंझावाती प्रवास व प्रचार केला. त्यातील स्वामी विवेकानंद यांचे कार्य ऐतिहासिक स्वरुपाचे मानावे लागेल.

भारत हा देश सर्पांचा, गारुड्यांचा, दगडधोंडयांची पूजा करणाऱ्यांचा, मंत्रतंत्र, जादूटोणा करणारांचा, प्राणी आणि झाडे यांची पूजा करणाऱ्यांचा एक अगदी मागासलेला देश आहे अशी सर्वसामान्य पाश्‍चिमात्य माणसाची भावना होती. एकोणिसाव्या शतकाच्या अंतिम दशकात विवेकानंद नावाचे एक तुफान पूर्वेकडील समुद्रात उत्पन्न झाले आणि ते रोरावत पश्‍चिम समुद्राच्या तटाकी धडकले. किंबहुना ते तुफान नव्हते. तो वेगवान प्रपात होता. विवेकानंदांची वाणी म्हणजे एक

कोसळणारा प्रपात होता. उमदे आणि प्रसन्न व्यक्तिमत्त्व, इंग्रजी भाषेवर असामान्य प्रभुत्व, काळजाला हात घालणारे कवित्व. समस्त धर्मग्रंथांचे सखोल अध्ययन आणि जिभेवर नर्तन करणारी सरस्वती यामुळे विवेकवाणीने समग्र अमेरिकनांना वेड लावले. धर्मपरिषदेत केलेल्या केवळ चार मिनिटांच्या भाषणाने या तरुण संन्याशाने तेथील विचारवंतांना, बुद्धिवंतांना, महंतांना आणि श्रीमंताना खडबडून जागे केले. हिमवंताच्या गुहागुहांमधून दुमदुमणारे उपनिषदांचे आदिम अंतःसूर त्यांनी पाश्चात्यांच्या वेदिकेवर निनादित केले. विवेकानंदांची ती वाणी ऋषीवाणी होती. सप्तर्षिमंडलातील ते नारायण ऋषीच होते. श्रीरामकृष्णांनी त्या रुपात विवेकानंदांना आधीच पाहिले होते.

हे विश्व म्हणजे एक नीड आहे, घरटे आहे, कुटुंब आहे ही मूलभूत धारणा ठेवून विश्वाला कवेत घेणारा, उदयांचलीच्या भास्कराचा केशरवर्ण धारण करणारा हा संन्यासधर्म आहे हे विवेकानंदांनी विशद करुन सांगितले. प्रत्येक जीव हा ईश्वराचा आहे. अंशाने अंशाकडे जायचे आहे. तीच कृतार्थता आहे. माणसाची खरी खोल भूक तीच आहे. ओढ तिकडेच आहे. ही भूक तृप्त करणारा अतिप्राचीन दिव्य सनातन धर्म इथे सागर तटाकी दीपस्तंभाप्रमाणे उभा असून तो तेजाच्या शलाकानित्य सर्वत्र वितरित करीत आहे ही गोष्ट विवेकानंदांनी स्वर्णभूमी आणि स्वर्गभूमी असलेल्या पाश्चात्य देशांना सांगितली.

स्वामी विवेकानंदांनी हेही सांगितले की सारी शास्त्रे, कला, विद्या यांचा उद्‌गम एका विराट अध्यात्मशास्त्रातून झाला आहे. पण त्यांची बेरीज केली असताही अध्यात्मशास्त्र पूर्ण होत नाही. विज्ञानाचा भरकटलेला उद्यम प्रवाह विवेकानंदांनी अध्यात्माच्या विशाल धारेत समाविष्ट केला. रजोगुणात विराजमान झालेल्या अमेरिकन समाजाला त्यांनी सत्त्वगुणाचा परिसर दाखवला. खोल खाली तमो गुणांच्या खडकाखाली असलेली सत्त्वगुणाची निर्मळ धार त्यांनी भारतीय समाजाला दाखवली. मनःशांतीच्या शोधात वणवण हिंडणाऱ्या पाश्चात्य बांधवांना त्यांच्या स्वतःच्याच हृदयांतरी विद्यमान असलेला नितळ शीतल निर्झर त्यांनी दाखवला.

अव्यक्त ब्रह्माचा साक्षात्कार घडवणारा, स्वतःबरोबर इतरांनाही मुक्तीयात्रेत सामील करुन घेणारा, सेवेचा, त्यागाचा मूलमंत्र देणारा, दीनदलितांच्या वाड्यावस्त्यांवर जाऊन त्यांचे अश्रू पुसणारा, कुष्ठ रोग्यांची ईश्वरभावाने सेवा करणारा अक्षरधर्म प्रसृत करण्यासाठी विवेकानंदांनी श्रीरामकृष्ण मठाची स्थापना केली. या मठाच्या शाखोपशाखा देशविदेशात विस्तार पावल्या. श्रीरामकृष्णांनी फार पूर्वीच भाकित केले होते की पाश्चात्य देशातील गौरवर्णीयही इथे दर्शन घेण्यासाठी येतील. ते त्यांचे भाकीत खरे ठरले. बेलूर येथील प्रमुख मठ व स्मृति मंदिर यांची उभारणी या केवळ पाश्चिमात्य भक्तांनी दिलेल्या उदार आणि स्वयंस्फूर्त देणगीतून साकार झाले आहे.

आपल्या ज्ञानमार्गी शिष्यांचे समाधान श्रीरामकृष्ण अगदी सोपी व व्यवहारातील उदाहरणे देऊन करीत असत. नमुन्यादाखल काही संस्मरणे पाहू. स्वामी तुरीयानंदाबरोबर झालेले पुढील संभाषण पहा.

तुरीयानंद – लोभापासून मुक्ती कशी मिळवावी ?

श्रीरामकृष्ण – लोभापासून मुक्ती कशाला हवी ? लोभाचा मोहरा फक्त ईश्वराकडे फिरवावा.

तुरीयानंद – मी स्त्रीयांना टाळतो. मला स्त्री दृष्टीसमोर नकोशी वाटते.

श्रीरामकृष्ण – मूर्ख आहेस. अरे स्त्री ही शक्तिदेवता आहे. जिच्यापुढे मान झुकव.

तुरीयानंद – ज्ञानाची पहाट उगवली असे कधी मानावे ?

श्रीरामकृष्ण – ज्ञानाची पहाट उगवल्यावर माणूस पूर्वी होता तसाच दिसतो. मात्र जगाकडे पाहण्याचा त्याचा दृष्टीकोन आमूलाग्र बदललेला असतो. तलवार तीच असते पण ती सोन्याची होते. आता ती प्रहारासाठी वापरण्याचा विचारच मनाला शिवत नाही.

तुरीयानंद – पुराणे, शास्त्रग्रंथ यांमध्ये काय असते ?

श्रीरामकृष्ण – पुराणे, शास्त्रग्रंथ या वाणसामानाच्या याद्या आहेत. सामान आणले की याद्या टाकून द्यायच्या.

तुरीयानंद – मला या जन्मातच निर्वाण हवे आहे...

श्रीरामकृष्ण – निर्वाणाची इच्छा करतात ते स्वार्थी, मतलबी असतात. खरा खिलाडी पुनःपुनः खेळात उतरुन प्रतिस्पर्ध्यावर मात करण्यास उत्सुक असतो.

तुरीयानंद – माणसाला ईश्वरप्राप्ती उशीरा का होते ?

श्रीरामकृष्ण – कारण माणसाच्या ठायी ईश्वरप्राप्तीसाठी व्याकुळता लौकर निर्माण होत नाही म्हणून.

तुरीयानंद – जगात एवढे दुःख का आहे ?

श्रीरामकृष्ण – जग हा ईश्वराने मांडलेला खेळ आहे. खेळ म्हटला की परस्पराविरुद्ध लढणारे भिडू हवेत.

स्वतःच्या साधनेचा प्रवास श्रीरामकृष्णांनी आपल्या शिष्यांना मोकळेपणाने उलगडून सांगितला आहे. स्वामी अभेदानंदांना श्रीरामकृष्ण म्हणाले, ''माझे गुरु तोतापुरी म्हणत तांब्याचे भांडे रोज घासायला हवे. तरच ते चकचकीत राहते. तसेच ध्यानही रोज करायला हवे तरच मन शुद्ध राहते. मी ध्यान करीत असे तेव्हा माझे शरीर पाषाणावत् होई. पुष्कळदा पक्षी माझ्या अंगाखांद्यावर येऊन बसत. डास, माशा, चिलटे यांचा उपद्रव मला जाणवत नसे. भिक्षा मागून खाल्लेले अन्न अहंकार नष्ट करते आणि ईश्वरशरणता निर्माण करते. निंदा आणि हल्ले हे सत्यपूजकाचे दागिने होत. त्यांच्यामुळे सत्यसेवकाचा आत्मा खंबीर होतो.

वेदांताबद्दल बोलताना स्वामी अभेदानंद म्हणतात, ''वेदांतांमध्ये सर्व धर्ममतांचा संगम झाला आहे. सर्व प्रेषितांची शिकवण वेदांतात समाविष्ट झाली आहे. भौतिकशास्त्र, तर्कशास्त्र, तत्त्वज्ञान, मानसशास्त्र अशा अखिल शास्त्रांच्या कसोट्या वेदांत पार करतो.

आपल्या संनस्त शिष्यांना श्रीरामकृष्ण म्हणतात, ''ब्रह्मचर्याचे परिपूर्ण पालन केल्यावर ब्रह्मतत्वाची प्रतिमा बुद्धीच्या आरशात लख्खपणे उमटते.''

श्रीरामकृष्णांचे सोळा संन्यस्त शिष्य म्हणजे देहबोध समाप्त झालेले, मुक्तीच्या आकाशात विहार करणारे पक्षी होते. देवशिशु दुडूदुडू धावत जगन्मातेकडे जावे तसे हे शिष्य आनंदाने, पवित्र मनाने समाधीच्या वाटेने श्रीरामकृष्णचरणी विलीन झाले.

या समस्त शिष्यांची नावे म्हणजे श्रीरामकृष्णचरणी वाहिलेला सोळा सुमनांचा दिव्य हार होता. श्रीरामकृष्णांच्या आरतीचा तो एक एक चरण होता. त्यांचा संन्यास विजनवासी नव्हता. त्यांचा संन्यास जनवासी होता. सेवाभावाने शिवाकडे अग्रेसर होणारा होता. अव्यक्त ब्रह्माला व्यक्त करणारा होता. समग्र जगाला, मानवजातीला पालाण घालणारा होता. धर्माधर्माच्या भिंती भेदणारा होता. उगमाच्या स्त्रोताकडे नेणारा होता. युगप्रवर्तक होता. 'अयं पन्थाः अनुवितः पुराणः यतो देवा उद्जायन्त विश्वे' या ऋग्वेदवचनाचा साक्षात्कार घडवणारा होता. काळाची पावले सांप्रत त्याच श्रीरामकृष्णप्रणीत विश्वधर्माची चाहूल घेत आहेत. एकएक पाकळी उलगडत आहे. विश्वकमल उमलत आहे. महाबोधिवृक्षाच्या शाखोपशाखा सर्वदूर पसरत आहेत.

श्रीरामकृष्णांचे जीवन म्हणजे जगाच्या मंचावर अवतरलेले 'ईश्वरी नाट्य होते. त्यांचे सोळा संन्यस्त शिष्य हे त्या नाट्यातील नट होते. आपल्या लौकिक जीवनाच्या अखेरीस श्रीरामकृष्ण म्हणाले, "ईश्वर माणसाचे रुप धारण करुन भूलोकी अवतीर्ण होतो. नाटक संपते. ईश्वर अंतर्धान पावतो. आकाशातून एकाएकी एक संगीतमेळा खाली उतरतो, नाचतो, गातो आणि निघून जातो. ते येतात, नाचतात, गातात, हसतात. ते निघून गेल्यावर ते कोण होते याची ओळख पटते. अवकाशात त्या संगीत मेळ्याचे सूर दीर्घकाळ निनादत राहतात."



Old dilapidated building of Baranagar Monastery - 1886-1892 (which is no more in existence) The two pillars (since renovated) at the entry gate of the monastery still standing as witness.

The Disciples of Sri Ramakrishna Deva at Baranagar Math in 1887
**Standing from Left :** Swami Shivananda, Swami Ramakrishnananda, Swami Vivekanand, Swami Premananda, Deven Majumdar, Mahendra Gupta (Shr. M), Swami Trigunatitananda, Mustafi.

**Sitting from Left :** Swami Niranjananda, Swami Saradananda, Swami Brahmananda, Swami Abhedananda.

**BARANGAR MATH SANRAKSHAN SAMITY**
(Regd. No. S / 13963 / 1973 - 74)
125/1, Pramanik Ghat Road, Calcutta - 700 036, Phone : 557 0827
Regd. Office : 37, Gopal Lal Tagore Road, Calcutta - 700 036

**श्री. म. वि. कोल्हटकर**
१६, जीवनछाया कॉलनी, सिव्हिल हॉस्पिटल समोर,
सातारा - ४१५००१ फोनः ०२१६२-२३२५०४

## 'श्रीरामकृष्ण म्हणतात' पुस्तकातून साभार

**वैद्य तीन प्रकारचे असतात – उत्तम, मध्यम आणि अधम किंवा निकृष्ट. जो वैद्य येतो नि रोग्याची नाडी पाहून "हे औषध घ्यायचं हं" असे सांगून निघून जातो, तो अधम किंवा निकृष्ट प्रतीचा वैद्य. रोग्याने औषध घेतले की नाही याची तो काहीच चौकशी करीत नाही. तसेच काही आचार्य नुसते उपदेश देतात, परंतु शिष्य त्याचे पालन करतो आहे किंवा नाही याचा ते काहीच विचार करत नाही.**

**दुसऱ्या वर्गातले वैद्य रोग्याला नुसते औषध घ्यायचे एवढेच सांगून निघून जात नाहीत तर रोगी जर औषध घेऊ इच्छित नसेल तर त्याला ते औषध घेण्यासाठी परोपरीने समजावितात. हे मध्यम प्रतीचे वैद्य. तसेच शिष्याच्या हितासाठी शिष्याला उपदेशाची नीट धारणा करता यावी व त्याप्रमाणे चालता यावे यासाठी जे आचार्य त्याला वारंवार प्रेमाने समजावून सांगतात ते मध्यम प्रतीचे आचार्य होत.**

**तिसऱ्या वर्गातले म्हणजे उत्तम वैद्य ते की जे रोगी गोडीगुलाबीने मानत नाहीसे पाहून बलप्रयोग देखील करतात. जरुर पडल्यास रोग्याच्या छातीवर गुडघे रोवून बळजबरीने त्याच्या तोंडात औषध घालतात. त्याचप्रमाणे, उत्तम श्रेणीचे आचार्य शिष्याला भगवत् मार्गावर आणण्यासाठी गरज वाटल्यास जोर जबरदस्तीदेखील करतात.**



# गुरुतत्त्व आणि श्रीरामकृष्ण

**सौ. वृषाली जयंत कुलकर्णी**, एम. फिल. - संत जनाबाई
पत्रकारिता - सकाळ, लोकसत्ता, रघुवीर समर्थ, जीवन विकास, कैवल्यमधून लेखन. अनेक कविता प्रसिद्ध, ऱ्हीदम ऑफ लाईफ कविता संग्रहाचा अनुवाद. 'मनाचे श्लोक' दर गुरुवारी, अंतरंगमधून स्तंभ लेखन, अनेक कार्यक्रमाचे सूत्र संचालन, दासबोध, ज्ञानेश्वरी समीक्षक. दर मंगळवारी दासबोधावर निरुपण, आचार्य किशोरजी व्यास प्रेरणेने रामकथेवर निरुपण. स्वामी माधवनाथ व रामकृष्ण मठ अनुग्रहित.

**'दिगम्बरो वाऽपि च साम्बरो वा त्वगम्बरो वाऽपि चिदम्बरस्थः।।**
**उन्मत्तवद्वाऽपि च बालबद्वा पिशाचवद्वाऽपि चरत्यवन्याम् ।।'**

'ईश्वरलाभाने वा ज्ञानलाभाने सिद्धमनोरथ झालेल्या पुरुषांपैकी कोणी केवळ ज्ञानरुपी वस्त्रच परिधान करुन पूर्ण नग्न अवस्थेत, कोणी वल्कले किंवा साधारण लोकांप्रमाणे वस्त्रे नेसून, कोणी वेड्याप्रमाणे, कोणी कामकांचगंधहीन बालकाप्रमाणे तर कोणी शौचाचार विवर्जित पिशाच्चाप्रमाणे पृथ्वीवर विचरण करीत असतात' या महापुरुषांचा पृथ्वीवरील अवतरणाचा हेतू मात्र एकच असतो. समस्त मानव जातीचे कल्याण ! याच हेतूने श्रीरामकृष्णांचे अवतरण झाले, 'होय या चराचरात भरलेलं चैतन्यतत्त्व मी जाणले आहे. माझ्यासह ये, ते तुलाही प्राप्त होईल' या दिव्य भावनेने जो मानवाला तिमीरांधकारातून स्वरुपाच्या प्रकाशाची वाट दाखवतो तो सद्गुरु ! ज्या माध्यमाच्या वा शरीराच्या आधाराने हा भाव प्रकट होतो ती निरनिराळी दिसत असली तरी त्यातला भाव एकच असतो, 'साधु दिसती वेगळाले, परि स्वस्वरुपी मिळाले'. जीवाला ईश्वराभिमुख करणे, त्याच्या आनंदस्वरुपाची जाणीव करुन देणे, आहे त्या अवस्थेतून त्याला उन्नत करणे आहे म्हणून ईश्वरी तत्व व गुरुतत्व अभेद आहेत.

वेदांतकारांनीसुद्धा एकमेव ईश्वराचे अस्तित्व स्वीकारुन तोच साऱ्या जीवाच्या वा जगताच्या रुपाने अभिव्यक्त झालेला आहे असे म्हणून ह्या विशेष सर्वशक्तीमान व्यक्ती नित्य, शुद्ध, बुद्ध, मुक्त ईश्वराच्या विशेष अंशापासून जन्मलेले मानले आहे, एवढेच नव्हे तर ह्या व्यक्ती लोककल्याणकारी अशा कार्यासाठी आवश्यकतेनुसार जन्म ग्रहण करीत असतात. म्हणून रामकृष्ण म्हणत असत, ''मी सरकारी माणूस, जगदंबेच्या जमीनदारीत जिथे जिथे गडबड होईल, तिथे तिथे ती थांबवण्यासाठी मला यावे लागेल. ठाकुरांनी निरनिराळ्या धर्मांची साधना करुन, पूर्णानुभूती घेतली. सगुणाच्या उपासनेबरोबर निराकाराची उपासना करुन निर्विकल्प समाधीची अवस्था सहजपणे प्राप्त झाली होती. बारा वर्षेकठोर अव्याहत साधना ! त्यामुळे त्यांचे मन भगवंताशी अनुक्षण एकरुप होते. 'मी'पणाचा लोप होऊन ते त्या 'विराट'शी तन्मयत्व अनुभवत होते आणि तरीही जगाच्या पसाऱ्यात वावरतांना जगदंबेच्या इच्छेचा आश्रय घेऊन जीवाला पारमार्थिक वाटचालीचे मार्गदर्शन करीत होते. जगदंबेने त्यांना 'तू भावमुखी रहा' असा आदेश दिला म्हणजे काय तर 'मी बोध लोप पावला तरी सतत निर्गुण भावात स्थित होऊ नको तर ज्यापासून अनंत भावाची उत्पत्ती होत असते त्या विराट विश्वमनाशी एकरुप होऊन त्याची इच्छा ती माझी, त्याचे कार्य ते माझे या भावनेतून जगताचे कल्याण कर' म्हणून ठाकुरांच्या ठायी 'तो विश्वव्यापी मी, मीच आहे' हा सोऽहं बोध सदासर्वकाळ व्यापून असे. म्हणून ते उंबरठ्यावरच्या दिव्याप्रमाणे शिष्याचे लौकीक व पारलौकीक जीवन उजळून टाकीत. ठाकुरांच्या ठायी स्पर्श करुन, बघून, नुसत्या इच्छेने, मनाचे मालिन्य दूर करुन वृत्ती ईश्वराभिमुख करण्याची शक्ती पूर्णपणे वास करीत होती. गुरुगीतेमध्ये वर्णिल्याप्रमाणे ठाकुर खरोखरच भवरोग वैद्य होते. निरनिराळ्या आध्यात्मिक भावांनी मानवी मनात घडून आलेल्या बदलांना पाहताक्षणीच ओळखून लक्षणे बघून साधकाच्या कल्याणानुरुप त्याला योग्य मार्ग दाखवीत. शिवाय साधकाचे अनिष्ट होणार नाही याकडेही बारीक लक्ष असे म्हणून विवेकानंद म्हणत, 'मनाबाहेरच्या (भौतिक) शक्तींना काही उपायाने वश करुन घेऊन एखादा अद्भूत चमत्कार दाखविणे ही फार मोठी गोष्ट नाही, पण हा जो पागल ब्राह्मण (श्रीरामकृष्ण) लोकांची मने चिखलाच्या पेंडाप्रमाणे हाताळून ती तोडून मोडून घडवीत, नुसत्या स्पर्शाने त्यांना नवीन घाट देऊन नवीन भाव भरीत ह्यापेक्षा आणखी विस्मयकारक चमत्कार मला आणखी कोणताही दिसत नाही'. 'येथे शब्द नाही शिष्यासी । हे अवघे सद्गुरु पासी ।। सद्गुरु पालटी अवगुणासी । नाना यत्ने करुनी ।।' नुसता पालटच सद्गुरु करीत नाही तर 'आपणासारीखे करीती तत्काळ' आपल्या साधनेची शक्ती देऊन गुरुदेव शिष्याचा पुनर्जन्म करीत असतात. जन्मदाते माय-बाप कर्माने मिळतात पण प्राणदाता गुरुदेव मात्र जन्मोजन्मी आपल्या शिष्याला उन्नत करीत असतो. म्हणून हा भाव शब्दाने वर्णन करता येत नाही. म्हणून ईश्वर वा सद्गुरु हा भावाचा विषय आहे. भावाशिवाय या तत्वाचे आकलन होणे कठीण. ठाकुरांच्या ठायी हे गुरुत्व शारदीयचंद्रकलेसारखे पूर्ण

विकसीत झाले होते. जगद्गुरुच्या ठिकाणी असणाऱ्या लक्षणांचा अपूर्व संगम रामकृष्णांच्या ठायी होता. निराभिमानता, दंभराहित्य, कोणालाही न दुखवणे, शांती, समचित्तता, सरलता, वैराग्य, पावित्र्य, कामत्याग, वासना त्याग, सत्यनिष्ठा, ईश्वरनिष्ठा या गुणांच्या प्रकाशाने त्यांचे जीवन तेजाळले होते. म्हणून मानवी देह धारण केलेले ईश्वराचे निस्वार्थी प्रेम म्हणजे रामकृष्ण होय !

ठाकुर म्हणत, 'गुरु म्हणजे जणूकाही ईश्वराची सखी. जोवर श्रीकृष्णाशी राधेचे मीलन होत नाही तोवर सखीच्या कामात खल नाही तसेच जोपर्यंत इष्टदेवतेशी साधकाचे मीलन होत नाही तोवर गुरुच्या कामाला खंड नाही' अशा रीतीने करुणामय गुरुदेव खऱ्या साधकाला हात धरुन अधिकाधिक उच्च भावराज्यात अग्रेसर करतात व अखेर शिष्याला इष्टदेवतेच्या समोर आणून म्हणतात, ''बघ ! हे तुझे इष्ट ! आणि शेवटी गुरु स्वतः इष्टदेवतेत विलीन होतात'. ठाकुर सांगत, 'गुरु, कृष्ण, वैष्णव, एकात तीन, तीनात एक'. म्हणून सद्गुरु हा सगळ्या अध्यात्मिक राज्याचा अत्यंत हळूवार विषय ! सगळ्या संताची वाणी गुरुपुढे नम्र होते. 'श्रीगुरुसारिखा असता पाठीराखा । इतरांचा लेखा कोण करी । राजयाची कांता काय भीक मागे । मनाचिया जोगे सिद्धि पावे । कल्पतरु तळवटी जो कोणी बैसला । काय वाणी त्याला सांगा जोजी । ज्ञानदेव म्हणे तरलो तरलो । आता उद्धरलो गुरुकृपे ।।''

नरेंद्रनाथांची रामकृष्णाशी पहिली भेट झाली तेव्हा नरेंद्राचे 'चल मन निज निकेतन' हे भजन ऐकून रामकृष्ण भावाविष्ट झाले. एवढेच नव्हे तर चार दोन गोष्टी बोलून नरेंद्राना बाजूच्या पडवीत घेऊन गेले व म्हणाले, ''मी जाणतो प्रभो, तुम्ही तेच पुरातन ऋषी, नररुपी नारायण, जीवाची दुर्गती निवारण्यासाठी पुन्हा देह धारण करुन आलात.'' ब्राह्म समाजात जाणे येणे असलेल्या निराकारवादी नरेंद्राला पहिल्या भेटीत रामकृष्ण पागल ब्राह्मण वाटले. 'तुम्ही देव पाहिला आहे का?' या नरेंद्राच्या प्रश्नाला, 'हो, मी देव पाहिला आहे. आता तुला पाहतो आहे ना त्यापेक्षा स्पष्ट....' असे निःसंदिग्ध उत्तर ठाकुरांनी दिले. याच नरेंद्रनाथांना दक्षिणेश्वरी सहज बोलता बोलता ठाकुरांनी स्पर्श केला आणि विलक्षण अनुभूतीने नरेंद्र विस्मीत झाला. 'स्वामीजी सांगत, 'ठाकुरांनी माझ्या छातीला स्पर्श करताच भिंतीसह सर्व वस्तु वेगाने फिरत आहेत, लय पावत आहेत समस्त विश्वासह माझे 'मीपण' महाशून्यात लोपत आहे'. स्वामीजी ओरडून म्हणू लागले, 'अहो काय केलत, मला आई बाप आहेत.' त्यावर ठाकूर म्हणाले, ''तर मग राहू दे, एकदम होण्याची गरज नाही.'' मग सारे पूर्वीप्रमाणे झाले. भविष्यकाळात नरेंद्राने हे मानले की या दिव्य शक्तीसमोर मन, बुद्धीची शक्ती क्षुद्र होय. आणि स्वामीजींच्या साऱ्या धारणा बदलल्या. त्यांनी रामकृष्णांना गुरुपद बहाल केलं. त्यांना कळले की हा निरक्षर पुजारी आपल्या अलौकीक त्याग, तपस्या, प्रेम, पावित्र्य यामुळे ईश्वराच्या अस्तित्वाला मूर्त रुप देऊ शकतो. यांच्या चरणाशी शरणागत होण्यातच सर्व मांगल्य आहे. त्यांचा दृढ विश्वास होता की, 'जेथे शुद्ध ब्रह्मज्ञान । आणि स्थूल क्रियेचे साधन । तोचि सद्गुरु निधान । दाखवी डोळा ।।

प्रेम, ज्ञान, कर्म, भक्ती या संबंधीचा अलौकीक प्रकाश प्रकट करुन माझे गुरुदेव मनुष्याचा जीवनमार्ग उजळून टाकील. ही नरेंद्राची श्रद्धा आहे. रामकृष्णांजवळ सखोल भावमग्नतेबरोबर सर्व सावधानता होती. निरंतर भावसमाधीत असूनही स्वतःच्या वस्तू ते कधीही विसरत नसत. अगदी माताजींनासुद्धा ते सांगत 'गाडीत सर्वात आधी चढावे व उतरताना शेवटी उतरावे, म्हणजे आपली काही वस्तू विसरली आहे का हे बघता येते.''

जर कुणी कठोर स्वभावाचे असेल तर त्यांना कोमल होण्यास सांगत व कोमल अंतःकरणाच्या शिष्याला कठोर होण्यास सांगत. एक शिष्य योगेन्द्र अत्यंत मृदु स्वभावाचे होते. एकदा ठाकुरांनी एक झुरळ पकडून योगेन्द्रला दिले म्हणाले, ''मारुन टाक'' ! पण कोमल हृदयी योगेंद्रने ते बोहर नेऊन सोडून दिल्याचे कळल्यावर ठाकुर म्हणतात, 'अरे तुला सोडायला नाही मारायला सांगितले ना? मग तू आपलेच मत का चालवतो. दुसऱ्या महत्त्वाच्या गोष्टीतही तू आपलेच मत चालवू लागला तर पश्चाताप पावशील.''

निर्विकल्प अद्वैत भावापासून तो सविकल्प समस्त प्रकारच्या भावाचा विकास स्वतःच्या ठायी दाखवून सर्व श्रेणीच्या भक्तांना आपापल्या मार्गाविषयी, परमार्थाच्या वाटचालीत मार्गदर्शन करुन अंधकारात प्रकाश, निराशेत आत्मविश्वास, संसारदुःखात अपूर्व शांती प्रदान करणारे ठाकूर सर्वांच्या भरवश्याचे विश्रांतीचे स्थान आहेत म्हणून तर त्यांना गुरुमाऊली म्हणतो ना ! जी चराचरात सामावून उरते ती माऊली ! ध्यान करताना आधी मनाला धुवून टाकायला सांगत. केर न् मळ विचार, वासना, स्वच्छ करुन मनाच्या गाभाऱ्यात इष्टदेवतेला बसवावे अशी कल्पना करावी. अशा छोट्या छोट्या पण आशयगर्भ गोष्टी साधकांना सांगून अध्यात्मिक जगताची ओळख करुन देत.

'सद्गुरुंच्या ध्यानाचे महत्त्व पटवताना म्हणत, 'गायीचा कळप पाहताच गुराख्याची आठवण येते. मुलाला पाहताच बापाची आठवण येते. आपले मन अनेक गोष्टींमध्ये विखुरलेले असते. गुरुदेवाचे चिंतन केल्यास हे विखुरलेले मन गुरुपादपद्मी जमा होईल आणि ईश्वरचिंतन केल्यास ध्यान जमू लागेल. ह्याच जन्मात ईश्वर लाभ करुन घेईल असा जोर असावा. साधना मनात, वनात व कोनात करावी की जेणेकरुन लोकांताचा उपद्रव होणार नाही. यासारख्या बाबी साधकांना सांगून सावध करीत असत. संन्यासी भक्तांसाठी त्यांनी कठोर नियम सांगितले. संन्याशाने स्त्रीचे चित्रही बघू नये. त्यांच्यासाठी कामिनी कांचन त्यागच श्रेष्ठ ! पण गृहस्थांसाठी मात्र म्हणत, ''किल्ल्याच्या आत राहून युद्ध करावे. चिखलात राहणाऱ्या पाखाल माशाप्रमाणे संसारात निर्लिप्त असावे. संन्यस्त असो वा गृहस्थ आत्मस्थ होणे हेच खरे जीवनाचे ध्येय ! यासाठी कर्माविण क्षणभरही कुणी राहू शकत नाही. हीच कर्म ठाकुरांनी 'शिवभावे-जीवसेवा' या महान बोधात विलीन करुन ईश्वराकडे जाणारी पाऊलवाट प्रकाशाची करुन टाकली.

त्यांच्यातील है अलौकिकत्व हृदयाला स्पर्श करते तेव्हा 'हे गुरो, तुम्ही कदापी माणूस नाही, तुम्ही तोच!' ह्या अपूर्व भावाने हृदय भारुन जाते. म्हणून समर्थांना सद्‌गुरुंना वर्णिताना परीस, समुद्र, मेरु, आकाश, वसुंधरा, सूर्य, पाणी, कल्पतरु, अमृत अशा अनेक उपमा शोधूनही वर्णन करता आले नाही. या सर्वाहून सद्‌गुरु श्रेष्ठ आहे. 'म्हणोनि सद्‌गुरु वर्णवेना । हे गे हेचि माझी वर्णना । अंतरस्थितीची या खुणा अंतर्निष्ठ जाणती ।। म्हणत समर्थ मौन होतात.

एक जानेवारीला काशीपूरच्या उद्यानात दुपारी तीन वाजता रामकृष्ण खाली बगीच्यात आले. त्यांच्या गळ्याच्या आजाराला बगिच्यातील हवा शुद्ध असल्याने हिताचे राहील असे डॉक्टरांनी सुचवल्याने काशीपुरला बगीच्यात ठाकुरांचे वास्तव्य आहे. दुपारी सारे संन्यस्त भक्त वरती ठाकुरांची खोली, बिछाना वगैरेची स्वच्छता करताहेत, तर कुणी रात्री साधना केल्याने आराम करताहेत. बगीच्यात गृहस्थ भक्तही वर्षाच्या १ल्या दिवशीची सुट्टी म्हणून ठाकुरांच्या दर्शनाला आले आहेत. दुपारी रामकृष्ण एकाएकी बगीच्यात खाली आले, आणि गिरीशांना म्हणाले, ''तुम्ही माझ्यासंबंधी काय पाहिले आहे म्हणून (मी अवतार आहे) ज्याला त्याला सांगत सुटता. अत्यंत ईश्वरानुराग व ठाकुरांवर कमालीचा विश्वास असणारे गिरीशचंद्र अत्यंत गद्‌गद होऊन म्हणाले, ''व्यास वाल्मिकी ज्याचे वर्णन करतांना अखेर थकले त्याबद्दल मी आणखी काय बोलू? '' हे ऐकून रामकृष्ण समाधीमग्न झाले. सारे गृहस्थ भक्त ठाकुरांची पदधुली घेऊ लागले. एवढ्यात रामकृष्ण अर्धवाह्य अवस्थेत येऊन अत्यंत सस्मित वदनाने सर्वांना बघून म्हणाले, '' तुम्हाला आणखी काय सांगू, तुम्हाला सर्वांना चैतन्य लाभो!''. ज्यांना ज्यांना ठाकुर स्पर्श करीत त्यांचे अपूर्व भावांतर होऊ लागले. कुणी रडू लागले, कुणी हसू लागले, तर कुणी एकाएकी ध्यानमग्न झाले. संसारात त्रिविध तापांनी पोळलेल्या जीवांसाठी ठाकूर करुणाघन होऊन बरसले. सारे जण एका दिव्य आनंदात चिंब भिजले. ह्या कृपेचे वर्णन कसे करावे. 'नाना सद्‌विद्येचे गुण । याहीवरी कृपाळूपण ।। हे सद्‌गुरुचे लक्षण । जाणिजे श्रोती ।। हेच खरे !

जगात मंत्रगुरु, तंत्रगुरु, राजगुरु आणि अनेक दांभिक गुरु पैशाला तीन मिळतात. ''ऐसे गुरु अडक्याचे तीन । मिळाले तरी त्यजावे ।। जे करामती दाखविती । तेहि गुरु म्हणेती । परंतु सद्‌गुरु नव्हे ती । मोक्षदाते ।।'' ज्याच्याजवळ गेल्याने शांत वाटते, समाधान वाटते, जो आत्मज्ञानाने युक्त आहे, भक्ती वैराग्य संपन्न आहे त्याचे मुख्य लक्षण, 'आधी पाहिजे विमळ ज्ञान । निश्चयाचे समाधान । स्वरुपस्थिती ।। तो खरा सद्‌गुरु असतो.

'अहं ब्रह्मास्मि' म्हणजे मीच ते परमात्मरुप आहे आणि साऱ्या विश्वात भरुन राहिलो आहे. याची प्रचिती देतो तो सद्‌गुरु. म्हणून आपण बोलतांना सद्‌गुरु ह्या विशिष्ट व्यक्तिविषयी बोलत नसून त्यातल्या गुरुतत्वाबद्दल बोलत असतो. आपल्या अध्यात्मिक प्राचीन परंपरेत अनेक सद्‌गुरु देहरुपाने वावरले आणि आपले जीवीत कार्य संपताच देहत्याग करुन अनंतात विलीन झाले. त्यांनी देहत्याग केला तरी गुरुतत्व अबाधीत राहते. ते देहाचे माध्यम करुन सतत जीवोद्धाराचे कार्य करीत राहतात. म्हणून भगवंत म्हणतात, ''यदा यदा हि धर्मस्य । ग्लानिर्भवती भारत । अभ्युत्थानम् अधर्मस्य । तदात्मानं सृजाम्यहम । परित्राणाय साधुनां । विनाशायच दुष्कृताम । धर्मसंस्थापनार्थाय । संभवामि युगे युगे ।। आपल्या सद्‌शिष्यांच्या उद्धारासाठी 'गुरुतत्व' नव्या माध्यमातून प्रकटते त्यावेळी सर्व सद्‌गुरुंची शक्ती त्यांच्या पाठीशी असते म्हणून दैवी गुणांचा मनोज्ञ संगम सद्‌गुरुठायी बघता येतो. 'अवघे मिळोनी एकचि झाले । देहतीत वस्तू ।। हे खरे सद्‌गुरुचे स्वरुप किंवा 'गुरुतत्व' होय ! म्हणून अजूनही ठाकूरांची ती व्याकूळ साद वातावरणात उमटते आहे. 'या रे या, तुम्ही सारे कुठे आहात, तुम्हाला बघायला माझे प्राण व्याकुळ झालेत.'' या सादेला प्रतिसाद देत त्यांच्या विचाराचा, कृपेचा प्रसाद घेऊन कृतार्थ व्हावे. त्यांच्या विलोभनीय गुणांचे चिंतन करीत अंतर्मुख व्हावे आणि 'मी कोण'? हे जाणण्याचा त्यांच्याच कृपेने प्रयत्न करावा. अंतर्स्थितीच्या खुणा जाणून घेत, शरणागत होऊन म्हणावे, ''तैसे श्रीगुरुचे महिमान । आकळिते के साधन ?

**हे जाणोनि मिया नमन । निवांत केले ।।**

**सौ. वृषाली जयंत कुलकर्णी**
५, साईकुंज अपार्टमेंट, प्लॉट नं.४१, भोईर कॉलनी,
गोलांडे बागेजवळ, चिंचवड, पुणे - ४११०३३



# गृहस्थ भक्तांच्या दृष्टीने – श्रीरामकृष्ण

**डॉ. अनंत अडावदकर**, एम.ए.(मराठी), पीएच.डी. – विनोबांच्या साहित्याचा अभ्यास. प्राध्यापक, प्राचार्य सेवादल महिला महाविद्यालय, नागपूर मधून निवृत्त. केंद्र संचालक आकाशवाणी, नागपूर. बालवाङमय, कथा, वैचारिक लेख, समीक्षा इ. चारशे लेख प्रकाशित. जीवन विकास नागपूर मासिकाचे संपादक, मठातील संपादन व संकलन, अनुवाद इ. कामात सहभाग. अनुवादित ६ ग्रंथ प्रकाशित, ४ प्रकाशनाच्या वाटेवर. गांधी विचार, विनोबा, श्रीरामकृष्ण व विद्यापीठात आमंत्रित, स्वामी यतीश्वरानंद यांचेकडून मंत्रदीक्षा प्राप्त.

याठिकाणी आपण चिंतनासाठी घेतलेला विषय, पुन्हा एकदा जर पाहिला, तर शीर्षकातल्या प्रत्येक शब्दाचे एक स्वतंत्र वैशिष्ट्य आपल्या लक्षात येते. अर्थात् महत्त्वाचा शब्द 'श्रीरामकृष्ण' हाच आहे; व तोच आहे मुख्य चिंतनविषय देखील! मात्र त्या विषयाचे आकलन, हे वाटते तसे सहजशक्यतेने पूर्ण होणारे नाही. युगावतार हे आपापले युगप्रयोजन घेऊन येथे अवतरत असतात. मात्र आपण सामन्यलोक त्यांची औपचारिक पूजा केवळ बांधून त्यांचा जणू मूर्ती होऊन बसलेला नुसता 'देव' करुन टाकतो. मग दररोज फुले, पूजा, आरती, प्रसाद, स्तोत्रगायन इ. इ. केवळ उपचार पूर्ण केले की सामान्य माणसाची भूमिका भक्त म्हणून जणू संपते. ह्यात खूप काही चुकते असे नाही. मात्र त्यामुळे युगावताराचे युग प्रयोजन पूर्ण होण्याची प्रक्रिया फारशी पुढे सरकत नाही. माणसाच्या भक्तीमय अशा 'जीवना'चा 'विकास'ही इष्ट रीतीने होत नाही. तेव्हा ह्यावर उपाय काय?

त्यावर उपाय असा की युगावताराची नुसती अशी पूजा बांधून चालणार नाही. तर त्याच्या ''जीवन-संदेशा'तून त्याचे प्रयोजन अगोदर नीटपणे समजून घ्यायला हवे. ते योग्य रीतीने समजल्यावर त्यानुसार योग्य असे आचरण करायला हवे. त्या तत्त्वांच्या आधारे अवतारांचे कालानुरुप असे अनुसरण भक्त असणाऱ्या माणसाने यथाशक्ती केले, तरच ती अवताराची उचित अशी पूजा होऊ शकेल. तेव्हा अवतारांच्या आकलनात जसे 'अर्चना मूल्य' महत्वाचे असते, तसे, (नव्हे त्याहीपेक्षा अधिक) महत्त्वाचे असते 'अनुसरण मूल्य' ! आणि ह्या दोन्हींसाठी आवश्यक असते – ते म्हणजे अवतारांच्या 'जीवन-संदेशा'चे सखोल अध्ययन !! म्हणजेच 'अध्ययन मूल्य'!!! खरे म्हणजे अर्चना, अध्ययन आणि अनुसरण हे तीनही घटक परस्परांना पूरकच असतात.

मात्र खरी अडचण असते – ती आपापल्या मर्यादांची ! आपण जेथे असतो, जसे असतो, जेवढे असतो, तेथूनच आपण अवतारांना आपापल्या आकलनाच्या कक्षेत घेऊ शकतो. ते आपले तसे आकलणे कधी संपूर्ण असूच शकत नाही. तो प्रयत्न म्हणजेच केवळ असतो एक दृष्टिकोन! अशा विविध दृष्टिकोनांना एकत्र करुन (अंशा-अंशांच्या बेरजेने) त्या 'पूर्णा'चे, 'पूर्ण वाटू शकेल' इतपत आकलन शक्य होऊ शकते. तेव्हा आपण प्रत्येकाने आपला हा अंशाला पूर्ण करायचा वाटा प्रमाणिकपणे उचलायला हवा.

सध्या आपला हा वाटा 'गृहस्थ भक्त' म्हणून आपल्याला उचलायचा आहे. त्यातही पहिला शब्द 'गृहस्थ' हा अगोदर येतो. त्या शब्दाचा अर्थ तसा आपण सारेच चांगला जाणतो. मात्र, नेहमीच्या, वापरुन बोथट झालेल्या अर्थापेक्षा आणखी वेगळ्या अशा अर्थछटा येथे ह्या शब्दाला लाभतात. 'श्रीरामकृष्णांच्या नावाने सुरु होऊन शंभर वर्षांपासून पिढ्यान्‌पिढ्या चालत आलेली 'श्रीरामकृष्ण संघ' (मठ+मिशन मिळून झालेली) ही संस्था प्रामुख्याने साधूसंन्यासी लोकांची म्हणूनच ओळखली जाते – आदरिली जाते. स्वतः श्रीरामकृष्णांचे – 'श्रीरामकृष्ण' हे नावही त्यांच्या श्रीगुरुंकडून त्यांना लाभलेले संन्यासनामच आहे. त्यांचा वारसा लाभून ते नाव अजरामर करणारे त्यांचे शिष्योत्तम – युगाचार्य 'स्वामी विवेकानंदही' ('योद्धा' असले तरी) संन्यासी म्हणूनच सर्वत्र मानले जातात. तेव्हा त्या पार्श्वभूमीवर कदाचित् 'गृहस्थ' हा शब्द येथे 'गौण' ठरण्याची क्वचित शक्यता वाटते.

मात्र, स्वतः श्रीरामकृष्णांना तसे वाटत नसावे. त्यांना अर्थातच हे चांगले ठाऊक होते की, अध्यात्माच्या मार्गावर संन्याशांची संख्या गुणवत्तेने प्रबल असली तरी अंकांनी गृहस्थापेक्षा नेहमी कमीच असते. पृथ्वीच्या पाठीवर, त्यातही आपल्या भारतवर्षात साधु-संन्याशांनी अध्यात्माचे क्षेत्र लक्षणीयदृष्ट्या जागृत आणि गतिमान ठेवलेले आहे. भारतीय संस्कृतीतील चार पुरुषार्थ आणि चार आश्रमांच्या संकल्पनांमध्ये 'गृहस्थ' नामक जी अवस्था आहे, तिचे स्थान शरीरातील पाठीच्या कण्यासारखे आहे. 'धर्मा'च्या मूळ अधिष्ठानापासून 'मोक्षांच्या' अंतिम ध्येयाकडे जाताना 'अर्थ' व 'काम' या दोनमधल्या पायऱ्या अपरिहार्यपणे ओलांडाव्याच लागतात. त्या पार करणे तसे सोपे नसते. त्या कठीण पायऱ्या एकदम (न थबकता – उडी मारुन) ओलांडून फार थोड्या शक्तीशाली व्यक्तीच पुढे सरळ व सहजतेने जाऊ शकतात. मात्र बहुसंख्य व्यक्ती, सामान्यतः या धर्माधिष्ठित मार्गात अगोदर थबकून जातात मग 'गृहस्थ' नामक आश्रमाचा आधार घेतात. नंतर यथाशक्ती हळूहळू पुढे

पुढे मार्गस्थ होतात. पुढे काय होते? तर अशा गृहस्थाश्रमी मंडळींचाच 'आश्रय' महत्वाचा ठरतो. त्यामुळे अन्य 'आश्रमा'त असलेल्या व्यक्तींनाही आधार लागतो. त्याचमुळे गृहस्थाश्रमाला 'ज्येष्ठ' आश्रम हे स्थान देण्यात येते.

**''यस्मात् त्रयोप्याश्रमिणो ज्ञानेन अन्नेन चान्वहम् ।**

**गृहस्थेनैव धार्यन्ते तस्मात् ज्येष्ठाश्रमो गृही ।।''** (मनस्मृती ३-७८)

म्हणजे - ''सर्व आश्रमांपेक्षा गृहस्थाश्रम ज्येष्ठ आश्रम आहे.... कारण सर्व आश्रमातील लोकांना अन्न आणि विद्या एकटा गृहस्थाश्रमच देतो, अन्य कोणताही नाही.'' (संदर्भ : स्वामी रंगनाथानंद 'गृहस्थांचे आध्यात्मिक जीवन', अनुवाद : प्रा. श्री. मा. कुलकर्णी, प्र. रामकृष्ण मठ, नागपूर, प्र. आ. २०००, पृ. क्र. ५)

तेव्हा अशा महत्त्वाच्या आश्रमाला डावलून कुणीही अवतार पुढे कसा जाईल? त्यामुळेच याही युगातील अवतार, प्रभु श्रीरामकृष्ण हे अनेकदा विवाहाच्या व गृहस्थांच्या बद्दल प्रतिकूल बोलल्यासारखे वाटत असले तरी त्यांनी प्रत्यक्षात 'गृहस्थाश्रमाची' दखल गांभीर्याने घेतली आहे. त्यांच्या जीवनातील प्रत्येक घटना आपण जर नीट अभ्यासून पाहिली, तर त्यामागील नेमका अर्थ आपल्या लक्षात येतो. त्यांचा स्वतःचा 'विवाह' हा देखील एक अर्थपूर्ण प्रसंगच कसा आहे; हे समजून येते.

वास्तविक संन्यस्तवृत्तीच्या श्रीरामकृष्णांवर त्यांच्या जीवनात कोणतीही गोष्ट त्यांच्या मनाविरुद्ध कुणालाही लादता येत नसे. त्यामुळे त्यांचा विवाह देखील त्यांच्यावर कोणीही लादलेला नव्हता तर तो त्यांनी स्वतः जाणिवपूर्णक स्वीकारला होता.

प्रत्यक्षात घडले असे की, त्यावेळी श्रीरामकृष्णांच्या कठोर तपस्येचा काळ संपून भक्तीच्या दिव्योन्मादाची अवस्था सुरु झाली होती. दक्षिणेश्वरच्या काली मंदिरात पूजा करीत असताना त्यांचे वागणे- अगदी पूजा करणे इत्यादी प्रचलित पद्धतींपेक्षा वेगळे वाटेल असे होऊ लागले. ती विलक्षण पूजा समजून घेणे अनेकांच्या आवाक्याबाहेरचे काम होते. त्यामुळे त्यांचे ते वागणे म्हणजे बहुतेकांना 'वेडाचा प्रकार' वाटू लागला. सहाजिकच त्यासाठी मग वेगवेगळे मार्ग चोखाळणे सुरु झाले. त्यातले औषोधपचारांचे वगैरे मार्ग, व्यर्थ ठरल्याने त्या रोगाकडे पाहाण्याचा प्रकारही मग बदलला. कित्येकांना तो रोग म्हणजे 'तारुण्याची गरज' असल्याचे वाटू लागले, आणि सर्वसाधारणाच्या बाबतीतला ठरलेला त्यावरचा उपाय- 'विवाह'-हा करुन पाहण्याच्या सूचना बळ धरु लागल्या. त्यासाठी हालचाली सुरु होऊन, आधी श्रीरामकृष्णांना आपल्या गावी-कामारपुकुरला नेण्याचे ठरले. तेथे गेल्यावर त्यांच्यासाठी अनुरुप वधूचा शोध सुरु झाला. हे सारे प्रथम जरी श्रीरामकृष्णांच्या नकळत घडत होते, तरी नंतर त्यांच्या कानावर, त्या साऱ्या गोष्टी पडत होत्याच. तेव्हा कुठे काही जुळत नाही अशी एक वेळ आली. त्यावेळी मग स्वतः श्रीरामकृष्णांनीच सांगितले की, ''इकडे तिकडे फिरण्याची आता काही गरज नाही. जयरामवाटील जा, अमूक अमूक ठिकाणी अगदी 'काडी बांधून' ठेवली आहे.'' - म्हणजे ''माझ्यासाठीच एक मुलगी जन्माला आली आहे.'' आणि नंतर तरुण गदाधर (श्रीरामकृष्णांचे संन्यासापूर्वीचे नाव) व बालिका सारदा या उभयतांचा त्यावेळच्या रुढ पद्धतीप्रमाणे विवाह पार पडला. आपल्या भाषेत ''दोनाचे चार हात झाले.'' श्रीरामकृष्ण 'हे गृहस्थ' बनले. अर्थात् बालिका सारदेचे वय लक्षात घेऊन पहिला 'गृहप्रवेश' वगैरे औपचारिक भाग पूर्ण झाल्यानंतर काही काळासाठी तिची रवानगी पुन्हा जयरामवाटीला, म्हणजे माहेरी, करण्यात आली. श्रीरामकृष्णही दक्षिणेश्वरला कालीमंदिरात गेले.

काळ पुढे सरकत होता. मध्यंतरीच्या काळात पुन्हा त्या नवदांपत्याची भेट कामारपुकुर येथेच झाली. त्यावास्तव्यात श्रीरामकृष्णांनी बालिका सारदेला पती या नात्याने काही व्यवहारीक वाटतील अशा प्रंपचातील गोष्टीचे ज्ञान करुन दिले. घरातील कामे कशी करावीत, घरी कसे राहावे, कसे वागावे, माणसे कशी ओळखावी, वडिल, धाकटे पाहून वागण्यातील आदर-प्रेम इत्यादींचे तपशील कसे लक्षात घ्यावे, हे सारे शिकविले. अगदी समईत वात कशी ठेवावी, इथपासून तर देवाच्या पूजेपर्यंतच्या गोष्टी त्यावेळी त्यांनी त्यांना समजावून दिल्या.

पुढे सारदादेवी वयाने मोठ्या झाल्यानंतर त्यांना दक्षिणेश्वरला आणण्यात आले.... आणि एक नवा अध्याय दोघांच्याही जीवनात सुरु झाला. त्यांचे एकत्र राहणे सुरु झाले. पत्नी या नात्याने श्रीसारदा देवींनी श्रीरामकृष्णांची सारी कामे स्वतःकडे घेऊन त्यांची सेवा करणे सुरु केले. पती म्हणून स्वतः श्रीरामकृष्णांनी त्या सगळ्यांना सहर्ष मान्यता दिली. एवढेच नव्हे तर स्वतः पुढाकार घेऊन सारदादेवींच्या शयनाची व्यवस्था आपल्या शय्येजवळ करुन घेतली. मात्र प्रत्यक्षात रात्रीच्या समयी एकत्र आल्यानंतर काय घडले? तर स्वतःला विसरुन श्रीरामकृष्ण समाधी अवस्थेत निघून गेले. असे वारंवार घडू लागले. श्रीसारदादेवी हे पाहत आणि झोपेच्या स्वाधीन होत. एके दिवशी श्रीरामकृष्णांनी आपल्या मनालाच प्रश्न केला. स्वतःच्या बाजूला झोपलेल्या सारदादेवींकडे बोट करुन ते म्हणाले, ''मना, याचेच नाव स्त्री देह. लोक याला पराकाष्टेची आस्वाद्य अशी भोग्य वस्तू समजत असतात. त्याचा भोग घेण्यासाठी सदासर्वदा आतुर असतात. परंतु त्याचे ग्रहण केल्याने देहातच आबद्ध राहावे लागते. सच्चिदानंद ईश्वराचा लाभ करुन घेता येत नाही. मना... खरं सांग तू हे ग्रहण करु इच्छितोस की तुला ईश्वर हवा आहे?.... स्पर्श करण्यास उद्यत होताक्षणीच त्यांचे मन कुंठीत होऊन एकाएकी समाधीमार्गे.... विलीन होऊन गेले.'' (संदर्भः श्रीरामकृष्णलीलाप्रसंग, प्रथम भाग, प्रथम आवृत्ती, १९६९, पृष्ठ ४२१). ही झाली पतीची बाजू! पत्नीचे काय? तेव्हा ''एक दिवस श्रीरामकृष्णांनी श्रीमाताजींना विचारले की, 'तुम्ही काय मला संसारात ओढायला आला आहात?' त्यावर श्रीमाताजींनी अगदी स्पष्ट आणि निश्चियपूर्वक उत्तर दिले, ''नाही, मी कशाला तुम्हाला संसारात ओढू? मी तर तुमच्या इष्ट प्राप्तीत तुम्हाला मदत करायला आले आहे.''.... एक अत्यंत अनपेक्षित पण अलौकिक उत्तर!

हो, ते सारे अलौकिकच होते. युगावतार श्रीरामकृष्णांच्या युग प्रयोजन कार्यात 'गृहस्थाश्रमाचा' हा असा 'आदर्श' उभा करण्यासाठी, त्यांच्या सहधर्मिणी युगमाता श्रीसारदादेवींची भूमीका तितकीच मोलाची होती. हेच येथे लक्षात येते.

मर्यादापुरुषोत्तम प्रभू श्रीरामचंद्राच्या अवतारातही भगवती श्री सीतादेवींचा सहभाग असाच अत्यंत महत्वपूर्ण होता, नाही का? मग त्याच साऱ्यांची केवळ पुनरावृत्ती करण्यासाठी प्रस्तुत युगात श्रीरामकृष्ण व श्रीसारदादेवींचे आगमन होते का? मुळीच नाही! नुसती पुनरावृत्ती करुन नव्या युगाचे प्रयोजन थोडेच साधणार?

ते युग केव्हाच संपले. त्याच्या कितीतरी पुढे आता काळ निघून आला आहे. त्यावेळी एका भोगासक्त रावणाला ठार करुन कार्य पूर्ण झाले. एका शूर्पणखेचेच नाक कापले गेले. आता विज्ञान-तंत्रज्ञानाच्या विकासाने साऱ्याच मानवांना भोगाची दारे सताड उघडून दिली आहेत. आताचा रावण बाहेर व्यक्त रुपात फारसा कुठे दिसत नाही. तर तो सूक्ष्मरुपाने अनेकानेक पुरुषांच्या मनात दडून आतमध्ये बसला आहे. शूर्पणखेनेही आता आपल्या वासनांची प्रगट रुपे सोडून सूक्ष्म रुपाने ती कितीतरी स्त्री देहांमधून सूक्ष्मरुपात झाकून ठेवली आहे त्यामुळे श्रीरामचंद्रांची एक पत्नीव्रताची मर्यादा आणि श्री सीतामाईचे आपल्या पतीला देव मानणे हे सारे महत्त्वाचे असूनही तेवढे पुरेसे नाही वाटू शकत. तेव्हा थोडे त्याच्या पुढे जाऊन नवा असा गृहस्थाश्रमाचा आदर्श माणसासमोर या युगातही प्रत्यक्षात येणे आवश्यक होते. ती काळाची गरज होती. ती युगाची गरज होती.

आता देहासक्तीचे सूक्ष्मरुप असलेले मनातील रावण व शूर्पणखा, जर नष्ट करायचे असतील तर गृहस्थाश्रमातील पती-पत्नींना, मनाच्याही वर उंच जाऊनच 'आत्मा'रुपात एक व्हावे लागेल. म्हणजे काय? हे शक्य असते? कसे? हो, तेच प्रत्यक्ष आचरुन दाखविले आहे, युगावतार श्रीरामकृष्ण आणि युगमाता श्रीसारदादेवींनी ! त्यासाठी झाली होती ती सुप्रसिद्ध षोडशीपूजा !! प्रभू श्रीरामकृष्णांनी आपली पत्नी श्रीसारदादेवी यांची, त्यांना प्रत्यक्ष जगदंबा मानून, केलेली पूजा!!!

या पूजेचे वर्णन तुम्ही-आम्ही कसे बरे करु शकू? श्रीरामकृष्ण विवेकानंदांचे मराठी सारस्वतामधील अधिकृत भाष्यकार, 'जीवनविकास' मासिकाचे संस्थापक संपादक पूज्यपाद स्वामी शिवतत्त्वानंद यांच्या शब्दांचे बोट धरुनच त्यासाठी चालवे लागेल. चला तर आपण प्रत्यक्षच पाहू :

''पुण्यधाम दक्षिणेश्वर येथील कालीवाडी. जगदंबेच्या त्या निवासस्थानी शुचिगंभीर वातावरण निर्माण करीत जवळूनच वाहत आहे - मुरारिचरणच्युता, ब्रह्मवारिमयी, तरलतरंगा भगवती गंगा. इ.स. १८७३ साल. ग्रीष्म ऋतूचे दिवस. ज्येष्ठ मास चालू होता. आज अमावास्या. फलहारिणी कालीपूजेचा पवित्र दिवस. साहजिकच दक्षिणेश्वरच्या कालीवाडीत सर्वत्र उत्सवाचे प्रसन्न वातावरण दरवळत होते...''

''...श्रीरामकृष्णांनी जगन्मातेची पूजा करण्याच्या इच्छेने आज विशेष तयारी चालविली आहे. परंतु अत्यंत विस्मयाची गोष्ट ही की, ती तयारी कालीमंदिरात न होता, श्रीरामकृष्णांच्या आदेशानुसार, कुणाला नकळत त्यांच्या स्वतःच्या राहत्या खोलीतच करण्यात येत आहे. पूजा समयी देवीला आवाहन करुन तिला बसावयास द्यावयाचे आसन, पूजकाच्या आसनाच्या उजव्या बाजूस ठेवण्यात आले. जगन्मातेच्या पूजेची समस्त तयारी झाली...

''सूर्यनारायण अस्ताचलास गेला. मावळत मावळत दिवस हळूहळू संध्येत आणि संध्या रात्रीत लीन झाली. अवसेचा निःशब्द गूढ अंधःकार घनीभूत होऊ लागला. सधन तिमिराची स्पंदने जाणवू लागली. रात्री नवाचा सुमार.

भगवान श्रीरामकृष्णांनी स्वतःच्या लीलासहधर्मिणी श्रीसारदादेवी यांना पूजा समयी आपल्या खोलीत येण्याचा आधीच आदेश देऊन ठेवला होता. तद्नुसार परम आराध्या श्रीसारदादेवी (श्रीमाताजी) श्रीरामकृष्णांच्या खोलीत येऊन उपस्थित झाल्या. श्रीरामकृष्ण पूजेस बसले. पूजेची पुष्पचंदनादी समस्त सामग्री मंत्रोच्चाराने शुद्ध करुन घेतल्यानंतर पूजेस सुरुवात झाली...

भगवान श्रीरामकृष्णांनी जवळच पूजा अवलोकीत उभ्या असलेल्या स्वतःच्या धर्मपत्नी श्रीसारदादेवींना, जगन्मातेसाठी पुष्पचंदनादिकांनी भूषित करुन ठेवलेल्या आपल्या उजव्या हाताकडील आसनावर बसण्याची खूण केली. पूजा बघता बघता श्रीसारदादेवींचे बाह्यजगताचे भान एव्हाना अर्धवट लोपून जाऊन, त्यांचे मन उच्च दिव्य अवस्थेत प्रविष्ट झाले होते. श्रीरामकृष्णांनी केलेली खूण बघताच मंत्रमुग्धाप्रमाणे त्या श्रीरामकृष्णांनी दाखविलेल्या देवीच्या आसनावर जाऊन बसल्या; त्या देवमानवीचे मुख, उत्तरेस होते आणि तिच्या अद्भूत पुजाऱ्याचे, त्या लीलामानवाचे मुख पूर्वेस होते.

जवळील कलशातील मंत्रपूत जलाने श्रीरामकृष्णांनी श्रीसारदादेवींना यथाविधी पुनःपुनः पुनः पुनः अभिषिक्त केले. पावन मंत्रामागून मंत्र उच्चारुन यथासांग पूजा चालू झाली. होता होता श्रीरामकृष्णांनी प्रार्थना मंत्र उच्चारले, ''हे बाले ! हे सर्वशक्तीच्या अधीश्वरी, हे त्रिपुरासुंदरी, सिद्धीचे दार उघड. ह्या (सारदादेवींच्या), शरीरमनाच्या आश्रयाने आविर्भूत होऊन सर्वांचे कल्याण कर...'' त्यानंतर श्रीसारदादेवींच्या अवयवांवर यथाविधी मंत्रन्यास करुन श्रीरामकृष्णांनी त्यांची जिवंत देवी अशा ज्ञानाने षोडश उपचारांनी पूजा केली. अखेर त्यांना नैवेद्य दाखवून, निवेदित वस्तूंचा थोडाथोडा अंश त्यांच्या मुखात घातला. आणि... बाह्य जगताचे भान पूर्णतया लोपून सारदादेवी समाधीमग्न झाल्या. श्रीरामकृष्णही बाह्य जगाच्या अर्धवट जाणिवेत मंत्र उच्चारता उच्चारता समाधिमग्न होऊन गेले.

जो एकमेवाद्वितीय आत्मा श्रीरामकृष्णांच्या, सारदादेवींच्या आणि समस्त जगाच्या रुपाने विलसत होता, देहबोध संपूर्णपणे ओलांडून, शरीरमनाच्या सर्व सीमा उल्लंघून, श्रीरामकृष्ण आणि श्रीसारदादेवी, उभयता त्या आत्म्यात पूर्णपणे विलीन होऊन आत्मस्वरुपी-स्व-स्वरुपी मीलित, एकीभूत झाले... अतींद्रिय सत्याचा इंद्रियगम्य दृष्टांत !

आधुनिक युगातील आम्हा संदेहप्रिय, प्रात्यक्षिक पिसाटांना ते आकळता यावे म्हणून एक महान युग प्रयोजनाच्या पूर्तीसाठी – प्रत्यक्ष जीवनात ते अनुष्ठून दाखविले – भगवान श्रीरामकृष्णदेव आणि भगवती श्रीसारदादेवी यांनी !'' (संदर्भः आमची मुख्य समस्या आणि श्रीरामकृष्ण – विवेकानंद, ले. स्वामी शिवतत्वानंद, प्र. रामकृष्ण मठ, नागपूर, प्रथम आवृत्ती १९७५, पृष्ठे ५४ ते ५७)

अशा रीतीने पूजा संपन्न झाल्यानंतर हळूहळू त्या उभयतांना बाह्य जगाचा बोध परत येत असता, श्रीरामकृष्णांनी श्रीसारदादेवींच्या चरणी ''सर्व मंगल मांगल्ये'' हा श्लोक म्हणून प्रणाम केला. परस्परांनी परस्परांना वंदन केले. श्रीरामचंद्र–सीतामाईंच्या अवतारात दांपत्य जीवनाचा एक आदर्श आपण पाहिला होता. 'पतीला देव मानणे' ही त्यातील एक महत्त्वाची आदर्श भूमिका होती. आता त्या भूमिकेला, ह्या आचरणाने 'पत्नीदेवता' मानल्याने एक प्रकारे पूर्णत्व प्राप्त झाले. पतीनेही पत्नीचा आदर केल्याने आदर्शाचे वर्तुळ आता जणू पूर्ण झाले.

वयाचा आधार घेऊन देखील श्रीरामकृष्णांनी श्रीमाताजींना एकेरी संबोधनाने कधीही संबोधिले नाही – 'अगं' 'तुगं' म्हटले नाही. ते नेहमीच माताजींना आदरार्थी बहुवचनाने – 'अहो' 'जाहो' म्हणूनच बोलत असत. त्याचमुळे 'श्रीरामकृष्णवचनामृता'च्या पहिल्या काही अध्यायात लेखक श्रीमास्तर महाशय जेव्हा आपल्या पत्नीबद्दल बोलताना ''स्वभाव तसा चांगला आहे, पण अज्ञानीच'' असे शब्द काढतात; त्यावर 'श्रीरामकृष्ण (तिटकाऱ्याने)'' म्हणतात, ''अन् तुम्ही मात्र ज्ञानी ! असंच ना?'' दांपत्य जीवनातील पतीच्या पुरुषी अहंकाराबद्दलची ही श्रीरामकृष्णांनी केलेली कानउघाडणी, श्री मास्तर महाशयांना बरोबर समजते. ते लिहून ठेवतात की, ''अहंकाराला परत एक जास्तच जोराचा धक्का बसला''. (संदर्भः 'श्रीरामकृष्ण वचनामृत' प्रथम भाग, आवृत्ती दुसरी १९५९, प्र. रामकृष्ण मठ, अध्याय दुसरा, पृष्ठे ८+९).

अध्यात्माच्या मार्गावर वेगाने वाटचाल करु इच्छिणाऱ्या व्यक्तींनी, विवाहाची पायरी शक्य तर टाळावीच असे, 'श्रीरामकृष्ण वचनामृता'च्या आरंभी लेखकाशी बोलताना श्रीरामकृष्ण स्पष्टपणे सांगतात. मात्र जर विवाह झालाच असेल तर पत्नी व मुलांच्या बाबतीत सगळी कर्तव्ये यथासांग पार पाडायलाही तितक्याच स्पष्टपणे ठणकावतात.

श्री. हाजरा महाशय नामक एका भक्ताने स्वतः दक्षिणेश्वर येथे येऊन बायको पोरांना सासरी नेऊन ठेवले होते. त्यावर श्रीरामकृष्णांनी एकदम नाराजी व्यक्त करुन त्यांचा 'चांगला' समाचार घेतला. पोरंबाळं झालीत, त्याचं पालन पोषण स्वतः नाही तर मग गावकऱ्यांनी का येऊन करायचं! लाज देखील नाही वाटत... खूप खरडपट्टी काढली अन् एखादी नोकरी पाहायला सांगितली. तेव्हा कुठं राजश्रींनी तळ हालविला इथून.'' (संदर्भः यापूर्वीचाच. पृष्ठ क्र. ७)

स्वतः श्रीरामकृष्णांचा गृहस्थभक्तांकडे पाहण्याचा दृष्टिकोन हा असा होता. स्वतःच्या जीवनातून त्यांनी जसा एक 'आदर्श गृहस्थाश्रम' आपल्यासमोर जिवंत करुन ठेवला तसाच योग्य उपदेशही गृहस्थांसाठी त्यांनी आपल्या संदेशातून देऊन ठेवला आहे. अर्थात् त्यांचा तो संदेश म्हणजे 'लोकगुरु'चा उपदेश तर आहेच – पण खरोखर त्यांच्या श्रीमुखातून बाहेर पडलेला एकेक शब्द म्हणजे 'वचनामृत'च आहे. आज ते सारे आपणासाठी ग्रंथबद्धही झाले आहे.

'वचनामृता'त ते गृहस्थांना सतत सांगत आहेत की, ''आपलं कर्तव्य पार पाडत असावं, मात्र मन भगवंताच्या चरणी ठेवून... थोरामोठ्यांच्या घरची मोलकरीण–मालकाचा सारा कामधंदा उरकते...जाणून असते की माझी कोणी लागत नाही... तिचं मनं गुंतलं असतं खेड्यातल्या स्वतःच्या घरात... ईश्वरभक्तीचं तेल हाताला माखा मगच प्रपंचाचा फणस कापायला घ्या... संसार आहे पाणी अन् मन आहे जणू दूध... ज्ञानभक्तीचं लोणी हस्तगत करण्यासाठी दुधाला (बाजूला ठेवून) विरजण लावावं लागेल... व 'विचार'. विचार अत्यंत आवश्यक – वस्तुविचार ! अनित्याचा त्याग. पैसा...सुंदर देह इ. कडे का बरं मन लावायचं?... बायकापोरांकरता रडून घागर घागर टिपं (लोक) गाळू शकतात... असंच व्याकूळ होऊन ईश्वरासाठी रडल्यास त्याचं दर्शन होऊ शकतं.'' हा आणि अशा प्रकारचा अनेक सोप्या सोप्या दृष्टांत – उदाहरणांनी भरलेला श्रीरामकृष्णांचा अमृतोपम उपदेश अन्य ठिकाणीही आपल्याला विपुल प्रमाणात उपलब्ध असलेला आढळतो.

आणखी उपलब्ध आहेत – श्रीरामकृष्णांचा समग्र संदेश विचारात घेऊन तद्नुसार युगाचार्य स्वामी विवेकानंद आणि भगवती सारदादेवींचा आदर्श समजून घेऊन – जीवन जगणारी जिवंत माणसे ! अशा 'माणसां'च्या अनेक पिढ्या 'श्रीरामकृष्ण मठ' आणि 'सारदामठा'तून संपूर्ण जगभरात अनेक वर्षांपासून श्रीरामकृष्णांचा आदर्श जगून दाखवीत आहेत. ते सारे त्यागी असून आहेत ब्रह्मचारी! मात्र ते नुसते स्वतःच्या मोक्षालाच चिकटून नाही बसत. तर जगाच्या कल्याणाचीही काळजी वाहत असतात. 'आत्मनो मोक्षार्थं जगत् हितायच' हेच आहे त्यांचे जीवन धोरण. तेव्हा त्यांच्या ह्या 'धोरणा'तील जवळच्या जगात – म्हणजेच त्यांच्या निकट सहवासात जाऊनही आपल्यासारख्या गृहस्थांचे 'हित' (म्हणजेच 'दृष्टादृष्ट' विजये) होऊ शकेल. श्रीरामकृष्ण मठ आणि सारदा मठ म्हणजे तुम्हा आम्हाला श्रीरामकृष्ण, श्रीमाताजी व स्वामी विवेकानंदांचे लाभलेले 'जिवंत पसायदान'च आहे. आम्हा सामान्यांच्या जीवनाचा विकास घडविणारी 'ईश्वरनिष्ठांची ही मांदियाळी'!

अगदी सारांशच करुन सांगायचा म्हटले तर श्रीरामकृष्णांकडे (अर्थात् श्रीमाताजी व स्वा. विवेकानंदांसह) सर्वांनी आणि गृहस्थ भक्तांनीही बघण्याची दृष्टी केवळ एकच असू शकते. ती म्हणजे ते आहेत – या युगाचे आदर्श 'अवतार', वचनामृतरुपाने 'लोकगुरु' आणि श्रीरामकृष्ण संघाच्या रुपाने लाभत असलेले 'जिवंत पसायदान'!!!

आता ही दृष्टी समजून घेतली. 'अध्ययन मूल्या'चा भाग पुढे सरकला. आता प्रत्यक्ष अनुसरणातून करावयाची पूजा! तेव्हा त्यासाठी श्रीरामकृष्ण स्वतःच सांगत असत, ''मी सोळा आणे केले. तुम्ही एक आणा तरी करा''. ह्याचा अर्थ असा की आपल्याला मिळालेला

'आदर्श' खूप मोठा आहे म्हणून घाबरुन, थबकून वा थांबून जाणे योग्य होणार नाही. तर एक एक पाऊल टाकायला सुरुवात तरी करायला काय हरकत आहे? तेव्हा त्यासाठी आपण सारेच आता श्रीरामकृष्णांच्या पदकमली नत होऊन त्यांच्या कृपेची याचना करु या -

**"धर्म-हान-हारकं त्वधर्म - कर्म - वारकं,**
**लोक - धर्म - चारणश्च - सर्व - धर्म - कोविदम् ।**
**त्यागि - गेहि - सेव्य - नित्य - पावनाङ्घ्रि पंकजं,**
**नमामि देव - देव - रामकृष्णं ईश्वरम् ।।"**

- स्वामी विरजानंद

म्हणजे "ज्यांनी अधर्माची गती थोपवून धर्मग्लानी दूर केली, सर्वधर्मांमध्ये पारंगत असूनही जे केवळ सामान्यजनांना वळण लावण्यासाठी लौकिक धर्माचे पालन करीत असत, गृहस्थ काय किंवा संन्यासी काय, दोन्ही प्रकारच्या लोकांकडून पूजिले जावेत असे ज्यांचे चरणकमल आहेत त्या देवाधिदेव भगवान श्रीरामकृष्णांना मी प्रणाम करतो".

(अनुवाद : कै. प्रा. प्र. ग. सहस्रबुद्धे - 'परमार्थाची वाटचाल', प्र. श्रीरामकृष्ण मठ, नागपूर, प्र. आ. १९६७, पृष्ठ ४)

**डॉ. अनंत अडावदकर,**
१/३, एफ.आय.जी. त्रिमुर्तीनगर, नागपूर - ४४००२२



# साक्षात्कारी संत

**श्री. विष्णू लक्ष्मण शिंत्रे**
ज्योतिषाचार्य, होराभूषण, ज्योतिषभास्कर, प्रवचनकार

।। श्री गुरुःशरणम् ।।
।। श्री रामकृष्णांना सादर प्रणाम ।।
(वृत्त – भुजङ्गप्रयात)

**श्री** एकदंता नमू आधी तुजला ।
श्री **रा**मकृष्णांसी नमस्कार केला ।
जिथे **म**त्सराला मुळी नाही थारा ।
मां काली **कृ**पेय करी सद्विचारा ।।१।।
कधीच तृ**ष्णां** न मनीही धनाची ।
भक्तीत खंड **ना** हो निष्ठा मनाची ।
चित्ति फलेच्छा न **सा**हणे कधीही ।
असे गांजल्यासाठी **द**या मनीही ।।२।।
सदा वृत्ति संन्यस्थ आ**र**म्भ छान ।
कृपा कालीची ही तयांसी **प्र**धान ।
'गुरु' मानुनि पत्नी करी प्र**णा**म ।
जपे **'विष्णु'** ही ते **'रामकृष्ण'** ना**म** ।।३।।

स्वामी रामकृष्ण परमहंस म्हटलं की कालिमातेचा एक भक्त, महान उपासक, योगीराज असा साक्षात्कारी संतच डोळ्यासमोर येतो. यांचा जन्म दि. १७-२-१८३६ या दिवशी सकाळी ६ वाजून २३ मिनिटांनी झाला. त्यावेळी पूर्व क्षितिजावर कुंभलग्न उदित होते व इतर ग्रह सोबतच्या कुंडलीत दाखविल्याप्रमाणे होते.

१) कुंभ लग्न व अष्टमेश (बुध) – लग्नात या दोन्ही गोष्टी वैवाहिक व सांसारिक जीवनाला विरोधक अशाच आहेत पण पंचमस्थानात गुरु हा शुभ व अध्यात्माला मदत करणारा ग्रह असल्याने रामकृष्णांनी स्वतः होऊन व पत्नीच्या संपूर्ण संमतीनेच ब्रह्मचर्य व्रताचे पालन केले व पत्नीनेही त्यांनाच गुरुस्थानी ठेवून स्वतःची अध्यात्मिक उन्नति करुन घेतली.

२) लग्नेश शनी भाग्यस्थानात तुळेचा (उच्चीचा) असल्याने त्याने रामकृष्णांना शुद्ध अंतःकरणाचे, परोपकारी व सदाचारी बनविले, ईश भक्ती दिली, संत समागम दिला, दैवी शक्तीही दिली आणि शास्त्रज्ञ केले. तसेच या शनीने शास्त्र, वेदान्त, तत्त्वज्ञान या विषयांची आवड निर्माण करुन त्यात प्राविण्यही मिळवून दिले आणि दैवी सामर्थ्य दिल्याने ते सुप्रसिद्ध व वंद्य होऊन जगावर कायमची छाप ठेवून गेले.

३) षष्ठेश चंद्र लग्नात आणि वृश्चिकेचा राहू दशमात यांनी त्यांना शरीर कष्ट फार दिले. पण याच राहूने त्यांना तपस्वी बनवून आणि चंद्राने त्यांना सत्वशील व शांत बनवून उत्तर आयुष्यात त्यांचा उदय केला.

४) लग्नातील कुंभेच्या रविने त्यांना कुलशीलवान व दृढनिश्चयी बनवून त्यांच्यात आत्मविश्वास निर्माण केला व शास्त्रीय विषयांची आवडही निर्माण केली.

५) व्यय स्थानातील मकरेचा मंगल हा तृतियेचा असल्याने त्याने धर्म, उपासना, योग इ. बाबतीत आवड निर्माण करुन मोठे भाग्यवानही बनविले, तसेच हाच व्यय स्थानातील मंगळ दशमेश असल्याने त्याने अध्यात्मिक अधिकार, मान, प्रतिष्ठा, इ. ही दिली. या मंगळाबरोबर (युतीत) नेपच्युन असल्याने त्याने एकांताप्रियताही दिली.

६) लग्नातील कुंभेच्या हर्षला मुळेही शास्त्रीय विषयांची आवड उत्पन्न झाली. हा हर्षल रवि चंद्राच्या युतीत असल्याने नाविन्य उत्पन्न करण्याची शक्ती व अंतर्ज्ञान शक्ती प्राप्त झाली आणि ध्येयपूर्तीसाठी अविश्रांत श्रमही करावे लागले. मात्र या हर्षलामुळे

प्लु शु.(९) १२
चं (२३) बु (१६) ह (९) र (८) ११
ने (१४) मं (२३) १०
९
के (४) २
८ रा (४)
१
गु (१६) ३
४
६
७ श (२५)

**जन्म लग्न कुंडली**

त्यांची वागणूक जगाच्या दृष्टिने विचित्र व चक्रमपणाची वाटणारी अशी होती.

७) वृषभेचा केतू आणि रवि बुध चंद्र यांचा हर्षलाशी संबंध ही ग्रहस्थिती पारमार्थिक साधनेला शुभच आहे. भक्तिचाकारक ग्रह शुक्र मीनेचा प्लुटोसह आहे. गुरु हा भक्ती व तत्त्वज्ञान समजावून देणारा शुभ ग्रह पंचमात असून पंचमेश बुधाचा चंद्र या शुभ ग्रहाशी असलेला संबंध हा नित्योपासना, नामस्मरण, जपजाप्य यांना आस्थापूर्वक स्थान प्राप्त करवतो. केतू शनि यांनीही वैराग्य संपन्न करुन परमार्थ पूर्ण केला.

८) कुंभ राशीच्या व्यक्तींना जनता प्रथम ओळखीत नाही. विचित्र व चक्रम समजतात. पण नंतर मात्र यांचं मोठेपण लोकांना कळून येते. (स्वा. सावरकरांचे ही असेच झाले. त्यांचे तत्त्वज्ञान - मते प्रथम लोकांना विचित्र वाटली पण नंतर मात्र तेच लोकांना पटवून आता त्यांची स्तुती होते.)

९) याशिवाय आता आणखी ग्रहस्थिती कुठली अनुकुल होती व तशी कोणाच्या पत्रिकांत होती तेही सोदाहरण पाहू -

१) रविबुध युति (हा योग तत्त्वज्ञकांट व संशोधक एडिसन यांच्या पत्रिकात आहे)
२) रवि गुरु नवपंचम योग (लोकमान्य टिळक व बर्नाड शॉ)
३) रवि हर्षल युति (बापूसाहेब मिटकर)
४) चंद्र बुध युति (आत्मचिंतन करवते)
५) चंद्र गुरु नवपंचमयोग (कुलमुख्य व कीर्तीमान)
६) चंद्र शनि नवपंचम (स्वामी समर्थ)
७) चंद्र हर्षल युति (टेंबे स्वामी - विक्षिप्तपणा व योगसाधना)
८) बुध गुरु नवपंचम (चिंतन व एखाद्या क्षेत्रात नावलौकिक देतो)
९) बुध शनि नवपंचम (योगी अरविंद, स्वा. विवेकानंद, रमणमहर्षि)
१०) बुध हर्षल युती (महर्षि अण्णासाहेब पटवर्धन)
११) गुरु शनि नवपंचम (लोकमान्यता मिळते)
१२) गुरु हर्षल नवपंचम (श्रीधर स्वामी - धर्मप्रचार होतो)
१३) गुरु - प्लुटो केंद्रयोग (तत्त्वज्ञान)
१४) शुक्र नेपच्युन लाभयोग (अध्यात्म, भक्ती - डॉ. प्र. न. जोशी)
१५) शनि हर्षल नवपंचम (पं सातवळेकरजी)
१६) शनि - नेपच्युन केंद्रयोग (स्वामी रामतीर्थ)

इतके जबरदस्त ग्रहमान अनुकूल असताना स्वामी रामकृष्ण परमहंस जगद्वंद्य झाले नसते तरच आश्चर्य ! तेव्हा त्यांची थोरवी गावी तितकी कमीच आहे.

**वानू किती मी थोर अशा या संत महात्म्याला ।**
**कुंठित वाणी, 'विष्णू' म्हणुनि, वंदी त्यांच्या चरणाला ।।**

**कवी - श्री. विष्णु ल. शिंत्रे, अहमदाबाद**



## सवाई मानवाची

मानव म्हणजे अमृताचा पुत्र । भगवंताचा मित्र ।
देव स्मरावा अहोरात्र । मोक्ष प्राप्तीसाठी ।।

मानवाचा देह । म्हणजे देवाचे मंदिर ।
राखावे ते सुंदर । जन्मांतरी ।।

श्रद्धा असावी देवावर । कर्म करावे सुंदर ।
सुंदर ते अर्पावे सत्वर । भगवंत चरणी ।।

मानवाला हवा कलेचा ध्यास । साहित्याचा सहवास ।
विज्ञानमार्गेप्रवास । भगवंताकारणे ।।

ऐसे जगतो जो जीवन । जन्म होतो पावन
मग इच्छामुक्त होऊन । विलीन होतो भगवंत चरणी ।।

म्हणावे जय जय गुरुदेव दत्त

शब्दरचना
डॉ. जगदिश सदाशिव सरदेशपांडे, साखरपा



# नवरत्नमाला

**सौ. मनीषा भास्कर अभ्यंकर**
'एम.ए. (संस्कृत) गोल्ड मेडलिस्ट. संस्कृत वर्ग घेतात. ज्ञानेश्वरीचा गाढा अभ्यास. 'बाप रखुमादेवीवरु' मध्ये बरेच लेख प्रकाशित.

**१) रक्ष रक्ष श्रीरामकृष्ण त्वं दुःखविमोचक संविताः ।**
**त्वमेवासि मम भाग्यविधाता त्वमेव पाहि मां शरणोपेताम् ।।१।।**

अर्थ – दुःख नाहीसे करणाऱ्या हे सूर्यरुपी श्रीरामकृष्णा, माझे रक्षण करा. तुम्हीच माझे भाग्यविधाता आहात, शरण आलेल्या माझे तुम्ही रक्षण करा.

**२) अद्भुताननु तव जीवनलीला स्थितिस्तेतुं समाधिमग्ना ।**
**उच्चमनोभूम्या त्व मिमाधितिष्ठासि काली मातरं सरो ध्यायन् ।।२।**

अर्थ – तुमची जीवनलीला अद्भुत आहे. कालीमातेचे ध्यान करुन आपण सतत उच्चमनोभूमिकेत व समाधिमग्न स्थितीत असता.

**३) कृत्वा उपासना विविधा सिद्धि प्राजोऽसि त्वं भक्त्या ।**
**यावन्ति मतानि मार्गावास्युः सन्देशोऽयं दत्तः सर्वेभ्यः ।।३।।**

अर्थ – आपण विविध धर्मांच्या साधना मोठ्या भक्तीभावाने केल्या आणि 'जितकी मते तितके मार्ग' असा संदेश (जगाला) दिलात.

**४) हित्वा परिणय मम आचरसि त्वं ब्रह्मचर्यं खलु नैष्ठिकम् ।**
**षोडशीपूजा नित्यं कृत्वा स्वदेहोऽप्यर्पितः श्रीचरणे ।।४।।**

अर्थ – विवाह करुन सुद्धा आपण मोठ्या निग्रहाने ब्रह्मचार्याचा सांभाळ केलात. (माताजींची) षोडशीपूजा करुन त्यांच्या चरणी स्वतःचा देह अर्पण केलात.

**५) यन्त्रमहं त्वं यन्त्रीत्यास्मिन् भावे नित्यंनिमग्नस्तम् ।**
**औपनिषद् सिद्धान्ताः स्रन्ति वरनार वार वारम् ।।५।।**

अर्थ – मी यंत्र तू यंत्री अशा भावात आपण नित्य निमग्न असता. आपल्या मुखातून सतत उपनिषदांतील सिद्धांतच प्रकट होत असतात.

**.६) नरेन्द्रशिरसि करं दधासि संक्रकाम्यस्यात्वज्ञानम् ।**
**सगुणनिर्गुण पालकं सत्यं तथाऽपि सदुकादिष्टम् ।।६।।**

अर्थ – नरेंद्रांना आत्मज्ञान देण्यासाठी त्यांच्या मस्तकावर तुम्ही हात ठेवलात. सगुण व निर्गुण दोन्ही गोष्टी खऱ्या आहेत असाही त्यांना तुम्ही उपदेश केलात.

**७) संन्यासिभिस्तव साच्छिष्यैर्जगदिदं पादाक्रान्तम् ।**
**प्रख्यापायितुं वैदिकधर्मं क्षेत्र कर्तुं जगतश्का ।।७।।**

अर्थ – जगाच्या कल्याणासाठी वैदिक धर्माचे प्रचलन करण्यासाठी आपल्या संन्यासी व सदाचरणी शिष्यांनी संपूर्ण जग पादाक्रांत केले.

**८) नरेन्द्रतारक शरच्चन्द्रे योगन्द्रबाबूराम ।**
**शशिभूषणहरिकालि शारदा गंगा सुबोधचंद्र ।।८।।**
**९) राखालादयः भक्ता नित्यं ध्यायन्ति तव रुपम् ।**
**रामकृष्णसंघस्य स्थापना त्वयेन विहिता शर्भरा ।।९।।**

अर्थ – नरेंद्र दत्त (स्वामी विवेकानंद), तारक (स्वामी शिवानंद), शरच्चंद्र चक्रवर्ती (स्वामी सारदानंद), योगींद्रनाथ रायचौधरी (स्वामी योगानंद), बाबूराम घोष (स्वामी प्रेमानंद), शशिभूषण चक्रवर्ती (स्वामी रामकृष्णानंद), हरिनाथ चटर्जी (स्वामी तुरीयानंद), कालिप्रसाद चंद्र (स्वामी अभेदानंद), सारदा प्रसाद मित्र (स्वामी त्रिगुणातीतानंद), गंगाधर घटक (स्वामी अखंडानंद), सुबोधचंद्र घोष (स्वामी सुबोधानंद), राखालचंद्र घोष (स्वामी ब्रह्मानंद) वगैरे आपले भक्त नित्य आपल्या रुपाचे पूजन करतात. रामकृष्ण संघाची स्थापना सुद्धा आपल्याच मूलस्त्रोतामुळे झाली आहे.

**१०) गुम्फिता स्रगेषा नवरत्नांना तवाशिषातथै प्रेरणया ।**
**त्वदीया कृति स्तुभ्यमेव खलु मयार्पिता बहु भक्त्या ।।१०।।**

अर्थ – आपल्याच आशीर्वादाने व प्रेरणेने ही नवरत्नमाला मी गुंफली. ही आपलीच कृती आपल्याच चरणी मी मोठ्या प्रेमाने अर्पण केली आहे.

**सौ. मनीषा भास्कर अभ्यंकर**
'रामजानकी' भोकरे कॉलनी, चंदनवाडी, मिरज–४१६४१० फोन : ०२३३–२२११४९७, मो. ९४२२०९४२४५



# धन्य ती गुरु–शिष्याची जोडी

**सौ. विजया प्रल्हाद प्रभुणे**
बी.ए.बी.एड (संस्कृत स्पेशल) राष्ट्रभाषा पंडित, शिक्षक. विविध मासिकांतून वैचारिक, चिंतनात्मक, कौटुंबिक लेखन, दैनिक प्रभातमध्ये संत जीवनावर अखंड लेखमाला

महाशिवरात्रीचा दिवस होता. गावातील मुलांनी शिवचरित्रावर एक छोटी नाटिका बसविली होती. पण ऐनवेळी शंकराचे काम करणारा मुलगा आजारी पडला. आणि सर्वच मुलांनी गदाधराची विनवणी केली, 'त्या भोलानाथ शिव शंकराचे काम तू करावेस' भगवान भोलानाथ त्याची सर्व आयुधे, व्याघ्रांबर यासह छोटा गदाधर स्टेजवर आला परंतु गदाधर शंकराच्या ध्यानात इतका तल्लीन झाला की आपले संभाषण, अभिनय सारे काही विसरला. एखाद्या पुतळ्याप्रमाणे नुसताच निश्चल उभा राहिला. त्याची भावसमाधीच लागली. त्यांची ही भावसमाधी पाहून सारी दोस्तमंडळी घाबरुन गेली. प्रेक्षक गडबड करु लागले आणि मग नाईलाजाने पडदा पाडून नाटक थांबवावे लागले. या प्रमाणे अगदी लहानवयापासून गदाधराचे ईश्वरस्वरुपाशी तादात्म्य होत असे. ईश्वराशी तदाकार होणारे हे लहान बालक मोठेपणी सर्व जगाला सर्वधर्म समभाव शिकविणारे सगुणोपासनेचे माहात्म्य पटविणारे, कालीमातेचे निस्सीम उपासक असणारे महामानव 'रामकृष्ण परमहंस' या नावाने विख्यात झाले. फक्त भारतीय नव्हे तर जगत् वंद्य ठरले.

ते आपल्या शिष्यांना समजावून सांगत – बाबांनो तुमची एकाग्रता, कार्यमग्नता, ईश्वरीय निष्ठा ही हनुमंतासारखी हवी. हनुमंताचा दृढ रामप्रेमाचा भाव बघण्यासारखा आहे. धन, मान यापैकी कशा–कशाचीही वांछा त्याला नव्हती. त्याला हवा होता फक्त भगवान ! स्फटिक स्तंभावरुन ब्रह्मास्त्र घेऊन पवनसुत उडाला तेव्हा राणी मंदोदरी घाबरुन गेली. वानराची जात, फळफळावळे दाखवली की खाली येईल. फळे घेऊन ब्रह्मास्त्र टाकून देईल. या आशेने मंदोदरी विविध फळे त्याच्या पुढे करु लागली. मंदोदरीला हनुमान म्हणाले, ''अगं मला फळांचा काय लोभ? उभा जन्म सफळ होईल असे फळ मला लाभले आहे. मोक्षफळाचा साक्षात वृक्ष भगवान श्रीराम माझ्या हृदयी आहे. तुझ्या फळाची भीक हवी आहे कोणाला ? बघ हा मी चाललो.''

श्रीरामकृष्णांनी अशा आशयाचे गाणे मधुर आवाजात उत्कृष्ट चालीवर गायिले आणि ते भावसमाधीत तल्लीन होऊन गेले. निष्क्रय देह, स्तिमित लोचन, स्थिर आसन, सस्मित मुखमण्डलाची विश्वरुपाशी तादात्म्य झालेली त्यांची भावमुद्रा बघून भोवती गोलाकार बसलेल्या शिष्यमंडळीनाही त्या अननुभूत आत्मानंदाची अनुभूती येऊ लागली. आपणासारीखे करीती तत्काळ एवढे समर्थ सद्गुरु होते ते !

पश्चिम बंगाल मधील कामरपुकुर या गावी रहाणाऱ्या सत्वशील, श्रद्धा संपन्न क्षुदीराम आणि मूर्तिमंत सात्विकता असलेली पत्नी चंद्रादेवी अशा मात्यापित्यांच्या पोटी त्यांचा जन्म झाला. गया क्षेत्री पिंडदान करण्यास क्षुदीराम गेले असता त्यांच्या मिटल्या डोळ्यांना असीम तेजोमय असा प्रकाश दिसला आणि त्यात एक महापुरुष साकार होवून त्याचे शब्द कानावर पडले, ''मी तुझ्या घरी जगत्कल्याणासाठी अवतीर्ण होईन''. इ.स. १७ फेब्रुवारी १८३६ ला चंद्रादेवीने या पुत्ररत्नाला जन्म दिला. सर्वांचे ते लाडके बाळ दिसामासाने वाढत होते.

वडीलांचे छत्र सातव्या वर्षी हरपल्यानंतर ते पुढे कलकत्याला वडील भाऊ रामकुमार यांच्याकडे गेले आणि मुळात धर्मभाव जागृत असणारा हा युवक दक्षिणेश्वरी कालिमातेचा पुजारी होऊन गेला, तेथे अहोरात्र कालिमातेचे ध्यान तिच्याशीच गोष्टी व देवी दर्शनाची ओढ यामुळे चित्ताची व्याकुळता इतकी वाढली की देवीच्या हातची तलवार घेऊन आपल्या शरीरावर प्रहार करुन सर्वसमर्पणभावाचीही तयारी दाखविली. ते पहाताच कालिमातेने त्यांना साक्षात् दर्शन दिले आणि एक असीम, अनंत, सचेत अस्त्र तेजोमय समुद्र त्यांच्या अंगावर येऊ लागला. त्या लाटांमध्ये आपण गटांगळ्या खात आहोत असा भास त्यांना झाला आणि ते निश्चेष्ट होऊन पडले.

देहभावरहित समाधिसुख त्यांना मिळू लागल्यावर इतर लौकिक सुखाची त्यांना गरजच उरली नाही. पण कालीमातेच्या कृपाप्रसादाने त्यांना प्राप्तक असे त्यांना काहीच उरले नाही.

**कल्पद्रुमः काल्पितमेव सूते । कामधुक कामितमेवदीग्धि ।**
**चिंतामणीः चिन्तितं एव दत्ते ।।**

इ.स. १८६० साली त्यांचा विवाह झाला. त्यांनी पत्नीला सांगितले लौकिक अर्थाचा आपला संसार नाही. उच्च अशा आनंदाची दिव्य अनुभूती घेत त्यात रममाण होणे हेच ध्येय असेल. श्रीसारदादेवी या

देखील तशाच योग्यतेच्याही होत्या. त्यांनी हसून मान डोलावली अन् पतीकार्यामध्ये समर्पित झाल्या.

भैरवी ब्राह्मणी या महान साधिकेची भेट झाल्यावर आपल्या अंगाचा सतत होणारा दाह आणि चित्ताची व्याकुळता याबद्दल विचारताच त्या म्हणाल्या, ''ही दिव्य अवस्था फारच थोड्या महानुभावांच्या वाट्याला येते. बाकीचे सामान्य लोक त्यांना वेडे समजतात आणि त्यांच्या वागणुकीला वेडाचार मानतात.'' कालिमातेवर अपार श्रद्धा, अथांग प्रेम असूनही या सत्पुरुषाच्या मनामध्ये हिंदु, मुसलमान, ख्रिस्ती, पारशी, जैन, बौद्ध सारेच धर्म आणि पंथ याबद्दल आदर होता. देवाकडे जाणारे हे सर्वच मार्ग चांगले आहेत असेच त्यांचे मत होते. सत्-चित्-आनंद जणू एक अनंत सागर ! भक्तीची थंडी लागून त्या पाण्याचे विविध आकाराचे हिमनग बनतात. आकारभिन्नता असली तरी मूळ तत्त्व बर्फ आणि त्याहूनही मूळ पाणीच असते. तद्वत् सगुण अवतार हे ते हिमनग आहेत. सामान्य संसारी लोकांसाठी देवी, दत्त, हनुमान, विठ्ठल, शंकर या देव देवता सगुण रुपाने साकार होतात. पण ज्ञानसूर्य उगवल्यावर उरते ते फक्त निर्गुण. सूर्य उगवल्यावर बर्फ वितळून पाणीच पाणी होते ना अगदी तसेच हे भगवत् ! तुम्ही सगुण तुम्ही निर्गुण किती सहज समजणारे मनोहारी विचार आहेत नाही काय ? अशा या ब्रह्मानंद परमसुखदं केवलं ज्ञानमूर्तिम् । द्वंद्वातीतं निर्गुणरहित सद्गुरुं तं नमामि ।

असे भावावस्थेत सुप्रतिष्ठित असलेल्या रामकृष्णांना त्यांच्या काळातील आध्यात्मिक क्षेत्रातील श्रेष्ठींनी परमहंस म्हणण्यास प्रारंभ केला. शिष्यांना उपदेश देताना श्रीरामकृष्ण म्हणतात, ''नामस्मरण हा जीवाला शिवाजवळ जाण्याचा अगदी सोपा मार्ग आहे. हे मला मान्य आहे पण नुसत्या माळा फिरविण्याने काम होणार नाही. त्या ईश्वराचे नाम घेताना त्या परमेश्वराविषयी अनुराग काठोकाठ भरलेला पाहिजे. यापुढे एक दृष्टान्त देतात ''गंगास्नान केल्याने पाप नष्ट होते. शरीर व मन शुद्ध होते असे म्हणतात पण स्नान करुन गंगेच्या काठावर आल्यावर त्याने केलेली पापे जी झाडावर लटकत असतात ती परत त्याच्या मानगुटीवर बसतात. पुन्हा आपला तो कामिनी कांचनाच्या घोटाळ्यात सापडतोच.''

**न्हाये धोये क्या भया जो मन का मैल न जाय ।**
**मीन सदा जलमें रहे तू बाँस कभी न जाय ।**

नामस्मरणात खंड पडला की काम, क्रोध, मद, लोभ, मोह, मत्सर हे षड्रिपू मनाची पकड परत घेतात. म्हणून म्हणतो देवाचे नाव जरुर घ्या. पण त्याचबरोबर त्याची प्रार्थनाही करा - ''हे ईश्वरा मजला ठाव द्यावा पायी ।''

दुसरा दृष्टान्त ''हिरवा, पिवळा, करडा, तांबडा इत्यादी रंग सरडा, ज्याप्रमाणे बदलतो त्याप्रमाणे ईश्वराच्या विविध रुपाचे आहे, अनेक रुपे पण मूळ एक''

**तुज सगुण म्हणू की निर्गुण रे । सगुण निर्गुण एक गोविंदुरे ।**

हे पक्के ध्यानात ठेवावे. ईश्वर लाभ झालेला माणूस बालकवत, जडवत, पिशाचवत, उन्मत्तवत असे वागत असतो. ईश्वर यंत्री व मी यंत्र हे तो साक्षात्कारी मनोमन ओळखून असतो.

**तुझिया श्वासे पान हलते । हर्षे तुझिया फूल फुलते ।**
**तेज झळाळत गगनही झुलते । रवी चंद्राचा तू निर्माता ।**
**शरण तुला भगवंता -**

हे प्रत्येकाने पक्के ध्यानात ठेवावे. असे हे अमृतबोल ऐकण्यासाठी काही लोक त्यांच्याभोवती जमू लागले, काही तरुण त्यांचे शिष्य झाले. राखाल हा त्यांचा आवडता शिष्य होता. केदार, सुरेश, मनमोहन, गिरीष इत्यादी सारे गुरुजवळ बसून उपदेशपर गोष्टी ऐकत असत.

असेच एकदा ब्राह्मसमाजात जाणाऱ्या चिकित्सक, बुद्धिवादी असलेल्या आपल्या नरेंद्र नावाच्या मित्राला एक तरुण श्रीरामकृष्ण परमहंसाकडे घेऊन आला. काहीशा अनिच्छेने आलेले नरेंद्र त्या सत्पुरुषाच्या भावव्याकुळ चेहऱ्याकडे पाहतच राहिले. सामान्यपणे गुरु-शिष्याची कसोटी घेतात पण येथे नरेंद्राने रामकृष्णांची परीक्षा घ्यायची ठरवली. द्रव्याचा स्पर्शही त्यांना सहन होत नाही हे त्यांना मित्राकडून कळले होते. कोणाच्याही नकळत रामकृष्णांच्या बिछान्याखाली चांदीचा रुपया ठेवला व ते दूर जाऊन बसले.

काही वेळाने श्रीरामकृष्ण त्या बिछान्यावर येऊन बसले. काही क्षणातच त्यांच्या सर्वांगाचा दाह होऊ लागला. त्यांनी राखालला हाक मारली. 'अरे राखाल'! माझ्या अंगाची आग होत आहे. माझा बिछाना झाडून जरा स्वच्छ कर पाहू. राखालने प्रत्येक पांघरुन झाडून झटकून काढले. गादीही काढली तो काय आश्चर्य? त्यातून चांदीचा रुपया टणकन खाली पडला. नरेंद्राने तो प्रकार पाहिला आणि धावत जावून सद्गुरुंचे पाय धरले. त्यांच्या डोळ्यातून अश्रू ओघळू लागले. तो मनोमन प्रार्थना करत होता. 'चुकलो चुकलो थकलो आता दया करा स्वामी, दया करा स्वामी ।' रामकृष्ण प्रेमार्द्र दृष्टीने त्याच्याकडे पहात मूकपणाने म्हणत होते -

**चुकलो, त्याची खंत नको पण । चुकता चुकता घडते जीवन ।**
**अनुतापाने येते उजळून । तरतो तो भवपाशी ।**
**तुझे असून तुजपाशी । परि तू जागा चुकलासी ।**

नरेंद्राची खात्री पटली - कालिमातेशी संवाद साधणारे हेच माझे सद्गुरु ! हेच माझे सद्गुरु रामकृष्णांचे चरण घट्ट पकडत म्हणू लागले -

**अज्ञानतिमिरान्धस्य ज्ञानांजन शलाकया ।**
**चक्षुः उन्मीलितं येन तस्मै श्री गुरवे नमः ।**

पुढे नरेंद्र दक्षिणेश्वरी त्यांच्या दर्शनाला नित्य येऊ लागले. एकदा, जवळ बसले असता श्रीरामकृष्णांनी त्यांच्या मस्तकावर हात ठेवला, ही स्पर्शदीक्षा होताच त्यांचे सारे शरीर रोमांचित, पुलकीत झाले. डोळे मिटले गेले, हात जोडून ते मूर्तिवत बसून समाधिसुखाचा अनुभव घेऊ लागले. त्या अपार आनंदाच्या भावसमाधित या हृदयीचे त्या हृदयी असे देणे झाले.

आत्मसाक्षात्काराची प्रत्यक्ष अनुभूति नरेंद्राला आली. अहंभाव, बुद्धिवाद, चिकित्सा, प्रयत्नवाद, साऱ्याचा खरा अर्थ कळून आला.

[illegible] फक्त शरणागत भाव. तेव्हापासून ते सद्गुरुंचे पट्टशिष्य झाले. [illegible]कृष्णांनीच त्यांना काही वेळाने देहभानावर आणले आणि [illegible] की आत्मबोधाच्या या अमृत सागरात आपण एकटाच [illegible]चा स्वार्थ कसा करतोस? ब्रिटिश राजवटीच्या वरवंट्याखाली [illegible] सारेच भारतीय हे गलितगात्र झाले आहेत. त्यांना स्वत्व [illegible]भिमान हे काहीच उरलेले नाही. परमेश्वर भक्ति, साधना जीव शिव [illegible] मीलनाची उत्कंठा काही म्हणून काहीच उरले नाही. आपल्या [illegible] परिश्रमाने त्यांच्यातला माणूस जागा कर सर्व ईश्वराधीन असले [illegible] उद्धार करण्याचा प्रयत्न तर आपल्या हातात आहे हे त्यांना पटवून दे. [illegible]. पराक्रम प्रयत्न ही खऱ्या माणसाची लक्षणे आहेत. हे त्यांच्या [illegible] बिंबव. नरेंद्राचे विवेकानंद झाले.

प्रयत्नवादाचा संजीवनी मंत्र देणारा साक्षात्कारी गुरुचा हा आदर्श [illegible]. पार अटकेपार म्हणजे परदेशातही पोहोचला. भारतीयांची अस्मिता जागृत करीत करीत सर्व धर्म परिषदेत हिंदुधर्माचा प्रमुख प्रतिनिधी म्हणून उपस्थित राहिला. अमेरिकेला बोटीने जात असता ते बोटीच्या डेकवर उभे राहून अथांग समुद्राकडे एकटक पाहत ईश्वरीय अनुभूति घेत असतानाच दोने गोरे ब्रिटीश अधिकारी त्यांच्या दोन्ही बाजूला येऊन उभे राहिले. स्वामीजींचा भगवा पोषाख व त्यांच्यामानाने सावळा वर्ण पाहून एक ब्रिटीश म्हणला - बेवकूफ कहीका - लगेच दुसरा म्हणला, 'गधा कहीका' - स्वामीजींनी वळून त्यांच्याकडे पाहिले आणि हसून शांत स्वरात ते उद्गारले. हाँ हाँ बिलकुल सच है उन दोनों के बीच मैं खडा हूँ। समझा - या उत्तराने ते दोघेही चपापले आणि निघून गेले. समयसूचकता, कुशाग्र बुद्धिमत्ता, प्रखर आत्मविश्वास यांच्या जोरावर आणि गुरुकृपेने त्यांनी अमेरिकेतील सर्वधर्मपरिषद खूपच गाजवली. विवेकानंदांनी My brothers and sisters of America अशी सुरुवात करताच सारे सभागृह टाळ्यांनी दणाणून गेले. प्रभावी वक्तृत्व, तर्कशुद्ध व अचूक प्रतिपादन याने सभा तर जिंकलीच पण सर्वच लोक विलक्षण प्रभावित झाले.

एका अलौकिक सद्गुरुंचा हा अलौकिक शिष्य असाच विचार त्यांच्या मनात घोळत असेल. विलक्षण तेजस्वी, प्रभावी व्यक्तिमत्व, भारतीय तत्त्वज्ञानाचे सखोल अध्ययन, अचूक प्रतिपादन शैली यामुळे ते परदेशी लोकांत फार लोकप्रिय झाले. ठिकठिकाणी त्यांची भाषणे आयोजित झाली. मुक्कामही खूप वाढला. सर्वधर्मसमभाव राखता राखता भारतीयांची मान अभिमानाने उंचावेल असे कार्य त्यांनी करुन दाखवले. स्वामीजींच्या वाट्याला अवघे ३९ वर्षाचे आयुष्य परमेश्वराने दिले त्यातील शेवटची ९ वर्षेत्यांनी झंझावाती कार्य करुन दाखवले. वादळातून वाट काढीत काढीत यशाचे निशाण फडकवीतच ठेवले. त्यांच्या कर्तृत्वाचा आलेख पाहिला की मन आश्चर्याने थक्क होते.

धन्य ते सद्गुरु आणि धन्य तो शिष्योत्तम ! आणि अशी ही अलौकिक गुरु शिष्याची जोडी पाहिली की म्हणावेसे वाटते -

**सागराच्या संगे नदी बी घडली।**
**नदी बी घडली सागरची झाली।**
**परिसाच्या संगे लोह बी घडले।**
**लोह बी घडले परीसची झाले।**
**सद्गुरुच्या संगे शिष्य बी घडला।**
**शिष्य बी घडला सद्गुरुची झाला।**

त्या गुरुशिष्याची थोरवी वर्णन करता करता शब्द मौनवतात पण त्यांच्या जीवनचरित्राने संदेश मात्र मिळतो.

**निसर्ग कोपूनी सारा क्रुद्ध मुद्रा धरो।**
**चूर्णही करण्या तुला धावूनी येवो।**
**दिव्य आहेस तू मार्ग आक्रमी आक्रमी पुढे।**
**न डावे उजवे जाई। थेट ध्येयाकडेची जा।**

**सौ. विजया प्रल्हाद प्रभुणे**
श्रीमान सोसायटी, परिसर १/१९ब, कर्वेनगर, पुणे - ४११०५२
फोन : ०२० - २५४५७४६४

## 'श्रीरामकृष्ण म्हणतात' पुस्तकातून साभार

**वाटेल तो माणूस गुरु होऊ शकत नाही. नामी लाकडाचे मोठाले ओंडके जेव्हा पाण्यावरुन वाहत जातात तेव्हा त्याच्यावर बसून जनवारे देखील तरुन जातात. परंतु तोच एखादा हलक्या लाकडाचा तुकडा तरंगत असताना त्याच्यावर एक कावळा जरी बसला तरी तो त्याच्यासकट बुडून जातो. लोकोपदेशासाठी युगीयुगी भगवानच गुरु रुपाने अवतरत असतात. एकमेव तो सच्चिदानंदच गुरु होय.**

**सर्वात श्रेष्ठ भक्त कोण? तोच की जो ब्रह्मज्ञान प्राप्त करुन घेऊन बघतो की तो ईश्वरच जीव, जगत आणि चोवीस तत्त्वे बनला आहे. आधी 'नेति नेति' विचार करीत जिना चढून वर जावे लागते. छतावर पोहोचल्यानंतर दिसते की ज्या विटा, चुना रेती वगैरेंनी छत बनले आहे त्यांनीच जीना देखील बनलेला आहे. तेव्हा भक्ताला प्रत्यक्ष प्रत्यय येता की ब्रह्मच जीव, जगत इत्यादी सर्व काही झाले आहे.**



# श्रीरामकृष्ण परमहंसांची निर्विकल्प समाधी

**सौ. मृणाल सुहास थोरात**
एम.एससी. (स्टॅटिस्टीक्स्).
राष्ट्रीयकृत बँकेमध्ये नोकरी

एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धात एका चांगल्या आदर्शाची, चांगल्या तत्त्वांची मन-बुद्धीच्या चांगल्या परिपोषणाची नितांत गरज होती. ते पुरविण्यासाठीच भारतात एक दिव्य व्यक्तिमत्व उदयास आले. या व्यक्तीच्या प्रकाशाने संपूर्ण भारत देश उजळून निघाला. अशा महान अजरामर पारमार्थिक शक्तिशाली व्यक्तीचे नाव 'श्रीरामकृष्ण परमहंस.'

श्रीरामकृष्ण परमहंस ह्यांचा जन्म भारतभूमीवर १८३६ साली कलकत्ता नामक महानगरापासून सुमारे पाऊणशे मैल दूर असलेल्या कामारपुकुर नावाच्या निसर्गरम्य अशा खेडेगावी झाला. आई चंद्रादेवी व वडील क्षुदिराम यांनी आपल्या लाडक्या पुत्राचे नाव 'गदाधर' ठेवले. श्रीरामकृष्णांचे शैशव, बाल्य व किशोरावस्था सर्व निसर्गरम्य खेडेगावातच व्यतीत झाल्या. हिरव्या हिरव्या शेतांचे मोहक दृश्य, झुळझुळणारे नदीचे पाणी, पाखरांची गोडशी किलबिल. नितळ निळे आकाश ह्या सर्वांच्या सान्निध्यात श्रीरामकृष्ण स्वतःला हरवून चिन्मय अनुभूती घेत एकान्त गूढ वातावरणात प्रवेश करीत. एकदा तर निळ्या आकाशाच्या पार्श्वभूमीवर पांढऱ्या शुभ्र बगळ्यांची मालिका बघून त्यांची स्वतःच्या शरीराची व इतर सर्व पार्थिव वस्तूंची जाणीवच नाहीशी झाली. त्यांची ती अवस्था बघून त्यांचे मित्र, स्नेही, आई व वडील चिंतेने अतिशय व्याकुळ झाले पण थोड्याच वेळात सर्व पूर्वीसारखे झाले. तेव्हा श्रीरामकृष्ण एका न अनुभवलेल्या अद्‌भूत अशा भावसमाधीत लीन होऊन गेले होते.

वयाच्या सातव्यावर्षीच त्यांचे वडील क्षुदीराम निवर्तले. सहाजिकच श्रीरामकृष्णांच्या शिक्षणाची हेळसांड होऊ लागली. पण काळ कोणासाठीही थांबत नसतो. स्वतःच्या जन्मसिद्ध, असामान्य, आध्यात्मिक प्रेरणेनुसार जीवन व्यतीत करताना त्यांचे बाल्य, किशोरा-वस्था संपून यौवनावस्था कधी सामोरी आली हे समजलेच नाही. वडील बंधू रामकुमार यांनी त्यांना कोलकत्त्यात आणून शिक्षण देण्याचा प्रयत्न केला. पण ज्या विद्येने ज्ञानाचा उदय होऊन माणूस खरेच कृतार्थ होईल अशी विद्या शिकायची आहे हे भावाजवळ श्रीरामकृष्णांनी स्पष्ट केले.

पुढे रासमणी नामक राणीने दक्षिणेश्वर या ग्रामी बांधलेल्या भगवती कालीमातेच्या मंदिरात श्रीरामकृष्णांनी पूजकाचे काम स्वीकारले. सर्वातीत, सच्चिदानंदमयीचा साक्षात्कार होईल ह्या आशेने जगन्मातेची पुजाअर्चा मनोभावे करु लागले. आई जगदंबेची कृपादृष्टी संपादन करण्यासाठी, तिचे प्रत्यक्ष दर्शन मिळविण्यासाठी धन, मान, भोग, सुख आदि विचारांचा त्याग करुन आहार, निद्रा, लज्जा, भय इत्यादीपासून अलिप्त राहून तीव्र व्याकुळतेने अविरत ध्यान धारणेत मग्न झाले. शेवटी अशी अवस्था झाली की शरीर झाडाच्या खोडाप्रमाणे निश्चळ होऊन गेले. पाखरे त्यांच्या डोक्यावर जटा विस्कटून टाकीत. जगत्‌जननीच्या विरहाने शेवटी इतके व्याकुळ झाले की दुःखावेगाने मंदिरातील टांगलेल्या तलवारीने शरीराचा शेवटच करायच्या विचाराने धावून गेले. मात्र आई जगदंबेने, जगत्‌जननीने एका असीम, अनंत, चैतन्य ज्योतिरुपात दर्शन देऊन श्रीरामकृष्णांना कृतकृत्य केले.

अशा अद्वैत सच्चिदानंदानुभवाच्या सागरात श्रीरामकृष्ण न्हाऊन निघाले. त्यांच्या अंतःकरणात एका नवीन आकांक्षेचे बीज पेरले गेले. एक युग प्रयोजनपूर्ती, एक अनाकलनीय प्रेरणा, एक शुभंकर, स्पृहा त्यांच्या हृदयात जन्मास आली. अनंतभावमयी जगन्मातेचे नाना रुपात दर्शन घेण्याची इच्छा मनात स्फुरु लागली आणि योग्य काळात ती साकारुनही आली. अशा सम्यक दर्शनाने उजळलेली परमानंदमय अवस्था लाभली की

**''भिद्यते हृदयग्रंथिः छिद्यंते सर्वसंशयः ।**
**क्षीयंते चास्य कर्माणि तस्मिन दृष्टे परावरे ।।** (मुंडक ३५, २.२.९)

एकमेवाद्वितीय सच्चिदानंदाचा साक्षात्कार झाल्याने हृदयातील मी, माझेपणा, सर्व वासना, कर्मफलाचे बंधन कायमचे निखळून पडले. श्रीरामकृष्णांच्या अंगी असलेल्या अभूतपूर्व साधनास्पृहा, निस्सीम भक्ती, आदर्शनिष्ठा, पराकोटीची व्याकुळता, अपरंपार सहिष्णुता, जाज्वल्य वैराग्य, अप्रूप जिज्ञासा, असामान्य तळमळ इत्यादी गुणांचा हा पारिपाक होय.

विश्वरुपिणीच्या साक्षात्कारानंतर त्यांनी स्वतःची कुलदेवता प्रभु रामचंद्रांच्या दर्शनाची इच्छा व्यक्त केली. पण श्री हनुमंतासारख्या अनन्यभक्तिनेच हे साध्य होईल हा भाव मनी ठेवून 'रघुवीर' 'रघुवीर'

अशा पवित्र नामस्मरणात ते अष्टोप्रहर तल्लीन झाले. थोड्याच दिवसात एक विलक्षण अनुभव त्यांच्या प्रत्ययास आला. प्रत्यक्ष सीतामाईने दर्शन दिल्यावर आई, आई म्हणत तिच्याचरणी ते नतमस्तक झाले. ती जगत्जननी सीतामाई त्यांच्या शरीरात प्रविष्ट झाली.

तद्नंतर भैरवी नावाच्या तंत्रमतातील संन्याशीनीकडून जगन्मातेची अनुमती घेऊन तंत्र साधनेतही ते परीपूर्ण झाले. ह्या काळातील ध्यानावस्थेत त्यांना अनेकांची दर्शने, अनेक अनुभव, अद्भूत रम्य गोष्टी अनुभवास आल्या. वंगभूमीत प्रचलित असलेल्या चौसष्ट तंत्रामधील प्रत्येक साधना भैरवी संन्याशीनीने त्यांच्याकडून करवून घेतली. अशा रीतीने श्रीरामकृष्णांना सर्वातीत सर्वगत एकमेकाद्वितीय सच्चिदानंद स्वरुपाचा, अंतिम सत्याचा, साक्षात्कार झाला.

त्यानंतर त्यांनी वात्सल्यभावाची साधना केली. नंदराणी यशोदेचा भाव, राममाता कौसल्येचा भाव, जगत्पित्या भगवंताविषयी पुत्रभाव ह्या भावसाधनेत ते एकरुप झाले व प्रत्यक्ष रामचंद्राचे त्यांना दर्शन झाले. नंतर ते मधुरभावाची साधना करण्यास प्रवृत्त झाले. राधेप्रमाणेच, ''कात्यायनि महामाये महायोगिन्यधीश्वरी। नंदगोपसुतं देवी पतिम् मे कुरु ते नमः ।।'' (दुर्गासप्तशती अ.११)

नंदाचा पुत्र पती म्हणून लाभो अशी जगत्जननीची प्रार्थना केली. ह्या काळात आपण पुरुष आहोत हा भावही त्यांच्यातून नाहीसा झाला. सहा महिने ह्या मधुरभाव साधनेत ते स्त्रीवेषात होते. दिवस नाही, रात्र नाही अविरत विनंती, अविरत प्रतीक्षा, विरह, व्याकुळता ह्यामध्ये श्रीरामकृष्ण इतके आकंठ बुडून गेले की, घामासारखे अंगावरील केसांच्या मूळातून रक्त बिंदू निघू लागले. यथाकाली राधेने त्यांना दर्शन देऊन ती त्यांच्या शरीरात प्रविष्ट झाली. नंतर भगवान श्रीकृष्णाने प्रत्यक्ष दर्शन देऊन त्यांच्या अंतरंगात प्रवेश केला.

अशा भावपंचकालातील दास्य, वात्सल्य मधुर भावांची साधना झाल्यावर एक शुभदिवस बघून श्री तोतापुरीजींनी श्रीरामकृष्णांकडून संन्यासग्रहणाच्या आधीचे सर्व विधी करवून घेतले. तद्नंतर गुरुशिष्य परंपरेप्रमाणे संन्यास विधीच्या पवित्र मंत्रोच्चारांनी अवघी पंचवटी भरुन गेली. द्वैतस्वप्नांचा नाश होऊन निर्गुण निराकार ब्रह्माचा लाभ होण्यासाठी प्रार्थनेने आहुती मागून आहुती होमाग्नीत पडू लागल्या. विरजा होम समाप्त झाला. शिखा यज्ञोपवीतादींची आहुती देऊन श्रीरामकृष्णांनी कौपीन, भगवी वस्त्रे परिधान केली. तोतापुरीजींनी वेदान्तसाधना करवून घेतली. ह्या अवस्थेत जगन्मातेची मूर्ती बोधात उदय पावताच श्रीरामकृष्ण अंतिम विकल्पाची ही सीमा ओलांडून विकल्पशून्य अवस्थेत विसावले. हीच ती निर्विकल्प समाधी ! ही तीच निर्विकल्प समाधी । केवळ आपल्या अमानवी व्याकुळतेच्या बळावर त्यांना जी निर्विकल्प समाधी लाभली होती, तीच निर्विकल्प समाधी तोतापुरीजींच्या मार्गदर्शनानुसार यथाविधि, यथाशास्त्र, योग्य आचारण. योग्य अनुष्ठान करुन त्यांना परत लाभली होती.

ध्यानात श्रीरामकृष्ण निमग्न असताना आपल्या शिष्याची निश्चलता बघून तोतापुरीजी कुटीबाहेर आले. त्यांना कोणीही त्रास देऊ नये म्हणून कुटीचे दारही त्यांनी बंद करुन घेतले. तीन दिवस सरल्यानंतर तोतापुरींनाच न राहवून त्यांनी कुटीचे दार उघडले. आतमध्ये त्यांना श्रीरामकृष्ण अतिशय गंभीर, निशब्द, श्वासविरहित ज्योतिःपूर्ण ध्यानमग्न, समाधीमग्न अवस्थेत दिसले. तोतापुरीजीपण अचंबित झाले की सतत ४०वर्षे कठोर साधना करुन जी समाधी अवस्था त्यांना प्राप्त झाली. ती केवळ तीन दिवसात श्रीरामकृष्णांना प्राप्त झालेली बघून नकळत त्यांच्या तोंडून उद्गार निघाले 'अरे यह क्या दैवी माया ।'' ही तर खरोखरच वेदान्तप्रणीत समाधी ! ज्ञानमार्गाचे अंतिम फल निर्विकल्प समाधी नंतर हरी ओम् मंत्राच्या गंभीर निनादाने श्रीरामकृष्ण निर्विकल्प समाधीतून द्वैतभावात आले.

साकार निराकाराच्या साधनांच्या अंती श्रीरामकृष्णांच्या ध्यानी आले की मार्ग कोणताही असला तरी अंतिम गंतव्य स्थान एकच असते. केवळ हिंदु परंपरेतीलच नव्हे तर इस्लाम व ख्रिश्चन धर्माच्या मार्गांनी साधना केली तरी तेच ध्येय गाठले जाते. या विश्वात्मैक्य अनुभूतीच्या अंती हे सर्व मंगल सत्य जगाला सांगण्यासाठी ''मुक्तश्च अन्यान् विमोचते' या उक्तीप्रमाणे ते ''या सत्याचा लाभ करुन घ्या रे ।'' असे जिज्ञासूंना सांगू लागले. स्वामी विवेकानंदादी सोळा अंतरंगी शिष्यांच्या हस्ते त्यांनी हा स्वानुभवाचा रत्नांचा खजिना जगाच्या हवाली केला.

साधनेचा क्रम

१) जगदंबेचे दर्शन

२) हनुमान दास्यभक्ती

३) भैरवी ब्राह्मणी – तंत्र साधना

४) वात्सल्य व मधुर भावाची साधना

५) जटाधारी – रामलीलाची मूर्ती देतो

६) मधुरभावाची साधना

७) तोतापुरींचे आगमन – अद्वैतसाधना – नंतर इस्लाम व ख्रिश्चन धर्मसाधना

**सौ. मृणाल सुहास थोरात**
एम.एससी. (स्टॅटिस्टीक्स्),
४८१, पर्वती दर्शन, फुले मॅन्शन, प्लॉट नं.२, पुणे - ४११००९
फोन : ०२०-२४४४८५०९

## 'श्रीरामकृष्ण म्हणतात' पुस्तकातून साभार

**तुम्ही भगवंताच्या जितक्या जवळ जाल तितकीच जास्त तुम्हाला शांती वाटेल. शांती, शांती, शांती, परमशांती ! तुम्ही गंगेच्या जितक्या जवळ पोहचता तितकेच तुम्हाला गार वाटते. जेव्हा तुम्ही पाण्यात बुडी मारता तेव्हा तुम्ही पूर्ण शीतल होऊन जाता.**



# श्रीरामकृष्ण परमहंस आणि भगवत गीता

**श्री. शाम रघुनाथ साखरे –** आध्यात्मिक व अन्य वाचनाची आवड. पायी प्रवासाची आवड, पंढरपूर दिंडीतून आळंदी–पंढरपूर आषाढी यात्रा तसेच श्रीअष्टविनायक यात्रा पायी पूर्ण. श्री क्षेत्र शुकताल (भागवत पीठ) येथे भागवत श्रवणासाठी १२ वेळा जाणे. काही वेळी भाविकांबरोबर. नैमिष्यारण्य, मथुरा, वृंदावन, पुष्कर येथेही भागवत श्रवण. अध्यक्ष – दासबोध अभ्यास मंडळ, मिरज, कार्यवाह – श्री नरसिंह सरस्वती पादुका शाश्वत पूजा ट्रस्ट. कार्यवाह – श्री योगीराज कल्याण स्वामी डोमगांव परांडा, श्री समर्थ सेवा मंडळ, सज्जनगड सदस्य. सामाजिक कार्याची आवड, प्रवचन व कथा कथनकार.

**उपासनेला दृढ चालवावे । भूदेव संतासि सदा नमावे ।**
**सत्कर्म योगे वय घालवावे । सर्वामुखी मंगल बोलवावे ।।**

ह्या समर्थ रामदास स्वामी यांच्या शुभ वाणीतून प्रगट झालेल्या श्लोकाप्रमाणे व्यक्तिमत्व ज्यांनी प्रकट केले ते म्हणजे कालीमातेचे निस्सीम उपासक, बंगालमधील संत, द्रष्टे म्हणजेच प. पू. रामकृष्ण परमहंस होय.

गीतेत सांगितलेल्या...

**यदा यदा हि धर्मस्य, ग्लानिर्भवती भारत ।**
**अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ।।**
**परित्राणाय साधूनां विनाशायच दुष्कृताम् ।**
**धर्मसंस्थापनार्थाय, संभवामि युगे युगे** ।। भ.गी.अ. ४.७-८

(अर्थ – ज्या ज्या वेळी धर्माचा ऱ्हास होतो आणि अधर्म माजतो त्या त्या वेळी मी स्वतः अवतार घेतो, सज्जनांचे संरक्षण, दुष्टांचा नाश आणि संतधर्माची स्थापना करण्यासाठी मी युगी युगी जन्म घेतो.)

रामकृष्ण परमहंस यांचा अवतार होण्यापूर्वी सुमारे एक हजार वर्षे सातत्याने परकीयांच्या स्वाऱ्या भारताचे स्वास्थ घालवत होत्या. संपत्ती लुटून नेणे, अन्याय, अत्याचार, बाटवाबाटवी यांनी उच्छाद मांडला होता. धर्माची अवनती होत होती. शारिरीक, मानसिक, बौद्धिक अशा सर्व प्रकारच्या आक्रमणांनी भारतीय जनता बेजार झाली होती.

अशा काळात धर्माची पुनःस्थापना करण्यासाठी श्रीरामकृष्ण परमहंस आणि स्वामी विवेकानंद या गुरु शिष्यांनी अवतार घेतला. अवकाशात ध्यानस्थ बसलेल्या सप्तर्षींपैकी स्वा. विवेकानंद हे एक होते. नरनारायणाची ही दोन रुपे आहेत. श्रीरामकृष्ण परमहंस यांना हे माहीत होते. विवेकानंद हे समाधी अवस्थेमध्ये असताना श्रीरामकृष्ण परमहंसांनी विवेकानंदांना प्रश्न विचारुन खात्री करुन घेतली होती. गीतेत भगवान श्रीकृष्ण अर्जुनास म्हणतात,

**बहूनि मे व्यतीतानि जन्मानि तव चार्जुन ।**
**तान्यहं वेद सर्वाणि न त्वं वेत्थ परंतप** ।। भ.गी.अ. ४.५

(अर्थ – हे शत्रुतापना अर्जुना, माझे आणि तुझे पुष्कळ जन्म होऊन गेले. ते सर्व मी जाणतो, तू जाणत नाहीस. त्याचप्रमाणे श्रीरामकृष्णांनाही याची जाणीव असणार.)

गुरु ही व्यक्ती नसून ते एक तत्व आहे. पांडित्य किंवा तीक्ष्णबुद्धी याच्या जोरावर आध्यात्मिक ज्ञान प्राप्ती (ब्रह्मज्ञान) होत नाही. जो ब्रह्मात्म्यैक्य अवस्थेमध्ये आरुढ आहे अशा गुरुच्या उपदेशानेच ते मिळते असे कठोपनिषदात सांगितले आहे.

परब्रह्म जाणण्यासाठी शिष्याने समिधा हाती घेऊन श्रोत्रिय व ब्रह्मनिष्ठ गुरुलाच शरण जावे असे मुंडक उपनिषद सांगते. रामकृष्ण परमहंस ब्रह्मपदाला पोहोचले होते. स्वामी विवेकानंदांनी प्रत्येक गोष्ट विचार करुन तर्कावर घासून घेऊन मगच श्रीरामकृष्णांचे शिष्यत्व पत्करले. अशीच गोष्ट थोड्या फार प्रमाणात ब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराज आणि त्यांचे शिष्य ब्रह्मानंद महाराज यांचे बाबतीत घडली आहे. ब्रह्मानंद महाराजांची खूप तपश्चर्या झाली. वेदवेदांताचा अभ्यास झाला होता. कडकडीत ब्रह्मचर्य आणि वैराग्य असलेले ब्रह्मानंद बनशंकरी देवीच्या आदेशाने गुरुशोधार्थ बाहेर पडले. खूप फिरल्यावर ब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराज यांची गाठ पडली. पण संसारी पुरुष हा आपला गुरु कसा होईल म्हणून शंका घेतली व गुरुपदाचा स्वीकार न करता परत गेले. श्रीक्षेत्र नरसोबाचीवाडी येथे दत्तगुरुचा साक्षात्कार झाला. दत्त गुरुंनी सांगितले, तू गुरुंना ओळखले नाहीस, तुझे गुरु इंदूरला आहेत. त्यांना सोडून तू इकडे का आलास ? तेव्हा ब्रह्मानंद महाराज परत इंदूरला गेले. इंदुरला आल्यावरही त्यांना शंका होती. पण इंदुरच्या मारुती मंदिरातील मारुतीने आदेश दिला. हेच तुझे गुरु आहेत. तेव्हा ब्रह्मानंद महाराजांनी गोंदवलेकर महाराजांचे शिष्यत्व स्वीकारले.

श्रीरामकृष्ण परमहंस यांचा जन्म बंगालमधील कामारपुकुर नावाच्या अगदी लहान खेड्यात दिनांक १८-२-१८३६ साली झाला. श्रीरामकृष्ण परमहंसाचे मूळ नाव गदाधर चट्टोपाध्याय होते. त्यांचे आई-वडील अत्यंत धार्मिक व सनातन वृत्तीचे ब्राह्मण होते. त्यामुळे धार्मिक व सनातन धर्माचे संस्कार त्यांचेवर मुळातूनच झाले होते.

वयाच्या चौथ्या वर्षापासूनच श्रीरामकृष्ण परमहंस यांची सहज समाधी लागत असे आणि अशा अवस्थेत ते बराच काळ राहात असत. श्रीरामकृष्ण फार कमी बोलत पण त्यांचे बोलणे तर्कशुद्ध, अध्यात्मपर, हितकारी आणि अत्यंत स्पष्ट असे. ''न क्रोधो, न च मात्यर्य न लोभो नाशुभा मतिः।'' असा त्यांच्या बोलण्याचा प्रत्यय येई.

सन १८५३ मध्ये गदाधर हे आपले वडीलभाऊ रामकुमार यांचेबरोबर कलकत्त्यास आले. एक दोन वर्षातच राणी रासमणीने रामकुमारला कलकत्त्याजवळील कालीच्या दक्षिणेश्वर मंदिराचे मुख्य पुजारी म्हणून नेमून घेतले. त्यावेळी गदाधर रामकुमारला काली मंदिरात हरप्रकारची मदत करीत होता.

**श्रेयान्स्वधर्मोविगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात ।**
**स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मा भयावहः ।।** गीता ३-३५

(अर्थ - सुखाने आचरता येणाऱ्या परधर्मापेक्षा गुणाने उणा स्वधर्मच श्रेयस्कर होय. स्वधर्मामध्ये मरण आलेले कल्याणकारक होईल. (परंतु) परधर्माचे आचरण घातक असते.

भारतात इंग्रजी साम्राज्य प्रस्थापित झाल्यावर इंग्रज राज्यकर्त्यांनी भारतीयांचा बुद्धीभेद करण्याचा अखंड प्रयत्न केला. इंग्रजी शिक्षण पद्धतीचा पाया भारतात घालून भारतीय लोकमानसात असा एक गैरसमज पक्का केला की, या देशातील शिक्षण पद्धती, चालीरिती, व्यवहार, परंपरा या अत्यंत हिणकस आणि वाईट आहेत. जे जे शिक्षण, शास्त्र, व्यवहार इंग्रज आचरतात ते ते उच्च, चांगले व सभ्यपणाचे आहे असा भास निर्माण केला. राजसत्ता प्रभावी असल्यामुळे नाईलाजाने भारतीय तशा पद्धतीचा अवलंब करु लागले. मात्र याचा सर्वांगिण अभ्यास करुन काही भारतीय समाजधुरीणांनी, राज्यकर्त्यांनी, तसेच राष्ट्रभक्तांनी त्यातील फोलपणा भारतीयांच्या लक्षात आणून दिला व समाज जागृती केली. यात श्रीरामकृष्ण परमहंस आणि विवेकानंद यांचे योगदान फार मोठे व मोलाचे होते. इंग्रजी राजवटीतील शिक्षण प्रसाराने नास्तिकत्वाकडे वळलेल्या, भयभीत झालेल्या, खरेखोट्याचे भान न राहिलेल्या आणि गोंधळलेल्या मनःस्थितीत असलेल्या भारतीयांना श्रीरामकृष्णांचा उपदेश नवचैतन्य देणारा ठरला.

**न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते ।**
**तत्स्वयं योग संसिद्धः कालेनात्मनि विन्दति ।।** गीता ४-३८

(अर्थ - ज्ञानासारखी पवित्र वस्तु ह्या जगात दुसरी कोणतीही नाही. कर्मयोगाने शुद्ध अंतःकरण झालेला पुरुष योग्यकाळी ते ज्ञान आपल्या ठायी प्राप्त करुन घेतो) हे शुद्ध, पवित्र दैवीक ज्ञान श्रीरामकृष्ण परमहंस यांनी भारतातील लोकांना पुनःप्रत्ययास आणून जागृत केले.

लोक कल्याणाची भावना, समाज उद्धारासाठीची तळमळ यामुळे श्रीरामकृष्ण परमहंस यांचा उपदेश अज्ञानी लोकांना मार्गदर्शक ठरत आहे. आपले विहित कर्म म्हणून श्रीरामकृष्ण परमहंस हे काम अत्यंत मनापासून करीत असत. सर्वांना ते सांगत सर्व धर्माच्या मुळाशी एकच तत्त्व असून ते म्हणजे सर्व प्राणीमात्रांचे ठिकाणी असलेले आत्मतत्त्व. सर्वाभूती एकच परमात्मा वास करीत असून त्याला प्रत्येक प्राणीमात्राने जाणले पाहिजे आणि त्याप्रमाणे वागले पाहिजे. मात्र अज्ञानाने व्यापल्यामुळे मनुष्य देहभावावरुन आत्मभावावर येऊ शकत नाही आणि मग तो दुःखी होतो.

**मया ततमिंद सर्व जगदव्यक्त मूर्तिना ।**
**मतस्थानि सर्वभूतानि न चाहं तेष्ववस्थितः ।।** गीता ९-४

(अर्थ - मी आपल्या अव्यक्त स्वरुपाने हे जग व्यापलें आहे. माझ्या ठायी सर्व भूतें आहेत पण मी त्याच्या ठायी नाही.)

अशा या आत्मबुद्धीवर असलेल्या महात्म्यांनी जीवभावे शिवपूजा करताना शरीराची काळजी केली नाही. श्रीरामकृष्ण परमहंस यांना घशाचा कर्करोग जडला होता. बोलताना, गिळताना त्यांना अत्यंत त्रास होत असे. त्यांना असह्य वेदना होत असत. पण त्यांच्या चेहऱ्यावर आनंद नुसता ओसंडून वाहात असे. दर्शनासाठी, उपदेश ऐकणाऱ्या भक्तगणांची गर्दी वाढतच होती. याही अवस्थेत ते सर्वांचे स्वागत आनंदाने करीत. शिष्यांनी भक्तगणांना भेटण्यास मनाई केली तर तसं न करण्याविषयी शिष्यांना ते बजावीत.

श्रीरामकृष्णांना त्यांच्या शिष्यांनी असे सुचवले की, आपण आपले सर्व लक्ष घशावरील आजारावर केंद्रीत करावे आणि आजार बरा व्हावा अशी 'आईला' विनंती करावी. आपला आजार बरा होईल कारण आपण योगी आहात. अन्य संसारी शिष्यांनीही हीच विनंती केली. श्रीरामकृष्ण परमहंस म्हणाले, ''परमेश्वराचे ठिकाणी वाहिलेले माझे मन हाडामासांच्या गलिच्छ शरीराकडे लावू काय? ते मला कसे शक्य आहे? मला बरे व्हायचे आहे पण ते आईच्या, कालीमातेच्या मनावर अवलंबून आहे.'' हे ऐकून नरेंद्रांनी त्यांना विनंती केली की, तुम्ही कालीमातेला विनंती करा की, मला लवकर बरे करा. श्रीरामकृष्ण परमहंस म्हणतात, ''माझ्या शरीरासाठी आईला, या जगन्मातेला त्रास देणे मला आवडणार नाही.''

नरेंद्र सुचवतो, ''तुमच्या शरीरासाठी नाही आमच्या शिष्य वर्गाच्या कल्याणासाठी तुम्ही शरीरानी असणे आमच्या गरजेचे आहे. आमच्यासाठी तरी कालीमातेला आळवा.'' श्रीरामकृष्ण किंचित हसले, नरेंद्रांनी केलेला युक्तीवाद त्यांच्या लक्षात आला. ते थोड्यावेळाने नरेंद्रास म्हणाले, ''मी जगन्मातेला म्हणालो, 'आई गिळताना त्रास होतो. मी खाऊ शकत नाही, पिऊही शकत नाही.' आई मला गंभीरपणाने म्हणाली, हे बघ, तिने तुमच्या सर्वांकडे बोट दाखवले. 'अरे या सगळ्यांच्या मुखाने तूच खात आहेस.' पहा विचार कर. नरेंद्रा माझी मलाच लाज वाटली रे. पुढे मी एक शब्दही बोललो नाही.''

श्रीरामकृष्ण परमहंस यांच्या आत्मबुद्धीत संपूर्ण विश्व सामावले होते. श्रीरामकृष्ण परमहंस म्हणत वेदना, आजार शरीराला होतात व होणारच पण मी त्यापासून वेगळा आहे. म्हणजेच शरीर शरीराहून भिन्न आहे हे केवळ त्यांनी जाणले नव्हते तर ते प्रत्यक्ष अनुभवत होते. गीता हेच म्हणत आहे ना.

**क्षेत्रक्षेत्रज्ञयोरेवमन्तरं ज्ञानचक्षुषा।**

**भूतप्रकृतिमोक्षं च ये विदुर्यान्ति ते परम्।।** गीता १३-३४

(अर्थ - जे ज्ञानदृष्टीने क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ या दोहोंतील भेद व अविद्यारुपी प्रकृतीचे मिथ्यात्व जाणतात ते परमश्रेष्ठ पदाला जाऊन पोहोचतात.)

हे क्षेत्र म्हणजे शरीर. हे जड विकारी व क्षणिक असून ते नाशवंत आहे. पंचमहाभूतात क्षणिक विलीन होणारे आहे. त्यात विकार उत्पन्न होणारच. ते क्षीण होत होत एक दिवस नाश पावणारच आहे. वेदना शरीराला असतात. शरीर म्हणजे क्षेत्र. हा नित्य, नूतन, चेतन, अविकारी, अविनाशी, अरुप असा असून 'मी'चे खरे स्वरुप क्षेत्रज्ञ हेच आहे.

हा क्षेत्र क्षेत्रज्ञातील फरक श्रीरामकृष्ण परमहंस जाणत होते, अनुभवत होते. अर्थात गीता ते जगत होते. श्रीरामकृष्ण म्हणत, ''सगळेजण श्रीमंताचा बगीचा नि त्यातील त्यांचा बंगला पाहूनच चकित होतात. झाडे कशी आहेत, फुले कशी आहेत, पुष्करणी कशा आहेत, दिवाणखाना कसा आहे, त्यात लावलेली चित्रे कशी आहेत हे सारे पाहूनच चकीत होतात. परंतु या साऱ्याचा जो मालक त्याला कितीजण शोधतात बरे? एखाद दुसराच त्याला शोधतो. ईश्वराला व्याकुळ होऊन शोधल्यास त्याचे दर्शन होते. त्याच्याशी बोलता चालता येते. जसा मी तुमच्याशी बोलतो आहे तसे खरे सांगतो त्याचे दर्शन होते. पांडित्याने माणसाला भुलवू शकाल. ईश्वराला भुलवू शकणार नाही.''

गीतेच्या दृष्टीने भगवान श्रीकृष्ण हा परमेश्वर आहे आणि त्यानेच निर्माण केलेल्या विश्वातील प्रत्येक पदार्थात त्याचा अंश आहे. जेथे हा अंश प्रकर्षाने, उत्कर्षाने आहे त्याला विभूती असे म्हटले आहे. जी ऐश्वर्याने युक्त, कांतीने युक्त आणि शक्तीयुक्त वस्तु आहे (म्हणजेच श्रीमंताच्या बागेतील वस्तुच होय) ती ती माझ्या तेजाच्या अंशाचीच अभिव्यक्ति आहे हे तू जाण. मात्र त्या त्या वस्तूचा शोध घेण्याऐवजी त्या मालकाचा शोध घेणारे फारच थोडे. भगवान श्रीकृष्ण अर्जुनाला हीच गोष्ट सांगताना म्हणतात, हे फार फार जाणण्याचे तुला काय प्रयोजन? (बागेतील वस्तु शोधण्याचे किंवा पाहण्याचे काय कारण?) संपूर्ण जगाला आपल्या योगशक्तीच्या केवळ एका अंशाने धारण करणाऱ्या मला जाण. मला समजून घे. (त्या बागेत श्रीमंत मालकाचे दर्शन घे. गीता १०-४२

श्रीरामकृष्ण परमहंस गीता, भागवताचे तत्त्व पूर्णपणे जगत होते. ब्रह्मपदाला पोहोचल्यामुळे सामान्यांप्रमाणे जीवनाचा उपभोग न घेता 'इदं न मम' या भूमिकेतून आपले जीवन लोकांचे कल्याणार्थच घालवीत होते. शिवाय ते सामान्य माणसात मिसळून आपले काम अत्यंत कौशल्याने करीत होते. त्यांना ते सन्मार्गाचा उपदेश करीत असत. हा उपदेश भगवत् प्राप्ती, भगवत साक्षात्कार करुन घेण्याच्या दृष्टीने होत असे. त्यांना ऐहिक जीवनाचा स्पर्शही नव्हता. वास्तविक श्रीरामकृष्ण परमहंस यांचा विवाह झाला होता. पण तरीही त्यांच्या मनाला कामवासनेचा स्पर्शही नव्हता. त्यांनी पत्नी शारदादेवी यांची देवीच्या स्वरुपात पूजा केली होती. त्यांचा संसार स्वतःपुरता नव्हता तर सर्वसंगपरित्यागी, सर्वसंकल्प विरहित आणि लोकसंग्रहमेवापि असाच होता. भगवान भगवत गीतेत म्हणतात की,

**न मां कर्माणि लिम्पन्ति न मे कर्मफले स्पृहा।**

**इति मां योऽभिजानाति कर्मभिर्न स बद्धयते।।** गीता ४-१४

(अर्थ - कर्मफळाच्या ठायी माझी इच्छा नाही म्हणून कर्मे मला बंधनकारक होऊ शकत नाहीत ह्याप्रमाणे मला जो ओळखतो तो ही कर्मांनी बद्ध होत नाही.)

रामकृष्ण परमहंस संसारात राहूनसुद्धा संसाराच्या आसक्तीपासून पूर्ण अलिप्त होते. श्रीरामकृष्ण परमहंस म्हणत, ''ईश्वराजवळ जाण्याचे अनंत मार्ग आहेत. ज्ञान, कर्म, भक्ती कोणत्याही मार्गाने जा तुमच्यात जर खरी तळमळ असेल तर यातल्या कोणत्याही मार्गाने तुम्ही ईश्वराजवळ पोहचू शकाल''.

पुढे श्रीरामकृष्ण परमहंस ज्ञानयोगाचे विश्लेषण करताना म्हणतात, ज्ञानी ब्रह्माला जाणण्याची इच्छा करीतो तो नेती नेती असा सत्‌विचार करीत असतो. 'ब्रह्मसत्य जगतमिथ्या' असा सत असत् विचार तो करतो. सत्य काय - असत्य काय ह्याचा विवेक करुन वागतो. हा विवेक विचाराच्या अंती तो समाधी अवस्थेपर्यंत जातो व त्याला ब्रह्मज्ञान होते.

श्रीरामकृष्ण परमहंस ज्ञान-विज्ञान संदर्भात सांगताना म्हणतात, ''विज्ञान म्हणजे विशेषप्रकारे जाणणे. उदा. कुणी दुधाविषयी ऐकले आहे, कुणी दूध पाहिले आहे तर कुणी दूध प्यायले आहे. ज्याने नुसते ऐकले आहे तो अज्ञानी, ज्याने पाहिले आहे तो ज्ञानी, जो दूध प्यायला आहे तो विज्ञानी. जो दूध प्यायला आहे त्याला विज्ञान झाले आहे म्हणजे त्यानेच ईश्वराला विशेषरुपाने जाणले आहे. ईश्वराचे दर्शन करुन घेऊन एखाद्या परम जिवलगासारखे त्याच्याशी बोलणे, चालणे ह्याचेच नाव विज्ञान. विज्ञान झाल्यानंतर संसारात देखील राहता येते. तेव्हा स्पष्ट अनुभव येऊ लागतो की तोच जीव जगत् झाला आहे. तो संसाराच्या बाहेर नाही.'' उदा. प्रभु रामचंद्र ज्यावेळी ज्ञानलाभानंतर म्हणू लागले की, मी संसारात राहणार नाही त्यावेळी त्यांची समजूत घालण्यासाठी दशरथाने वसिष्ठांना रामाकडे पाठवून दिले. वसिष्ठ रामांना म्हणाले, ''रामा, जर संसार ईश्वरापासून वेगळा असेल तर तू तो खुशाल सोडू शकतो. प्रभु रामचंद्र चूप बसून राहिले. ते पक्के जाणून होते की ईश्वराखेरीज या जगात काहीच नाही.''

पुढे कर्मयोगाचा विचार मांडताना श्रीरामकृष्ण परमहंस सांगतात, कर्मामधून ईश्वरावर मन जडवून ठेवणे, ईश्वराची सेवा करणे, दीन दुबळ्या लोकांची सेवा करणे म्हणजेच कर्ममार्गाचे आचरण करणे होय. संसारी माणूस आसक्ती सोडून मिळणारे फळ ईश्वराला अर्पण करुन जरी भक्तीभावाने संसारातील कामे (कर्मे) करील तर तोही कर्मयोगाचे आचरण करीत आहे.

पुढे भक्तीयोगाचे विवरण करताना श्रीरामकृष्ण परमहंस म्हणतात, ईश्वराचे गुण नाम संकीर्तन करुन त्याची भक्ती मनापासून करणे हाच भक्तीयोग होय. हा कलीयुगातील अत्यंत सोपा मार्ग आहे. थोडक्यात...

**आकाशात पतितं तोयम् यथा गच्छति सागरम् ।**
**सर्व देव नमस्कारम् केशवम् प्रति गच्छती ।।**

(अर्थ - आकाशातून पडलेले पावसाचे पाणी ओढा, नद्या, ओहोळ यांच्या माध्यमातून शेवटी सागराला जावून मिळते. त्याचप्रमाणे कुठल्याही देवाला केलेला नमस्कार, केलेली उपासना, भक्ती, योग वगैरे मनापासून केले तर केशवालाच पोहोचते. या संदर्भातील गीतेतील श्लोक आपणांस पाहता येईल.)

संत असून, सांसारिक असून, योगारुढ झालेले, ब्रह्मनिष्ठ रामकृष्णांचे हेच निराळेपण आहे असे म्हणावेसे वाटते. खऱ्या अर्थाने ते गीता जगले असून भक्तगणांना तसे आचारण करण्याची ते प्रेरणा देतात यातच त्यांचे मोठेपण सामावले आहे.

संदर्भ : १) श्रीरामकृष्ण वचनामृत, द्वितीय खंड २) विवेक विचार मासिक, जुने अंक ३) जीवन विकास मासिक, जुने अंक ४) ज्ञानगंगा ग्रंथ ५) भगवत गीता अन्वय ६) धर्मग्रंथ अंक

**श्री. शाम रघुनाथ साखरे**
सुमन निवास, खणीवरील विठ्ठल मंदिर, ब्राह्मणपुरी, मिरज-४१६४१०
फोन : ०२३३-२२२३८४३, मोबाईल : ९८५०३८०५३८



# श्रीरामकृष्ण बोधामृत

**डॉ. श्रीमती कमलाताई वैद्य**
एम. ए. पीएचडी. निवृत्त प्राध्यापक. श्रीराम चरित्रमानस मंडळाच्या माजी अध्यक्षा.
दासबोध मराठी गद्य अनुवाद. वाल्मिकी रामायण मराठी अनुवाद.
प. पू. स्वामी प्रज्ञानानंद सरस्वतींच्या शिष्या.

समाजातील धर्मग्लानी दूर करण्यासाठीच अवतारी पुरुषांचा जन्म होत असतो. अशा अवतारी पुरुषांपैकीच श्रीरामकृष्ण परमहंस आहेत. सर्वधर्मसमन्वयाच्या दिव्य संदेशाचे ते प्रणेते आहेत. त्यांचे चरित्र वाचून आणि रामकृष्ण मिशनच्या काही **प्रमुख संतांचे अनुभव वाचून त्यातून त्यांच्या उपदेशपर वचनांचे संकलन करण्याचा यथामति प्रयत्न येथे केला आहे.** अथांग सागरातील सर्वच रत्नांचा संग्रह कोणी करु म्हणेल तर ते जसे असंभवनीय आहे; तसाच हा प्रयत्नही अपूराच आहे याची पूर्ण जाणीव असूनही श्रीगुरुकृपेच्या बळावर हे धाडस करीत आहे. तरी वाचकरुपी भगवान ही सेवा गोड मानून घेतील असा विश्वास वाटतो. लेखनाच्या सोयीसाठी वर्गीकरण करण्याचा प्रयत्न केला असला तरी प्रपंच परमार्थ खरे तर एकरुपच असतात त्यामुळे सरमिसळ होणे अपरिहार्यच आहे.

**सर्वांसाठी**

१) ईश्वर असून सर्व कर्तृत्व त्याचेच आहे हे सत्य जाणून संपूर्ण शरणागती पत्करावी हेच मनुष्यास योग्य आणि हितकारक आहे म्हणून हेच आचरणात आणावे. हेच मनुष्यजन्माचे उद्देश्य आहे.

२) सदाचार आणि निष्ठा या दोन्ही गोष्टी महत्त्वाच्या आहेत.

३) प्रत्येक बाबतीत शास्त्रमर्यादा पाळली पाहिजे.

४) दुर्बलतेचा त्याग करुन बलवान व्हा. कामिनी कांचनाचा त्याग केवळ मनानेच नव्हे तर स्थूल शरीरानेही करता येतो.

५) जगाचे कल्याण माणूस करत नाही, ईश्वरच करतो.

६) सारे धर्म सत्य आहेत. सर्वच मार्गांनी ईश्वर लाभ शक्य आहे. गच्चीवर चढण्याशी काम. पक्क्या जिन्याने जा, शिडीने जा, दोरीने जा, नाहीतर गाठाळ बांबूने जा.

७) प्रत्येक जण म्हणतो माझाच मार्ग बरोबर, माझेच घड्याळ बरोबर.

८) नुसती फिलॉसॉफी म्हणजे शुद्ध लाकडे फोडणे, नुसती विचारांची कचाकची अशाने लाभ कधीच व्हायचा नाही.

**संसारी लोकांनी कसे वागावे ?**

संसारी लोकांनी नेहमीच साधुसंग करणे आवश्यक. खरे तर सर्वांनाच तो आवश्यक आहे, संन्याशांनादेखील. सुई निर्मल हवी तरच लोहचुंबक तिला आकर्षून घेतो.

परमेश्वर सर्वाठायी असतो. सर्वत्र तेच सोने असते. संसारी माणसात ते सोने मातीच्या ढिगाऱ्याखाली दबलेले असते. संसारीक माणसाच्या दृष्टीने सेवक-सेव्य भावच चांगला! मीच तो म्हणणाऱ्याला त्याच्यासह सगळेच स्वप्नवत वाटते मग तो संसारीक कामे कशी करणार? म्हणून सेवक-सेव्य भावच चांगला. ईश्वरच सारे करतो आणि करवतो हे खरे. तोच खरा कर्ता, माणूस यंत्र ! पण हेही खरेच की कर्मफळ चुकत नाहीच नाही. जहाल मिरच्या खाल्ल्या तर पोटात आग पडणारच. त्यानेच नियम करुन ठेवला आहे. पाप केले तर फळ भोगावेच लागते. ईश्वराचे दर्शन ज्याला झाले आहे त्याच्या हातून पाप घडूच शकत नाही. पट्टीचा गाणारा गायक बेताल कदापि गाऊच शकत नाही. गळा कमावला आहे त्यामुळेच गळ्यातून अचूक सूरच येणार.

**प्रश्न :** संसार कशासाठी आहे ?

**उत्तर :** संसार आहे कर्मक्षेत्र. कर्म आचरता आचरता ज्ञान होते. मनातील मळ धुतला जातो. फार विचार करीत राहणे चांगले नाही. तळ्यात वर वरच पाणी प्या चांगले स्वच्छ पाणी मिळेल. जरा खोल हात घालून हलवाहलव केली तर सर्वच पाणी गढूळ होऊन जाईल.

एखादी गोष्ट नुसती ऐकणे, पाहणे वेगळे आणि तिचा अनुभव घेणे वेगळे. ईश्वरासंबंधी ऐकले तरी त्याला पाहून त्याच्याशी संवाद साधता आला पाहिजे. भात करायचा आहे असे घोकून का भात शिजणार आहे? नुसते भांग, भांग घोकल्याने का कधी नशा चढून मजा येणार आहे? ईश्वर दोनदा हसतो भाऊ भाऊ जमिनीवरुन भांडतात तेव्हा आणि वैद्य रोग्याला म्हणतो की मी तुला बरा करील तेव्हा.

**संन्याशांनी कसे वागावे ?**

अंगी विवेक वैराग्य पाहिजे. जो गुरु तोच इष्ट होय. गुरु फक्त नीट मार्ग लावून देतात. संसारीपणाचा लेश असला तर ईश्वरदर्शन होत नाही. आगकाड्या दमट असल्या तर पेटत नाहीत. विषयासक्त मन म्हणजे ओलसर आगकाडी. थोडी जरी आसक्ती राहिली तरी भगवद्दर्शन होणार नाही. दोऱ्याला लहानसा तंतू जरी राहिला तरी तो सुईत ओवला जात

नाही. संन्याशाचे नियम म्हणजे लोखंडाचे चणे. स्त्रियांचे चित्र देखील पाहू नये. भक्तिमती असली तरी अखेर ती स्त्रीच ना? तिच्याशी घसट उपयोगी नाही. संन्यासी जितेंद्रिय असला तरी लोकसंग्रहास्तव मर्यादा पाळली पाहिजे. संभाळून प्रत्येक पाऊल टाकले पाहिजे. साधूचा बावनकशी त्याग पाहून लोक त्यागाचे धडे घेतात. नाहीतर आधीच उल्हास आणि त्यात फाल्गुनमास. संन्यासी जगद्गुरु आहे, तोच घरंगळला तर कसे? नुसते पांडित्य कुचकामाचे. एका साधुला एकाने विचारले 'तुमच्या पोथीत काय आहे?' तर सर्वत्र ओम् राम लिहिलेले!

**प्रश्न :** गीतेचे मर्म काय?

**उत्तर :** गीता दहावेळा उच्चारले की तागी म्हणजे त्यागी उच्चार होतो. गीता हेच शिकविते की सर्वस्वाला तिलांजली देऊन भगवंताच्या दर्शनासाठी प्रयत्न करा. संन्यासी असो की गृहस्थ, आसक्ती मनातून समूळ नाहीशी व्हायला हवी.

सोंगटी पटाची घरे जेव्हा फिरुन येते तेव्हाच ती पकून आपल्या घरी निजते. संसारातील सर्व लोकांची अवस्था पाहून, ऐकून, अनुभव घेऊन मग या सर्व तुच्छ असार आहेत अशी जेव्हा दृढ धारणा होते तेव्हाच साधकाला परमहंस अवस्था प्राप्त होते. तो यथार्थ ज्ञानी होतो, संन्यासी मंडळींनी ईश्वरासाठी सर्वस्वाचा त्याग केला पाहिजे. प्रखर वैराग्य अंगी बाणले पाहिजे. सर्व वासनांचा समूळ त्याग झाला तरच ईश्वर दर्शन होऊ शकते. संन्याशाच्या ठिकाणी अंतर्बाह्य दोन्ही त्याग असावे लागतात.

**कर्ममार्ग**

भगवत् चरणी अनुराग उत्पन्न होईपर्यंत पूजाअर्चा आदि कर्मकांडाची आवश्यकता असते. जोवर वारा वहात नाही तोवरच पंख्याची आवश्यकता. निष्काम कर्म करता करता भगवत् प्रेम उत्पन्न होते. जसे तुमचे भगवत् प्रेम वाढत जाईल तसे कर्म घटत जाईल. सून गर्भारशी झाली की सासू कामाचा बोजा कमी करते, जसे दिवस जातात तशी जास्त जपते. निष्काम कर्माने चित्तशुद्धी झाली की ईश्वर प्रेम उत्पन्न होते. सच्चिदानंदाचा लाभ झाल्यावर समाधी लागते. त्यावेळी कर्म समूळ गळून पडते. समजा आपण ज्या व्यक्तिविषयी बोलतो तीच व्यक्ती उपस्थित झाली तर बोलण्याची काय गरज? मधमाशी गुणगुण करते कुठवर? ती फुलावर बसत नाही तोवर! पण साधकाने मात्र सर्व साधना केली पाहिजे. वस्तुलाभानंतर कुणी तर्कवितर्क करील तर तो मधुपान करता करता चाललेला अर्धस्फुट गुंजाख होय.

**प्रश्न :** कर्म कर्म ते कुठवर?

**उत्तर :** ईश्वर लाभ होत नाही तोवर! एकदा त्याचा लाभ झाला की कर्मे गळून पडतात. पाप पुण्याच्या कक्षेबाहेर माणूस जातो. **फळ धरताच फुल झडते. फुल येत असते तेच फळ लागावे म्हणून!**

**प्रश्न :** कर्माचे महत्त्व कुठवर?

**उत्तर :** भगवंताचे नाम घेताच अंगावर रोमांच आणि डोळ्यात प्रेमाश्रू येत नाहीत, तोवर! हे सारे होणे ईश्वर लाभाचे, ईश्वराच्या ठायी शुद्ध भक्ती लाभल्याचे लक्षण होय. पवित्र झाल्याखेरीज पावित्र्य ओळखता येत नाही.

रोप लहान असते तोपर्यंत कुंपण घालावे लागते. एकदा झाड वाढून बुंधा वाढला की कुंपण नकोच. मग हत्ती आणून बांधला तरी झाड मोडायचे नाही. ईश्वर कर्ता बाकी इतर सर्व अकर्ते हेच ज्ञान. मी अकर्ता, त्याच्या हातातील यंत्र मी मुळी नाहीच, तूच तू आहेस हे ज्ञान.

जितकी मते तितके मार्ग. कोणत्याही मार्गाने जा, मार्गाच्या अंती उपासक उपास्याशी एकरुप होऊन जातो. मन आणि मुख एक करणे हेच साधन होय. ईश्वरावर पूर्ण भरवसा, विश्वास ठेवून फलाची आशा न ठेवता कर्तव्यकर्मे सद्विचारपूर्वक करीत राहणे हाच ईश्वर प्राप्तीचा मार्ग आहे. जेव्हा एकदाच हरिनाम, रामनाम घेताच शरीर रोमांचित होऊन नेत्रावाटे प्रेमाश्रु वाहू लागतात तेव्हा नक्की समजावे की संध्यावंदनादी कर्मेआता आणखी करावी लागणार नाहीत. कर्मत्यागाचा अधिकार तेव्हाच प्राप्त होतो. त्यावेळी कर्म आपण होऊनच निवृत्त होऊन जाते. त्यावेळी नुसते नाम जपले तरी चालते.

**ज्ञानमार्ग**

सुवर्णनिधी आत लपला आहे. माती बाजूला केलीत की सुगावा लागेल. एक लाकुडतोड्या होता. त्याला एक ब्रह्मचारी म्हणाला, 'पुढे जा'. प्रथम त्याला चंदनाचे बन लागले, मग रुप्याची खाण, मग सोन्याची खाण मग हिऱ्यामाणकांची खाण लागली. तसे निष्काम भावाने कर्मे केल्यास ईश्वराविषयी प्रेम उत्पन्न नंतर हळूहळू त्याच्या कृपेने त्याचे दर्शन घडते, त्याच्याशी बोलताही येते जसे आपण एकमेकांशी बोलतो तसे.!

**प्रश्न :** निराकाराचा लाभ होऊ शकतो का?

**उत्तर :** होऊ शकतो पण मार्ग फार कठीण आहे. पूर्वीचे ऋषी सारा दिवस तपश्चर्येत घालवीत. कंदमुळे, फळे खाऊन दिवस काढीत, विषयबुद्धीचा लवलेश असला तरी या मार्गात यश मिळणार नाही. शब्द, स्पर्श, रुप, रस, गंध काडीभरही नकोत. मन शुद्ध व्हायला हवे. तसे झाले की साधकाला कळते की ईश्वर कर्ता, मी अकर्ता, दुसऱ्याचे आपल्यावाचून अडणार नाही हे त्याला कळते.

एका साधुला एकदा कुणी मारले. मित्रानी त्याची काळजी घेऊन त्याला दुध पाजले. त्यांनी विचारले, 'दुध कोण पाजतो आहे?' साधुने उत्तर दिले, ज्याने मारले तोच दुध पाजतो आहे. गोष्ट नुसती माहित असून भागत नाही तशी धारणा व्हायला हवी. विषयबुद्धी संपूर्ण नाहीशी व्हावी लागते. तरच मन समाधिमग्न होते.

**देह आणि आत्मा**

देह जन्माला आला नी जाणारच. पण आत्म्याला मरण नाही. सुपारी पहा. पक्की सुपारी सालीपासून अलग होऊन जाते. पण कच्च्या अवस्थेत सुपारी आणि साल अलग करणे मोठे कठीण जाते. ईश्वरदर्शन झाल्याने देहबुद्धी लोपते. मग देह निराळा आणि आत्मा निराळा हा बोध होतो.

शास्त्रोक्त अनुभव इतर साधकांचे अनुभव, गुरुंचे अनुभव आणि स्वतःचे अनुभव यांची एकवाक्यता होणे आवश्यक आहे. कोणाचीही कुठल्याही तऱ्हेची मदत नसली तरी साधकाला केवळ आंतरिक तळमळीच्या जोरावरही ईश्वराचा लाभ करुन घेता येतो. मात्र ती व्याकुळता प्रचंड हवी. ज्ञान्यांचे कामक्रोध म्हणजे जळलेली दोरी. फक्त आकार दिसतो. फू केले की बेपत्ता.

**ब्रह्म**

ब्रह्म म्हणजे आकडा. त्याच्यावरच सारा पसारा. आकडा पुसला तर शून्याला किंमतच नाही. ब्रह्म जणू दिवा. दिवा एकच, कुणी त्याच्या प्रकाशात भागवत वाचतो तर कुणी त्याच्या उजेडात बनावट कागदपत्र तयार करतो. दिवा अलिप्तच असतो किंवा जणू सूर्य, सुष्टाला, दुष्टाला सारखाच प्रकाश देतो. सुखदुःख, पाप पुण्य सर्व जीवाच्या दृष्टीने असते. ब्रह्म त्यापासून अगदी अलिप्त असते. जगातल्या सर्व गोष्टी उष्ट्या होऊन गेल्या आहेत. उष्टी न झालेली एकच वस्तु म्हणजे ब्रह्म. ब्रह्मदर्शन होत नाही तोपर्यंतच माणूस बोलतो. ते झाले की तो चूप होऊन जातो. तुप कच्चे असते तोपर्यंत ते कडकडते. पुरे कढले की आवाज होत नाही. त्या कच्च्या तुपात पुरी पडली की परत कडकड सुरु. ती पुरी पक्की तळली गेली की परत आवाज बंद. त्याप्रमाणे समाधीमग्न पुरुष लोकांना उपदेश करण्यासाठी परत खाली येतो. परत बोलणे चालणे करतो. तळ्यातील पाण्यात कळशी बुडवली की बुडबुड आवाज होतो. एकदा कळशी भरली की आवाज बंद ! पण परत दुसऱ्या कळशीत पाणी ओतताना आवाज येतोच.

**माया**

आजीबाईचा झोळणा असतो तशी ब्रह्ममयी आई आहे. प्रलयकाली सर्व बीजे राखून ठेवते. जगात राहाते. ऊर्णनाभीप्रमाणे जाळे विणून ईश्वर स्वतःच त्यात राहतो. ईश्वरच जगाचा आधार, आधेय सर्व काही आहे.

काली काळ्या रंगाची नाही. दुरुन पाहिले की काळी दिसते. जसे दुरुन पाहिल्याने आकाश निळे दिसते. समुद्राचे पाणी लांबून निळे दिसते तसेच दोन्ही जवळून पाहिले की ते रंगरहित आहे हे कळते. आदिमायेच्या प्रभावाने जीव कामिनीकांचनाच्या तडाख्यात सापडतो आणि तिच्या दयेनेच त्यातून सुटतो.

घरात लग्नकार्य असते. घर मालक आरामात गुडगुडी ओढत बसतो. त्याची पत्नी सर्व कार्यभार संभाळते. तसे प्रकृति – मायाच सर्व उत्पत्ति, स्थिती, संहारादि करते. ब्रह्म निष्क्रिय असते.

**भक्तीमार्ग**

वैराग्याचा उदय झाल्याशिवाय खरी भक्ती उत्पन्न होत नाही सरल अंतःकरणाशिवाय भक्तिलाभ होणार नाही. देव होऊन देवासी भजावे. म्हणजे आपले आत्मस्वरुप जाणून उपासना अद्वैतभावनेने करावी. समाधी दोन प्रकारची आहे. एक निर्विकल्प आणि दुसरी भावसमाधी. 'नेति, नेति' मार्ग म्हणजे ज्ञानमार्ग. 'इति, इति' म्हणजे भक्तिमार्ग. लज्जा, घृणा, भय ही तीन असली तर ईश्वरलाभ होत नाही.

**भावसमाधी**

**प्रश्न :** भावसमाधीत काय वाटते ?

**उत्तर :** मडक्यातील मासोळी गंगेत सोडून द्यावी तसे वाटते. चैतन्यदेवांच्या किंवा श्रीरामकृष्ण परमहंसांच्या भावसमाधीमुळे तीन प्रकारच्या दशा (अवस्था) होत असत. **अंतर्दशा** – यात मन महाकारणात लीन होत असे. ही पंचकोशातील स्थिति असून हिला जड समाधी किंवा निर्विकल्प समाधी म्हणतात. या अवस्थेत ते स्तब्ध होऊन जात. **अर्धबाह्यदशा** – त्यावेळी कारण शरीरात मन लीन होते. कारण शरीर म्हणजे आनंदमय कोश. या अवस्थेत ते नृत्य करु लागते. **बाह्यदशा** – स्थूलात वा सूक्ष्मात त्यांचे मन राही. स्थूल शरीर म्हणजे अन्नमय, प्राणमय कोश आणि सूक्ष्म शरीर म्हणजे मनोमय, विज्ञानमय कोश या अवस्थेत ते नामसंकीर्तन करीत. महाभाव सिद्ध झाला तर शरीरावरील सर्व छिद्र, केसांची मुळे महायोनी होऊन जातात. प्रत्येक छिद्रासह आत्म्यासहित रमण सुखाचा अनुभव येऊ लागतो.

भावना ज्यावेळी प्रत्यक्ष उचंबळत असतात त्यावेळी काहीच लक्षात येत नाही. त्यांनी केलेल्या शारीरिक हानीची कल्पना येत नाही. मोठे जहाज गंगेतून जाते तेव्हा कळत नाही. किनाऱ्याजवळ ते येऊ लागते तेव्हा धडाधड लाटा आपटून केवढा आवाज होतो, सर्वत्र खळबळ माजते. कधी तर किनारा खचूनच जातो आणि पाण्यात पडतो. किंवा एखाद्या कुडाच्या खोपटात हत्ती शिरला तर ते जसे उलटे पालटे होऊन जाते, त्याचा धुव्वा उडतो तसा भाव हत्ती देहरुपी प्रवेश करतो तेव्हा तिची विल्हेवाट लावतो.

भगवान–भावगम्य आहेत. भक्तीरसात रसिक आहेत. भावभक्ती म्हणजे भगवंतावर अनुरक्ती. मनात भावना घोळविल्याने भावाचा उदय होतो. जसा भाव तसा लाभ. सर्वाचे मूळ आहे विश्वास. चित्त अगदी तद्‌गत झाले पाहिजे. खूप खूप प्रेम बसले पाहिजे.

**भक्तीमार्ग**

भक्त तीन प्रकारचे असतात. तमोगुणी भक्ताला वाटते की देवीला बकरा आवडतो. रजोगुणी भक्तास वाटते की मिष्टान्न, विविध भाज्या, कोशिंबरीचा नैवेद्य दाखवावा. सात्त्विक भक्त मात्र पूजेसाठी बाह्य अवडंबर माजवीत नाही. तो पूजा करतो हे देखील कोणाला कळू देत नाही. पत्र, पुष्प, जल, नैवेद्य म्हणजे लाह्या अथवा फार तर बत्तासे, कधी वाटले तर बासुंदी ही देईल! त्रिगुणातीत भक्त – त्याचा बालकासारखा स्वभाव असतो. भगवंताचे नामस्मरण हीच त्याची पूजा असते.

**डॉ. श्री. कमल बा. वैद्य**
Holy Mount, ३५, विजयनगर,
श्रीशिल्पचिंतामणी को. ऑप. हौ. सोसा.,
बानलेसवाडी, सांगली – ४१६४१४

**'श्रीरामकृष्ण म्हणतात' पुस्तकातून साभार**

**ब्रह्म आणि शक्ती अभिन्न आहेत. वस्तू एकच. जेव्हा ती निष्क्रिय असते, सृष्टि–स्थिति–प्रलयाचे कार्य करीत नाही, तेव्हा आपण तिला ब्रह्म म्हणतो आणि जेव्हा ती ही कार्ये करीत असते तेव्हा तिला शक्ती म्हणतो, काली म्हणतो.**



# मला भावलेले श्रीरामकृष्ण परमहंस

**श्री. सचिन दिपक बोरकर**
आर्किटेक्ट

**स्थापकाय च धर्मस्य सर्व धर्म स्वरुपिणे ।**
**अवतार वरिष्ठाय रामकृष्णाय ते नमः ।।**

प्रत्यक्ष आचरणाने, आपल्या दिव्य चरित्राने मानवी जीवनोन्नतीच्या मूल्यांचे प्राकट्य ज्यांनी केले आहे अशा अवतारांच्या वास्तव्याने ही भारतभूमी पुण्यभूमी झाली आहे. त्यातीलच एक 'अवतार वरिष्ठ' म्हणजे भगवान रामकृष्ण परमहंस हे होते.

**अवताराची पार्श्वभूमी :**

भारतभूमी ही पुन्हा एकदा परकीय सत्तेच्या अंमलाखाली जखडली जात होती. धर्माचरण हे शाश्वत सत्याकडील पंथ सोडून कर्मकांडात भरकटत चालले होते. त्यातूनच अनेक मतप्रवाहांचा, पंथांचा उगम होत होता व आपले प्रभुत्व सिद्ध करण्यासाठी त्यांच्यात एक वैचारिक संघर्ष उभा राहिला होता. परदेशीय धर्म सत्तेच्या पाठबळाने आपले वैचारिक श्रेष्ठत्व प्रस्थापित करुन, धर्मप्रचाराच्या सुनियोजित कारवाया करीत होते. हे कार्य इतके कुशलतेने पार पाडले जात होते की एतद्देशीय बुद्धीजीवी देखील त्यामुळे प्रज्ञाहत होऊन स्वधर्म निंदा करु लागले होते.

भारतवर्षात अशी धर्म 'ग्लानी' आलेली असतांना 'धर्मसंस्थापनेसाठी' 'गीतावचन'पूर्तीकरीत भगवान श्रीरामकृष्णांनी अवतार घेतला.

बालपणीच भावातीतावस्था प्राप्त होत असणाऱ्या गदाधरांनी उदरपरायण लौकिक विद्येचा मार्ग नाकारुन शाश्वत पराविद्येची कास धरली. त्यांच्या पराकोटीच्या भक्तीने प्रसन्न होऊन कालीमातेने त्यांना दर्शन व अनुग्रह दिला. श्रीराम व श्रीकृष्ण या पूर्वावतारांचेही त्यांना दर्शन लाभले. 'परब्रह्म' परमेश्वराची, त्याची पत्नी 'प्रकृती'रुपात, 'मधुरा'भावात त्यांनी आराधना केली. ख्रिस्ती व इस्लाम मतांचे आधारे उपासना करुन त्यांनी येशू व महमंद यांचे दर्शन प्राप्त करुन घेतले. भैरवी ब्राह्मणी व तोतापुरी महाराज यांचा अनुग्रह व दीक्षा त्यांना प्राप्त झाली. त्यांच्याकडे त्यांनी योग-वेदांताचा अभ्यास केला. अशाप्रकारे विविध मार्ग अनुसरुन त्यांनी 'एक सत्'ची प्रचिती घेतली.

श्रीज्ञानेश्वर माऊलींनी वर्णन केल्याप्रमाणे,

आणि आकाराचेनि जाले पणे । जन्मधर्मातें नेणें । आकारलोपीं निमणें । नाहीं कहीं ।। ऐशिया आपुलियाची सहज स्थिती । जया ब्रह्माची नित्यता असती । तया नाम सुभद्रापती ।। अध्यात्म गा ।। (ज्ञा. ८.१८-१९)

अशा खऱ्या अध्यात्माची ओळख मतामतांच्या गलबल्यात सापडलेल्या समाजास प्रत्यक्ष आचरणाने पटवून दिली. अध्यात्म हा पांडित्यप्रदर्शनाचा विषय नसून समत्वभावे वर्तनाचा विषय आहे हे त्यांनी दाखवून दिले.

अत्यंत तळमळीच्या भक्तीने सारे काही प्राप्त होते हे त्यांनी सप्रमाण सिद्ध केले. लौकिकदृष्ट्या जरी ते 'निरक्षर' भासत असले तरी ते खरे 'अक्षर' वेत्ते होते. एकही शास्त्रग्रंथ न वाचता ते शास्त्रग्रंथांची जिवंत मूर्तीच होते. हां गा जीवापैलीकडिलीये खुणे । जो पावोनि वावरो जाणे ।। (ज्ञा. ७.१८) असेच त्यांचे जीवन होते.

धर्मसंस्थापनेची संकल्पना विषद करताना माऊली म्हणतात, "मी अविवेकाची काजळी । फेडूनि विवेकदीप उजळी ।। (ज्ञा. ४.५४) भगवान श्रीरामकृष्णांनी समाज धर्मग्लानीत असतांना स्वआचरणाने व उपदेशाने असाच विवेकाचा दिवा प्रज्वलित केला व जीवन्मुक्तीचा मार्ग उजळून टाकला.

भगवान श्रीरामकृष्णांचे शिष्यप्रवर स्वामी विवेकानंदांनी शिकागो सर्व धर्म परिषदेत, पंथाभिमान, स्वमतान्धता आणि तज्जन्य अनर्थकारी धर्मवेड या सर्वांना काटशह देत, उदात्त सत्य अवघ्या जगासमोर जाहीरपणे प्रस्थापित करीत असतांना, "रुचींना वैचित्र्यात् ऋजुकुटिलनानापथजुषाम् । नृणाम् एको गम्यः त्वमसि पयसाम् अर्णव इव ।।" हा जो सर्वपंथ समत्वाचा सनातन सिद्धांत मांडला तो भगवान श्रीरामकृष्णांनी आयुष्यभर आचरुन सिद्ध केला होता.

आजही बहिर्गामी भौतिक विलासिता, प्रगती आणि अंतर्गामी शाश्वत शांती या दोन मार्गांच्या द्वंदात सापडलेल्या, भोवताली सर्व संपदा गोळा करतांना अंतरीचे स्वत्त्व हरवलेल्या, अध्यात्म्याचा मुखवटा घालणाऱ्यांकडून ठकविल्या गेलेल्या, स्वतःची खरी ओळख शोधू पहाणाऱ्या प्रत्येक जिज्ञासूला शाश्वत सत्याचा मार्ग प्राप्त होण्यासाठी भगवान श्रीरामकृष्णांचे अनुभवसिद्ध मार्गदर्शन अत्यंत उपयुक्त व

निकडीचे आहे.

प्रदीर्घ पारतंत्र्याच्या काळात सुनियोजित बौद्धीक आक्रमणाने 'प्रज्ञाहत' होऊन आपले कुळ, वैभव व यश विस्मृत झाल्याने स्वातंत्र्योत्तर सहा दशकानंतरही 'गुलामी'च्या मानसिकतेत जखडल्या गेलेल्या आपल्या समाजास श्रीरामकृष्णवचनामृत 'संजीवनी'ने 'आत्मबोध' प्राप्त होऊन; पूर्वसुरींनी वर्णिलेल्या –

''युवा स्यात् साधुयुवाऽध्यायकः । आशिष्ठो द्रढिष्ठो बलिष्ठः ।।
तस्येयं पृथिवी सर्वा वित्तस्य पूर्णा स्यात् । स एको मानुष आनन्द ःः।।
(तैत्तिरीय २.८.३-६)

अशा आनंदमय युगाचे अवतरण भूतलावर होवो अशी श्रीमत् भगवत् चरणी प्रार्थना करतो.

।। ओम् तत् सत् ।।

**सचिन दिपक बोरकर**
फ्लॅट नं. ६, अरविंद कॉम्प्लेक्स, (जुनी इमारत)
२५/६, हिंगणे खुर्द, नित्यानंद हॉलजवळ,
सिंहगड रोड, पुणे-४११०५१
मो. ९९७५५६८४४३



# श्रीरामकृष्ण आणि रामकृष्ण संघ

**डॉ. गो. ना. नातू**, एम.एस.सी. पीएच.डी., पुणे
विद्यापीठ रसायनशास्त्र विभागात २८ वर्षेप्राध्यापक. शिक्षण व संशोधन क्षेत्र. स्वेच्छा निवृत्ती व १९९४ पासून रामकृष्ण मठ, पुणे. दुर्बल घटकातील मुलांना शिकवणे इ. मठाच्या प्रकल्पामधून सेवा. 'विज्ञान व अध्यात्म' या विषयांची आवड. त्यामुळे 'जीवन विकास' मासिक नागपूर यात विपुल लेखन.

**स्थापकाय च धर्मस्य सर्वधर्मस्वरूपिणे ।**
**अवतारवरिष्ठाय रामकृष्णाय ते नमः ।।**

अर्थः धर्माची संस्थापना करणारे, सर्व धर्मांचे (जणू मूर्तिमंत) स्वरुप अशा अवतारश्रेष्ठ श्रीरामकृष्ण यांना नमस्कार असो.

स्वामी विवेकानंद रचित या प्रमाणमंत्रामध्ये श्रीरामकृष्णांचे चरित्र सूत्ररुपाने वर्णन केलेले आहे. श्रीरामकृष्णांनी नवा धर्म स्थापन केला का? नाही ! मग ते धर्माची स्थापना करणारे कसे? यासाठी स्वामी विवेकानंद धर्माविषयी काय म्हणतात ते पाहा... ''हे सदैव लक्षात ठेवा की धर्म हा वादविवादात नसतो, तर तो आत्मसाक्षात्कारात असतो. धर्म हा नुसत्या विद्वत्तेत नसून, तो आत्म्याशी एकरुप होण्यात आहे. श्रीरामकृष्णांची ईश्वरदर्शनाविषयी परमावधीची व्याकुळता त्यांच्या चरित्रामध्ये दिसून येते.'' ते म्हणत, ''सतीला पतीविषयी, कृपणाला धनाविषयी आणि विषयी माणसाला उपभोग्य वस्तूंविषयी जी ओढ असते, ती लक्षात घ्या. ही तीनही आकर्षणे एकत्र केली असता जितकी आकर्षणमात्रा होईल तितके आकर्षण जर भगवंताविषयी निर्माण झाले तर भगवत् लाभ घडतो.'' आपल्यासारख्या व्यावहारिक पातळीवर जगणाऱ्यांना समजावे म्हणून श्रीरामकृष्ण वरील उदाहरण देत आहेत. ईश्वराची अनुभूती होतेच होते, हेच त्यांना सांगावयाचे आहे.

सदैव ईश्वराच्याच अनुसंधानात असलेले श्रीरामकृष्ण अनुभूतीपूर्वक सांगतात की, ''ईश्वर साकारही आहे आणि निराकारही आहे. त्याचबरोबर तो साकार-निराकाराच्या पलिकडेही आहे. तो खरा काय आहे, हे त्याचे त्यालाच माहित. साधकांसाठी तो नाना भावांनी नाना रुपे धारण करुन दर्शन देतो.'' श्रीरामकृष्ण जन्मभर कालीमातेचे संतान या भावातच वावरले. अत्यंत अडाणी, अशिक्षित समाजातील स्त्री-पुरुषांपासून उच्च विद्याविभूषित लोकांपर्यंत त्यांनी सर्वांना समजेल, रुचेल, पचेल अशा भाषेमध्ये धर्माचा खरा अर्थ सांगितला. केवळ काही रीतिरिवाज पाळणे म्हणजे धर्म नाही, उत्तम वादविवाद करणे म्हणजेच धर्म नाही, तर धर्म ही पूर्णतः अनुभव घेण्याची, जगण्याची गोष्ट आहे, हे त्यांनी स्वतःच्या जीवनातून दाखविले. धर्माचा हा अर्थ त्यांच्या काळात जणूकाही लोप पावला होता. आजही, संपूर्ण भारतातसुद्धा धर्माचा एवढा विशाल दृष्टीकोनातून विचार करणारे थोडेच भेटतील.

एखादा शास्त्रीय प्रयोग ज्या प्रमाणे दाखविता येतो आणि त्यावरुन एखादा सिद्धान्त प्रस्थापित करता येतो, त्याप्रमाणे श्रीरामकृष्णांनी ईश्वरानुभूती प्राप्त होते, हे विविध प्रकारे लोकांच्यासमोर दाखवून दिले. मात्र ही केवळ अनुभूतीची प्रक्रिया असल्याने हा मार्ग ज्याचा त्याने चोखाळायचा आहे हे त्यांनी स्पष्ट केले.

ईश्वरी रचना म्हणा किंवा योगायोग म्हणा, याच काळामध्ये विज्ञानाच्या क्षेत्रात अनेक क्रांतीकारक शोध लागत गेले. त्यांचा अत्यंत थोडक्या शब्दात सारांश सांगायचा झाला तर म्हणता येईल की, हे सारे दृश्य-अदृश्य जग एकाच मुलभूत शक्तीची अनंत रुपांतरे आहेत. स्वामी विवेकानंदांचा त्या काळातील प्रसिद्ध तंत्रज्ञ-वैज्ञानिक निकोला टेस्ला यांच्याशी जो संवाद झाला त्यामध्ये उपनिषदातील हे महान सत्य ऐकून तो शास्त्रज्ञ अत्यंत प्रभावित झाला होता. ''एकम् सत् विप्रा बहुधावदन्ति ।'' हे आपल्यापैकी बहुतेकांना माहिती असलेले सत्य त्या वैज्ञानिकाला मोहित करुन गेले. आता आपणच विचार करावयास हवा की, या वैविध्यपूर्ण जगाच्या पसाऱ्याचा उगम जर एकाच शक्तीत असेल तर ईश्वर एक यावर वाद होण्याचे कारणच नाही. याच्या पुढची पायरी म्हणजे विविध धर्म हे त्या एका 'सत्या'च्या अनुभूतीसाठी केवळ विविध मार्ग होत. श्रीरामकृष्ण म्हणत, ''घरात आई बटाट्याची भाजी वेगवेगळ्या प्रकारे करीत असते - मुलाला जशी रुचेल, पचेल त्याप्रमाणे'' विविध प्रवृत्तीच्या, स्वभावाच्या लोकांना आवडेल त्याप्रमाणे त्याने ईश्वरानुभूतीसाठीची साधना त्या त्या पद्धतीने करावी.

अशा प्रकारे श्रीरामकृष्णांनी धर्मा-धर्मातील भिन्नता काढून टाकून धर्माचा खरा अर्थ सामान्य लोकांना समजेल अशा प्रकारे त्यांच्या पुढे उलगडून ठेवला. म्हणून त्यांना धर्माचे संस्थापक म्हटल्यास उचितच ठरेल. संपूर्ण जीवनभरात त्यांनी कोणत्याही धर्माला, पंथाला वा सांप्रादायाला हीन, कमी कधीच लेखलेले नाही व त्यांच्या संपर्कात आलेल्या कोणाही व्यक्तीला तसे करण्यापासून त्यांनी तर्कशुद्धतेने व प्रेमाने परावृत्त केले. म्हणूनच सर्वधर्माविषयी उदारभाव हा रामकृष्ण संघाचा कणा राहिला आहे.

**सर्वधर्मस्वरुपिणे...**

स्वामी विवेकानंदांनी हे दुसरे विशेषण श्रीरामकृष्णांसाठी योजिले आहे तेही तितकेच महत्त्वाचे आहे. श्रीरामकृष्ण यांच्या साधनाकाळामध्ये कालीमातेला आर्त हृदयाने विनवित असत की, आईने (कालीमातेने) त्यांना शुष्क, रुक्ष, ज्ञानी करु नये तर 'रस' पूर्ण ठेवावे. कालीमातेबद्दल प्रगाढ भक्ती त्यांच्या मनात प्रथमपासूनच होती. त्यांची प्रथम गुरु भैरवी ब्राह्मणी यांच्याकडून तंत्रशास्त्राच्या अंगाने, नंतर अद्वैतीसाधू तोतापुरी यांच्यापासून निर्विकल्प समाधीच्या अंगाने त्यांनी ईश्वरानुभूती प्राप्त करुन घेतली होती. पण एवढ्याने त्यांचे समाधान झाले नाही. जटाधारी नावाच्या साधूच्या मार्गदर्शनाखाली त्यांनी वात्सलभावाने रामभक्ती केली आणि रामाचे दर्शन प्राप्त केले. मधुराभक्ती करुन राधेचे दर्शन घेतले. त्याचप्रमाणे त्याकाळी बंगालमध्ये प्रचलित असलेल्या काही संप्रदायाप्रमाणे साधना करुनही त्यांना हाच साक्षात्कार झाला की अंतिम सत्य म्हणा, ईश्वर म्हणा त्याची अनुभूती कोणत्याही मार्गाने जा, एकाच प्रकारची असते.

विविध पंथ-संप्रदायांच्या उपासना पद्धतींचा हा अनुभव घेऊनसुद्धा इतर धर्मांच्या नियमांप्रमाणे साधना करण्यास ते उद्युक्त झाले. याचा अर्थ रामकृष्णांना अशा साधना करण्याची वखवख लागली होती, असा मुळीच नाही. त्यांच्या सुदीर्घ सहवासात राहून त्यांची सेवा करणारे एक शिष्य स्वामी सारदानंद याविषयी लिहितात - "... अशा रीतीने अद्वैत भावाची प्राप्ती करुन घेतल्या कारणाने ठाकुरांना (श्रीरामकृष्णांना) अपार उदारता, व्यापक नि सर्वसमावेशक दृष्टी लाभली होती. दक्षिणेश्वरच्या कालीवाडीत आणि प्रसिद्ध तीर्थांच्या ठिकाणी नाना संप्रदायाच्या जाणकार साधकांशी संबंध येऊन त्यांच्या लक्षात एक गोष्ट आली की, अशी उदारदृष्टी आणि असली सहानुभूती हे केवळ त्यांचे स्वतःचेच वैशिष्ट्य आहे.... या काळात दक्षिणेश्वरच्या कालीवाडीत राहून गोविंद राय नावाचे साधक इस्लाम धर्मातील कुराणात सांगितलेल्या पद्धतीने साधना करण्यात गढून गेले होते. त्यांची साधना, सरळ विश्वास व प्रेमाने मोहून जाऊन ठाकुरांचे मन इस्लाम धर्माकडे आकृष्ट झाले. ते विचार करु लागले की 'हाही तर ईश्वर प्राप्तीचा एक मार्ग आहे. अनंत लीलामयी आईने या मार्गानी कितीतरी लोकांना आपली श्रीपादपद्मे प्राप्त करुन धन्य केले आहे. ती ह्या मार्गाने आपल्या आश्रितांना कशारीतीने कृतार्थ करीत असते, हे बघितले पाहिजे. गोविंदांकडून दीक्षा घेऊन मी या भावाच्या साधनेत मग्न होईन.' याप्रमाणे ते इस्लाम धर्माच्या साधनेत गढून गेले."

याकाळातील श्रीरामकृष्णांच्या वर्तनाचे वर्णन करताना स्वामी सारदानंद लिहितात, ".... ते (ठाकुर) सांगत, 'मी 'अल्ला' मंत्राचा जप करीत असे. हिंदू भाव मनातून पूर्ण लोपून गेल्या कारणाने हिंदू देव देवींना प्रणाम करणे दूरच राहो, त्यांचे दर्शन घेण्याची देखील प्रवृत्ती होत नसे.' ... इस्लाम धर्माची साधना करते वेळी ठाकुरांना मुसलमान लोकांना आवडणाऱ्या खाण्याच्या गोष्टी ग्रहण करण्याची इच्छा झाली होती.... शेवटी विचार करुन मथुरानाथांनी एक मुसलमान स्वयंपाकी आणून त्याच्या सुचनांनुसार मुसलमान पद्धतीचे पदार्थ रांधवून ठाकुरांना खावू घातले होते."

विविध पद्धतीच्या साधना करताना श्रीरामकृष्ण याप्रमाणे अंतर्बाह्य बदलून जात असत. मनाची एकाग्रता, निष्ठा, श्रद्धा यामुळे अगदी थोड्या दिवसात ते ईश्वर साक्षात्काराची अवस्था प्राप्त करु शकत. याप्रमाणे त्यांनी इस्लाम, ख्रिश्चन व इतरही धर्मांची साधना करुन 'ईश्वर प्राप्ती हाच मानवी जीवनाचा उद्देश होय' यामतावर ते आले. सारदानंद लिहितात, "अंतःपर धर्मविषयी एकांगी वृत्ती इतरांच्या ठायी आढळतातच. त्यांच्या हृदयावर भयंकर आघात होऊन ती तसली हीन वृत्ती दूर करण्याचा ते सर्वतोपरी प्रयत्न करीत." या त्यांच्या वागण्याचा त्यांच्या काळातही खूप गवगवा झाला होता. त्यांना विक्षिप्तच नव्हे तर मनोरुग्ण म्हणण्यापर्यंत समकालीनांची मजल गेली होती. काही मोजक्या व्यक्तीच रामकृष्णांच्या अशा विविध साधनामागचा गूढ अर्थ समजू शकल्या. अगदी सूत्ररुपाने त्यामागील अर्थ आता सांगता येईल. -

१) विविध पंथ, संप्रदाय यांनी प्रवर्तित केलेले मार्ग वैध आहेत. २) प्रत्येक मार्गाचे अनुशीलन हे श्रद्धापूर्वक निःस्वार्थपणे, सर्वभूतहिताच्या भावनेतून आणि ईश्वरानुभूतीच्या उद्देशाने करावयास हवे. ३) कोणत्याही मार्गाने साधना केली तरीही अंतिम अनुभूती एकच असते. ४) कोणताही एक मार्ग अवलंबताना दुसऱ्या कोणत्याही मार्गाला हीन वा कमी लेखूच नये. साधक सारे समान!

या साऱ्यांचा परिणाम स्वरुप त्यांनी "जतो मत ततो पथ" म्हणजे "जितकी मते तितके मार्ग" हे सूत्र अनेकवार उद्घोषित केले आहे.

रामकृष्ण संघाची उभारणी करताना स्वामी विवेकानंद यांनी हिंदू तत्वज्ञान, श्रीरामकृष्ण प्रणित शिकवण त्याचबरोबर इतर धर्मग्रंथ व शास्त्राचाही अभ्यास करण्याचा पाया घालून ठेवला आहे. त्यामुळेच रामकृष्ण संघ म्हणजे वेगळा पंथ वा संप्रदाय असे स्वरुप आजही आलेले नाही. स्वामी विवेकानंदांच्या शब्दात सांगायचे तर पहा - "आमच्याच गुरुची सर्वांनी उपासना केली पाहिजे, असे आमच्या गुरुबंधूंपैकी कोणीही सांगितले नाही. ही गोष्ट कालत्रयीही घडणार नाही.... आज या संघात दहा लोक, दहा भिन्न मते बाळगून देखील एका ठिकाणी अपूर्व सलोख्याने राहत आहेत. आम्ही प्रत्येक धर्म सत्य मानतो. वैयक्तिक व सामाजिक जीवनात धर्म परिणामकारक व्हावा, असे वाटत असेल तर त्यामुळे संकुचित संप्रदाय निर्माण होणार नाहीत, याची आपण अवश्य खबरदारी घेतली पाहिजे. यासाठीच जणू एक 'असांप्रदायिक संप्रदाय' तयार झाला पाहिजे. यामध्ये संप्रदायाचे सारे फायदे राहतीलच आणि त्याचबरोबर त्यात सार्वजनिन धर्माचा, विश्वधर्माचा, उदार, व्यापक भावदेखील राहिल."

**अवतारवरिष्ठाय -**

स्वामी विवेकानंदांनी हे तिसरे विशेषण रामकृष्णांसाठी योजिले आहे. त्यामध्येही विशेष अर्थ भरला आहे. अवतार म्हणजे काय? कुणाला अवतार म्हणावे? याविषयी भगवंत गीतेमध्ये सांगतात - "यदा यदा हि धर्मस्य, ग्लानिर्भवती भारत । अभ्युत्थमानमधर्मस्य, तदात्मानं सृजाम्यहम् ।। ४-७

"ज्या ज्या वेळी धर्माचा खरा अर्थ विसरला जातो, त्यावेळी ईश्वर

स्वतः धरेवर जन्म घेतो आणि धर्माचे सत्य स्वरुप प्रस्थापित करतो.''

याचाच अर्थ असा की, धर्माला आलेले संकुचित स्वरुप दूर सारुन त्याचे विश्वात्मक स्वरुप तो जगाला स्वतःच्या जीवनाद्वारे पुन्हा उलगडून दाखवतो, तो अवतार होय व तोच अनादि अनंत ईश्वराचे सगुण रुप होय.

रामकृष्णांच्या वेळी खरोखरच अशी धर्मग्लानी निर्माण झाली होती का?

एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धातच सर्व भारत ब्रिटिशांच्या आधिपत्याखाली आला होता. पाश्चात्यांचे भोगवादी तत्त्वज्ञान, त्यांचा जडवाद आणि त्याला आधार असे भौतिक विज्ञान अशा सैनिकी, सांस्कृतिक व शैक्षणिक आक्रमणामुळे भारतीय लोक श्रद्धा, परंपरा यापासून दूर जाऊ लागले. भारतीय धर्म व तत्त्वज्ञानाचा विकृत अर्थ होऊ लागला. त्याचे सत्य स्वरुप समजेनासे झाले. अशा गोंधळलेल्या व स्वत्व हरवलेल्या समाजाला जागे करण्याची आवश्यकता निर्माण झाली. याचवेळी श्रीरामकृष्णांचा जन्म झाला. (१७ फेब्रुवारी १८३६)

अवताराचे दुसरे व्यवच्छेदक लक्षण म्हणजे 'दिव्यभाव'. रामकृष्णांचे संपूर्ण जीवन अशा दिव्य भावाने भरुन गेल्याचे दिसते. त्यांनी सतत बारा वर्षे वेगवेगळे पंथ, संप्रदाय, धर्म त्या त्या पद्धतीने उपासना करुन उच्च आत्मानुभूती प्राप्त करुन घेतली होती. या ठोस पायावर उभे राहून त्यांनी 'जितकी मते तितके मार्ग' हे अभिनव तत्व लोककल्याणार्थ घोषित केले.

स्वामी विवेकानंद प्रभृती श्रीरामकृष्णांचे सोळा संन्यासी शिष्य आणि अनेकानेक गृहस्थी शिष्यच नव्हे तर रवींद्रनाथ टागोर, महात्मा गांधी, योगी अरविंद असे भारतीय तत्त्वशिरोमणी आणि मॅक्समुल्लर, रोमा रोलाँ, अर्नोल्ड टॉयजी असे पाश्चात्य तत्त्वज्ञही रामकृष्णांच्या अद्‌भूत जीवनाने आणि गहन तत्त्वज्ञान स्वतःच्या जीवनाद्वारे प्रकट करण्याच्या त्यांच्या लीलेने मुग्ध झाले. कोणाचाही भाव नष्ट न करता जो जिथे असेल तेथून त्याला मानवी जीवनाच्या परम ध्येयापर्यंत जाण्यासाठी त्याचे उन्नयन करण्याचे अद्‌भूत कार्य त्यांनी करुन दाखविले.

अवतारांच्या जन्मासंबंधी अध्यात्मशास्त्र सांगते की, ईश्वर धरतीवर जन्म घेतो तो त्याच्या स्वयंप्रेरणेने. इतर सामान्य मानवांप्रमाणे पूर्ण कर्मांचे फलित भोगण्यासाठी किंवा वासनक्षय होण्यासाठी नाही. श्रीरामकृष्ण व त्यांच्या लीलासहधर्मिणी श्रीसारदादेवी यांच्या जीवन व कार्याकडे पाहता ते अवतारी महात्मे आहेत असेच म्हणावे लागेल.

'अवतारवरिष्ठाय' म्हणून श्रीरामकृष्णांचा विचार करताना एक महनीय आणि आजपर्यंतच्या अवतारांमध्ये जवळजवळ न दिसलेला वेगळा आविष्कार म्हणजे श्रीरामकृष्णांचे दांपत्य जीवन! श्रीरामकृष्ण व श्रीसारदादेवी यांच्या लीलासहधर्माचे जे दिव्य नाते आपणास दिसून येते ते चकित करणारे आहे. आपल्या अवतारकार्याच्या पूर्तीमध्ये त्यांनी त्यांच्या धर्मपत्नीला अगदी नियोजनबद्ध रीतीने सहभागी करुन घेतले. इतर अनेक अवतारांमध्ये असे घडलेले दिसून येत नाही. श्रीसारदादेवीही अवतारवरिष्ठाय रामकृष्णांच्या तोडीच्या होत्या हे वेगळे सांगावयास नको. स्वतः श्रीरामकृष्ण त्यांच्याविषयी बोलताना म्हणाले होते, ''अरे एक वेळ मी रागावलो तरी चालेल, परंतु त्या रागावल्या तर ब्रह्मा, विष्णू, महेशही तुला वाचवू शकणार नाहीत.'' स्वामी विवेकानंदांनीही एका पत्रातून गुरुबंधूंना लिहिले होते, ''माताजी कोण आहेत, हे तुम्हा लोकांना अजून कळलेले दिसत नाही. पुढे हळूहळू कळेल. भगवतीच्या महाशक्तीचं पुनरुज्जीवन करण्यासाठीच माताजींचा जन्म!''

श्रीरामकृष्णांनी श्रीसारदादेवींची देवीभावाने पूजा करुन स्वतःच्या सर्व साधनांचे फळ त्यांना अर्पण केले होते. ते दोघे जीवनभर एकमेकांशी अशरीरी संबंधानेच वावरली. लौकिकदृष्ट्या श्रीरामकृष्णांनी सामाजिक, व्यावहारिक, आध्यात्मिक असे प्रशिक्षण श्रीसारदेवींना दिले असे आपल्याला दिसले तरी ते सर्व तत्क्षणी ग्रहण होण्याइतकी माताजींची सिद्धता होती, यावरुनच हे दांपत्य म्हणजे देहाच्या मर्यादांमध्ये वावरणारी ईश्वरी शक्तीच होती, हे श्रद्धावान वाचक मनोमनी समजू शकतील. श्रीरामकृष्णांच्या महासमाधीनंतर चौतीस वर्षे श्रीमाताजींनी श्रीरामकृष्णांचा शिष्यपरिवार, संसारी भक्त, रामकृष्ण संघ आणि संघाशी संबंधित देशी-विदेशी भक्त यावर कृपा व त्यांना मार्गदर्शन केले आहे. श्रीरामकृष्णांनी कलियुगासाठी 'भक्ती' व 'शिवज्ञानाने जीवसेवा' हा संदेश दिला व श्रीसारदादेवींनी तो चौतीस वर्षे आचरुन दाखविला.

गीतेत म्हटले आहे की, ईश्वरानेच जगत् कल्याणासाठी देहधारण करुन मार्गदर्शन करत असते. मग याला ओळखायचे कसे? त्यामध्ये कोणत्या गुणांचा प्रकर्षाने विकास झालेला दिसतो? अवतार किती आहेत? वा झाले?

आपल्याला श्रीविष्णुंचे दहा अवतार माहीत आहेत. शिवाय विष्णुपुराणात चोवीस अवतार म्हटले आहेत. जातक कथांमध्ये भगवान बुद्धांचे कितीतरी अवतार वर्णन केले आहेत. तद्वतच शंकर, गणपती, देवी या देवदेवतांच्या अवतारांच्याही कथा प्रचलित आहेत. थोडक्यात सांगायचे तर जेथे पूर्ण निस्वार्थता, वासनाहीनता, दीन-दुःखितांना मदत करण्याची वृत्ती, सहनशीलता, शांती व क्षमा दिसते, तेथे ईश्वराची शक्ती आविर्भूत आहे, असे समजावे. हा मापदंड लावायचा तर सर्व संत हे अवतारच मानावे लागतील. ते एका अर्थी खरेही आहे. पण श्रीरामकृष्ण म्हणत त्याप्रमाणे ती ईश्वरी शक्ती कोठे अंशाने तर कोठे पूर्णत्वाने प्रकाशते. स्वामी विवेकानंद स्वानुभूतीने आणि स्वतःच्या गुरुंशी अनेकवार कठोर परीक्षा घेऊन म्हणतात, ''श्रीरामकृष्ण ईश्वराचा अवतार होते यात मला लवमात्र संदेह नाही.''

अशा श्रीरामकृष्णांनी घडविलेल्या सोळा शिष्यवरांनी एकत्र येऊन रामकृष्ण संघ प्रस्थापित केला. श्रीसारदा देवींनी अपार कष्ट सोसून संघाचा पाया, कार्यपद्धती आणि जडणघडण भक्कम केली.

**रामकृष्ण संघ....**

स्वामी विवेकानंद अमेरिका आणि युरोपच्या दौऱ्यावरुन भारतात परतल्यानंतर त्यांनी रामकृष्ण संघाच्या स्थापनेची घोषणा १ मे १८९७ रोजी केली. ऐतिहासिकदृष्ट्या जरी संघाची स्थापना या दिवशी झाली तरी या घटनेचे मूळ शोधू गेल्यास तीन प्रसंगाचा उल्लेख करावा लागेल.

१) नरेंद्रनाथ दत्त (पुढे स्वामी विवेकानंद) श्रीरामकृष्णांच्या संपर्कात येऊ लागल्याला दीड - दोन वर्षेझाली होती. अधून मधून शनिवारी - रविवारी हा युवक दक्षिणेश्वरी श्रीरामकृष्णांच्या चरणी येऊन बसत असे. १८८४ सालच्या एकेदिवशी भावसमाधीतून जागृत अवस्थेत येता येता श्रीरामकृष्ण उद्गारले, ''जगत्संसार कृष्णाचाच ही गोष्ट ह्दयात धारण करुन सगळ्या जीवावर दया....'' असे म्हणून पुन्हा समाधीमग्न होऊन गेले. समाधी भंग झाल्यावर बोलू लागले, ''... जीवावर दया? छी! छी! तू जीवावर दया दाखविणार? दया करणारा तू कोण? दया नाही... शिवज्ञानाने जीव सेवा!'' हे ऐकूण नरेंद्र मुग्ध होऊन गेला. बोलणे संपल्यावर बाहेर येऊन हा युवक म्हणाला, ''ठाकुर आज भाववेषात जे बोलले त्यावरुन कळू शकते... वनातला वेदान्त घरात आणता येतो.... भगवान जर संधी देतील तर हे आश्चर्यकारक सत्य जगात सर्वत्र प्रसारित करीन....'' पुढे स्वामी विवेकानंद झालेल्या या नरेंद्राने आजन्म हेच कार्य केले. त्यातूनच श्रीरामकृष्ण संघाच्या कार्यक्षेत्राचा विकास झाला.

२) ही गोष्ट आहे १८८६ सालची, काशीपूर उद्यानगृहामध्ये श्रीरामकृष्णांच्या लीलासंवरणाच्या आधी काही महिने! त्यांचे एक शिष्य स्वामी अद्वैतानंद (त्यावेळचे बुढोगोपाल!) तीर्थयात्रा करुन आले होते. त्यांच्या मनात संन्याशांना नवी भगवी वस्त्रे, रुद्राक्षमाळा इत्यादी वस्तू दान करायच्या होत्या. तसा मानस त्यांनी श्रीरामकृष्णांच्यापुढे व्यक्त करताच ते म्हणाले, ''या तरुण मुलांपेक्षा अधिक उच्च प्रकारचे त्यागी विरागी साधू कोठून मिळणार?'' असे म्हणून त्यांनी त्यावस्तू नरेंद्र (स्वामी विवेकानंद), राखाल (स्वामी ब्रह्मानंद), योगिंद्र (स्वामी योगानंद), बाबूराम (स्वामी प्रेमानंद), निरंजन (स्वामी निरंजनानंद), तारक (स्वामी शिवानंद), शरत (स्वामी सारदानंद), शशी (स्वामी रामकृष्णानंद), गोपाल (स्वामी अद्वैतानंद), काली (स्वामी अभेदानंद) व लाटू (स्वामी अद्भूतानंद) यांना वाटून टाकल्या. याचक्षणी रामकृष्ण संघातील संन्याशांचे संघटन झाले असे म्हणता येईल, नाही का?

३) श्रीरामकृष्णांच्या महासमाधीनंतर त्यांचे संन्याशी शिष्य तपश्चर्या व तीर्थक्षेत्री यात्रेच्या निमित्ताने चारी दिशांना पांगले. श्रीसारदादेवी देखील तिर्थयात्रेसाठी बाहेर पडल्या. १८६० साली त्यांनी बुद्धगयेला भेट दिली. तेथील बौद्ध भिक्षुंचे मठ, निवासस्थाने, खाण्यापिण्याच्या सोयी पाहून श्रीसारदा देवींना आपल्या संन्याशी पुत्रांची तीव्रतेने आठवण झाली. त्यांनी कळवळून श्रीरामकृष्णांची प्रार्थना केली, '.... तुमच्या नावाने सर्व संघ परित्याग केलेल्या माझ्या बाळांनी दारोदार भिक्षा मागत फिराव हे मला पाहवत नाही.... त्यांना अन्न वस्त्रांची ददात रहाणार नाही असे करा. मग त्यांच्या भोवती संसारतापानं पोळलेली माणसं गोळा होतील आणि तुमची शिकवण ऐकूण शांती पावतील....' मठासाठी माताजींची काय आणि किती तळमळ होती हे या प्रार्थनेवरुन दिसून येते. त्यांच्या अंतर्दृष्टीने मठाचे आदर्श आणि भविष्यातील कार्यप्रणालीचा प्रकाश त्यांनी पाहिला होता. प्रथम रामकृष्णांच्या त्यागी व संन्यस्थ शिष्यांनी एकत्र येऊन त्यांच्या आदर्शानुसार स्वतःचे जीवन घडविणे व दुसरे म्हणजे संसारतापदग्ध लोकांना शांती देण्यासाठी श्रीरामकृष्ण भावधारेचा प्रचार करणे. स्वामी विवेकानंदांनी नंतरच्या काळात ''आत्मनो मोक्षार्थ जगद्धितायच'' - ''स्वतःची मुक्ती आणि जगताचे कल्याण'' हा युग मंत्र या संघटनेला देऊन ज्या आदर्शाची घोषणा केली त्याचे बीज माताजींच्या वरील प्रार्थनेमध्ये दडलेले आहे.

मठाने केवळ अध्यात्मिक कामच केले पाहिजे असे स्वामीजींनाही वाटत नव्हते. स्वामी शुद्धानंद यांना लिहिलेल्या एका पत्रात ते म्हणतात, ''रसायनशास्त्र आणि पदार्थविज्ञानशास्त्र यांच्या उपकरणांचा संच प्राप्त करावा. त्या दोन्ही शास्त्रांचे आणि विशेषतः शरीर शास्त्राचे प्रारंभिक आणि प्रात्यक्षिक वर्ग सुरु करावेत..... आपण आताच एकाचवेळी तीन महंताची निवड केली पाहिजे. एकाने व्यवहारीक, दुसऱ्याने अध्यात्मिक आणि तिसऱ्याने बौद्धिक असे विभाग सांगाळावेत....'' यावरुन स्वामीजींना अशा तीन स्वतंत्र स्तरांवर कार्य व्हावे असे वाटत होते, हे लक्षात येते. आज पाहू गेल्यास रामकृष्ण संघामध्ये विविध विद्या शाखांमधील उच्च विद्याविभूषीत युवक प्रवेश घेऊन संन्याशी म्हणून कार्यरत आहेत. यावरुन स्वामीजींचा द्रष्टेपणा यथार्थ आहे हे जाणवल्याशिवाय राहत नाही.

मठाचे बोधचिन्ह काय असावे? घटना व मार्गदर्शक तत्त्वे कोणती? संघ कार्यासाठी कोणती पथ्ये पाळावीत? साधू व ब्रह्मचार्यांचे शिक्षण व प्रशिक्षण कशा तऱ्हेचे असावे? गृहस्थ व संन्याशी यांचे परस्पर संबंध व कार्यप्रणाली कशी असावी? हिशोब कसा ठेवावा? जनसंपर्क कसा असावा? व्यक्तीनिरपेक्षपणे संघकार्य चालू रहावे म्हणून काय करावे? अशा अनेक बारकाव्यांसह स्वामी विवेकानंदानी घटना तयार करुन संघाचा पाया प्रथम पासूनच भक्कम करुन ठेवला आहे.

स्वामीजींच्या मतांप्रमाणेच शिक्षण, वैद्यकीय सेवा आणि आपत्कालिन सेवा अशा तीन आघाड्यावर रामकृष्ण संघाचे संन्याशी व गृहस्थ कार्यकर्ते काम करतात.

संन्याशी असो की गृहस्थी असो, व्यक्ती तितक्या प्रकृति हे वचन खरेच आहे. मानवी जीवनाचे एकमेव चरमध्येय म्हणजे ईश्वरप्राप्ती हे होय. त्यासाठी कर्म, ज्ञान, भक्ती आणि योग असे चार महामार्ग सर्वांसाठी उपलब्ध आहे. दैनंदिन पूजापाठ, उत्सव, श्रीकृष्ण जन्माष्टमी, रामनवमी, नवरात्र, बुद्धपौर्णिमा, ख्रिस्त जयंती इत्यादी गोष्टी भक्तीमान साधकांसाठी उपयुक्त ठरतात. ब्रह्मसूत्रे, गीता, उपनिषदे आदीवरील टीका ग्रंथांचा अभ्यास, चिंतन व चर्चा ज्ञानमार्गी साधक अधिक पसंत करतात. वैद्यकीय सेवा, दीन-दलित, गरीब मुलांसाठी शिक्षणवर्ग, शाळा, कॉलेजेस, अनाथ विद्यार्थीगृहे, गरीब शिकाऊ मुलांसाठी हॉस्टेल्स्, नैसर्गिक आपत्ती, पीडितांसाठी मदत कार्य इत्यादी कामे कर्ममार्गी साधक निःस्वार्थपणे करत असतात. यासर्व कार्यामध्ये गृही, भक्त, संन्यासी प्रमुखांच्या मार्गदर्शनाखाली विविध उपक्रम राबवीत असतात.

महाराष्ट्रावर आलेले भूकंपाचे संकट अजूनही अंगावर काटा आणते. लातूर व परिसरात पाच भूकंपपीडित गावांचे पुनर्वसन रामकृष्ण

संघांने अंगावर घेऊन पूर्ण केले. २००५ साली कोकणामध्ये अतिवृष्टीने हाहाकार उडाला त्याहीवेळी चिपळून परिसरात मदत वाटप आणि गृहनिर्माणाची कामे मठातर्फे करण्यात आली. रामकृष्ण मठाची सर्वच कामे, धर्म, जात-पात, लिंग निरपेक्ष केली जातात. हे वेगळे सांगायलाच नको. देशातही अनेक ठिकाणी दरवर्षी पूरपरिस्थितीमध्ये मदत कार्य केली जातात.

भारतात रामकृष्ण संघाच्या १४३ शाखा कार्यरत आहेत तर जगातील इतर १८ देशांमध्ये ४५ शाखा कार्य करीत आहेत.

**रामकृष्ण संघाचे शैक्षणिक क्षेत्रातील कार्य**

पूर्वप्राथमिक, प्राथमिक, माध्यमिक असे शालेय शिक्षणाचे टप्पे आहेत. पदवी, पदवीका, पदवीका शिक्षण, व्यवसायिक शिक्षण असे शालेय शिक्षणा नंतरचे टप्पे असे ढोबळपणे शिक्षणाचे भाग करता येतील.

रामकृष्ण संघातर्फे भारतात एकूण २३१ पूर्व प्राथमिक शाळा, (१२५३६), १७८ सर्व साधारण मुलांसाठी शाळा (७३५०९), १० रात्रशाळा (५००), २ अंध आणि विकलांग मुलांसाठी शाळा (२८५), १० पदवी महाविदयालये (८९००), १ पॉलिटेक्निक पदविका महाविद्यालय (२९००), ६३ व्यवसाय शिक्षण (१०६००) संस्था चालविल्या जातात. नोकरी करुन शिकणाऱ्या मुलांसाठी १० रात्रशाळा (५००) आणि ४८८ शिकवणी केंद्रातून (७९६००) शिक्षण प्रसार करण्यात येते. दुर्गम व अदिवासी भागात २५ शाळांमधून सुमारे (२१५००) मुले-मुली शिक्षण घेत आहे. (कंसातील आकडे मुलांमुलींची २००७ सालातील संख्या दर्शवितात). बांगला देश, श्रीलंका, सिंगापूर, दक्षिण अफ्रिका व फिजी या ही देशातील हजारो मुले त्या त्या देशातील रामकृष्ण संघ संचालित शाळांमधून शिक्षण घेत आहेत.

**रामकृष्ण संघाचे वैद्यकिय क्षेत्रातील कार्य**

आरोग्य हा जगातील सर्वच देशांमधील जनतेचा महत्त्वाचा प्रश्न असतो. भारतामध्ये रामकृष्ण संघ संचालित सर्व आधुनिक उपचार पद्धतींनी युक्त अशी १५ हॉस्पिटल्स् असून २००७ साली एकूण ३२,४७,४१ रुग्णांनी उपचार घेतले. तत्पर व विनम्र सेवा आणि अल्पदर यामुळे गोरगरिबांना ही रुग्णालये म्हणजे वरदान वाटतात. याव्यतिरिक्त विविध शाखांमधून चालणारे १२१ दवाखाने आणि दुर्गम व पहाडी भागासाठी ५२ फिरती रुग्णालये याद्वारे ॲलोपॅथीक आणि होमिओपथी पद्धतीनी उपचार केले जातात. त्यामधून भारतातील एकूण ५२ लाख रुग्णांवर (२००७ या एका वर्षात) उपचार करण्यात आले.

याव्यतिरिक्त ७ नर्सिंग कॉलेजमधून सुमारे ५०० जणांनी २००७ साली अभ्यासक्रम पूर्ण केला. संगणक (कॉम्प्युटर) शिक्षण हा आता शिक्षणाचा अविभाज्य घटक बनला आहे. देशात रामकृष्ण संघाच्या ११ शाखांमधून हा शिक्षणक्रम राबविला जातो व २००७ साली त्यामधून ५,५०० विद्यार्थी-विद्यार्थीनींनी प्रमाणपत्र मिळविले.

रामकृष्ण संघाची आपत्कालीन सेवा कार्ये

स्वामी विवेकानंदांनी मठस्थापना केल्यापासून आपत्कालीन सेवा विभागाचे कार्य केले. १८९७-९८ सालची प्लेगची साथ हे प्रारंभीचे उदाहरण. आता त्या विभागाला निश्चित असे स्वरुप आले असून रोगराई, पूर, अवर्षण, अतिवृष्टी अशा संकटांना तोंड देण्यासाठी मठाच्या कोणत्याही शाखेत काही तासांमध्ये कार्यकर्त्यांची फळी साधन सामग्रीनीशी उभी राहते. दंगलपीडित, अतिवृष्टी, अवर्षण, वादळे इत्यादींनी त्रस्त अशा २०२७ गावांतून राहणाऱ्या सुमारे ५,६७,००० लोकांनी मठाच्या या सेवांचा लाभ २००७ साली घेतला आहे. बांगला देश, श्रीलंका या देशातील पूरग्रस्त आणि अराजक स्थितीतील व विस्थापित लोकांनाही तेथील रामकृष्ण संघाच्या सेवांचा लाभ मिळत असतो.

**समारोप**

'आत्मनो मोक्षार्थ जगत् हिताय च' या ब्रीदवाक्याला अनुसरुन मठ व मिशनची कार्य संन्याशांबरोबरीने सेवाभावी वृत्तीच्या गृही भक्तांकडून संपन्न होत असतात. दरिद्री नारायणाची सेवा अशा पद्धतीने केली जाते की त्याद्वारे आपल्या मनाची स्वार्थ, अहंकार, शुद्रता, मोह, मत्सर अशा दुर्गुणांपासून सुटका होते आणि ईश्वर लाभ या मानवी जन्माच्या एकमेव ध्येयाच्या पथावर अग्रेसर होतो. त्यासाठी या मठाचे द्वार सर्वांना खुले आहे. कोणाही पांथस्थाला हे स्थान जणू म्हणते,

**''मोह जाळूनी येऊन बसले येथे सारे यती ।**

**शिवभावाने सेवा करण्या कटिबद्धची हे व्रती ।।**

**आश्रय कोठे मिळेल तुजला, मायिक ही दुनिया ।**

**ये पान्थस्था येई येथे विशाल रे छाया ।।**

संदर्भ :


१) 'स्तवनांजलि' रामकृष्ण मठ, नागपूर पृष्ठ १११ (२००८)

२) 'विवेकवाणी' रामकृष्ण मठ, नागपूर पृष्ठ ५५ (२००२)

३) 'अमृतवाणी' रामकृष्ण मठ, नागपूर पृष्ठ १३ (१९९२)

४) संदर्भ ३ पृष्ठ १९९

५) 'A brief History and Time' - Stephen Hawkings

६) 'श्रीरामकृष्णलीलाप्रसंग' स्वा. सारदानंद, रामकृष्ण मठ, नागपूर, ५वी आवृत्ती, पृष्ठ २८०-२८१ (१९९८)

७) 'स्वामी विवेकानंदांची पत्रे' रामकृष्ण मठ, नागपूर पृष्ठ १११, ११३ सहावी आवृत्ती (२०००)

८) 'जन्मजन्मातरेर माँ' संपा. श्रीसारदा मठ दक्षिणेश्वर, कोलकत्ता (२००४)



**डॉ. गो. ना. नातू**

ए/१२, अनुबंध सोसायटी, रामकृष्ण मठाजवळ,

पुणे - ४११०३०

फोन : ०२०-२४३२१९७२